# ज्ञानोदय लेखनसारसूची, खंड पहिला : भाग दुसरा. (जाने. १८५१ ते डिसेंबर १८५७)

प्रमुख संपादक डॉ. गंगाधर ना. मोरजे

संपादन साहाय्यक प्रा. सौ. पद्मा मोरजे संशोधन साहाय्यक डॉ. स. बा. मुळे

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मंत्रालय, मुंबई–४०० ०३२.

आलोचना प्रस्थान मुंबई द्वारा अहमदनगर कॉलेज संचलित
ज्ञानोदय लेखनसारसूची प्रकल्प



प्रस्तुत प्रकल्पाला भा. पां. हिवाळे एज्युकेशन संस्थेचे अहमदनगर कॉलेज व महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, यांनी आर्थिक साहाय्य दिलेले आहे. आलोचना प्रस्थान व प्रा. वसंत दावतर, यांचे मौलिक मार्गदर्शन प्रकल्पाला लाभले आहे.

## निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने दुर्मिळ साहित्याचे संपादन व संकलन करून ते प्रकाशित करण्याची योजना हाती घेतली आहे. महानुभाव वाङ्मय, सत्यशोधक समाजाचा इतिहास, दीनमित्र या साप्ताहिकातील सत्यशोधक समाजासंबंधीचे लेख, इत्यादींचा या योजनेत समावेश करण्यात आला आहे. या योजनेचाच एक भाग म्हणजे ख्रिस्ती मिशनऱ्यांनी अहमदनगर येथून ज्ञानोदय मासिक १०० वर्षांवर चालविले, त्याची सारसूची करून ती प्रसिद्ध करणे. ही योजना आलोचना प्रस्थान, मुंबई यांच्या साहाय्याने मंडळाने साकार केली आहे. या सारसूचीचे एकूण सहा खंड होणार असून प्रत्येक खंडाचे दोन किंवा अधिक भागांत प्रकाशन होणार आहे. 'ज्ञानोदयलेखनसारसूची'च्या संपादनाचे काम अहमदनगर येथे डॉ. गंगाधर मोरजे यांच्या देखरेखीखाली चालू आहे.

या सूचीचा खंड–१, भाग–१ आम्ही पूर्वीच प्रकाशित केला आहे. आज खंड १, भाग २ प्रकाशित करण्याचा योग आहे. या सार सूचीचे संपादन करून दिल्याबद्दल डॉ. मोरजे, तसेच आलोचना प्रस्थानचे प्रा. वसंत दावतर यांचे आभार. अभ्यासकांना या सूचीचा उपयोग होईल याबद्दल शंका नाही.

सुरेंद्र बारलिंगे,

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, ४२, यशोधन, मुंबई-४०० ०२०
१३ मे, १९८७, बुद्धजयंती.

अहमदनगर कॉलेज सुरू केले, तेव्हा ग्रामीण परिसरातील लोकांना उच्च शिक्षणाचा लाभ मिळावा, असा संस्थापकांच्या मनांत एक प्रमुख हेतू होताच, पण त्याचबरोबर आपल्या सभोवतालच्या परिसराची, संस्कृतीची जाण नव्याने होऊ घातलेल्या जीवनसंदर्भात व्हावी, यासाठी नगर कॉलेज सदैव जागृत राहिले आहे. ग्रामीण विकासकेंद्र, जीवरसायनशास्त्र, आदी क्षेत्रांत नगर कॉलेजने केलेले संशोधन व कार्य सर्वश्रुत आहे. नव्याने येणाऱ्या विचारांत, प्रत्येक देशाच्या परिसराचा विचार, त्या त्या परिसराच्या भूभागाशी संस्कृतीच्या, समाजधारणेच्या संदर्भात होणारे विचार, यांना स्थान लाभत आहे.

अहमदनगर शहराला महाराष्ट्राच्या इतिहासांत आणि सांस्कृतिक जीवनांत एक महत्त्वाचे स्थान आहे. याच शहरात ज्ञानोदय नियतकालिक सुरू झाले. ब्रिटिश राजवटीच्या आगमनापासून स्वातंत्र्यपूर्व काळातील महाराष्ट्राची सांस्कृतिक, सामाजिक, धार्मिक जडणघडण समजण्यासाठी, ज्ञानोदयाच्या संचिका म्हणजे अभ्यासकाला महत्त्वाची साधनसामग्री आहे. महाराष्ट्राचा सर्वांगांनी नव्याने इतिहास लिहिण्यासाठी अशा साधनांची गरज आहे. अहमदनगर कॉलेजने अशा प्रकारचा प्रकल्प हाती घेऊन, तो सिद्ध करणे, हे कॉलेजने स्वीकारलेल्या एका व्रताचे फलित आहे. तसेच, अहमदनगर कॉलेज केवळ कॉलेज चालवून समाधान न मानता, नव्या नव्या ज्ञानक्षितिजांच्या अंगांनी झेपावत आहे, याचा नगर कॉलेजला सार्थ अभिमान आहे.

आमच्या कॉलिजचे मराठी विभागप्रमुख डॉ. गंगाधर मोरजे महाराष्ट्रातील एक मान्यवर संशोधक आहेत. या प्रकल्पाची कल्पना, आखणी आणि प्रकल्प पुरा करण्याची त्यांची तळमळ व जिद्द लक्षणीय आहेच. पण त्यांना या प्रकल्पसिद्धीसाठी साहाय्य करणारे डॉ. स. वा. मुळे व संपादनसाहाय्य करणाऱ्या प्रा. सौ. पद्मा मोरजे, यांची प्रशंसा करणे, तितकेच महत्त्वाचे आहे.

प्रारंभापासून या प्रकल्पसिद्धीसाठी प्रयत्नशील असणारे डॉ. सुरेंद्र बारलिंगे, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, यांची सक्रिय प्रेरणा,

या प्रकल्पपूर्तीमागे आहे, हे नमूद करण्यास मला अभिमान वाटतो. त्यांच्या मार्गदर्शनाने आणि साहाय्याने आम्ही काम पुरे करू शकलो.

आलोचना प्रस्थान (मुंबई) चे प्रा. वसंत दावतर यांचा आणि नगर कॉलेजचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. या प्रकल्पास आलोचना प्रस्थानाद्वारा साहित्य संस्कृती मंडळाने मान्यता दिली. प्रा. वसंत दावतर यांनी या प्रकल्पसिद्धीसाठी जे मार्गदर्शन आणि अन्य सक्रिय साहाय्य केलेले आहे, ते ऋण केवळ आभार मानून संपणारे नाही. त्यांचे आमचे ऋणानुबंध अधिकाधिक वृद्धिंगत होवोत.

भास्कर पांडुरंग हिवाळे एज्युकेशन सोसायटी (अहमदनगर) चे चिटणीस व माजी प्राचार्य डॉ. टी. बार्नाबस, हे सदैव अशा कामांना प्रेरणा व प्रोत्साहन देत आले आहेत. त्यांचे बळ आमच्या पाठीशी आहे. तसेच प्रा. डॉ. सौ. मनोरमा बार्नाबस, यांना महाराष्ट्राच्या सामाजिक, सांस्कृतिक चळवळींत विशेष रस. कारण तो त्यांच्या अभ्यासाचा विषय. या उभयतांचे मन:पूर्वक आभार. 'ज्ञानोदयलेखनसारसूची' महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक, भाषिक आदी चळवळींचा इतिहास साधार उभा करण्यास अभ्यासकांना उपयोगी होईल, असा भरवसा आहे. जाणकार अभ्यासक व सामान्य वाचक या कार्याची योग्य ती दखल घेतील, याबद्दल मला खात्री आहे.

अहमदनगर कॉलेजने स्वीकारलेल्या संशोधन-व्रताची ज्योत अशीच अधिकाधिक तेजाने उजळत ठेवण्यासाठी आम्ही प्रयत्नशील आहोत, हे खरे.

पी. एस्. जेकब, प्राचार्य, अहमदनगर कॉलेज.

'ज्ञानोदय' हे नियतकालिक शंभर वर्षांहून अधिक काळ चालू आहे. याचे जुने अंक अभ्यासकांना सर्वच ठिकाणी सहज उपलब्ध होण्यासारखे नाहीत. मूळ अंक आता इतक्या जीर्ण अवस्थेत आहेत की, ते हाताळणे म्हणजे ते पुढील संदर्भासाठी योग्य त्या अवस्थेत न ठेवणे, असा प्रकार आहे. म्हणून त्यांचे जतन वस्तुसंग्रहालयासारख्या पद्धतीनेच (म्युझियममध्ये) करता येणे शक्य आहे आणि आवश्यकहि आहे. इतक्या दीर्घकालांतील अंकांचे सूक्ष्मपट तयार करणे हे बरेच अवाढव्य काम आणि असे सूक्ष्मपट एखाद्याच ठिकाणी राष्ट्रीय प्रकल्पात उपलब्ध करणे शक्य.

ही परिस्थिति लक्षात घेऊन या अंकांची शंभर वर्षांची 'लेखनसारसूची' तयार करून प्रकाशित करण्याची कल्पना डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्या सूचनेद्वारा प्रथम नजरेसमोर आली. त्या अनुरोधाने डॉ. हिवाळे एज्युकेशन सोसायटी व अहमदनगर कॉलेज येथील अधिकारीवर्गाशी आणि अहमदनगर कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक व विभागप्रमुख डॉ. गंगाधर मोरजे यांच्याशी विचारविनिमय करण्यात आला. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्याशी संपर्क साधून चर्चा केली. या सर्व विचारविनिमयातून व चर्चेतून 'लेखनसारसूची'चा आराखडा तयार होऊ लागला. इ. स. १८४२ ते १९४१ या कालावधीतील अंकांमधील सर्व लेख–कविता–इत्यादी साहित्याची ही सार-सूची सहा खंडांत तयार करण्याची योजना नक्की करून हा प्रकल्प संघटित केला. मदतीसाठी तो महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळापुढे ठेवला. सर्व प्रकारच्या सहकार्याची आणि उर्वरित मदतीची जबाबदारी डॉ. हिवाळे एज्युकेशन सोसायटी, अहमदनगर कॉलेज, यांनी स्वीकारली. साहित्य आणि संस्कृती मंडळानेही हा भार उचलण्यास आम्हांस मदत करून आश्वासित केले.

'ज्ञानोदय' या नियतकालिकाचे महत्त्व ते शंभर वर्षांहून अधिक काळ चालले आहे, ख्रिस्ती मराठी मंडळींनी ते चालविले आहे, इतकेच नाही. ख्रिस्ती मराठी संस्कृतीचे ते प्रतीक तर आहेच. पण त्याशिवायहि महाराष्ट्रातील धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, वाङ्मयीन, इत्यादि अनेक जीवनांगांमधील स्थित्यंतरे, विचारमंथने, वस्तुस्थिती, यांचे दप्तर म्हणूनही ते महत्त्वाचे आहे. या विषयांतील अभ्यासकाला व जिज्ञासूलाही या

नियतकालिकातील हे लेखन अवलोकनार्थ आणि चिकित्सेसाठी मिळाले नाही, त्याचा उपयोग करून घेता आला नाही, तर त्याच्या अभ्यासात व ज्ञानात बरीच मोठी उणीव राहिल्यासारखे होईल. म्हणून ही उणीव दूर करण्याचा प्रयत्न या लेखनसारसूचीद्वारे केला आहे. या सूचीमध्ये केवळ सारकथन केलेले नाही, तर मुळांतील शैली व भाषा यांची जाणीवही वाचकाला होऊ शकेल, अशा धोरणाने संशोधन–संपादन केलेले आहे.

मराठीतील कोणत्याही नियतकालिकाची अशी सारसूची केली गेलेली नाही. या दृष्टीने ही अशी पहिलीच सूची आहे. इतकेच नव्हे, तर कोणत्याही विषयाची अशी सारसूची मराठीत अजून तयार झालेली नाही. प्रस्तुत सूचीने आरंभ करून दिला आहे आणि धडा घालून दिला आहे, ही वस्तुस्थिती नमूद करण्यात आत्मश्लाघा नाही. हा पहिलाच आणि अनोखा असा प्रकल्प आहे. त्यामुळे तो चुकतमाकत झालेला असणे शक्य आहे. प्रयोग करीत आणि अनुभव घेत यातील उणीवा दूर होतील. इतर काही विषयांत असे प्रयत्न सुरू झाले की, या प्रकारच्या सूचीचे प्रारंभिक प्रवर्तनाचे कार्य म्हणून 'ज्ञानोदया'च्या या सूचीकडे बघावे लागेल. अशा प्रकारच्या कार्याचे 'सूतोवाच' करण्याची संधी आलोचना प्रस्थानला डॉ. हिवाळे एज्युकेशन सोसायटी–अहमदनगर कॉलेज आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांच्या बहुमोल साहाय्याने मिळाली आहे.

सारसूचीमध्ये प्रत्येक अंकातील मजकुराचे क्रमवार आणि कालानुक्रमाने सारकथन केलेले आहे. त्यांचे संदर्भही नमूद केलेले आहेत. विषयवार सूचीचीही जोड दिलेली आहे. उपयुक्तता, संदर्भ सहजतेने सापडणे आणि पद्धतशीर मांडणी, यांच्याकडे लक्ष पुरवून सारसूचीची रचना केलेली आहे. हे काम निव्वळ संकलनाचे नाही. शास्त्रीय दृष्टी बाळगून, संशोधनपद्धती नजरेसमोर ठेवून, सार करताना मुळातील विचार, अनुभव, निवेदन, मांडणी, इत्यादींना धक्का लागणार नाही याची काळजी घेत, अभ्यासनीती पाळीत सारसूचीतील लेखन व त्याची मांडणी केलेली आहे. अभ्यासकांची सोय आणि एका मराठी सांस्कृतिक ठेव्याचे मुळाशी संवादी राहून जतन, या दृष्टींनी या सारसूचीची पूर्तता करण्यासाठी अवश्य ते संयोजन केलेले आहे. असे हे काम

करण्यांत सहभागी होण्याची संधी आलोचना प्रस्थानला मिळाली, याबद्दल संबंधित सर्वांचेच मन:पूर्वक आभार.

या सूचीच्या मुद्रणाची मांडणी, मुखपृष्ठ, यांबाबत श्री. शांताराम पवार यांचे साहाय्य उल्लेखाविना जाऊ देणे योग्य होणार नाही. तसेच, महाराष्ट्र राज्य मुद्रण व लेखनसामग्री संचालनालयाचे संचालक व उपसंचालक, शासकीय मुद्रणालय, वाई, येथील व्यवस्थापक, संबंधित इतर सर्व अधिकारी आणि कामगार-सेवक यांनी ज्या आस्थेने व तत्परतेने या किचकट कामासंबंधी मुद्रणव्यवस्था केली व हे काम पार पाडले, त्याचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे. डॉ. मोरजे, प्रा. सौ. पद्मा मोरजे, डॉ. मुळे यांच्या संपादनकार्याचाही खास ऋणनिर्देश आवश्यक वाटतो. डॉ. सुरेंद्र बारलिंगे आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे सर्व सभासद, अधिकारी व सेवक यांचाही हातभार हे काम यथोचितपणे पार पाडण्याच्या कामी लागला आहे, यांचाही निर्देश करणे कर्तव्य आहे. डॉ. बारलिंगे यांच्याप्रमाणे अहमदनगर कॉलेजचे माजी प्राचार्य डॉ. टी. बार्नाबस, डॉ. सौ. एम्. बार्नाबस आणि आजी प्राचार्य डॉ. पी. एस्. जेकब यांनी हे काम आपलेच मानून पाठीशी सदैव उभे राहून या कामाच्या पूर्तीची निश्चिती करून ठेवली आहे, याचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्याशिवाय या मनोगताची पूर्ती करता येणार नाही.

वसंत दावतर,
आलोचना प्रस्थानकरिता

ज्ञानोदयलेखनसारसूचीचा खंड पहिला भाग दुसरा ( इ. स. १८५१ ते १८५७ ) अभ्यासकांच्या हाती देताना फार आनंद होत आहे. ( खंड पहिला, भाग पहिला इ. स. १९८६ मार्चमध्ये प्रकाशित झाला. )

महाराष्ट्राच्या प्रबोधनकालाचे साक्षी म्हणून 'ज्ञानोदय' हे महत्त्वाचे नियतकालिक आहे. इ. स. १८४२ (जून) मध्ये अमेरिकन मराठी मिशनने अहमदनगरहून हे नियतकालिक सुरू केले.

'ज्ञानोदय' नियतकालिकाचा घोषित हेतु 'शुभवर्तमाना'चा प्रसार आणि या दृष्टीने हिंदूधर्म आणि ख्रिस्ती धर्म यांच्या संदर्भातील 'गैरसमज दूर करणे' असा असला, तरी प्रबोधनकाळातील चळवळीचे प्रतिबिंब त्यात असल्यामुळे ते अभ्यासाचे एक महत्त्वाचे साधन आहे. या पार्श्वभूमीवर या नियतकालिकाचे सारदर्शनही महत्त्वाचे ठरते.

आजवरच्या मराठीतील सूचिग्रंथांहून प्रस्तुत 'ज्ञानोदयलेखनसारसूची' वेगळी आहे. आणि या स्वरूपाची मराठीतील ही पहिलीच सूची आहे, हे आता विदित झालेलेच आहे.

या सूचीत जे 'सार' आहे ते 'सारांश' नव्हे. महत्त्वाचा भाग, काही प्रमाणात भाषा, लेखनपद्धती, शैली, अशा गोष्टींतून मुळाचे दर्शन होईल असा प्रयत्न केला आहे.

मनोरंजन आणि ज्ञान यांबरोबरच काळाचा व जीवनाचा पट नजरेसमोरून सरकत जावा अशी या सूचीची मांडणी आहे. तसेच, 'आज'चे वर्तमान कोणत्या 'भूत'काळावर आधारलेले आहे, याचे भानही वाचकाला या सूचीच्या आधारे यावे, अशी सूचीची रचना आहे.

वाचकांच्या सोयीसाठी काही स्पष्टीकरणे :

पृ. ३१ वरील नोंदक्रमांक २१०८ चे विवरण :

( या नोंदक्रमांकामुळे आपणांस हवी ती नोंद मिळणार आहे. )

नोंदक्रमांकाच्यापुढे कंसात येणाऱ्या बारीक ठशातील मजकुरासंबंधी :

१० : ज्ञानोदयनियतकालिकाचे दहावे वर्ष.

८ : ज्ञानोदय नियतकालिकाचा आठवा अंक.

१५ एप्रिल ५१ : ज्ञानोदयनियतकालिक प्रसिद्धीची तारीख, महिना, सन.

१३०–१३२ : मूळ लिखाण या पृष्ठांवर मुद्रित झालेले आहे.

यानंतर मजकूर.

पृष्ठक्रमांक ३१ : नोंद क्रमांक २१०८ : खाली बारीक ठशात अमेरिकन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर हा मजकूर ज्ञानोदय नियतकालिक कुठल्या छापखान्यात, कुठे छापले, मुद्रक कोण, ही माहिती आहे आणि अंकाचा शेवट सुचविला जातो.

आणखी एक उदाहरण :

पृष्ठक्रमांक ३२ : नोंदक्रमांक २१०९.

दोन समांतर रेषांमध्ये मजकूर : ज्ञानोदय पुस्तक १०, अंक ९, मुंबई, १ मे १८५१ या मजकुरापासून 'ज्ञानोदय'च्या १० व्या वर्षाच्या ९ व्या अंकास आरंभ होतो.

'ज्ञानोदय'मध्ये कधीकधी इंग्रजी व मराठी असा दोन भाषांत मजकूर आहे. याबाबत वस्तुस्थिती : कधी इंग्रजी मजकुराचे मराठी भाषांतर किंवा त्याचा संक्षेप, तर कधी मराठी मजकुराचे इंग्रजी भाषांतर किंवा त्याचा संक्षेप असा प्रकार आहे. इंग्रजी मजकुराचे 'सार' प्रस्तुत सूचीत देणे शक्य नव्हते. त्यामुळे नोंदक्रमांक 'अ' चिन्ह जोडून असा मजकूर सुचविलेला आहे. उदाहरणार्थ :

नोंदक्रमांक २१०९ : मजकूर संपल्यानंतर २१०९ अ अशा क्रमांकाची नोंद केलेली आहे. पुढे कंसात बारीक ठशात इंम असा निर्देश आहे. यातील

अ : इंग्रजी नोंदीचे सूचकचिन्ह.

इंम : इंग्रजी मजकूर.

१३३ : इंग्रजी मजकूर असलेले पृष्ठ.

'ज्ञानोदय 'मध्ये काही वेळा तत्कालीन इतर नियतकालिकांमधील मजकूर उदधृत केलेला आहे. तसा निर्देश नोंद-मजकुराच्या अखेरीस केलेला आहे.
उदा. पृष्ठक्रमांक ४०, नोंदक्रमांक २१४५ मजकुरानंतर कंसात ( ज्ञानप्रकाशवरून ).

काही मजकूर चित्रासह असतो. त्याचा निर्देश मजकुरानंतर कंसात (सचित्र) असे नोंदून केला आहे.
उदा. पृष्ठक्रमांक ९७ : नोंदक्रमांक २४१९ : मजकुरानंतर (सचित्र).

काही मजकुरानंतर प्रश्न असतात. याचा निर्देश : मजकुरानंतर कंसात (प्रश्न) असे नोंदून केला आहे.
उदा. पृष्ठक्रमांक ९७ : नोंदक्रमांक २४२०. मजकुरानंतर (प्रश्न).

काही कविता आहेत. त्यांचे गद्यसार देऊन पुढे कंसात (कविता) असे निर्देशिले आहे.
उदा. पृष्ठक्रमांक ६१ : नोंदक्रमांक २२४५. मजकुरानंतर कंसात (कविता) असे नोंदले आहे.

'ज्ञानोदय 'मधील लेखन अनेक विषयांवर आहे. त्या प्रत्येक लेखनाला मुळात मथळा आहे. हे मथळे सूचीच्या सूचीत दिले आहेत. यांचे वर्गीकरण व त्यांची मांडणी खंड पहिला, भाग पहिला यामध्ये आहेत तशाच येथे आहेत. सूचीच्या सूचीवरून हे लक्षात येईल.

याकामी अहमदनगर कॉलिजमधील मराठी विभागातील माझे सहकारी डॉ. स. वा. मुळे, एम्.ए. पी.एच्.डी. यांचे संशोधन सहाय्यक म्हणून सहकार्य लाभत आहे. तसेच संपादन सहाय्यक म्हणून माझी पत्नी प्रा. सौ. पद्मा मोरजे, एम्.ए. हिचे नेहमीच्या तत्परतेने आणि जिद्दीने सहकार्य लाभत आहे. खरे तर या दोघांच्या सहकार्यावर हा प्रकल्प उभा आहे. हे नम्रतापूर्वक नमूद करणे माझे कर्तव्य ठरते.

प्रकल्पाच्या सुरुवातीपासून तो आतापर्यंत गुरुवर्य प्रा. वसंत दावतर यांचे मार्गदर्शन, विचारविनिमय व सक्रिय साहाय्य या स्वरूपांत सहभाग लाभत आहे हे कृतज्ञतापूर्वक

नमूद करणे माझे कर्तव्य ठरते. अहमदनगर कॉलेजचे प्राचार्य डॉ. पी. एस्. जेकब, माजी प्राचार्य डॉ. टी. बार्नाबस व डॉ. सौ. मनोरमा बार्नाबस यांचे प्रोत्साहन आणि सहकार्य या कामी प्रेरक ठरले आहे, हे नमूद करण्यास मला आनंद होत आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी या प्रकल्पास मान्यता देऊन, ग्रंथरूपाने सहाही खंड प्रकाशित करण्याची जबाबदारी स्वीकारली. त्याबद्दल व्यक्तिशः त्यांचा व साहित्य संस्कृती मंडळाचा मी आभारी आहे.

अहमदनगर महाविद्यालयाच्या ग्रंथपाल सौ. हळवे व ग्रंथालयातील कर्मचारी यांनी ज्ञानोदयाच्या संचिका मुक्तहस्ते वापरण्यास मुभा दिली. त्याबद्दल त्या सर्वांस मनःपूर्वक धन्यवाद.

अशा प्रकारच्या कामाला अनेकांचा अनेक संदर्भांत हातभार लागलेला असतो. मुद्रणप्रत तयार करणारे माझे मित्र श्री. शांताराम घोलप यांचे आभार आवर्जून मानीत आहे. अशा प्रकारे ज्यांचे साहाय्य झाले त्या सर्वांच्या साहाय्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो.

गंगाधर मोरजे
प्रमुख संपादक.

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १, मुंबई, १ ज्यानुएरी १८५१

**१९८२** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १–२)
'ज्ञानोदय' या पत्रास दहावे वर्ष सुरू होत आहे. साहेबाप्रमाणेच नेटिवसुद्धा ते स्वतांहून घेतात. पानाचा आकार मोठा धरूनही किंमत मात्र पूर्वीइतकीच धरली आहे. साहेबलोकांस मात्र वर्षास ४ रु. जादा पडतील.

**१९८२ अ** (इंम : १)

**१९८३** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, ३–४)
१८१८ मध्ये शरंपुरला बंगाली दर्पण सुरू झाले, तर १८३२ मध्ये मराठी दर्पण निघू लागले. ज्ञानप्रसारक, ज्ञानोदय, प्रभाकर, ही सर्व नियमित निघतात. फिरंगी लोकांचा एक पोर्तुगीज कागदसुद्धा आहे. प्रभातसूचक तारा हे वर्तमानपत्र तमली भाषेत फार वर्षांपासून निघते.

**१९८३ अ** (इंम : ३)

**१९८४** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, ४)
निजामाच्या राज्यात अजूनही सतीचे प्रकार घडतात. तेथील अंदाधुंदीमुळे सरकारी प्रतिबंध परिणामकारक ठरत नाही.

**१९८५** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, ४)
देवनागरी लिपीचे रोमनमध्ये लिप्यंतर करण्यासंबंधी सूचना. (इंग्रजी).

**१९८५ अ** (इंम : ५)

**१९८६** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, ५–६)

सन १८५१ चे मराठी पंचाग अमेरिकन मिशनने छापले. वर्षफळाप्रमाणेच डाकेचे हासील, सरकारी सुट्या, मराठी पुस्तकांची याद वगैरे उपयुक्त मजकूर आहे.

**१९८७** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, ६)

बाबाजी दिवाण हे आंग्रे सरकारचे सेवक होते. वरकड कमाई पुष्कळ असल्यामुळे त्यांनी ५० लक्षांची दौलत केली. चाकरी इमाने इतबारे केली. तरी मत्सरी व लोभी होते. आंग्र्यांवर कर्जाचा मोठा बोजा ठेविला होता ! श्राद्धाकरिता ८ हजारांचा दानधर्म होणार आहे ! लोभ धरून वागणाऱ्या माणसास ईश्वर अनुकूल होईल काय ?

**१९८७अ** (इंम : ६)

**१९८८** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, ८–११)

'ढोंगद्वेष्टा पुरुषोत्तम' लिहितो की : मंत्राच्या योगाने परमेश्वर ब्राह्मणाच्या स्वाधीन झाला, असे लोक मानतात. वीरदेव अनुकूल करण्याकरिता ते ढोल्की वाजवून मंत्र म्हणतात. हाडे, तांबडी फुले, औषधी, यांचा पसारा मांडतात. गारुडी व मांत्रिक हे सिद्धसाधक असतात. लिंबू खाऊन रक्त ओकण्याचा देखावा करतात. असल्या खडबुडावर विश्वास ठेवणे, हे अज्ञान होय. त्यांची जादू व्यर्थच नाही, तर दुष्ट आहे. असल्या कुविद्येचे कोणी भय धरू नये. एक माणूससुद्धा त्यांच्या विद्येने मरणार नाही.

**१९८८अ** (इंम : ७–८)

**१९८९** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १२–१३)

सातान्याच्या १३ पेठ्यांमध्ये १३ लाख १६ हजार लोक राहातात. सातान्यास राजवाडा आहे. जुना राजवाडा फार शोभिवंत असून तेथे एक जलमंदिर आहे. शिवाई, वाई, फलटण, कऱ्हाड, ही शहरे नामांकित आहेत. पर्वत फोडून चिपळोणपर्यंतचा रस्ता होणार आहे. कापसाचे पीक चांगले येते. कमिशनर म्हणून ओगलवी याची नेमणूक झाली.

**१९८९ अ** (इंम : ११–१२)

**१९९०** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १३)

बाळंतपणाची नीट तजवीज नसल्यामुळे लहान मुले फार मरतात. त्यांसाठी सरकारने १५ हजार रुपये जमवून धर्मशाळा बांधण्याचे ठरविले. सर जमशेदजीने आपले घर त्यासाठी दिले.

**१९९१** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १३)

जर्मनीत गडबड झाली. युद्ध होण्याचा संभव आहे.

**१९९२** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १३)

मांचेस्टरचे सावकार भारतीय कापूस-पिकाचा शोध घेत आहेत.

**१९९३** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १४)

मुंबईची शिक्षण मंडळी गरिबांसाठी शाळा सुरू करणार. द्रव्यवानांनी मदत द्यावी. लोकसुधारणूक लवकर होईल.

**१९९४** (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १४)

खंडोबा देवाचे दागिने पुजाऱ्यांनीच चोरले हे सिद्ध झाले. त्यांस तीन वर्षांची कैद झाली. पोटभरू लोक अतिशय निर्लज्ज व कुकर्मी असतात.

१९९५ (१०:१, १ ज्यानुएरी ५१, १४)

रॉबर्ट मनी शाळा वार्षिक परीक्षेस ६० मुले उत्तीर्ण झाली. त्यांस पुस्तके बक्षीस दिल्ही.

१९९६ (१०:१, १ ज्यानुएरी ५१, १४)

मुंबईत जुगाराचे अड्डे फार चालतात. काहींना पकडून माजिस्त्रेताने शिक्षा दिल्ही.

१९९७ (१०:१, १ ज्यानुएरी ५१, १४–१५)

मद्यपी माणूस मूर्खाहून मूर्ख असतो. मान, द्रव्य, यांची हानी करतो. हे व्यसन वृद्धिंगत होण्यापूर्वीच उपाय करून त्यास दूर करावे. व्यसनानेच लोक नीतिभ्रष्ट झाले.

१९९८ (१०:१, १ ज्यानुएरी ५१, १५)

दोन बायकांच्या कलहातून एका गृहस्थावर विषप्रयोग होऊन तो मरण पावला. दोन्ही बायकांना कैद झाली.

१९९९ (१०:१, १ ज्यानुएरी ५१, १५)

पुण्यातील कल्याणोन्नायक मंडळी :

या सभेतील वेदशास्त्रसंपन्न मोरेश्वरशास्त्री साठे पुराणातील समजुतींना प्रमाणे देतात. इंद्र पाऊस पाडतो, असे ते मानतात.

२००० (१०:१, १ ज्यानुएरी ५१, १५–१६)

दुसऱ्याच्या शेतातील कणसे चोरून खाताना आपणांस कोणी पहात नाही, असे बाप समजतो. तेव्हा मुलगाच त्याला उपदेश करतो की : देवाला सर्व दिसते. देवाच्या आज्ञेप्रमाणे चालाल, तर अखंडित संपत्ती मिळेल, त्याच्या आज्ञा जर तुम्ही अतिक्रमिल्या, तर अनंत दुःख भोगावे लागेल. या बोलण्याने बाप सुमार्गावर आला.

२००१ (१० : १, १ ज्यानुएरी ५१, १६)

सर विलियम गोम्सची कमांडर इन् चीफ म्हणून नेमणूक झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक २, मुंबई, १५ ज्यानुएरी १८५१

२००२ (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, १७–१८)

फ्रान्स देशाची प्रजा ३ कोटी २० लाख आहे. नामी घरे, सुंदर बागा, रमणीय वाटा, यांसाठी राजधानी पारिस प्रसिद्ध आहे. रूयनला जवाहिराचा कारखाना आहे, तर लायन्सला रेशीम तयार करतात. हवा अत्यंत रमणीय असल्यामुळे फळे बहुत पिकतात. फ्रेंच लोक गुलहौशी व विलासी आहेत. ते स्त्रियांचा फार आदर करितात. पोषाकाच्या अनेक तऱ्हा या देशात आढळतात. सारंगीवादन व नृत्य यांचा त्यांना फार नाद आहे. तरीही विद्वत्तेच्या वैभवात ते कमी नाहीत. (प्रश्न)

२००३ (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, १९–२५)

श्रीयेशूख्रिस्तमहात्म्य (प्रदीर्घ कविता) :

पुराणपद्धतीने प्रथम काही संस्कृत श्लोक आहेत. दाविदाच्या वंशात येशू जन्मला. त्याच्या जन्माचे भविष्य गाब्रिएल नावाच्या देवदूताने धनगरांना सांगितले. मेंढपाळांनी प्रथम त्याचे दर्शन घेतले. तो जगाचा उजेड आहे. त्याचा जन्म गोठ्यात झाला. त्याचा महिमा ऐकून अनेक लोक तेथे येऊन गेले. यहूदीराजा हेरोद त्याच्या जन्माचे वृत्त ऐकून चिडला, म्हणून मारिया माता व पिता जोसेफ यांनी त्यास तेथून हलविले. त्याच्या भोवताली पंडितांचा मेळावा नेहमी जमत असे. त्याचे तत्त्वज्ञान ऐकून ते चकित होत असत. अनादि अनंत ईश्वराचा तो पुत्र होय.

**२००३ अ** (इंम : १८)

**२००४** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, २५)

१ फेब्रुवारीस प्रजेची मोजदात होणार आहे. मनुष्यांवर काही दस्त बसेल, असे समजू नये. वास्तविक माहिती द्यावी.

**२००४ अ** (इंम : २५)

**२००५** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, २६)

मिस्तर क्लार्कसन् आणि कारबोल विलायतेहून आले असून ते गुजरातेत राहाणार.

**२००५ अ** (इंम : २६)

**२००६** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, २६)

ज्ञानोदयाची बांधलेली पुस्तके मिशन छापखान्यात मिळतात.

**२००६ अ** (इंम : २६)

**२००७** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, २७–२८)

वर्तमानपत्रावरून जगाचे वर्तमान आणि मते लगेच समजतात. कलकत्यामध्ये चंद्रिका निघाले, तेव्हा तेथील शास्त्रीपंडितांस भीती वाटली. कां की, हे रीतीविरुद्ध आहे. पण देशकल्याणासाठी याची गरज आहे.

**२००७ अ** (इंम : २६–२७)

**२००८** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, २८–२९)

नडियाच्या राजाने वानराचे लग्न राजेरजवाड्याप्रमाणे अगदी थाटात लावले. रत्नजडित पालखी आणून दारूकामही केले. काय हा मूर्खपणा ? गायकवाडही बाहुलीच्या लग्नाचा थाट १५–१५ दिवस करतात! थोरांनी पोराप्रमाणे वागू नये.

**२००८ अ** (इंम : २८)

**२००९** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, ३१–३२)

मंत्रविद्या हा फक्त पैसा काढण्याचा उद्योग आहे. कोणी यावर शंका काढली की, नास्तिक असे म्हणतात. विचारशील अशा पुरुषांनी विचक्षणेने पहावे. मंत्रावरील भक्ती सोडावी.

**२००९ अ** (इंम : २९–३१)

**२०१०** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, ३१–३२)

बोधसागर पत्रातील दूषणार्ह विषय प्रभाकराने उतरून घेतले, म्हणून आम्ही त्यास दोष दिला. रायरेश्वरचा वृत्तांत त्याने प्रथम छापला. आता तो साहेबांस दोष देतो. पण निवड करणे हे प्रत्येक संपादकाचे कर्तव्य होय. आपला दोष कबूल करावा.

**२०११** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, ३२)

एल्फिन्स्तन संस्थेने शिक्षागुरू दादाभाई नवरोजी यांसी अस्तित्वांत प्रोफेसरचा किताब दिला असून १५० रु. पगार केला.

**२०१२** (१० : २, १५ ज्यानुएरी ५१, ३२)

पटकी : मुंबईत वाखा कमी होत आहे.

२०१३ (१०:२, १५ ज्यानुएरी ५१, ३२)
ज्ञानोदयाची वर्गणी आगाऊ भरल्यास पंचांग फुकट मिळेल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी १८५१

---

२०१४ (१०:३, १ फेब्रुवारी ५१, ३३–३६)
मंत्र म्हटले की वेताळ येतो, अशी समजूत आहे. त्यासाठी पूजा मांडतात. बर्फी व गुलाबाची फुले ठेवून हस्तचलाखीचे प्रकार करतात. जप तर २१ हजार करतात. यांचे मंत्र अस्पर्श स्त्रीने ऐकू नये म्हणतात. इतरांनी ऐकले, तर अक्षरही कळत नाही. पिशाचबाधा काढून टाकण्याच्या बढाया मारतात. जर खरे सामर्थ्य असेल, तर ते सिद्ध करून दाखवावे.
(पृ. ३१ पासून चालू आहे.)

२०१५ (१०:३, १ फेब्रुवारी ५१, ३६)
जनरल असेंब्ली इन्स्तिटुशानच्या वार्षिक परीक्षेस ४७६ विद्यार्थी बसले.

२०१५ अ (इंम: ३६)

२०१६ (१०:३, १ फेब्रुवारी ५१, ३६)
चीनमधील पारशी लोकांनी मुंबईतील विद्यार्थ्यांसाठी ४६२९ रुपये शिक्षणासाठी देणगी पाठविली.

२०१६ अ (इंम: ३६)

**२०१७** (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ३७–३९)

डॉ. स्तिवेन्सन याने कल्पसूत्र व तत्त्व यांचे मागधीतून भाषांतर केले. बौद्ध व जैन धर्मांत विशेष साम्य आहे. परंतु यात पुरातन कोणता, ते ठरविणे कठीण आहे. कल्पसूत्र सन ४११ मध्ये लिहिले गेले. जैन साधूंना तीर्थंकर म्हणतात. ईश्वराची पदवी मिळवून ते दोषमुक्त झालेले असतात. महावीर हा शेवटचा तीर्थंकर होय. पुण्यवान माणसास अक्षय ज्ञान आणि निर्वाणसुख मिळते. हे विचार बहुतकरून नास्तिक वाटतात.

**२०१७ अ** (इंम : ३६–३७)

**२०१८** (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ३९–४०)

शिक्षक मंडळीने भाषांतरित पुस्तके प्रकाशित केली, तेव्हा त्यांतील चुका सांगून लोकांनी गडबड केली, म्हणून मेजर कॅण्डीस तपासनीस नेमण्यात आले. कॅंडीस मराठी समजत नाही आणि तो नेटिव शिक्षकांस तुच्छ मानतो, असा प्रभाकरने आरोप केला. पण तसे काहीही घडलेले नाही. उगीच निंदा करणे, हा हलकेपणा आहे.

**२०१८ अ** (इंम : ३९)

**२०१९** (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ४१–४५)

(मेजर कॅंडीने दिलेले उत्तर : ) नेटिवांस ज्ञानप्राप्ती व्हावी, यासाठी मी जीव लावून मेहनत करीत आहे. प्रभाकर मात्र घोर शत्रुभाव ठेवीत आहे. वर्नाक्युलर सोसायटीच्या शिक्षकमंडळीस नीट भाषांतर करता येत नाही. संस्कृतचेही ज्ञान नाही. त्यांचे व्याकरण तर ढळढळीत अशुद्ध आहे. त्यांच्या चुका दाखविणे मला भाग होते. गर्व आणि अज्ञान यांचा काही उपयोग नाही. प्रभाकराची बडबड तर निरर्थक आहे. मी २५ वर्षे मराठीचा अभ्यास करीत आहे. दुसऱ्याची निंदा करण्याने आपली कीर्ती वाढत नसते. नेटिव शिक्षक इंग्लिश भाषेतल्या चालीप्रमाणे मराठी लिहितात.

२०१९ अ (इंम : ४०–४१)

२०२० (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ४६–४७)

हलक्या लोकांची संगत करू नये. दारू-जुगार वगैरे दुर्व्यसनापासून कटाक्षाने लांब राहावे. घरापासून दूर राहिलात, तरी आईबापांना विसरू नका. ईश्वराची भक्ती करा. देवाचा विसर ही कुकर्मांची उत्पत्तीच होय.

२०२० अ (इंम : ४५–४६)

२०२१ (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ४७)

भरत खंडात दिवाणी कामासाठी ज्या साहेबांस पाठवितात, ते हैलबेरी नामक विद्यालयांत तयार होतात. तेथे मराठी, तेलंगी, बंगाली, इत्यादी भाषा शिकतात.

२०२१ अ (इंम : ४६)

२०२२ (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ४७–४८)

पूर्वी हिंदूंना स्वदेशाची हद्दही ठाऊक नव्हती. लुटारूंच्या उपद्रवामुळे ते त्रासून गेले होते. इंग्रजांनी आगळिकेवाचून कोणतेही राज्य आपल्या हाती घेतले नाही. अजूनही कित्येकांस मद्रास किंवा कलकत्ता ठाऊक नाही! क्षीरसमुद्र मात्र सर्वांना माहीत आहे! शास्त्राविषयीचे मिथ्याज्ञान तर अफाट आहे! पुराणातील हकिगती हे भ्रमिष्टपण आहे. हे लोक व्यापार व नौकानयन कसे करणार?

**२०२३** (१० : ३, १ फेब्रुवारी ५१, ४८)

गेल्या महिन्यात मुंबई मुक्कामी २९७२ मनुष्ये मरण पावली. त्यातून १८५० जरीमरीच्या वाख्याने मरण पावली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ४, मुंबई, १५ फेब्रुवारी १८५१

**२०२४** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५१–५३)

दुसऱ्यांना तुच्छ लेखणे ही मोठी चूक आहे. अभिमानयुक्त अज्ञान लवकर नाहीसे होत नसते. माणूस जे पेरितो ते पीक पावेल. परदेशी लोक प्रवास करीत शोध लावतात. हिंदू लोक मात्र बसून आहेत. खरी भूगोलविद्या लोकांना कळली पाहिजे. आपल्या देशाबाहेर जाऊ नये, अशी यांना धर्माची ताकीद असल्यामुळे ते अडाणी राहिले. सप्तसमुद्र आणि मेरू पर्वत, यापलिकडे त्यांचे ज्ञान गेले नाही! निःपक्षपातीपणाने चौकशी करून ज्ञान स्वीकारावे.

**२०२४ अ** (इंम : ४९–५१)

**२०२५** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५३–५४)

स्वीदनचा राजा राज्यात फिरत असता एका सालस मुलीने त्यास पाणी दिले. तेव्हा राजा तिला आपल्याबरोबर येण्यास सांगू लागला. पण आपल्या म्हाताऱ्या आईची सेवा करण्याकरिता ती मुलगी गावातच राहिली. राजाने औषधोपचारासाठी रुपयांची थैली दिली आणि तिच्या नावे वर्षासन करून दिले. सर्व कन्यांनी असेच वागावे.

**२०२५ अ** (इंम : ५३)

**२०२६** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५४–५५)

कर्नल हालेटने पलटणीतील सैनिकांना ४२ वर्षे अन्नने काम केल्याबद्दल पदके दिली.

**२०२६ अ** (इंम : ५४)

**२०२७** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५५)

एल्फिन्स्तन विद्यालयाची वार्षिक परीक्षा :

सर अर्स्किन पेरी यांनी परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना बक्षिसे दिली. ज्यांनी मुलींच्या शाळा घातल्या, त्यांची फार तारीफ केली.

**२०२८** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५५)

श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे मरण :

२८ जानेवारी १८५१ रोजी रावबाजीचा मृत्यू झाला. ३२ वर्षे ब्रह्मावर्तास पेन्शन घेऊन राहिले. ते थोर कुळातील व मोठ्या योग्यतेचे पुरुष होते. तथापि वर्तणूक व आचार चांगला नव्हता. यास्तव अपकीर्तीही तशीच राहिली.

**२०२९** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५५)

मुंबई ओरिएंटल ब्यांकेतून ९५ हजार रुपये चोरीस गेले. चोर सापडला नाही.

**२०३०** (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५६)

ईश्वराच्या दहा आज्ञा : माझ्याशिवाय तुला दुसरा देव नसावा. मूर्तिपूजा करू नये. सातव्या दिवशी त्याचे नाव घ्यावे. विश्रांतीच्या दिवशी प्रार्थना करावी. आपल्या देशात राहावे. घोर कर्म व हिंसा करू नये. परस्त्रीगमन करू नये. परधनावर दृष्टी ठेवू नये. शेजाऱ्यावर प्रेम करावे. त्याच्या घरावर लोभ ठेवू नये.

२०३१ (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ५६–६१)

ओरिसात जगन्नाथपुरी आहे. गावची लोकसंख्या ३० हजार आहे. गावाची बांधणी गैरशिस्त व गल्या अरुंद आहेत. जागोजाग कुंडे असून यात्रेकरू त्यात स्नान करतात. देऊळ फार मोठे व भव्य आहे. जगन्नाथ, भाऊ व बहीण यांच्या मूर्ती आहेत. ४०० आचारी स्वयंपाक करतात. देवासमोर १२० वेश्या नाचतात. देऊळ उघडण्याच्या ठराविक वेळा आहेत. प्रसाद विकून पुजारी पैसे मिळवितात. २ लाख १० हजार रुपये उत्पन्न येते. रथयात्रेतील रथास १६ चाके आहेत. या मूर्ती मात्र प्रसन्न नाहीत. चमत्कारिक वाटतात. शेकडो लोक रथ ओढतात. कारण ते पुण्याचे काम आहे. (पुढे चालू)

२०३२ (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ६१)

शाहू राजांच्या कुत्र्याने वाघापासून त्यांना वाचविले होते. हा कुत्रा त्यांचा लाडका असून ते त्यास जडजवाहीर घालून दरबारात बसवीत म्हणून त्याची कृष्णातीरी समाधी केली. त्यावर दगडी चित्र असून लोक पूजा करतात.

२०३३ (१० : ४, १५ फेब्रुवारी ५१, ६१–६२)

जर्मन मिशनच्या प्रतिवार्षिक समारंभाच्या वेळी ४ हजार लोक जमले होते, तर ६ हजार बाहेर उभे होते. हिंदू लोकांसाठी पैसा व उपदेशक पाठवावे, म्हणून हातात ताट घेऊन पैका जमविला. एका गरीब स्त्रीने तर रुप्याच्या दोन चमक्या दिल्या. एका चाकराने आपल्या लग्नाकरिता जमविलेले ११ डाल्लर देऊन टाकले. पाण्याचा द्राक्षरस करणारा प्रभू त्यास आशीर्वाद देईल.

२०३४ (१०:४, १५ फेब्रुवारी ५१, ६३)

'एक पत्र वाचणारा' लिहितो की : मोलस्वर्त व क्यांडी यांनी जे परिश्रम घेतले, त्याचा कोणास विसर पडू नये. त्यांचे ग्रंथ म्हणजे चंद्र-सूर्यच आहेत जणू काही! वाक्याचे भाषांतर जसेच्या तसे केले, तर आरंभिला गणपती आणि उत्तरला माकड, असला प्रकार होईल. मराठीची उत्तम व्यवस्था नुकतीच होऊ लागली आहे. धोक्या शास्त्रीबुवा किंवा अर्ज्या वाचणारा कार्कून यांच्या हातून ग्रंथोपयोगी रचना होणे कठीण असते. क्यांडीसाहेबांचे बोलणे ग्रहणीय आहे. भाषांतर त लांब वाक्ये नसावीत. आबालवृद्धांना कळेल असेच लिहावे.

२०३५ (१०:४, १५ फेब्रुवारी ५१, ६३)

रावजी शास्त्री बापट व अमरापूरकर यांनी प्रबोधचंद्रोदय या नाटकाचा सुंदर तर्जुमा करून छापण्यास प्रारंभ केला. सुंदर चित्रे आहेत. प्रबोधचंद्रोदय नाटक ६ आण्यात मिळेल. विठ्ठल सखाराम अग्निहोत्री यांच्या छापखान्यांत छापण्यास आरंभ केला आहे.

२०३६ (१०:४, १५ फेब्रुवारी ५१, ६४)

इंग्लंडच्या राणी सरकारास आठ अब्ज रुपयांचे कर्ज झाले आहे. लढायांमुळे कर्ज वाढले.

२०३७ (१०:४, १५ फेब्रुवारी ५१, ६४)

वॉशिंग्टनने एकदा मेजवानी दिली. त्यावेळी एकजण अभद्र शब्द बोलला. जॉर्ज म्हणाला, 'मला वाटते मी सभ्य लोकांनाच निमंत्रण केले आहे.' तेव्हा तो गृहस्थ उमजला व गप्प बसला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ५, मुंबई, १ मार्च १८५१

**२०३८** (१० : ५, १ मार्च ५१, ६५)

१०० रुपयांची बक्षिसे देऊन होळीविषयी दोन ग्रंथ छापले. जिज्ञासूंनी विकत घ्यावेत. किंमत १ आणा.

**२०३८ अ** (इंम : ६५)

**२०३९** (१० : ५, १ मार्च ५१, ६६-६८)

कल्पसूत्र हे ईश्वरप्रेरित पुस्तक मानले जाते. महावीराचे चरित्र त्यात आहे. संन्यास घेऊन तो तीर्थंकर झाला. ७२ व्या वर्षी त्यास मोक्षपदाचा लाभ झाला. तो पूजनार्ह वीर आणि आदरणीय साधू आहे. मनुष्यबुद्धी टाकून विकाराच्या पलिकडे जाण्याचा उपदेश त्याने केला. ईश्वराच्या अस्तित्वाशिवाय मनुष्यच उत्तम स्थितीत जाऊन देव होतो. असा त्याचा सारांश आहे.

**२०३९ अ** (इंम : ६५-६६)

**२०४०** (१० : ५, १ मार्च ५१, ६९)

पगारातून दरमहा ठराविक कपात करून मनुष्याच्या मृत्यूनंतर कुटुंबास पेन्शन देण्याची योजना आहे. कित्येक अविचारी व उधळ्या वृत्तीचे लोक कुटुंबास फार अडचणीत आणतात. म्हणून ही योजना चांगली आहे.

**२०४० अ** (इंम : ६९)

**२०४१** (१० : ५, १ मार्च ५१, ६९)

मेजर क्यांडी व प्रभाकर या वादात पुष्कळ शाई व कागद खर्चिला. पण तो निष्फळ आहे. चिखलात दगड टाकून अंगावर चिखल घ्या कशाला? ज्ञानप्रकाशने जाहीर केले की, क्यांडीचेच मत योग्य आहे. सर्व सुज्ञांसही तसेच वाटते.

**२०४१ अ** (इंम : ६९)

**२०४२** (१० : ५, १ मार्च ५१, ७१–७२)

इंग्लिश व्याकरण व सांप्रदायिक भाषणवाक्ये अमेरिकन मिशनाने छापले. पृष्ठे २९५ व किंमत २ रुपये आहे. इंग्रजी व मराठी शिकणारास उपयोग होईल.

**२०४२ अ** (इंम : ७०)

**२०४३** (१० : ५, १ मार्च ५१, ७२–७३)

पुष्पवन : सादीच्या 'गुलिस्तान'चे हे मराठी भाषांतर आहे. पृष्ठे ५८. किंमत पाच आणे आहे. यातील विचार मननीय आहेत. यंत्रज्ञान वगैरे ग्रंथ करणाऱ्याचे शेवटच्या अध्यायाचे हे भाषांतर. कृष्णाजी त्र्यंबक रानडे यांनी पुणे येथे १८५१ मध्ये ते ज्ञानप्रकाश छापखान्यात छापले.

**२०४४** (१० : ५, १ मार्च ५१, ७३–७४)

दक्षिणेविषयी कायदा : पुण्याच्या दक्षिणा फंडातून उपयुक्त नवे ग्रंथ अथवा तर्जुमा करणारासाठी १५०० रुपयांची बक्षिसे देणार आहेत. दर वर्षी सप्तेंबरपर्यंत अर्ज करावयाचे आहेत. (अर्ज करणारांस सूचना)

२०४५ (१० : ५, १ मार्च ५१, ७५–७७)

जगन्नाथाची गोष्ट : यात्रेकरूमध्ये स्त्रियाच दोनतृतीयांश असतात. पंडे लोक सांगतात की, तेथील भूमी सोन्याची आहे. पण तसे काही नाही. दोन लाखावर यात्रा भरते. एकदा स्वैपाकाजवळ माणसाचे हाड सापडले. पण अन्नाच्या विक्रीस बाधा येऊ नये, म्हणून ती गोष्ट दडविण्यात आली. रथाच्या मार्गावर लोक ५–५ दिवस बसून राहातात. डोळे थिजतात, पण दर्शन होत नाही. पावसातही लोक उभे असतात. रथाखाली जीव देण्याचा प्रकार मात्र कमी होत आहे.

२०४६ (१० : ५, १ मार्च ५१, ७७)

अमेरिकेत पाच वर्षांत पाच पट लोकसंख्या वाढली. या वेगाने ५० वर्षांत ती १९ कोटी होईल. इंग्लंदात मात्र ५० वर्षांत ती दुप्पट होते. भारतात जंगले तोडून वसतीस जागा करणे आवश्यक आहे.

२०४७ (१० : ५, १ मार्च ५१, ७७–७८)

अमेरिकेतून इंग्लंडकडे ७५ कोटीचा कापूस जातो. भरतखंडामधून ६॥ कोटी जातो. गोदावरीच्या व कृष्णा यांच्या काठी कापूस पिकविण्यास भरपूर वाव आहे. लोखंडी रस्तेही बांधले पाहिजेत.

२०४८ (१० : ५, १ मार्च ५१, ७८)

होळी : ही चाल दुष्ट आणि अमंगळ असून सुजनास त्याची लाज वाटते. वडलांकडून मुले शिव्या शिकतात. पेरावे तसे उगवते.

२०४९ (१० : ५, १ मार्च ५१, ७८)

विद्या उत्तम वाढावी, म्हणून इंग्लिश शाळा पुणे पाठशाळेस जोडली जाणार.

२०८० (१०:५, १ मार्च ५१, ७८-७९)

मराठी भाषांतर करण्याविषयी निःपक्षपाती हिंदू लिहितो की : 'देवाने देह धारण केले.' हे वाक्य चूक नाही. कारण संस्कृतात देह नपुंसकलिंगी आहे. अशी दूषणे काढण्यात वेडेपणा आहे. मेजर कँडीची काही चूक नाही. उलट साहेबलोक मराठी शिकतात, ही चांगली गोष्ट आहे.

२०८१ (१०:५, १ मार्च ५१, ७९)

'हितेच्छु' म्हणतो की : एका मित्राकडे लग्न होते. मुहूर्तानंतर काही अडचणीमुळे लग्न लांबले. पुढे मुलगी वारली. लग्नाऐवजी क्रियेचा खर्च झाला. रीतीखातर हे लोक प्रत्येक प्रसंगी मोठा खर्च करतात. पोटभरू लोक स्वतःचा फायदा करून घेतात. सोळा संस्कार हे पोटभरूंचेच ढोंग आहे. यापेक्षा विद्येकरिता खर्च करावा.

२०८२ ( ०:५, १ मार्च ५१, ८०)

यंदा पाऊस कमी झाल्यामुळे नळास पाणी कमी येते.

२०८३ (१०:५, १ मार्च ५१, ८०)

इंग्रज सरकार कर्जापोटी निजामाचा मुलूख घेणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८५१

**२०५४** (१० : ६, १५ मार्च ५१, ८१–८२)

याफेताचे वंशज गाल समुद्राच्या किनाऱ्यावर सुपीक प्रदेशामध्ये राहात होते. त्यांची नगरेही वैभवशाली होती. भूमध्य समुद्रापासून ध्रुव सागरापावेतो या गोतांनी राज्य वाढविले. हल्ला करून निरनिराळ्या देशांची 'पारध' केली.

**२०५५** (१० : ६, १५ मार्च ५१, ८२–८४)

जगन्नाथाच्या यात्रेमध्ये हजारो लोक मरतात. त्याकडून कोणाचेही तारण होणार नाही. गरीब लोक चुरमुरे-फुटाण्यावर राहातात. थंडीने व मरीमुळे मरून जातात. आजारी लोकांना कोणी पाणीही देत नाही. एका ठिकाणी ८० प्रेते पडली होती. कुत्र्यांना आणि गिधाडांना मेजवानी झाली! जे जगतात ते छत्र्यांच्या व ताडांच्या टोप्या घेऊन कसेबसे चालत असतात. अरण्यातील फळे खाऊन झाडाच्या जवळ झोपतात. मरीच्या सतत साथी येऊन ओरिसाची लोकसंख्याही कमी होत आहे.

**२०५६** (१० : ६, १५ मार्च ५१, ८४)

मुंबईस गार्डियन नावाचे इंग्रजी वृत्तपत्र सुरू झाले. ते साप्ताहिक आहे.

**२०५६ अ** (इंग : ८४)

**२०५७** (१० : ६, १५ मार्च ५१, ८५)

मोल्स्वर्थसाहेब यांनी कँडीच्या मदतीने २० वर्षांपूर्वी इंग्रजी–मराठी कोश तयार केला. ते कोश-सुधारणेकरिता महाबळेश्वरला राहणार आहेत. हा कोश चांगला होईल.

**२०५७अ** (इंम : ८४)

**२०५८** (१० : ६, १५ मार्च ५१, ८५)

फेब्रुवारीत मुंबईमध्ये १८५७ लोक वारले. त्यांपैकी ९१२ पटकीने गेले.

**२०५९** (१० : ६, १५ मार्च ५१, ८५)

कन्याशाळा : शाळेसाठी ज्ञानप्रसारक मंडळीस ९३९५ रुपयांची देणगी मिळाली. पण हे सर्व साहेबांचे व पार्शांचे अनुदान आहे. एकाही हिंदूची देणगी नाही ! पदार्थविज्ञान शास्त्रासाठी ४ हजारांची देणगी मिळणार आहे.

**२०५९ अ** (इंम : ८५)

**२०६०** (१० : ६, १५ मार्च ५१, ८६–८७)

पुस्तकमंडळीने जाहिरात दिली आहे की, स्त्रियांच्या सुधारणेविषयी उत्तम ग्रंथ कुणी लिहिला तर १०० रुपये बक्षीस मिळेल.

**२०६० अ** (इंम : ८५)

**२०६१** (१० : ६, १५ मार्च ५१, ८८–९१)

फ्री चर्चचे विद्यार्थी लिहितात की : तरुणांना इंग्रजी विद्येचा लाभ झाला. मूर्तिपूजा व जातिभेद यांवर त्यांचा विश्वास राहिला नाही. ते प्रसिद्धपणे असे बोलतात की, राम–कृष्ण मानवी राजे होते. एवढे ज्ञान घेऊनही मृत्यूनंतरची अवस्था काय आणि पापातून तरून कसे जावे, याचा त्यांना संभ्रम पडलेला आहे. तारणाचा मार्ग त्यांस सापडत नाही. त्यांनी एकेश्वरवादी बनावे. पक्षपात सोडून वास्तविक सत्याचा मार्ग धरावा. प्रार्थनापूर्वक ज्ञान मागावे.

२०६१ अ (इंम : ८७–८८)

२०६२ (१० : ६, १५ मार्च ५१, ९१–९२)

या समाजातील हेंगाड्या समजुती नाहीशा होत नाहीत, तर एकीकडे शिकलेले लोक नास्तिक बनत आहेत. यापेक्षां कुठला तरी धर्म पाळणारे लोक चांगले समजावे लागतील. कोणता का होईना, ईश्वरदत्त धर्म पाळावा. त्यामध्येच सर्वांचे कल्याण आहे.

२०६२ अ (इंम : ९१)

२०६३ (१० : ६, १५ मार्च ५१, ९३)

पार्लमेंटपुढील भाषणात राणीने इंग्लंडच्या प्रगतीबद्दल समाधान व्यक्त केले.

२०६४ (१० : ६, १५ मार्च ५१, ९३)

अमेरिकेत डाकव्यय पत्रास अर्धा आणा आहे.

२०६५ (१० : ६, १५ मार्च ५१, ९३)

भुलेश्वरातील गवत खाणारा ढोंगी बैरागी : गवत खाण्याचा चमत्कार दाखवून अफू व गांजा यांकरिता पैसे मिळवितो. गवत खाण्यात काही विशेष सामर्थ्य नाही. तरी लोकांनी फसू नये. तो जनावर मात्र ठरतो!

२०६६ (१० : ६, १५ मार्च ५१, ९३)

घाणेरडे मोरीचे नळ बंद करण्यासाठी १ लाख ७५ हजार खर्च होणार.

२०६७ (१० : ६, १५ मार्च ५१, ९३)

रामचंद्र कापडीच्या मुलावरून त्यास ग्रामण्य तर झालेच, परंतु त्याच्या शातिबांधवांनी त्याला मारहाण केली. जातीच्या तंट्यावरून द्रव्य आणि अन्न जाऊन वर मार बसतो.

२०६८ (१० : ६, १५ मार्च ५१, ९४)

ग्रंथ-परीक्षणाकरिता पाच सभासदांची समिती नेमली.

१) हेनरी न्यूटन : कमिटीचे सेक्रेटरी.
२) मोरेश्वर प्रभाकरशास्त्री साठे, परशराम बल्लाळ गोडबोले, बापू रावजी मांडे : कमिटीचे सभासद.
३) गोपाळराव हरी देशमुख : असि. सेक्रेटरी.
४) बालबोध अक्षरांत ग्रंथ ल्याहावे.
५) विनाकारण संस्कृत शब्द ग्रंथात नसावेत.
६) ग्रंथ लेखकाने स्वतः लिहिलेला असावा.

२०६९ (१० : ६, १५ मार्च ५१, ९४-९५)

'सुधारलेला तरुण' लिहितो की : आमच्यातले जुने लोक अज्ञानदशेत आहेत. यांत्रिक सुधारणा हा त्यांना बिघाड वाटतो. सामाजिक सुधारणा ही अनीती व भ्रष्टाचार वाटतो. प्रत्येक गोष्टीवर कलियुगाचा शिक्का मारतात. यंत्राने माणसे उपाशी मरतील, छापखान्यामुळे कारकून बेकार होतील, धर्म आणि कर्म अगदी बुडाले, असे ते म्हणतात.

२०६९ अ (इंम : ९५-९६)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ७, मुंबई, १ एप्रिल १८५१

**२०७०** (१० : ७, १ एप्रिल ५१, ९७)

अमदाबादेतील मुलींच्या शाळा : या गावी विद्येचा प्रसार इतका वाढला की, कित्येक सुज्ञांही मुलींच्या शाळा पाच स्थापल्या आहेत.

**२०७० अ** (इंम : ९७)

**२०७१** (१० : ७, १ एप्रिल ५१, ९७)

रे. श्रेबरची मडम कराचीत मृत्यू पावली. तरी तिचे कार्य चालू राहील.

**२०७१ अ** (इंम : ९७)

**२०७२** (१० : ७, १ एप्रिल ५१, ९७)

लेरसाहेबाची प्रकृती ठीक नाही. तरी तो परत येणे कठीण दिसते. पण शाळा चालू आहे. काही एकास बाप्तिस्मा दिल्हा.

**२०७२ अ** (इंम : ९७)

**२०७३** (१० : ७, १ एप्रिल ५१, ९७–९८)

चर्च मिशनने सिंधमध्ये २३ जणांस दिक्षा दिल्ही. नाशकाजवळ खिस्ती वसाहत तयार करणार. इंग्लंडचे लोक फार मदत पाठवतात.

**२०७३ अ** (इंम : ९७)

**२०७४** (१० : ७, १ एप्रिल ५१, ९९–१००)

प्रभाकर पत्रात दुर्भाषणे व लबाडी फार येत चालली आहे. येशू ख्रिस्ताबद्दल त्याने अनुदार उद्गार काढले. ख्रिस्ती धर्म काही जबरदस्तीने किंवा लबाडीने वाढलेला नाही. वजंदार युरोपियनांचा तो धर्म आहे. येशूच्या अनेक शिष्यांनी चमत्कार केले. नास्तिकांचे विचार वाचून येशूस वाईट ठरविणे अयोग्य आहे. ईश्वरास तुच्छ मानण्यात अकल्याणच आहे.

**२०७४ अ** (इंम : ९८–९९)

**२०७५** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०१–१०२)

२३ वर्षांपूर्वी बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी मंडळी स्थापन झाली. त्यांनी छापलेल्या पुस्तकांची संख्या ६३ हजार तीनशे असून त्यांपैकी ५५ हजार आठशे सोळा खपली. छपाई व बांधणी सुंदर आहे. यांत्रिक सुधारणा झाल्या. आळस सोडून लोक विचार करू लागले. हा फायदा झाला.

**२०७५ अ** (इंम : १००–१०१)

**२०७६** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०२–१०३)

डा. माक्सम्युलरने ऋग्वेदाची भाष्यासहित एक हजार पृष्ठे छापली. विल्सनही त्याचे भाषांतर करीत आहे. जुना करार व ऋग्वेद हे दोन अतिप्राचीन ग्रंथ आहेत. आता लोक वेदाचा अर्थ नीट समजून घेतील. अर्थ न समजता अंधपरंपरा मानणे अयोग्य आहे.

**२०७६ अ** (इंम : १०२)

**२०७७** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०३–१०४)

डॉ. मासग्रोव म्हणतात : निष्कळ जुलाब हे पटकीचे लक्षण समजावे. थोड्या गरम पाण्यात ब्रांडी व अफूचा अर्क मिसळून पिण्यास द्यावे. किंवा नुसते थंड पाणी पिऊन किंचित पारदभस्म घ्यावे. रोग्यास कसलेही भय वाटू देऊ नये.

**२०७७अ** (इंम : १०३)

**२०७८** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०४)

इंग्लंडचा मुख्य प्रधान जान रस्सल याने मंत्रिमंडळाचा राजीनामा दिल्हा. कारण पार्लमेंटमध्ये मतभेद झाले.

**२०७९** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०५–१०६)

हुशार व गरीब म्हणून साहेबाने गगूस कामावर ठेवले. परंतु तो लहानसहान वस्तू व पैसे चोरी. साहेबाने त्यास छडी मारिली, तरी तो सुधारला नाही, तेव्हा त्याला घालवून दिले. चोरटेपणामुळे जगात तर फजिती होतेच, पण देवसुद्धा नाराज होतो. कारण तो सर्व पाहतो.

**२०८०** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०६)

लोकांच्या मोजदादीवरून दिसते की : लंकेची लोकवस्ती १५ लक्ष २४ हजार एकशे चौसष्ट आहे. त्यात साहेब ८ हजार २१९ आहेत.

**२०८१** (१० : ७, १ एप्रिल ५१, १०६)

बालविवाहामुळे स्त्रियांवर वैधव्याची घोर आपत्ती येते. त्यातून काही अनर्थ होतात. गंगाधरशास्त्री फडके बालविवाहाविरुद्ध विचार सांगतात. ते योग्यच आहे. पुनर्विवाहाची परवानगी असावी.

२०८२ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०६)

केप ऑफ गुड होपच्या रानटी लोकांनी २०० गोरे शिपाई ठार मारले.

२०८२ब (१० : ७, १ एप्रिल ५१, १०६)

आगाखानास पीर मानावे की नाही यावरून खोजा लोकात तंटा चालू आहे.

२०८३ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०६–१०७)

हे प्रभो तुझा मान तूच वाढव. जगात तुझे राज्य स्थापन व्हावे. आम्हाला अन्न दे. पापांची क्षमा कर. आमच्या मनातला सैतान तू घालव. आमचे पालन कर. तुझ्याजवळ तेज आणि शक्ती आहे.

२०८४ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०७)

व्यंकटेशास वाहिलेल्या स्त्रीच्या मुलग्याची मुंज करण्यास ब्राह्मणांनी दक्षिणा घेऊन संमती दिली. पुढे ग्रामण्याच्या भीतीने मुंज लावीनात. तेव्हा त्या बाईने सगळ्या ब्रह्मवृंदांना ही हकीगत सांगितली. आता त्या ब्राह्मणांवर ग्रामण्य बसले आहे! अशी गैरवर्तणूक करणाऱ्या निरुद्योगी लोकांना धर्मबुद्धी नसते, लोभ मात्र असतो.

२०८५ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०७)

सुखवस्तू गृहस्थ शिवरात्रीच्या दिवशी भांग पिऊन डोळे चढवितात! भांगेस ज्ञानवल्लीचा घोटा म्हणतात.

२०८६ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०७–१०८)

एका मुलीने भावास मारले, तेव्हा तिच्या आईने तिला सांगितले की: मारण्यापेक्षा प्रेम करावे, हे चांगले आहे. भावंडांनी भांडू नये.

२०८७ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०८)

एका मुलीस तिच्या चुलतीने फळ बक्षीस दिल्हे. तेव्हा तिने सखीला फळ दिले. कारण की, ती जेव्हातेव्हा तिला दुःख देत असे. वाईटाबद्दल कोणाचे वाईट करू नये. होईल तेवढे चांगले करावे. ती योग्य वर्तणारी मुलगी होती.

२०८८ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०८)

ज्ञानप्रसारक मंडळीच्या कन्या शाळेला जगन्नाथ शंकरशेट यांनी १०० रु. दिल्हे. आणखीही हिंदू देणार आहेत.

२०८९ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०८)

जर्वीस व टौनसेंड विलायतेस जाणार.

२०९० (१० : ७, १ एप्रिल ५१, १०८)

कर्नल औटरम मुंबईत काम करणार.

२०९१ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०८)

जोय चंद्रवल्लभ या व्यापाऱ्यास खोट्या वजनाबद्दल ५० रु. दंड झाला.

२०९२ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०८-१०९)

रामा राणू यास विधवेचे ४ रुपये चोरल्याबद्दल फटक्यांची शिक्षा झाली.

२०९३ (१० : ७, १ एप्रिल ५१, १०९–११०)

हिंदू व महंमदी धर्मापेक्षा वेगळा धर्म स्थापन करण्याचे नानकाने ठरविले. एकेश्वरवाद, प्रार्थना, दयाबुद्धी, यांवर त्याचा भर होता. नानकानंतर शिखांचे नऊ गुरू झाले. आदिग्रंथात त्यांची भजने आहेत. गुरू गोविंदसिंहाच्या काळामध्ये बादशहाशी लढाई होऊन शिखांनी सरदारांना हाकलून दिले. राणा रणजितसिंहाने फार पराक्रम करून पंजाबचे रक्षण केले. अवतार मान्य असले, तरी नारायण हा एकच देव ते मानतात. पुनर्जन्मावर विश्वास ठेवतात. त्यांचा प्रार्थनेवर फार भर आहे. दुर्गादेवीची पूजाही ते करतात. आंतरजातीय विवाहास मान्यता आहे.

२०९४ (१० : ७, १ एप्रिल ५१, ११०–११२)

'सूक्ष्मविचारी' लिहितो की : भिकाऱ्यांपैकी खरे दुबळे व गरजू फार थोडे असतात. धटेकटे पण आळशी व दुर्व्यसनी लोक भीक मागत हिंडतात. एक श्रीमंत तर व्रत म्हणून भिक्षा मागतो! शहरातल्या काही धर्मशाळांत काम करणारे भिकारी आहेत. पण बरेच लोक आपल्याबद्दल दया वाटावी, म्हणून शस्त्राने टोचून घेऊन रक्त काढितात, ढोलकी वाजवून पैसे गोळा करतात. यावर उपाय म्हणजे निधी गोळा करून समिती नेमावी. खऱ्या गरजूंना पोसावे. इतरांना काम करण्यास सांगावे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

२०९५ (१०:१८, १५ एप्रिल ५१, ११३–१२०)
'पाप दूर करण्याचा वास्तविक उपाय' : म्युअरसाहेबाने एक संस्कृत अभंगरूप पुस्तक छापले, त्याचे हे मराठीकरण. त्यात ते म्हणतात की : गंगास्नानाइतकेच मन निर्मळ असणे महत्त्वाचे आहे. तीर्थाने पापमुक्ती होते, हा भ्रम समजा. हृदयात शांती ठेवा. मनोरोग नाहीसे करण्याचे सामर्थ्य गंगा नदीमध्ये अजिबात नाही. षड्रिपूंपासून दूर राहा. येशू ख्रिस्ताची प्रार्थना करा. येशूचा मृत्यूही यज्ञरूप आहे. मृत्यूस जिंकून तो स्वर्गामध्ये गेला. मानवाच्या पापाकरिता त्याने प्रायश्चित भोगले. (एकूण २४२ ओव्या)

२०९५ अ (इंग्र : ११३)

२०९६ (१०:८, १५ एप्रिल ५१, १२०–१२ )
रानटी गोतांच्याही युरोपात अनेक वेळा लढाया झाल्या. अमेरिकेच्या इंडियनांपेक्षा त्यांची घरे चांगली होती. ते दांडगे, पण धैर्यवान व हिंमती होते. गाल राजा आलरिक याने तर रोमनावर खंडणी लावली ! ते उत्तरोत्तर साळसूद व सभ्य होऊन मोठ्या साम्राज्याचे मालक झाले.

२०९७ (१०:८, १५ एप्रिल ५१, १२२)
काठेवाडात अनेक वर्षे काम करून ग्लासगोसाहेब विलायतेस गेले.

२०९७ अ (इंग्र : १२२)

२०९८ (१०:८, १५ एप्रिल ५१, १२२)
एल्फिन्स्तन विद्यालयात स्कॉलरशिपांसाठी परीक्षा सुरू झाली.

२०९८ अ (इंम : १२२)

२०९९ (१० : ८, १५ एप्रिल ५१, १२३)

फ्री चर्च इनस्तितुशनमध्ये मेजर जेकब यांनी बक्षीससमारंभाच्या वेळी सांगितले की : 'तुम्ही देश सुधारण्याविषयी अवश्य मेहनत करा. निष्पक्षपातीपणाने शेध करा.' शाळेत १०२४ विद्यार्थी आहेत. साहेबांनी ७ हजाराची देणगी दिल्ही.

२०९९ अ (इंम : १२२-१२३)

२१०० (१० : ८, १५ एप्रिल ५१, १२४-१२५)

सन १८४९ चा शिक्षण मंडळीचा रपोट : इलाख्यात १०,६०७ विद्यार्थी शिकत आहेत. ग्रांट वैद्य पाठशाळेत २२ आहेत. सदोष पुस्तके काढून टाकून नवी पुस्तके तयार करण्याचे काम मेजर क्यांडीकडे दिले.

२१०० अ (इंम : १२३-१२४)

२१०१ (१० : ८, १५ एप्रिल ५१, १२८-१२९)

विठोबा हे महादैवत मानतात. पण त्याचा पुराणात उल्लेख मात्र नाही. सर्वत्र विठोबाच्या नावाचा गजर चालतो. पुजारी व कीर्तनकार यांच्यात अज्ञान फार दिसते. रात्ररात्र तंबोऱ्याचा आवाज ऐकू येतो. एक हरदास थकला की, दुसरा पहारा देतो. झिपरीबाई नावाची मराठीणही कीर्तन करते. तिच्या कथेस फार गर्दी होते. गोपाळपुरला काला असतो. पण त्यात चमत्कार काही नाही.

२१०१ अ (इंम : १२५-१२८)

२१०२ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०)
गेल्या महिन्यात मुंबईत १९५३ मृत्यु पावले. त्यात निम्मे पटकीने गेले.

२१०३ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०)
पंजाब मिशनासाठी १० हजार रुपये जमले.

२१०४ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०)
कलकत्त्यात १६७ देवळे आहेत.

२१०५ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०)
सोन्याच्या खाणी सापडल्यामुळे लोकवस्ती वाढत आहे. कालिफोर्निया हे एक स्वतंत्र संस्थान होऊन अमेरिकेस जोडले आहे. व्यापार-उद्योग वाढतो आहे.

२१०६ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०)
जान रसेल अद्यापही मुख्य प्रधानकीचे काम चालवितो.

२१०७ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०)
कल्याणोन्नायक मंडळीत ब्राह्मण वेदमंत्र म्हणतात. परंतु इतर जातींच्या लोकांना ते ऐकू देत नाहीत.

२१०८ (१०:८, १५ एप्रिल ५१, १३०–१३२)
ब्रह्मदेशाच्या पूर्वेस सयाम असून क्षेत्रफळ १ लाख २० हजार मैल आहे. शेजारी बंगालचे आखात असून त्यात लहान लहान अनेक बेटे दिसतात. जंक बेटावर कथलाच्या खाणी आढळतात. सयामी लोक लाकडाच्या घरांत राहातात. बानकाक ही मुख्य राजधानी होय. मिरे इत्यादी मसाल्याच्या पदार्थांचे उत्पन्न मिळते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ९, मुंबई, १ मे १८५१

**२१०९** (१० : ९, १ मे ५१, १३३)

लेकरांची पहिली पोथी या पुस्तकाच्या सहा हजार प्रती खपल्या. आता त्याचे गुजराथी भाषांतरही प्रसिद्ध झाले.

**२१०९ अ** (इंम : १३३)

**२११०** (१० : ९, १ मे ५१, १३३)

विश्वासकथन : हे नवीन मराठी पुस्तक हल्ली पुस्तके व निबंध मंडळाने छापले. पृष्ठे १२०, किंमत २ आणे आहे. विश्वास म्हणजे काय आणि त्याचे फळ काय, हे बहुत उदाहरणांनी या पुस्तकात दाखविले आहे.

**२११० अ** (इंम : १३३)

**२१११** (१० : ९, १ मे ५१, १३४)

लेकरांकरिता चित्रांचे पुस्तक : मराठीत व उर्दूत छापले आहे. हल्ली गुजरातीत छापले आहे. दर पृष्ठावर चित्रे घालून त्याविषयी गोष्ट लिहिलेली आहे. पृ. ३२. किंमत पाव आणा.

**२१११ अ** (इंम : १३३)

**२११२** (१०:९, १ मे ५१, १३६)

ग्रांट वैद्य पाठशाळा : सर अर्स्किन पेरी यांनी ८ विद्यार्थ्यांना सनदा दिल्या. या शाळेच्या कामाबद्दल संतोष व्यक्त केला. त्याच्या मराठी गुजराती, उर्दू अनुवाद. सनदा घेणाऱ्या विद्यार्थ्यांची नावे.

१) सीबाश्चन ए. डी. कारव्हालो
२) अनंत चंद्रोबा
३) जे. सी. लेस्बो
४) भाऊ दाजी
५) आत्माराम पांडुरंग
६) पाल फ्रान्सीस गोंमीस
७) मैखानजी सोराबजी
८) बर्जोरजी दोराबजी

**२११२अ** (इंग्र : १३४–१३५)

**२११३** (१०:९, १ मे ५१, १४०–१४३)

विठोबाच्या यात्रेस ब्राह्मणेतरांचीच गर्दी दिसते. कारण हा देव जातीकडे पाहात नाही. तो भक्तिप्रिय आहे. हा मूळचा पारसनाथ आहे, असे जैन म्हणतात. पेशवाईतही ब्राह्मण त्यास मानीत नसत. कारण ही दिगंबर-स्वरूप मूर्ती आहे. पंढरपुरात शास्त्रापेक्षा भजनास जास्त महत्त्व दिसते. देवदर्शनाकरिता लोक शेकडो मैल पायी चालतात. व्यवस्था योग्य नसल्यामुळे रोगी पडतात.

**२११३अ** (इंग्र : १३६–१४०)

२११४ (१०:९, १ मे ५१, १४४)

या देशात रेल्वेसाठी जवळजवळ ४ अर्ब रुपये खर्च झाले आणि १६ हजार ४८५ मैल रस्ता तयार झाला. आबादानीचा हा उत्तम मार्ग आहे.

२११५ (१०:९, १ मे ५१, १४४)

नामदार विल्बीसाहेब मुदत संपल्यामुळे विलायतेस जाणार. त्यांच्या नावे विद्यावेतन सुरू होणार.

२११६ (१०:९, १ मे ५१, १४४)

कमिशनर टाउनसेंड प्रकृती बिघडल्यामुळे विलायतेस जात आहेत.

२११७ (१०:९, १ मे ५१, १४४)

धोबीतळ्यावरील नेटिव्ह जनरल लैब्ररीचे काम ठीक चालते. थोडा पैका खर्च करून सुंदर पुस्तके मिळतात.

२११८ (१०:९, १ मे ५१, १४४)

परदेशात पाण्याच्या शक्तीवर चक्की चालवून छापखाना चालू शकतो. मुंबईच्या आसमंतात पवनचक्कीवर कारखाने चालविता येतील.

२११९ (१०:९, १ मे ५१, १४५)

मुलगा धर्मान्तर करणार म्हणून एकाने कराचीत मुलास विष दिले. मुलगा कसाबसा वाचला.

२१२० (१०:९, १ मे ५१, १४५)

सरकारने धर्म शिकवू नये, असेच मिशनरी नेहमी म्हणतात. सरकारी शाळेत फक्त विद्या द्यावी.

२१२१ (१०:९, १ मे ५१, १४५)

सातान्यात कापसाचे पीक उत्तम आले.

२१२२ (१०:९, १ मे ५१, १४५)

ढोंगद्वेष्टा परभू कवितेत म्हणतो की : अभ्यास न करता भिक्षुकीचे सोंग चालवितात. स्वतः देवार्चन न करता भिक्षुक इतरांना उपदेश करतात. त्यांचे शिष्यही ऐटीत चालतात. गुरुवेड फार माजले आहे. मिष्टान्नाचे जेवण, तांबूल भक्षण व वरती दक्षिणा मिळते. लोक कर्ज करून यांची भरती करतात.

२१२३ (१०:९, १ मे ५१, १४६)

एका नोकरबाईस ओळखीचा मनुष्य चिथावीत असे की, साहेब नसताना वस्तू पळवाव्या. ती म्हणाली की, चोरीचा हिशोब निदान देवापाशी तर द्यावा लागतोच.

२१२४ (१०:९, १ मे ५१, १४७)

'दहा आज्ञा' : या कवितेत कवी म्हणतो की : ईश्वराच्या आज्ञा मान्य केल्या, तर तुमचे कल्याण होईल. ईश्वराचे नाव सर्वांहून श्रेष्ठ असे आहे. वडलांना मान द्यावा. चोरी, जारकर्म, खोटी साक्ष, यांत पडू नये. लोभ सांडून प्रेमाने संसार करावा.

२१२५ (१०:९, १ मे ५१, १४७)

तुमडीबाबा : हा साधू कोल्हापूरात आला असून तो तुमडीतून रुपये काढतो. पण हे ढोंग आहे. कोणीही फसू नये.

२१२६ (१०:९, १ मे ५१, १४७)

बुद्धिवर्धक सभा : या सभेत स्त्रियांस शिकवावे की नाही, याचा वाद झाला. शेवटी कन्यांस विद्या करू द्यावी, असे ठरले.

२१२७ (१०:९, १ मे ५१, १४८)

माणसाची विवेकबुद्धी नेहमी जागी असावी. साहेबाने गजर लावला, पण गजर होऊनही तो उठला नाही. यावरून घड्याळ लावूनही लवकर उठण्याची इच्छा जर मनात नसेल, तर काम होत नाही, हेच सिद्ध होते. अज्ञाने बुद्धी निरुपयोगी मात्र होते.

२१२८ (१०:९, १ मे ५१, १४८)

सर पेटन व शेषाद्री यांनी गिरगाव शाळेची परीक्षा घेतली. विद्यार्थ्यांची राहण्याची व पाणी पिण्याची उत्तम व्यवस्था पाहून साहेब संतुष्ट झाले.

२१२८ अ (इंम : १४८)

२१२९ (१०:९, १ मे ५१, १४८)

गेल्या पन्नास वर्षांत २॥ लाख लोकांनी खिस्ती धर्म स्वीकारला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १०, मुंबई, १५ मे १८५१

२१३० (१०:१०, १५ मे ५१, १४९)

इ. सनापूर्वी ३९० मध्ये सेनापती ब्रेन्नस याने रोम शहर जिंकले. ९ वर्षे युद्ध चालले होते. गाल देश प्रथम रोमकडे व नंतर फ्रेंच लोकांकडे आला. गाल लोक मागे हटले.

२१३१ (१०:१०, १५ मे ५१, १५०–१५३)

अद्भुत क्रिया सांगताना कवी म्हणतो : योहानाने येशूची कीर्ती गाजवली. हा देवाचा कोकरा जगाचे तापत्रय हरण करणार, असे तो म्हणे. पापाचा कंटाळा करून देवाकडे वळा. येशूने अनेकांना रोगमुक्त केले. त्यांना औषधाची गरज पडलीच नाही. भाविकांचे थवे त्याच्याबरोबर हिंडत असत.

२१३१ अ (इंम : १५०)

२१३२ (१०:१०, १५ मे ५१, १५४)

रे. निसबिट् १८२७ पासून भारतात उपदेश करीत आहेत. नुकतेच ते विलायतेहून परत आले.

२१३२ अ (इंम : १५४)

२१३३ (१०:१०, १५ मे ५१, १५४)

मिर्झापुरातील मिशन शाळा आणि छापखाना चालविते.

२१३४ (१०:१०, १५ मे ५१, १५५–१५६)

कलकत्त्यातील पुस्तक मंडळी : पुस्तक विक्रीतून १० हजार रुपये मिळाले. उत्तम ग्रंथ करणारास ३०० रु. बक्षीस देणार.

२१३४ अ (इंम : १५४)

२१३५ (१०:१०, १५ मे ५१, १५५–१५६)

एल्फिन्स्तनचे गुजराथी मासिक : या अंकात म्हटले आहे की : महाराष्ट्रातील लोक ख्यालीखुशाली, दागदागिने, कपडालत्ता यांत शक्तीपेक्षा जास्त खर्च करतात. तरी मराठी लोकांनी सावधपणाने खर्च करावा.

२१३५ अ (इंम : १५५–१५६)

२१३६ (१०:१०, १५ मे ५१, १५८–१६०)

स्वधर्म सोडल्यामुळे कोणाचा दावा बुडत नाही : मालमत्तेबाबत नवा कायदा झाल्यामुळे नारायण रामचंद्र खिरतो याचा संपत्तीचा हक्क कोर्टाने मान्य केला.

२१३६ अ (इंम : १५७–१५८)

२१३७ (१०:१०, १५ मे ५१, १६१–१६२)

मालमत्तेचा हक्क प्रथम बंगाल्यात व नंतर महाराष्ट्रामध्ये झाला. आपल्या इच्छेप्रमाणे ईश्वरास भजण्यास जो तो मुखत्यार आहे. तसेच, धर्मान्तर केले, तरी मुलांवरचा हक्कही कायम राहातो. लोकांनी कायद्याचा फायदा घ्यावा.

२१३७ अ (इंम : १६०–१६१)

२१३८ (१०:१०, १५ मे ५१, १६२)

जे. पी. लार्किनसाहेब विलायतेस जाणार.

२१३९ (१०:१०, १५ मे ५१, १६२)

ओरिएंटल बँकेच्या चोरीतील ५० हजार रु. सापडले.

२१४० (१०:१०, १५ मे ५१, १६२)

कलकत्याची पुस्तक मंडळी इंग्रजी तर्जम्यासह पुराणे छापणार.

२१४१ (१०:१०, १५ मे ५१, १६२)

कलकत्याचा कुलीन नामक ब्राह्मण वारला. त्यास १७ बायका आहेत. एवढ्या विधवा आता दुःखात पडतील.

२१४२ (१०:१०, १५ मे ५१, १६३)

कलकत्ता मिशन : तीन ब्राह्मणांनी खिस्ती धर्म स्वीकारला. कोर्टात आपल्या मनःपालटाची खात्री दिल्ही.

२१४३ (१०:१०, १५ मे ५१, १६३)

ब्राह्मणांची अवस्था : 'एक ब्राह्मण' लिहितो की : पूर्वीचे ब्राह्मण दया-क्षमा-शांतियुक्त होते. पण आजच्या ब्राह्मणाबद्दल असे म्हणता येणार नाही. त्यांची श्रीमंतीही गेली आणि दुर्दशा झाली. गृहस्थ कारकुनी करतात आणि भट आळसात दिवस घालवितात. त्यांनी काही उद्योग-व्यवसाय करावा.

२१४४ (१०:१०, १५ मे ५१, १६३–१६४)

गारुड्याचे खेळ म्हणजे कपटाचे सोंग असते. त्यांचे मंत्र म्हणजे भोळ्या व वेड्या लोकांची समजूत घालणे होय.

२१४५ (१०:१०, १५ मे ५१, १६४)

जात कोणत्याच युगात चालली नाही. जातीचे बंद मोडले आहेत. हिंदू पिरास नवस करतात आणि राजपुतांचे स्वयंपाकी अरब असतात. ईश्वर ज्या जातीस वाढवील, तीच श्रेष्ठ समजावी. (ज्ञानप्रकाशवरून)

२१४६ (१०:१०, १५ मे ५१, १६४)

हिंदुस्थानात, पृथ्वीवर काय आहे त्याचा शोध करणारी मंडळी : ही मंडळी संशोधन करणार असून तिने ८ उष्ण पाण्याचे झरे नोंदविले आहेत. या मंडळीची सभा मुंबईत आहे. जमिनीवरील चमत्कार शोधून काढण्यासाठी ही मंडळी जमली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक ११, मुंबई, २ जून १८५१

२१४७ (१० : ११, २ जून ५१, १६५)

एल्फिन्स्तन विद्यालयाचे मुख्य गुरू हार्कनेस विलायतेहून आले आहेत. (२५ मे १८५१)

२१४७अ (इंम : १६५)

२१४८ (१० : ११, २ जून ५१, १६६)

सयद अबदुल्लाच्या पत्नीने कोर्टासमोर जाब दिल्हा की, लहानपणी झालेले लग्न मला अमान्य आहे. लहानपणचे लग्न व्यर्थ ठरते. अर्थात् युरोपियनाइतके वय वाढू देऊ नये. परंतु अगदीच लहान वयात लग्न करणे अयोग्य आहे.

**२१४८ अ** (इंम : १६५–१६६)

**२१४९** (१० : ११, २ जून ५१, १६८–१७०)

भारतात जैन धर्म प्रचलित असताना व मुसलमानी आक्रमणे होत असताना चैतन्य स्वामी ब्राह्मण कुळात जन्मास आला. वैराग्य पत्करून त्याने श्रीकृष्णाची भक्ती करण्याचा उपदेश केला. कृष्ण हा एकच परमेश्वर आहे, असे तो म्हणे. तरीही ईश्वर जगापेक्षा वेगळा आहे. नीती, भूतदया आणि भक्ती यांचे माहात्म्य त्याने वाढविले. जातिभेदाच्या तो विरुद्ध होता. परंतु त्याचे शिष्य जाती मानतात.

**२१४९ अ** (इंम : १६७–१६८)

**२१५०** (१० : ११, २ जून ५१, १७२–१७३)

पुण्यातील नवीन विद्यालय : संस्कृत विद्यालयांत ब्राह्मण गुरूच नेमावेत, असा नियम सरकारने केला. आज ब्राह्मणांची दुर्दशा झाली आहे. त्यांचा मोठेपणा व देवपणा अकस्मात बुडून गेला. फार दिवसांपासून ते शूद्रांशी निर्दयपणाने वागत होते. आता तरी त्यांनी इतर जातींना अनुकूल व्हावे व त्यांस विद्याधन मिळवून देण्यास साहाय्य करावे. सरकारनेही नीट परीक्षा करूनच पंतोजी नेमावेत. या महिन्याच्या २ त्या तारखेपासून संस्कृत पाठशाळा बंद होऊन हे नवीन विद्यालय सुरू झाले.

**२१५० अ** (इंम : १७१–७२)

२१५१ (१० : ११, २ जून ५१, १७४–१७५)

'हिंदू लोकांच्या रीती सुधारण्याविषयी बोध' : हे पुस्तक गोविंदजी नारायणाने लिहिले. आमच्यात लहान मुलांना घरात चांगले शिक्षण मिळत नाही. आईबाप माराचे भय दाखवितात अगर भलभलत्या लबाड्या सांगतात. त्यातून खोटे व अभद्र बोलण्याची सवय लागते. चांगले शिक्षण देण्याऐवजी लाड करून दागदागिन्यांची सवय लावतात. यातूनच मुले ख्यालीखुशालीकडे वळतात. नीच वर्णातील मुलांचे आचरण याहून वाईट आहे.

प्रकाशक : पुस्तके व निबंध करणारी मंडळी. पृ. ६०.

२१५१ अ (इंम : १७३–१७४)

२१५२ (१० : ११, २ जून ५१, १७६)

होरमसजी मेहताने रसायनशास्त्रविद्या हे पुस्तक लिहिले. भाषा इंग्रजी व गुजराती आहे.

२१५२ अ (इंम : १७६)

२१५३ (१० : ११, २ जून ५१, १७७–१७८)

सरकारी जाहिरात : शिक्षण मंडळीने एक हुकूम काढून संस्कृत व मराठी विभाग एकत्र केले. सर्व जातींच्या व प्रतींच्या लोकांना प्रवेश मिळेल, असंही जाहीर केले. मराठी सक्तीची आहे. संस्कृत व इंग्रजी शिकणे प्रत्येकाच्या खुशीवर राहील. ५४ शिक्षक नेमले आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

२१५३ अ (इंम : १७७)

२१६४ (१० : ११, २ जून ५१, १७८)
कॅप्टन हार्ट प्रकृती बिघडल्यामुळे नीलगिरीस गेला होता, तेथेच त्याचा मृत्यू झाला. दक्षणी पुस्तक मंडळीसाठी त्याने सुंदर काम केले.

२१६५ (१० : ११, २ जून ५१, १७८)
माहीम ते कल्याण लोखंडी रस्ता तयार होत आहे.

२१६६ (१० : ११, २ जून ५१, १७८)
भारत सरकारचे दोन वर्षांचे उत्पन्न २७ कोटी ६८ लाख होते.

२१६७ (१० : ११, २ जून ५१, १७९)
'कल्याण इच्छिणारा' लिहितो की : हल्ली स्वस्त पण आंबट आंबे विकणारे लोक रस्त्याने दिसतात. ते आंबे प्रकृतीस घातक आहेत. तरी मुलांना ते खाऊ देऊ नयेत.

२१६८ (१० : ११, २ जून ५१, १७९)
लग्नसंबंधी अज्ञान : 'पाटील' लिहितात की : एखाद्याने मोहतर लावला, तर कुटुंबवत्सल लोक येत नाहीत. रांडके म्हातारे तेवढे येतात. ब्राह्मणही उरफाटे मंत्र म्हणतो! शिवाय मोहतराची बायको चैत्र महिन्यामध्ये घरी आणू नये, असाही नियम आहे म्हणे! तरी या गोष्टीविषयी नीट विचार व्हावा.

२१६९ (१० : ११, २ जून ५१, १८०)
एक शास्त्री लिहितात की : सरकारने देवी काढण्याची चांगली सोय केली आहे. परंतु लोक त्याचा फायदा घेत नाहीत. गेल्या ३ महिन्यांत १४०० मुलांचा मृत्यू झाला, तरी आमचे लोक देवभोळेपणा सोडीत नाहीत. देवी काढण्यात फायदाच आहे, अपाय काहीही नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १२, मुंबई, १६ जून १८५१

**२१६०** (१० : १२, १६ जून ५१, १८१)

मनी स्कूलचे गुरू जेर्रम यांचा मृत्यू झाला. या देशाच्या कल्याणासाठी त्यांनी फार प्रयत्न केले.

**२१६१** (१० : १२, १६ जून ५१, १८२)

जगन्नाथाची नेमणूक : कलकत्ता सरकारने जगन्नाथपुरी संस्थानची आर्थिक मदत बंद केली. ही नेमणूक बंद करावी म्हणून वृत्तपत्रांनी वारंवार लिहिले होते. कूडच्या संस्थानिकाने जगन्नाथाचा खर्च चालविण्याकरिता यात्रेकरूंवर कर बसविण्याची परवानगी मागितली आहे.

**२१६१ अ** (इंम : १८१)

**२१६२** (१० : १२, १६ जून ५१, १८३)

सन १८१० पासून अमेरिकेने निरनिराळ्या देशांत खिस्ती मंडळ्या स्थापन केल्या. अशी ८३ मिशने आणि ३५५ धर्मोपदेशक आहेत. ४५ हजारांहून अधिक धर्मान्तरे झाली. अमेरिकेहून गतवर्षी १३॥ लाख रुपये दिले गेले.

**२१६२ अ** (इंम : १८२)

२१६३ (१० : १२, १६ जून ५१, १८५–१८८)

हिंदू शास्त्र म्हणते की : ब्राह्मण हे भूदेव आहेत. ते सर्व जातींमध्ये श्रेष्ठ आहेत. पुण्य हवे असेल, तर ब्राह्मणास दान देऊन नमस्कार करा. तो दुराचरणी असला, तरी वंदनीय असतो. तो विष्णुरूप असल्यामुळे त्याला प्रदक्षिणा घालणे, हे पुण्याचे काम ठरते. परंतु ही विचारसरणी अयोग्य होय. इतर जातींतही विद्वान व धर्मशील असे लोक आहेतच. मानवेतर प्राण्यांप्रमाणे मानवाचीही जात एकच असते. गुण पाहावा, जात कधी पाहू नये. जातीमुळे फाटाफूट वाढली. आळस व गर्व हे दोष ब्राह्मणांत शिरले. ईश्वराने ही व्यवस्था केली, हे विधान लबाडीचे व कल्पित आहे.

२१६३ अ (इंम : १८३–१८५)

२१६४ (१० : १२, १६ जून ५१, १८८)

कंपनीची मुदत १८५४ मध्ये संपत आहे. पार्लमेंटच्या काही सभासदांना असे वाटते की : राणी-सरकारने भारताचा कारभार स्वतःच्या हाती घ्यावा. ईस्ट इंडिया कंपनी पार्लमेंटच्या कक्षेत यावी. त्यातच रयतेचे कल्याण आहे.

२१६५ (१० : १२, १६ जून ५१, १८९)

पांजरापोळातली धर्मशाळा आगीत जळून गेली.

२१६६ (१० : १२, १६ जून ५१, १८९)

मुंबईत १ महिन्यात १३५६ मृत्यु झाले.

२१६७ (१० : १२, १६ जून ५१, १८९)

पनवेलीस पटकीची साथ सुरू झाली.

२१६८ (१० : १२, १६ जून ५१, १८९)

कलकत्यात एक हिंदू मुलगा खिस्ती झाला.

२१६९ (१० : १२, १६ जून ५१, १९०)

पुण्यातील विद्यालय : या शाळेस आता कॉलेज हे नाव दिले. शास्त्रीपंडितांना मात्र ही गोष्ट आवडली नाही. ७ जून १८५१ ला उद्‌घाटन समारंभ झाला.

२१७० (१० : १२, १६ जून ५१, १९०)

अग्रूदार हिंदूच्या धर्मान्तराने कलकत्यात गडबड उडाली. काहींना वाटते की, अशा माणसाला पुन्हा जातीत घ्यावे. प्रायश्चित देण्यासही पंडित तयार आहेत. पण माणूस जर मनाने शुद्ध असेल, तर त्याला प्रायश्चिताची गरज नाही. जातिभेद मिटला पाहिजे.

२१७१ (१० : १२, १६ जून ५१, १९१)

इंग्रज सरकारचा मुलूख वाढत चालल्यामुळे गवरनर जनरल यांना सतत भारतात राहावे लागते. पंजाबची व्यवस्था उत्तम आहे.

२१७२ (१० : १२, १६ जून ५१, १९१–१९२)

पावसाळ्यात बेडकांचा कलकलाट चालतो. ईश्वर त्यांचाही सांभाळ करतो. घोंड्याच्या पोटातही ते सापडतात. मृत्यूनंतर बेडकाप्रमाणे माणूससुद्धा मातीत मिसळून जातो.

२१७३ (१० : १२, १६ जून ५१, १९२–१९३)

कर्मनाशी नदीची गोष्ट : 'वाकडवाडीकर' पत्रात लिहितो की : काशीस जाताना ही नदी लागते. या नदीस शाप असल्यामुळे यात्रेकरू तिचे पाणी पीत नाहीत. परंतु तिथले गावकरी मात्र पाणी पितात. तात्पर्य, हे सर्व अज्ञानच आहे. या नदीस 'कर्मजोडी' म्हणावे.

२१७४ (१० : १२, १६ जून ५१, १९३–१९४)

फ्रान्सचा संस्थापक क्लिडरिक यास क्लोविस नामक एक राजपुत्र होता. बायकोच्या सल्ल्यावरून त्याने खिस्ती धर्म स्वीकारला. त्याच्या मृत्यूनंतर धाकटा पीपिन गादीवर बसला. तो टेंगणा होता. त्याने सिंह आणि पोळ यांची झुंज लावली. सिंह इतका क्रूर झाला की, पीपिनला मधे पडून त्यास मारावे लागले. तेव्हापासून त्याच्या ठेंगणेपणाची कोणी थट्टा केली नाही. (प्रश्न)

२१७५ (१० : १२, १६ जून ५१, १९४–१९६)

सयामच्या तीन मुख्य नद्यांत मेनाम ही मोठी नदी आहे. बानकोकजवळ ती सागरास मिळते. हा देश बहुतेक डोंगराळ आहे. देशात देवीची साथ वारंवार येते. अनेक प्रकारची फळे येतात. पण ती खाण्यास अयोग्य आहेत. कथील व लोखंड हे खनिज पदार्थ मिळतात. रानांत अनेक हत्ती दिसतात. हत्तीस मोठी प्रतिष्ठा आहे. कारागिरांना राजाच्या गुलामगिरीत राहावे लागते. म्हणून ते आपली कला दाखवीत नाहीत. उत्तम कार'गिरास रुप्याचा चंबू बक्षीस देतात.

२१७६ (१० : १२, १६ जून ५१, १९६)

मुंबईत यंदा चांगला पाऊस झाला.

२१७७ (१० : १२, १६ जून ५१, १९६)

सरकारी नेमणूक.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२१७८** (१० : १३, १ जुलै ५१, १९७)

'ईजिप्रिमर' : मिशनने हे इंग्रजी पुस्तक छापले असून मराठी अर्थ दिल्यामुळे ते फार सुलभ झाले आहे.

**२१७८ अ** (इंग्र : १९७)

**२१७९** (१० : १३, १ जुलै ५१, १९९-२०१)

कोल्हापुरचे वर्णन : पंचगंगेच्या घाटावर बसलेल्या या गावात ३३ हजार लोक राहातात. सन १८४४ पासून ते इंग्रजांच्या ताब्यात आहे. कोल्हापूरच्या भोवताली सरकारने पके रस्ते बांधले. कोल्हापूरच्या राजाने इंग्रज सरकारशी लढाई केली. तिचा खर्च त्याच्या पेन्शनीतून वसूल करतात. तेथील देवीचे देऊळ बांधण्यास जैनांनीही देणग्या दिल्या. नगारखाना व सिलेखाना पाहण्याजोगे आहे. दारूची अनर्थकारक दुकाने फार आहेत. त्याचा दोष सरकारवर येतो.

**२१७९ अ** (इंग्र : १९७-१९९)

**२१८०** (१० : १३, १ जुलै ५१, २०२-२०३)

प्राचीन काळी जे युरोपियन येथे आले, त्यांना असे दिसले की : धर्माचे मुख्य ब्राह्मण असून राजा त्यांचे ऐकतो. आपल्या ग्रंथांतून त्यांनी स्वतःस वर्णगुरू म्हणविले. बौद्ध धर्मामुळे वेदकालातल्या रीती बदलून मोठा फेरफार झाला होता. पांडवलेणी बौद्ध राजांनी केली. कबीर, रामानुज, यांनी वेगळे विचार मांडले होते. चैतन्य, बसवेश्वर, ज्ञानेश्वर, हेही धर्मसुधारक आहेत. पेशवाईत मात्र ब्राह्मणांकडे पुन्हा सत्ता आली. आता खिस्ती धर्मच खऱ्या सुखाचा मार्ग दाखवील.

**२१८० अ** (इंम : २०१–२०२)

**२१८१** (१० : १३, १ जुलै ५१, २०५–२०७)

श्रीनिवास या ब्राह्मणाने धर्मांतर केले. कोर्टाने त्याच्या बायकोस फरमाविले की : त्याचा नवरेपणाचा अधिकार कायमच आहे. तेव्हा नातेवाईकांनी दंगल केली. हे अयोग्य वर्तन आहे. त्यांना सुखाने नांदू देणेच योग्य होय.

**२१८१ अ** (इंम : २०३–२०५)

**२१८२** (१० : १३, १ जुलै ५१, २०७–२०८)

लंडनमध्ये एक म्युझियम उघडले असून वस्तूंच्या संरक्षणाकरिता काचेची घरे केली आहेत. भोवतालचे वृक्ष त्याची शोभा वाढवीत आहेत. वीस लक्ष मनुष्ये हे संग्रहालय पाहातील.

**२१८३** (१० : १३, १ जुलै ५१, २०८–२०९)

घर बांधणारा जसा मालक, तसा जग तयार करणार ईश्वर आहे. जगाची व्यवस्था त्याने चतुराईने केली. थंड देशातील जनावरांच्या अंगावर लोकर ठेवली. प्रकाशासाठी सूर्य-चंद्र निर्माण केले. लहान बालकदेखील म्हणेल की, यास कोणीतरी योजक असावा. धुरावरून अग्नी कळतो, तसा जगावरून ईश्वर ओळखावा.

**२१८४** (१० : १३, १ जुलै ५१, २०९–२११)

सयाममध्ये कथलाचे दागिने चीनहून आयात होतात. सुती व रेशमी कापडाचे कारखाने आहेत. त्यांत स्त्रिया जास्त असतात. घरे बांबूची व झापाची असतात. लाकडी फळ्या टाकून नद्यांवर पूल करतात. खुष्कीपेक्षा जलमार्गच जास्त आहेत. लाकडी व दगडी मूर्तीवर मुलामा करतात. गलबते बांधण्याचा उद्योगही चालतो.

२१८५ (१०:१३, १ जुलै ५१, २११)

'वाचणारा' लिहितो की : इकडे सतत जेवणावळी चालत आहेत. एक गृहस्थ तर भरपेट जेवणाने तडस लागून मरण पावला. भुकेच्या शांतीपुरतेच खावे.

२१८६ (१०:१३, १ जुलै ५१, २११–२१२)

ग्रेट ब्रिटनमध्ये ६०० वृत्तपत्रे तर अमेरिकेत २७०० आहेत. भारतात मात्र १०० ही नाहीत व वाचणारे फार थोडे असतात. एकट्या न्यूयॉर्कमध्ये वृत्तपत्रांचा खप १ लाख ४० हजार आहे.

२१८७ (१० : १३, १ जुलै ५१, २१२)

एक देशस्थ म्हणतो की, : हरिश्चंद्राने मद्य पिऊन चूळ भरल्यानंतर कर्मनाशी नदी शापित झाली. पण असल्या कथांवर विश्वास ठेवणे, हे वेडेपणाचे, होय. आता तर या नदीवर पूलसुद्धा आहे.

२१८८ (१०:१३, १ जुलै ५१, २१२)

एका श्रीमंत स्त्रीने नवसाने मुलास बरे वाटले, म्हणून ५-६ हजार रुपयांची साखर वाटली!

२१८९ (१०:१३, १ जुलै ५१, २१२)

खानदेशात सोनगडला एक स्त्री सती गेली.

२१९० (१०:१३, १ जुलै ५१, २१२)

सातारकर राणीस द. म. ४५०० रु. पेन्शन मिळणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२१९१** (१० : १४, १५ जुलै ५१, २१३–२१४)

बैलगाडीच्या प्रवासाने अंग खुळखुळे होते. उंट वगैरेंच्या उपयोगातही त्रास आहेच. रेल्वेची वाफ घोड्याचे काम करते. रेल्वेत भरपूर विश्रांती मिळते. भाडेही थोडे पडते. लोखंडी रस्ता सुलभ आहे.

**२१९२** (१० : १४, १५ जुलै ५१, २१४–२१५)

चार्लमेन हा शूर राजा मेंढरांच्या लोकरीचा झगा घालीत असे. त्याने युरोपात अनेक ठिकाणी विजय मिळविला. सार्वभौम राजा असूनसुद्धा गुडघे टेकून प्रार्थना करी. त्याच्या मृत्युनंतर त्याची कबर राजेशाही पद्धतीने सजविण्यात आली. (प्रश्न)

**२१९३** (१० : १४, १५ जुलै ५१, २१५–२१६)

मद्रासेन ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी या मंडळीने गेल्या वर्षी ६ लक्ष ८७ हजार पुस्तके छापली. जवळ-जवळ २ लाख खप झाला.

**२१९३ अ** (इंम : २१५)

**२१९४** (१० : १४, १५ जुलै ५१, २१६)

लुधियानात ११ साहेब मिशनरी आहेत. अनेक भाषांमधून पुस्तके छापली जातात.

**२१९४ अ** (इंम : २१६)

२१९५ (१० : १४, १५ जुलै ५१, २१७)

'शब्दालंकार' : हे पुस्तक विद्यार्थ्यांनाच काय, पण शास्त्री–पंडितांनाही उपयुक्त आहे. लक्ष्मीज्ञान पदनामाचा लेखक या पुस्तकाचा लेखक आहे. (ज्ञानप्रकाश प्रेस)

२१९५ अ (इंम : २१६)

२१९६ "स्त्रियांच्या सुधारणुकीविषयी कोणी ग्रंथ" लिहिल्यास शंभर रुपये बक्षीस मिळेल.

२१९६ अ (इंम : २१७)

२१९७ "न्याय आणि सत्यता" याविषयी ग्रंथ लिहिल्यास २५० चे बक्षीस आहे.

२१९७ अ (इंम : २१७)

२१९८ (१० : १४, १५ जुलै ५१, २१९–२२१)

धर्मान्तरित पतीचा पत्नीवरील हक्क मान्य केल्यामुळे नेटिव नाराज झाले. त्यांना ही धर्मात ढवळाढवळ वाटते. खरे तर हिंदूधर्ममतही असेच आहे. मुंबई व मद्रास कोर्टांनी या कायद्यानुसार निकाल दिले.

२१९८ अ (इंम : २१७–२१९)

२१९९ (१० : १४, १५ जुलै ५१, २२२–२२३)

'सत्यशोधक' विचारतो की : प्रबोधचंद्रोदय या वृत्तपत्राने सत्यधर्म काय ते सांगण्याऐवजी पोरकट विचार व निर्लज्ज निंदा कशासाठी चालविली आहे? सभ्यपणाने वाद करून सत्याचा शोध घेणे ठीक पडेल. अभिमानाच्या आहारी जाऊ नये.

२१९९ अ (इंम : २२१)

२२०० (१० : १४, १५ जुलै ५१, २२३)
मूळजी व उसमान यांना जबरी चोरीबद्दल १० वर्षांची शिक्षा झाली. सरकारने दारू व जुगार यांस बंदी केली, तर गुन्हे कमी होतील.

२२०१ (१० : १४, १५ जुलै ५१, २२४–२२७)
येशू ख्रिस्त वर्णन : कवी म्हणतो की : येशूने आंधळ्यांच्या डोळ्यांना स्पर्श केला, तर त्यांना दिसू लागले. त्याने हात लावला की, अन्नदेखील कधी कमी पडत नसे. त्याच्या स्पर्शाने प्रेते जिवंत होत असत.

२२०२ (१० : १४, १५ जुलै ५१, २२७)
युरोपात ५८७, तर आशियात ९३७ भाषा बोलल्या जातात.

२२०३ (१० : १४, १५ जुलै ५१, २२७)
दारूबाज व्यक्तीस पंक्तीत घेतल्याबद्दल अनेक ब्राह्मणांची घरे अपांक्त ठरविण्यात आली. हे फार संतोषजनक कृत्य आहे.

२२०४ (१० : १४, १५ जुलै ५१, २२७)
विलायतेतील पदार्थसंग्रहालय पाहणाऱ्या लोकांकडून दररोज वीस हजार रुपये उत्पन्न मिळते.

२२०५ (१० : १४, १५ जुलै ५१, २२७)
फ्रामजी कावसजीच्या स्मरणार्थ उत्कृष्ट निबंध लेखकास बक्षीस मिळेल.

२२०६ (१० : १४, १५ जुलै ५१, २२७)
ओरिएंटल बँकेच्या चोरीबद्दल दोराबजीस १४ वर्षांची शिक्षा झाली.

**२२०७** (१० : १४, १५ जुलै ५१, २२७)
पत्नीच्या खुनाबद्दल लक्ष्मण यंकेश स्वामीस फाशी झाली.

**२२०८** (१० : १४, १५ जुलै ५१, २२८)
निजामाच्या देण्याबद्दल काही मुलूख जप्त होणार.

**२२०९** (१० : १४, १५ जुलै ५१, २२८)
मुंबईत ४८ इंच पाऊस पडला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १५, मुंबई, १ ऑगस्ट १८५१

**२२१०** (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २२९)
'निरनिराळे धर्म' : अनेक धर्म व पंथ यांची माहिती दिली आहे. पृ. १००, किं. २ आणे.

**२२१० अ** (इंम : २२९)

**२२११** (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३०)
'शास्त्रातील प्रकरणे' : जुन्या कराराचा मराठीत तर्जमा मिळेल. पृ. २३०, किं. ३॥ आणे.

**२२११ अ** (इंम : २२९)

२२१२ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३०)
'कोकरचारा' : मुलांकरिता चित्रे व प्रार्थना दिलेल्या आहेत.

२२१२ अ (इंम : २३०)

२२१३ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३०)
'इंग्लिश भाषणाचे ज्ञान' : हे व्याकरण हालसाहेबाने लिहून प्रसिद्ध केले. चवथी संस्कारित आवृत्ती. (गॉर्डन हॉलचे व्याकरण.)

२२१३ अ (इंम : २३०)

२२१४ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३०)
एल्फिन्स्तन विद्यालयाचा रपोट : १८५० च्या रपोटावरून दिसते की, काम सुंदर चालले आहे.

२२१५ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३१)
ज्ञानेंद्र मोहन ठाकुराने बाप्तिस्मा घेतला. बापाने काही अडथळा न करता हजार रु. दरमहा द्यावयाचे ठरविले.

२२१५ अ (इंम : २३१)

२२१६ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३२)
मुलाने धर्मपालट करण्याचे ठरविले, तर पालक त्यास कोठडीत ठेवतात. पण कायदा अशा जुलमाच्या विरुद्ध आहे. मात्र सरकारने विशिष्ट वय जाहीर करणे आवश्यक आहे. तसा नियम व्हावा.

२२१६ अ (इंम : २३२)

२२१७ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३३–२३९)

हिंदुधर्म व रोमन क्याथोलिक धर्म यांचे साम्य : फिरंगी क्याथोलिकांनी अन्य धर्मांमधील रीती आणून बिघडणूक केली आहे. त्यांचे मत भ्रष्ट व पाखंडी आहे. ब्राह्मणाचा व पोपचा अधिकार, पवित्र पदार्थ व पूजा, स्थापित देवळे, पुण्य मिळविण्याचे उपाय, उपास, देहदंड, चमत्कार, पश्चाताप व कबुली, नवस, देव, सण, यांत अफाट साम्य आहे.

२२१८ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २३९)

जुगारखाना चालविणारास हजार रुपये दंड होईल.
गंमतीकरिता जरी कोणी जुगार खेळला, तरी त्यास दंड होईल व जिंकलेली रक्कम जप्त होईल.

२२१९ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २४०–२४२)

युरोप : हे खंड इतर खंडांपेक्षा लहान असूनही कला, विद्या, व्यापार, यांत अग्रेसर आहे. इंग्लंड ते रशिया अशी याची हद्द आहे. अगदी सिसिली व सॉर्डिनियासारखी लहान बेटेही त्यात येतात. (संवादात्मक)

२२२० (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २४२–२४३)

सयामच्या राजाचा मृत्यू झाला. त्याचा भाऊ टी. पै. चौफा राजा झाला. तो अनेक भाषा जाणतो व अनेक वर्षे बौद्धांचा उपाध्या होता. त्याने अफूवर बंदी घातली.

२२२१ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४३)

तारतरी राज्याविरूद्ध एका चिनई माणसाने बंड केले आहे.

२२२२ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४३)

एका खाजगी मंडळीने ३५० मैल लोखंडी रस्ता बांधला. हा रस्ता पासिफिक महासागरापर्यंत वाढविणार आहेत.

२२२३ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४३)
नागपाड्यात पंचमीस नाग उत्पन्न होतो, ही गप्पच ठरली. गारूड्याच्या सापांची लोक पूजा करतात. पण हे व्यर्थ आहे.

२२२४ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४३)
मिठासाठी खोटी मापे वापरल्याबद्दल दोन मुसलमान दुकानदारांना दंड झाला.

२२२५ (१० : १५, १ ऑगस्ट ५१, २४३)
ग्रेट ब्रिटनची लोकसंख्या २ कोटी ३७ लक्ष आहे.

२२२६ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४४)
लंडनमधील म्युझियम (पदार्थसंग्रहालय) पाहण्यास एका आठवड्यात ३॥ लाख लोक आले.

२२२७ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४४)
पंढरपूरची आषाढी यात्रा : पाऊस आणि वाख्याची साथ यांमुळे यात्रा फारच कमी भरली. वाणी–उदमी, बडवे, यांचा फार तोटा झाला.

२२२८ (१०:१५, १ ऑगस्ट ५१, २४४)
अग्नीच्या योगाने लाकूड जळते, तसे पंचगव्याने पाप जळून जाते; यज्ञोपविताने बलाची वृद्धी होते; असे लोक समजतात. श्रावणी पौर्णिमा या दिवशी समुद्रात नारळ टाकून त्याची पूजा करतात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १६, मुंबई, १५ ऑगस्ट १८५१

**२२२९** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २४५–२४७)

सयाममध्ये चीनहून भांडी कापड व कागद यांची आयात होते, तर मसाल्याचे पदार्थ, पिसे व हाडे यांची निर्यात होते. सयामी राजा चीन देशाचा मांडलीक आहे. सयामात गलबते बांधून अतिपूर्वेच्या देशांना विकतात. राजधानी बानकोक ही उदमाची धनतर पेठ आहे. या देशात अनेक परदेशी लोक राहातात. गुलाम, नीग्रो, पेगू, मलायी, हेही वसती करून आहेत. हिंदूंपेक्षा मुसलमान जास्त आहेत. लोकसंख्या २ लक्ष ७९ हजार आहे.

**२२३०** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २४७–२४९)

एक तरुण गृहस्थ मरण पावला. त्याची माता शोक करीत होती, तेव्हा येशूने स्पर्श करून त्यास जिवंत केले. याइरस नावाच्या पालकाची कन्या मृत्यु पावली, तिलाही तात्काळ प्राणदान दिले. अशा अद्‌भुत क्रिया त्याने दाखविल्या.

**२२३१** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २५०–२५१)

यरूशलेम शहर तुर्कांच्या अमलात होते. तेथे खिस्ती लोकांना यात्रेस जावे लागे. देवभक्त पीटरचा तुर्कांनी अपमान केला. पीटरने फौज जमवून तुर्क राजा सालोमन याशी युद्ध केले. त्यात साडेआठ लक्ष खिस्ती मारले गेले. २५० वर्षे हे युद्ध चालूच राहिले. (प्रश्न)

**२२३२** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २५२)

'बुद्धिवर्धक ग्रंथ' : स्त्रियांना शिक्षण दिले, तर शृंगारी ग्रंथ वाचून त्यांचे मन बिघडेल, अशी नेटिवांना भीती वाटते. म्हणून स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराकरिता हा गुजराती ग्रंथ तयार झाला. स्त्रियांची सुधारणूक अवश्य केली पाहिजे. (बुद्धिवर्धक अधिकाऱ्यांनी तयार केला. पृ. ८६, गुजराती)

**२२३२ अ** (इंम : २५२)

**२२३३** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २५३)
'इजिलेसन्स' : या पुस्तकात इंग्रजी–मराठी कोशासह सुलभ धडे छापले आहेत. मुलांना स्वतः अभ्यास करण्याची सवय लागेल. (दुसरी आवृत्ती, पृ. १४० इंग्लिश भागामध्ये कोश पृ. १७०.)

**२२३३ अ** (इंम : २५२–२५३)

**२२३४** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २५४)
जर्मन मिशन : दक्षिण महाराष्ट्रात हे मिशन चांगले कार्य करते. त्यांच्या शाळेत १९०० विद्यार्थी आहेत. मंगलोरला उद्योगशाळाही चालवीत आहेत. एकूण ५६७ जणांचा बाप्तिस्मा झाला.

**२२३४ अ** (इंम : २५३–२५४)

**२२३५** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २५६–२६०)
वेदांमध्ये ईश्वरी लक्षणे काहीच नाहीत. शंखासुराने वेद चोरले होते. मग त्या युगात चोरीलबाडी नव्हती, असे सिद्ध होत नाही. इंद्र आणि ब्रह्मदेव यांची लंपट वागणूक त्या काळातीलच आहे ना? वेद ब्रह्मदेवाने काढले, म्हणजेच ते अनादि होऊ शकत नाहीत. पक्षपात सोडून विचार करा.

**२२३५ अ** (इंम : २५५–२५६)

**२२३६** (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २६०)
बाळासाहेब रास्ते व मल्हारराव टेंबुरणीकर या सरदारांचा मृत्यू झाला.

२२३७ (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २६०)

सांगलीकरांना कर्ज असल्यामुळे इंग्रज सरकार कारभारी नेमणार.

२२३८ (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २६०)

कल्याणोन्नायक व ज्ञानप्रकाश सभांच्या नेहमी बैठका भरतात.

२२३९ (१० : १६, १५ ऑगस्ट ५१, २६०)

या महिन्याचे २० तारखेस मुंबईतील लोकांची मोजदाद करणार आहेत. सर्वांनी वास्तविकपणाने मदत करावी.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १७, मुंबई, १ सप्टेंबर १८५१

---

२२४० (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६१)

चार वर्षे मिशनचे कार्य करून मिसेस वुड् मरण पावली. ती मराठी शिकून स्त्रियांची सुधारणूक करणार होती.

२२४० अ (इंम : २६१)

२२४१ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६१)

गेल्या महिन्याच्या २७ वे तारिखेस रे. लेम्युएक बिस्सेलसाहेब अमेरिका देशाहून मडमीसुद्धा येऊन पोहोचले.

२२४१ अ (इंम : २६१)

२२४२ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६४–२६६)

महाराष्ट्र भाषेचे व्याकरण (आ. २ री) : दा. पां. तर्खडकरांनी विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरिता लिहिले आहे. पहिल्या आवृत्तीत शब्दांचे ५ वर्ग होते ते ८ केले. मराठी विभक्ती संस्कृतप्रमाणे नाहीत. थोड्याफार इंग्रजीप्रमाणे आहेत.

२२४२ अ (इंम : २६२–२६४)

२२४३ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६७)

नवऱ्याने बाप्तिस्मा घेतला, म्हणून नातेवाईकांकडे लक्ष न देता कोर्टाने लक्ष्मीस नवऱ्याकडे पाठविले. नवरा तिजवर प्रीत करतो.

२२४३ अ (इंम : २६६–२६७)

२२४४ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६७–२६८)

इंग्लंडमधील पदार्थसंग्रहालयासाठी दोन लक्ष त्रेपन्न हजारांचा माल इंग्लंडकडे रवाना झाला. राजे लोकांच्या पोशाखापासून धंदेवाइकांच्या हत्यारांपर्यंत सगळ्या प्रकारच्या वस्तू त्यात होत्या.

२२४५ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६८)

दारू पिऊन पोटास आग लावून घेऊ नये. दारूने कुटुंबाची फजिती होते. दारू तुमची शक्ती खाते. कारणावाचून अफू-गांजा यांनाही स्पर्श करू नका. (कविता)

२२४६ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६९)

विलायतेत पाण्याचे बर्फ करण्याचे यंत्र निघाले आहे.

२२४७ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६९)

इस्रायली लोकांना पार्लमेंटमध्ये बसू देत नाहीत.

२२४८ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६९)

युरोपातून दोन लाख लोक अमेरिकेत राहाण्यास गेले.

२२४९ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६९)

प्रेसिडेंटला मुदतवाढ देण्यावरून फ्रान्समध्ये मतभेद झाला.

२२५० (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २६९)

सयामी लोक ठेंगणे पण बांधेसूद आहेत. ते सुती किंवा रेशमी वस्त्र नेसतात; सुतकात पांढरी वस्त्रे वापरतात; शेंडी राखण्याने रानटी वाटतात; निमुळती टोपी घालतात; त्यांच्या स्त्रिया अनेक प्रकारचे दागिने वापरतात. त्यांच्यात विवाहात मुलीला हुंडा दिला जातो. त्यांच्यात बहुपत्नीत्व आहे. तसेच, प्रेते जाळण्याची चाल असून अकस्मात मृत्यू झाला तर दफन करतात.

२२५१ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७१–२७३)

फ्रान्स देश : इंग्लिश खाडीच्या दक्षिणेस हा देश आहे. हवा रमणीय व निरोगी आहे. फळे, द्राक्षरस व लोकर, हे उत्तम उत्पन्न आहे. लोक मेहनती, पण रंगेल आहेत. इंग्लंडपेक्षा यांचा व्यापार फार कमी आहे. १८४८ च्या क्रांतीनंतर आता राज्य चांगले चालते. राजधानी पारी विद्या व कला यांसाठी प्रसिद्ध.

२२५२ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७२)

स्पेन देश : फ्रान्सच्या दक्षिणेस हा देश आहे. प्रदेश अतिशय डोंगराळ आहे. घोडी, मेंढ्या, यांच्या इतकाच सोन्यारुप्याकरिता हा देश प्रसिद्ध आहे. लोक गर्विष्ठ व अभिमानी आहेत.

२२८३ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७३)
पुण्यातील मुलींच्या शाळेत मुख्य गुरूही स्त्रीच आहे. स्त्रियांची दशा सुधारण्यास भगीरथ प्रयत्न हवेत.

२२८४ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७३)
उज्जयिनी काशी व दिल्ली येथे ग्रह व नक्षत्रे पाहण्यासाठी वेधशाळा होत्या. नलिकायंत्र, शंकू, यांचा उपयोग करीत.

२२८५ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७४)
कोर्टातल्या भांडणाने श्रम व पैसा जाऊन दुःख मात्र होते. त्यापेक्षा खाजगी पंचायती स्थापाव्यात.

२२८६ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७४)
निजामाच्या कर्जाचा लवकरच उलगडा होईल.

२२८७ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७४)
अलीबाग येथे इंग्रजी व मराठी शाळा चांगली चालते. कराडे आणि देशस्थ यांच्या ग्रामण्यावरून गावात तंटे होतात.

२२८८ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७४)
'ढोंग नास्तिक' लिहितो की : एक बैरागी जमिनीत डोके घालून तपश्चर्या करी. तो मूळचा आळशी व उनाड होता. आणि घरातील भांडणामुळे पळून आलेला आहे. लोक त्याचा राग सहन करून दक्षिणा देतात! पण ज्याला राग येतो, तो साधू नव्हेच.

२२८९ (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)
पुण्यात एक दुखणेकरी म्हातारी बेशुद्ध झाली, तेव्हा ती निधन पावली, असे समजून तिला स्मशानात नेण्यात आले. पण ती जिवंत आढळली! तरी सावध राहावे.

**२२६०** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)

रावसाहेब वामनराव यास पुण्याचे सदर अमीन नेमले आहे.

**२२६१** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)

मुंबईच्या विद्यार्थी सभेने ६५३० रुपये जमवून इंग्लंडहून शालोपयोगी यंत्रे आणण्याचे ठरविले आहे.

**२२६२** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)

उद्योगानेच लक्ष्मी मिळते. उद्योगावाचून राहू नये. (ज्ञानप्रकाशवरून)

**२२६३** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)

कौन्सिलर डेयून याचा मृत्यू झाला.

**२२६४** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)

डेयून यांच्या जागी वॉर्डनची नेमणूक झाली.

**२२६५** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७५)

नेवी सुपरिंटेंडेंट हॉकिन्सचा अपघातात मृत्यू झाला.

**२२६६** (१० : १७, १ सप्टेंबर ५१, २७६)

हिंदी प्रकाशने.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२२६७** (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २७७)

हलके नांगर व लाचारी असणारे शेतकरी मूर्ख असतात. शिकलेले शेतकरी नांगरास घोडे जोडीत. शेतीचे कामाकरिता ते ईश्वराचे सुभक्त असतात.

**२२६८** (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २७७–२७९)

धाकट्या पिपिनच्या राज्यात कारागिरांची संख्या मोठी होती. ते बळकट व धैर्यवान होते. लढाईत देश हरला, तर त्यांच्यावर गुलाम होण्याची वेळ येत असे. शांततेच्या काळात ते गाणी म्हणून वेळ घालवीत. शेतकऱ्यांना धान्याचा वाटा राजास द्यावा लागत असे.

**२२६९** (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २७९)

बौद्ध लोक म्हणतात की : जगन्नाथ हा मूळचा आमचा देव होता. आता तो हिंदूंचा देव झाला.

**२२६९ अ** (इंम : २७९)

**२२७०** (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २७९)

'पहिले पुस्तक' : मालकमच्या पहिल्या पुस्तकाचा मराठी तर्जुमा, रामचंद्र व्यंकटेश शेणवी यांनी केला.

**२२७० अ** (इंम : २७९)

**२२७१** (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २७९)

'रोम बादशहाचा वृत्तांत' : पुस्तक मंडळीने प्रसिद्ध केला. रोमच्या १४ सम्राटांची चित्रे देऊन इतिहास सांगितला आहे.

२२७१ अ (इंम : २७९)

२२७२ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८१)
'मनोरंजक गोष्टी' : हे पुस्तक लहान मुलांना उपयुक्त आहे. पूर्वी सदाचरणाऱ्या गोष्टी, चमत्कारिक गोष्टी, मुलांसाठी बोधाच्या गोष्टी, बालमोतातल्या शाळेचे वर्णन आणि शास्त्रातील उपदेश, ही पाच प्रकरणे वेगळी छापली होती. ती या पुस्तकांत एकत्र छापली आहेत. ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी.

२२७३ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८३–२८६)
दादोबांचे व्याकरण : या व्याकरणात फार उदाहरणे दिली आहेत. अनियमित क्रियापदांची रूपे पाया म्हणून वापरता येत नसतात, याची जाणीव दिसत नाही. (मागून चालू)

२२७३ अ (इंम : २८१–२८३)

२२७४ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८६)
मुंबईत गेल्यावर्षी ६ कोटी १६ लक्षांचा माल आयात झाला. त्यात सोने चांदी ८ कोटींची होती. निर्यात ८ कोटी ३ लाखाची होती. कलकत्त्याहून निर्यात ११ कोटी तर आयात साडेसहा कोटी झाली.

२२७५ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८७)
दारूविक्यांस पैजारा माराव्यात. गोड बोलून ते माणसाचा घात करतात. दारूचे दुकान म्हणजे नरकाची मोरी होय. शहरातले भलेभले लोक त्यांच्या नादी लागले. कित्येक मेले, कित्येक भिकेस लागले.

२२७६ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८८)
बाळू रामा हा मजूर दारूच्या धुंदीत विहिरीत पडून मेला.

२२७७ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८८)

सणाच्या दिवशी लोक कामास न जाता दारू पिऊन छाकटे होतात. तरी लोकांनी काम बंद ठेवू नये.

२२७८ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८८)

ज्ञानप्रकाश सभा : या मंडळात लेक्चर चांगले चालते. पण ल्हान मुलांमुळे गडबड फार होते. तरी मुलांना आणू नये.

२२७९ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २८८–२८९)

'परगावी गेलेल्या माणसाला अन्न पाठविता येत नाही किंवा येथे दिले तरी त्यास पोहोचत नाही. मग आकाशातील पूर्वजांना ते कसे मिळेल ? मग ब्राह्मणमुखाने पितर तृप्त कसे होतील ? मेले माणूस जेवते की काय ?' अशा मजकुराचे संभाषण एका गृहस्थाने पत्रातून लिहिले आहे.

२२८० (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २९०–२९१)

'द्रव्यापव्ययत्रासक' लिहितो की : भुलेश्वराला एका गृहस्थाने एक कोटी लिंगे करण्याचे औडंबर घातले आहे. आठ महिने पूजा व अनुष्ठान चालू असते. दहा हजार रुपये जमविले. या व्ययापासून जनतेचे कसलेच कल्याण नाही. तीळ-तांदूळ-तुपाचा मात्र अपव्यय होतो. आळस मात्र वाढतो.

२२८१ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २९१)

पलटणीतले लोक पेन्शन घेतल्यावर दारूच्या आहारी जातात. यासाठी एक मंडळी स्थापन झाली असून ती निधी जमविणार आहे.

२२८२ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २९१)

दारूने धुंद झालेल्या माणसाच्या अंगावरचे ११२ रुपयांचे दागिने दुकानदाराने काढून घेतले. दारूखानेवाल्यासाठी कायदा करावा.

२२८३ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २९२)

जमना नावाच्या भिकारणीचे ७३० रु. मणीराम या गृहस्थाने चोरले. माजिस्त्रेताने खटला दाखल करून घेतला. पाहा की, भिक्षा देणेही किती धोक्याचे आहे ? लाचारीही वाढत असते.

२२८४ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २९२)

पुण्यात उत्सवाचा पूर्वीचा उत्साह दिसत नाही. लोक कमी झाले, श्रीमंतीस क्षय लागला.

२२८५ (१० : १८, १५ सप्टेंबर ५१, २९२)

देवी काढण्यापासून फायदे, या विषयावरील एका पारशाचा निबंध उत्तम असून त्यास बक्षीस मिळणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक १९, मुंबई, १ ऑक्टोबर १८५१

२२८६ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, २९३)

आयर्लंडचे मिशनरी अमदाबादेस एक मिशन व हायस्कूल सुरू करणार.

२२८६ अ (इंम : २९२)

२२८७ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, २९३–२९४)

महिकाठा मिशन या मंडळीने देवाण व बरसद अशी दोन गावे वसविलेली आहेत. गावातील दुष्टांनी खिस्त्यांना मारण्याचा कट केला. पण ईश्वरी कृपेने ते सुरक्षित आहेत.

२२८७ अ (इंम : २९३)

२२८८ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, २९४)
फ्रामजीच्या स्मरणार्थ पैका जमविला आहे. ते देशसुधारक होते. म्हणून पदार्थालय व पुस्तकालय सुरू करणार आहेत. स्मारकशिलाही उभारण्याचे ठरले.

२२८८ अ (इंम : २९४)

२२८९ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, २९७–२९९)
दादोबांचे व्याकरण : स्वार्थी भूतकाळ व कृदंत यांची कर्मणि उदाहरणे दिलेली नाहीत. माझ्याने देववावे, देववते, अशी रूपे होतच नाहीत. यावून नुसता वाचकांचा गोंधळ मात्र उडतो. व्हावा होता, व्हावा असावा, असे कोणी म्हणत नाहीत. साधित पदांचा विचार फक्त संस्कृतात उपयुक्त आहे. दादोबाची भाषा संस्कृतप्रचुर आहे. (परीक्षण चालू)

२२८९ अ (इंम : २९४–२९७)

२२९० (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, २९९–३०२)
येशू ख्रिस्तमाहात्म्य : लाजारस केवळ देवाच्या गौरवासाठी जगत होता. त्याचा मृत्यू झाल्यामुळे येशू अस्वस्थ झाला. त्याची कबर चार दिवसांपूर्वी तयार झाली होती. कबरेपाशी हाक मारल्यावर प्रेतपण नाहीसे होऊन तो जिवंत झाला ! ख्रिस्ताचे गुण सांगण्यास बुद्धि अपुरी पडते.

२२९१ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०३)
अज्ञान शेतकरी जुन्या पद्धतीने शेती करतो. सुशिक्षित शेतकरी बैलगाडी प्रमाणेच घोडागाडी वापरतो. खरा धर्म स्वीकारल्यामुळेच तो सुखी झाला. तो यंत्राने शेती करतो. (सचित्र)

२२९२ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०४–३०५)

सयामात सती जाण्याची चाल नाही मांसाहार वर्ज्य असूनही ते बेधडक मांसाहार करतात. स्वस्ताई व कामाची सुलभता या कारणांनी तेथे भिकारी नाहीत. शेतकरी राजासही तुच्छ मानतो. दुसरा मजला बांधणे निषिद्ध समजतात. लोक लाचार, पण शिरजोर, लोभी, आणि हावरट, पण भित्रे आहेत. आदरसत्कारात मात्र प्रवीण आहेत.

२२९३ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०५)

बंगालमध्ये १ लाख ६७ हजार फौज आहे. पैकी १५ हजार बंगालमध्ये राहाते.

२२९४ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०५)

मिसर देशात १४० मैलांचा लोखंडी रस्ता होणार.

२२९५ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०५)

रणजितसिंगाचा वारस रणबीरसिंग हा २४ वर्षांचा आहे.

२२९६ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०५)

पुण्यात सात ब्राह्मणांनी एका दारूबाजास प्रायश्चित दिले, म्हणून त्यांना बहिष्कृत करण्यात आले.

२२९७ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०५–३०६)

परमहंस सभा स्थापन झाली, अशी बातमी मिळाली आहे. विशेष तपशील मिळत नाही. परंतु तरुण लोक पुराणातल्या खोट्या गोष्टींचा भरवसा धरीनासे झाले, एवढे मात्र निश्चित आहे. वादविवाद होऊनच प्रकाश वाढेल.

२२९८ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०६)

लहानपणी सौम्य वाटणाऱ्या नीरोने अतिशय क्रूरपणा दाखविला : प्रेषित पॉल व पीटर यांचा वध केला.

२२९९ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०६–३०७)

ढोंगद्वेष्टा लिहितो की : भुलेश्वरचा ढोंगीबाबा हा साधू फक्त फळे खातो. बडेबडे लोक त्याच्या पाया पडतात. पण तो प्रश्नांची नीट उत्तरे देत नाही, नुसतेच नरकात पाठविण्याचे भाषण करतो. धर्मशास्त्र त्यास ठाऊकही नाही.

२३०० (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०७–३०८)

शरीरास हितकारक समजून अफू खाणाऱ्या पारशाने जीव दिला. त्याचे कुटुंब निराधार झाले.

२३०१ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०८)

स्त्रियांच्या सुधारणुकेचा ग्रंथ लिहून पुस्तक मंडळीकडे (बीटीबीएस्) पाठवावा. १०० रुपये बक्षीस मिळेल.

२३०२ (१० : १९, १ ऑक्टोबर ५१, ३०८)

वाईकर भिक्षुकाने चार हजारांचे दागिने चोरले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक २०, मुंबई, १५ ऑक्टोबर १८५१

२३०३ (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३०९)

रे. कुल्लन, प्लक्स्त व डिरस मंगलोर मिशनला जात आहेत. ते नुकतेच विलायतेहून आले.

२३०३ अ (इंम : ३०९)

२३०४ (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३११–३१२)

ब्राह्मण हे भूदेव, तर इतर पशु, असल्या समजुती इकडे आहेत. पण जातिभेद ही पायातली बेडी आहे. शिक्षकही इतर जातींना तुच्छ लेखतात, हे विपरित आहे. पलटणीमध्ये सगळ्या जाती एकत्र राहातात. पूर्वी अदालतीतसुद्धा अस्पृश्यता पाळली जात असे. ब्राह्मण-पारशी फिरंगी यांशी मात्र चांगले वागतात, हे आश्चर्य आहे. बंगाल व मद्रास येथीलप्रमाणे इकडेही समानतेचा कायदा करावा. (रिपोर्ट ऑफ दी बोर्ड ऑफ एज्युकेशन IX १८५०–१८५१)

२३०४ अ (इंम : ३०९–३११)

२३०५ (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३१३–३१४)

मद्रासेत काही उंच जातीच्या विद्यार्थ्यांनी अतिशूद्रांबरोबर बसणे नाकारले आणि ते गैरहजर राहू लागले. शाळेच्या गुरूंनी फार खंबीरपणे शूद्रांची बाजू घेतली. गैरहजर स्पृश्य विद्यार्थ्यांची नावे काढून टाकली.

२३०५ अ (इंम : ३१३)

२३०६ (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३१४–१५)

नगरला सरकारी व सावकारी मंडळ स्थापन झाले. स्त्रियांच्या सुधारणेकडे ते लक्ष देईल.

२३०७ (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३१५)

एका अमेरिकनाने शेतकापणीचे यंत्र तयार केले. हे यंत्र वीस माणसांचे काम करील.

**२३०८** (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३१५)

कलकत्याहून विलायतेसाठी रस्ता होणार.

**२३०९** (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३१५)

दक्षिण व उत्तर अमेरिकेस जोडणारा रस्ता होईल.

**२३१०** (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३१९–३२३)

यात्रेत गोसावी लोक फार धिंगामस्ती करतात. प्रयागवर ते फार दांडगे व निष्ठुर आहेत. उपस्त्री ठेवतात. लाखो रुपये उत्पन्न मिळवितात. भिकारी मात्र उपाशी मरतात.

**२३१० अ** (इंम : ३१५–३१९)

**२३११** (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३२३–३२४)

युरोपीय सरदार बळकट गढ्या बांधीत असत. फ्रांक लोकांनी जहागिरी पद्धत सुरू केली. सरदारकन्यांवरून अनेक वेळा लढाया होत असत. सूडाच्या भावनेने त्या अनेक वर्षे चालत. (प्रश्न)

**२३१२** (१० : २०, १५ ऑक्टोबर ५१, ३२४)

न्यायखात्याच्या कामावर उत्कृष्ट निबंध लिहिणारास बक्षिसे दिली जातील. उत्तम प्रतीच्या निबंधास रु. १५०/–; मराठी किंवा गुजराती भाषेत (गुजराती व इंग्रजी मजकूर) ग्रंथ चालेल. विलबीसाहेब बक्षीस देणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक २१, मुंबई, १ नोव्हेंबर १८५१

**२३१३** (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३२५)
शास्त्रातील गोष्टी (सचित्र) : नवीन सुंदर पुस्तक आहे. पृष्ठे ७० किं. १ आणा आहे.

**२३१३ अ** (इंम : ३२५)

**२३१४** (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३२६)
एका पार्शी वृत्तपत्राने पैगंबराचे चित्र छापल्यावरून दंगा झाला. धर्मावरून दुरुत्तरे छापणे वाईट आहे. परंतु त्यासाठी मारामारी करणे आणखी वाईट होय.

**२३१४ अ** (इंम : ३२४)

**२३१५** (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३२९–३३१)
मुंबई इलाख्यात ९ लाख विद्यार्थ्यांसाठी १२,७१२ शिक्षक आहेत. अमेरिकेपेक्षा आमच्याकडे २० पट अधिक खर्च आहे! मिशनरी शाळांचा खर्च तुलनेने कमी आहे. सरकारी शाळेत धर्मशिक्षण दिले जात नाही, हेही अयोग्य होय. शिक्षणाने नास्तिकपणाच वाढतो. देवाचे भय कमी होते. विद्याभ्यास हेच काही सार्थक नाही. (रिपोट ऑफ द बोर्ड ऑफ एज्युकेशन, १ जानेवारी १८५०, ते एप्रिल ३०, १८५१ क्रमांक IX)

**२३१५ अ** (इंम : ३२६–३२९)

२३१६ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३३–३३४)

महाराष्ट्र भाषेचे व्याकरण गंगाधरशास्त्री फडके यांनी लिहिले. विभक्तिप्रत्ययांबद्दल प्रत्येकजण निराळे मत व्यक्त करतो. सहाय क्रियापदांचाही गोंधळ वाढत आहे.
(चवथी आवृत्ती. संपूर्ण सुधारलेली आवृत्ती. गणपत कृष्णाजी, १८५०)

२३१६ अ (इंम : ३३१–३३३)

२३१७ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३४–३३६)

महायात्रा : आपल्या संसारातील संकटांवरून लोक गंगेस साकडे घालीत असतात. काशीचे रस्ते फारच अरुंद आहेत. तारकेश्वराचे देऊळ बहुधा पाण्यातच असते. गंगेच्या पाण्याला स्पर्श केला की, माणूस 'विष्णुरूप' होतो, पण याचा काही अनुभव आला नाही, असे 'विश्वेश्वरदास' म्हणतो.

२३१८ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३७–३३९)

सयाम येथील बौद्धभिक्षु संन्यासी जीवन जगतात. काही संसारी लोकसुद्धा जून ते नोव्हेंबर संन्यासी बनतात. ब्रह्मचर्य व निर्व्यसनीपणा ही बंधनेही पाळतात. सोन्याला स्पर्श करीत नाहीत. वपन करून अंगभर भगवे वस्त्र घालतात. सगळ्या देशात ५० हजार साधू आहेत.

२३१९ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३९)

लंडन : पदार्थसंग्रहालय पहाण्यास ४२ लाख ६० हजार लोक आले होते.

२३२० (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३९)

ग्रांट वैद्य शाळेच्या अनंत चंद्रोबास कलकत्यास नेमले आहे.

२३२१ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३९)
मद्रासच्या काही लोकांनी आपोआप हलणारे पंखे तयार केले.

२३२२ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३३९)
दारूच्या चोरट्या विक्रीचे प्रमाण वाढत आहे.

२३२३ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३४०)
मुंबई ते ठाणे सागरमार्गावर फिरती आगबोट राहणार.

२३२४ (१० : २१, १ नोव्हेंबर ५१, ३४०)
दिवाळीचा सण : 'उपयोगी व्ययकर्ता' लिहितो की : फटाकडे हा पैशाचा अपव्यय आहे. मुंबईत दरवर्षी २ लाख रुपये शोभेच्या दारूत जातात. त्यापेक्षा शिक्षणाकडे पैका खर्च करा.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक २२, मुंबई, १५ नोव्हेंबर १८५१

२३२५ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४१)
पशुज्ञानप्रकाश (सचित्र) : लहान मुलांना आवडेल असे हे पुस्तक आहे. (अ. मि. प्रेस, पृ. २४, १८५१, ४ आणे)

२३२५ अ (इंग : ३४१)

२३२६ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४१)
खिस्ती शास्त्रातल्या कथा : ३० वेळा छापले गेले. पृष्ठे २००, किमत सहा आणे आहे.

२३२६ अ (इंम : ३४१)

२३२७ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४३)
महंमदाचा वृत्तांत : पुस्तक मंडळीने छापिला. १७४ पृष्ठे.

२३२८ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४३)
'सृष्टीतील चमत्कार' : भाषां. रा. गोविंद नारायणाने केले. तीस विषयांचे एकेका पृष्ठावर इंग्लिशमध्ये वर्णन केले आहे. समोर दुसऱ्या पृष्ठावर मराठी लिहिले आहे. किंमत ५ आणे.

२३२८ अ (इंम : ३४२)

२३२९ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४४)
'भरतखंडपर्व' : पुराणे म्हणजे इतिहास नव्हे, असे ग्रंथकर्ता म्हणतो; ते बरोबर आहे. लेखक स्तुतीस योग्य आहे.
(शब्दालंकारादि ग्रंथ करणार) किं. १० आणे ज्ञानप्रकाश प्रेस, पुणे–१८५१

२३२९ अ (इंम : ३४३–३४४)

२३३० (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४५–३४६)
दक्षणी भाषेत पुस्तके प्रसिद्ध करणारी मंडळी : या मंडळीने १४,००० रुपये जमविले. अनेक विषय निवडून त्यांवर उत्तमोत्तम पुस्तके छापली.

२३३० अ (इंम : ३४५)

२३३१ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४६)
पुस्तके प्रसिद्ध करणारी गुजराथी मंडळी अहमदाबादवर निबंध करणारास बक्षीस देणार आहे.

**२३३१ अ** (इंम : ३४६)

**२३३२** (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४७)

आगरा येथील सरकारी शाळेने जातिभेद करावयाचा नाही, असा ठराव केला.

**२३३२ अ** (इंम : ३४७)

**२३३३** (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४७)

कराची ते मुलतान ८०० मैलांचा आगबोट–मार्ग सुरू झाला. याने व्यापारास उत्तेजन मिळेल.

**२३३३ अ** (इंम : ३४७)

**२३३४** (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४८–३४९)

पुण्यातील दक्षिणा सभेने नवे ग्रंथ व भाषांतरे करणारांना १३०० रुपयांची बक्षिसे दिली. बक्षिसे येणेप्रमाणे :

| | |
|---|---|
| १) हरी रघुनाथ गाडगीळ : संक्षेप इतिहासाबद्दल | रु. २०० |
| २) शंकरशास्त्री गोखले : व्यवहारदर्पण | रु. १५० |
| ३) विष्णु मोरेश्वर भिडे : सैरस, इराणचा प्राचीन बादशहा. | रु. १५० |
| ४) कृष्णशास्त्री चिपळूणकर : साक्रेतीस | रु. १५० |
| ५) भाऊशास्त्री पेटकर : रोम बादशहाचा वृत्तांत | रु. १५० |
| ६) कृष्णशास्त्री राजवाडे : 'शब्दालंकार' | रु. १०० |
| ७) गणेश सदाशिव लेले : क्यापटन कुक्‌ | रु. १०० |
| ८) गंगाधर रामचंद्र टिळक : त्रिकोणमिती | रु. १०० |
| ९) रामचंद्र गोविंद करंदीकर : बेंजामिन फ्रँकलिन | रु. १०० |
| १०) रामकृष्ण विनायक मोडक : रेखागणित | रु. १०० |

२३३५ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४८)
लोक तीर्थयात्रेसाठी लगबग करतात. त्यापेक्षा घरीच राहावे व मन शुद्ध ठेवून खऱ्या देवास भजावे. (कविता)

२३३६ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४९)
गंगाधरशास्त्री फडके यांनी सुचविले की : पुनर्विवाहास परवानगी असावी. अशा सामाजिक फेरफाराची आवश्यकता आहे. (प्रभाकरवरून)

२३३७ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३४९–३५०)
सरदार बहादुराविषयी : बळकट घोड्यावरून हिंडणारे युरोपियन कित्येक वेळा गंमत म्हणून युद्ध करीत असत. घोड्यालाही पोलादी चिलखत चढवीत असत. भालाईत लोकांची मोठ्या मैदानावर झुंज होत असे. इलिजाबेथ या राणीच्या अंमलात सरदारांचे महत्त्व कमी झाले.

२३३८ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३५०–३५२)
उपदेशपद्धती : येशू पापाचे मूळच खंडून टाकतो. तो भिकाऱ्यांनाही उपदेश करीत असे की : आपली दृष्टी शुद्ध असावी. परमेश्वराच्या कृपेचा शोध घ्यावा. पुण्याईचा गर्व धरून इतरांना तुच्छ लेखू नये. आपले नीचपण जो जाणतो, तो खरोखर उंच समजावा. मालकाने सेवक बनले पाहिजे. (कविता)

२३३९ (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३५३–३५६)
सयामात म्हाताऱ्या भिक्षुणी मठात राहातात. बौद्ध धर्म कोणीही स्वीकारू शकतो. सयामी भिक्षू ताडपत्रावर पेन्सिलीने लिहितात. राजा हा देशाचा सर्वाधिकारी आहे. एकवीस वर्षे पूर्ण झाल्यावर प्रत्येकास चार महिने सरकारी काम करण्याची सक्ती असते. भिक्षूंना या नियमातून सूट मिळते.

**२३४०** (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३५६)
लंडन म्यूझियमला एका दिवसात ५१,७५० रु. उत्पन्न मिळाले.

**२३४१** (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३५६)
लंडन व पॅरिसमध्ये बातमी पाठविणारे विजेचे यंत्र तयार झाले.

**२३४२** (१० : २२, १५ नोव्हेंबर ५१, ३५६)
डाकेच्या हसिलाचा नवा कायदा होणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक २३, मुंबई, १ डिसेंबर १८५१

**२३४३** (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३५७)
मिशनरी रे. एवन्स मिर्जापुरात राहणार.

**२३४३ अ** (इंम : ३५७)

**२३४४** (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३५८)
मुंबईतील दंगा : दंग्याच्या बंदोबस्तास सरकारने कुचराई केली, अशी टीका होत आहे. परंतु सरकारने आवश्यक तेवढेच बळ वापरले.

**२३४४ अ** (इंम : ३५७-३५८)

२३४५ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३५९–३६०)

हिंदुधर्मसभा : धर्माच्या रक्षणाकरिता मेहनत घेणे, हे बरे आहे. परंतु दुसऱ्याची निंदा न करता काम करावे. आम्ही वादास तयार आहोत. पण द्वेष नको आहे. एका परभूने या सभेसाठी पुढाकार घ्यावा, याचे मात्र नवल वाटते.

२३४५ अ (इंम : ३५८–३५९)

२३४६ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३६२–३६४)

अमेरिकेत लोक स्वतः शाळेचा खर्च चालवितात. इकडे लोकांना ४–६ आणे भरणेही कठीण वाटते. सरकारी शाळेत तर एक आणा घेतात व तोही माफ होतो. पण फी असल्याशिवाय ज्ञानाचे महत्त्व कळणार नाही.

२३४६ अ (इंम : ३६०–३६३)

२३४७ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३६४)

बंगाली मिशनने कोल लोकांत चांगली सुधारणूक घडविली. २०० लोकांची दीक्षा पूर्ण झाली.

२३४७ अ (इंम : ३६४)

२३४८ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३६६–३६७)

भरतखंडातील मिशने : या देशात ३०९ मंडळ्या आहेत. ५ लाख ३०० ख्रिस्ती झाले. मिशनच्या १३४५ शाळांत ८५,००० विद्यार्थी शिकतात. कित्येक मिशनऱ्यांनी १६ वर्षे अखंड कार्य केले. मुलींच्या शाळा ३५४ आहेत. त्यांत ११,५०० कन्या शिकतात.

२३४८ अ (इंम : ३६५–३६६)

२३४९ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३६७–३६८)

पृथ्वी, आकाश, उदक, यांसही देव मानून त्याची पूजा करतात. मृतासही देवरूप मानतात. त्याची पुराणे तयार करतात. मूर्तीचा जन्मच अज्ञानातून होतो.

२३४९ अ (इंम : ३६७)

२३५० (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३६८–३७१)

सयामचे वर्णन : सयाममध्ये लिहिलेले कायदे फार थोडे आहेत. छडी व फटके यांपासून शिक्षा दिली जाते. सयामींना 'थाई' असे नांव दिले जाते. तेथे इ. स. ६३८ पासून बौद्ध धर्म चालू आहे. वाहतुकीसाठी मेनाम नदीचा फार उपयोग होतो. १७६७ इसवी या वर्षी ब्रह्मदेशाने या देशावर हल्ला करून फार धूळधाण केली. इंग्रजांनीही या देशाचा बराच भाग घेतला. अजूनही त्यांचे युद्ध चालू आहे.

२३५१ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३७१)

कर्नल जर्वीसचा मृत्यू झाला.

२३५२ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३७१)

रस्ते, तळी करणाऱ्या (बोर्ड ऑफ कानझरवन्सी) मंडळीने ३ लाखांवर खर्च करून गावांची सोय केली.

२३५३ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३७२)

दिल्लीची बातमी : शिया व सुनी यांत तंटा होऊन ५० घायाळ झाले.

२३६४ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३७२)
'सदोदितमंडळी' : कलकत्ते मुक्काम आक्टोबर महिन्याच्या २९ तारखेस देशाचे कल्याण पहावे, या हेतूने सदोदित मंडळी स्थापावी व तिने विचार करून लोककल्याणाविषयी सरकारला शिफारस करावी, असे ठरले. विलायतेंत कंपनी सरकारची नवी सनद होणार ती कोणत्या रीतीने करावी, याविषयी आपले मत दाखवावे.

२३६५ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३७२)
एका गुजराती मुलीची शिक्षणमंडळाने परीक्षा घेऊन तिला ११४ रुपयांची पुस्तके बक्षीस दिली.

२३६६ (१० : २३, १ डिसेंबर ५१, ३७२)
हल्ली बडोद्यात लाच घेऊन दगलबाजी करण्याचे प्रकार वाढले आहेत. चौकशी झाली पाहिजे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १०, अंक २४, मुंबई, १५ डिसेंबर १८५१

२३६७ (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३७३)
१८५२ चे पंचांग तयार होत आहे.

२३६७ अ (इंम : ३७३)

२३६८ (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३७३)
मद्रासेत तिघा नेटिवांना पालकाचे काम दिले आहे.

**२३५८ अ** (इंम : ३७३)

**२३५९** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३७४–३७५)

मुंबईतील दंगा : दंगलखोरांस मृत्युदंड द्यावा, असे काही लोकांचे मत आहे. पण दंगल होऊच नये, असा बंदोबस्त करणे आवश्यक ठरते.

**२३५९ अ** (इंम : ३७३–३७४)

**२३६०** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३७६–३७७)

सरकारला दारूचा अबकारी कर म्हणून ८१ लाख रुपये मिळाले. शेकडो लोक दारू पितात. हे भ्रष्टकारक व्यसन वाढत आहे. गरीब लोक कुटुंबाचे हाल करून व्यसन चालवतात. गावकऱ्यांनी अर्ज करून दुकाने घालवून द्यावीत.

**२३६० अ** (इंम : ३७५–३७६)

**२३६१** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३७९–३८०)

बाबा पद्मनजी लिहितात की : आपल्या धर्माचा फेरविचार लोक करीत आहेत. वर्तमानपत्राचा ते कंटाळा करतात. धर्मावर आंधळा विश्वास टाकणारांना वाटते की, सर्वच उलटे होत चालले. हा कलीचा प्रभाव आहे. पण इंग्रजांनी येथे कायद्याचे राज्य स्थापन केले. यांत्रिक सुधारणा केल्या. सुज्ञ लोक तर म्हणतात की, कलियुग संपले. लोकांच्या अडाणी समजुतीही संपल्या पाहिजेत.

**२३६१ अ** (इंम : ३७९–३८०)

**२३६२** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८०)

पापाच्या प्रभावाने जगात नरकाची आग पेटली. देवाचा राग वाढत आहे. पापमुक्तीनेच सुखमुक्ती साधेल. (कविता)

**२३६३** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८१–३८२)

हिंदुधर्माविषयी श्रद्धोत्पादक ग्रंथ : गंगाधरशास्त्री फडके हा ग्रंथ तयार करीत आहेत. लोकांनी प्रमाणे शोधून व वाचून नीट विचार करावा.

**२३६३ अ** (इंग्र : ३८१)

**२३६४** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८२–३८३)

फ्रान्सचा फिलिप राजा सुंदर होता. पण त्याचे गुण मात्र वाईट होते. तो पोपचे ऐकेना. म्हणून पोपने त्यास मंडळीतून काढून टाकले. इंग्रज व फ्रेंच यांचे दीर्घकाळचे शत्रुत्व होते. त्यांच्यात लढाई सुरू झाली. फ्रेंच राजकन्या जोन आफ अर्क हिने सेनापतित्व केले. पण लोकांनी तिला चेटकाळी समजून जाळून टाकले!

**२३६५** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८३–३८४)

(रोमच्या) आगस्तसचे साम्राज्य फार मोठे होते. त्याला लढाईचा कंटाळा होता. शिपायांचे वेतन दुप्पट करून तो आरामात राही. प्रजाही चैनी व आळशी होती. पण सम्राटाचे हुकूम मात्र बिनचूक पाळीत असे.

**२३६६** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८४–३८६)

येशू उपदेश करी की : स्वर्गात जावयाचे असेल, तर गर्व सोडावा. अपकारास उपकाराने उत्तर द्या. सावकाराने कुळाचे कर्ज सोडून दिले पाहिजे. देवाजवळ भेदाभेद नाही. जखमी माणसांची तो स्वतः सेवा करीत असे. (कविता)

**२३६७** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८७)

जगाचा संक्षिप्त इतिहास, व्यवहारदर्पण, खुसरूपाचा इतिहास, साक्रेटिसाचा इतिहास व अलंकारविवेक, या पुस्तकांना १३०० रु. ची बक्षिसे मिळाली.

**२३६८** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८७)

दारूबाजास शुद्ध करून घेऊ नये. त्यास वाळीत टाकावे.

**२३६९** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८७)

बाबू ईश्वरचंद्र भोस याने मुलीस शाळेत घातले, म्हणून त्यास पंचगव्य पिऊन प्रायश्चित घ्यावे लागले !

**२३७०** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८७)

मुंबई दंगलीतील गुन्हेगारांना शिक्षा झाली. दोघांना मनुष्यवधामुळे फाशी झाली.

**२३७१** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८७)

निजाम सोने विकून सरकारचे कर्ज फेडणार.

**२३७२** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८७–३८८)

चीनचा चहा हा विषारी असल्याबद्दल सिद्ध झाले. हिमालयावर उगवणारा चहा मात्र उत्तम आहे.

**२३७३** (१० : २४, १५ डिसेंबर ५१, ३८८)

नवीन विठोबा : नागोठण्याजवळ पालीस विठोबाची मूर्ती प्रगट झाली, ही अफवा उठल्यामुळे लोक गर्दी करीत आहेत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२३७४** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, २)
संपादकीय :
एतद्देशींप्रमाणे साहेबलोकही ज्ञानोदयास अनुकूल होत आहेत.
तोटा सोसून पत्र छापतो. लोकांस ज्ञान मिळावे हा हेतू आहे. उपयुक्त मजकूर पाठवावा.

**२३७४ अ** (इंम : १–२)

**२३७५** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, ३)
इंग्लिश आदि तारखा असलेले पंचांग अमेरिकन मिशनने छापले.
किंमत एक आणा.

**२३७५ अ** (इंम : ३)

**२३७६** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, ३)
लहान गणित नावाचे पुस्तक पूर्वी छापिले होते. ते आता तपासून छापिले आहे. लहान मुलांस फार उपयुक्त ठरेल. किं. २ आणे.

**२३७६ अ** (इंम : ३)

**२३७७** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, ६–९)
पालीस स्वयंभू विठोबा प्रगट झाला असे कळले. एका सुतारास स्वप्नात दृष्टांत झाला होता. पुजाऱ्यासही बरे उत्पन्न मिळते. पण मूर्ती घडीव आहे. कोणीतरी तेथे आणून ठेवली असावी. पोटासाठी काही ढोंग करणे, ही रीत जुनीच आहे. (मामलेतदाराचा सरकारास रिपोर्ट)

**२३७७ अ** (इंम : ३-६)

**२३७८** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, ९)

नवीन विठोबाच्या निमित्ताने संपादकांचा अभिप्राय :
अनेक देवतांचे दर्शन घेऊनही पाप कायमच राहिले. निराशा वाढली.
आता एकच उपाय राहिला. खऱ्या देवास भजावे.

शांति होत नाही सदा राहे पाप ।।
अहोरात्र ताप मना माजी ।। १ ।।

**२३७९** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, १०)

दहा हजार रुपयांच्या बोलीवर बंगालमधून ब्रह्मदेशाकडे आगबोटीने
सैनिक रवाना झाले. ब्रह्मी सरकारास हा जुलूम वाटतो.

**२३८०** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, १०-१३)

जे पदार्थ व व्यक्ती वाढतात व चालतात, त्यांना जंगम म्हणावे. उदा.
माणूस. जे पृथ्वीतून उत्पन्न होतात, त्यांस उद्‌भिज्ज म्हणावे; उदा. झाड.
निर्जीव पदार्थांना स्थावर म्हणावे उदा. दगड. (इंग्रजी शब्दांचे मराठी
अर्थ.) प्राणिशास्त्रासंबंधी माहिती.

**२३८० अ** (इंम : १०)

**२३८१** (११ : १, १ ज्यानुएरी ५२, १५-१६)

"भरतखंडाभिमानी" हे सिंहासनावरील नाव मळकट व पुसट झाले, असे
"एक हिंदू" लिहितो. "इंग्लंडदेशाभिमानी" ची मुले मात्र फार उद्योगी
ज्ञानी, पराक्रमी निपजली आहेत. ती सुदृढ असून यंत्रांचा उपयोग
करतात.

एक रूपक : ज्ञानप्रकाश दि. १८५१ वरून. एका हिंदूचे पत्र.

२३८१ अ (इंग : १४–१५)

२३८२ (११ : १, १ ज्यानुएरी ५२, १६)
युरोपमधून चीनमध्ये ७९ मिशनरी गेले. त्यांत ४८ अमेरिकेतून, इंग्लंडातून २५, जर्मनीहून ३, स्वीडनहून २ आणि २ स्विटजर्लंडाहून आलेले आहेत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक २, मुंबई, १५ ज्यानुएरी १८५२

२३८३ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, १७)
दक्षिण अफ्रिकेतले रानटी लोक इंग्रज फौजेशी लढाई करीत असतात. चोरी, लूटमार करून इंग्रजांना त्रासून सोडतात. (सचित्र)

२३८४ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, १८–१९)
फ्रान्समध्ये राजाविरुद्ध कट करणे व त्याला विषप्रयोग करणे, असे प्रकार नेहमी चालत असत. विजयी चार्लस् राजा विषाच्या भीतीने झिजून वारला. चवथा हेन्री या शहाण्या व उदार राजास मारेकऱ्यांनी घातपात करून मारले. (प्रश्न)

२३८५ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, १९–२०)
नवी सनद देताना इंग्रज बादशहाने चांगला विचार करावा, असे नेटिवांनी सुचविले पाहिजे. संस्थानिकांनी व जहागीरदार यांनी आपले प्रतिनिधी पाठवून सूचना कराव्यात. एकाही राजास अशी बुद्धी होऊ नये हे दुर्दैव होय.

**२३८५ अ** (इंम : १९)

**२३८६** (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २०–२१)

अमेरिकेची ३१ संस्थाने असून वस्ती ३ कोटीवर आहे. आयात-निर्यात, वृत्तपत्रे, डाक, रेल्वे, सर्वच बाबतीत ती आघाडीवर आहे. नेटिवांनी दुर्गुण सोडून अशी प्रगती करावी.

**२३८६ अ** (इंम : २०)

**२३८७** (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २२)

६ नवंबर १८४९ साली मुंबईचे लोकांनी सरकारास अर्जी केली. त्यास सरकारचा जबाब समाधानकारक नाही. दारूच्या उत्पन्नावर आम्ही नजर ठेवतो, या म्हणण्यात काही अर्थ नाही. दुकाने बंद करून कंत्राटे रद्द करा व दंगलखोरांस कडक शासन करा. (ज्ञानप्रकाशवरून)

**२३८७ अ** (इंम : २१–२२)

**२३८८** (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २३)

दारूच्या व्यसनाने लोक अन्नवस्त्राला महाग होऊन बसले आहेत. दरिद्र वृद्धिंगत होत आहेत. अशा भिकारी लोकांकडून सरकारास कर कसा मिळेल? लोक तर दारूने बुडत चालले. (ज्ञानप्रकाशवरून)

**२३८८ अ** (इंम : २२–२३)

**२३८९** (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २४–२५)

हिंदूचे ज्ञान ब्राह्मणाच्या ठिकाणी साचलेले आहे. जो संशय धरितो, त्यास ते नास्तिक व शापग्रस्त मानतात. स्वबुद्धीने विचार करूच देत नाहीत. पण हे ज्ञानी माणसाचे लक्षण नाही. आपण बिनचूक, असा अभिमान खोटा असतो. वेदाखेरीज सारे पाखंड आहे, असे मानणे चूक आहे.

**२३८९ अ** (इंम : २३–२४)

**२३९०** (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २६–२७)

धोब्याने राजास कुंभाराविरुद्ध चिथावले. तेव्हा कुंभारानेही डाव टाकून हत्ती गोरा करण्याची कामगिरी धोब्यावर सोपविली. कुंभाराने एक मोठे गाडगेही तयार केले. परंतु हत्तीने पाय ठेवताच ते फुटले. तात्पर्य, दुसऱ्याच्या नाशाची योजना आत्मघातकी असते.

**२३९० अ** (इंम : २५–२६)

**२३९१** (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २७–२९)

आपला कशाने नाश झाला व उदय कसा होईल, याचा विचार करावा. धर्म व विद्या यांबाबतचे अज्ञान दूर करावे. आपली स्थिती कूपमंडूक प्राण्याप्रमाणे झाली आहे. जातिभेदामुळे यांत्रिक सुधारणेस प्रतिबंध उत्पन्न झाला. विद्या म्हणजे जुनी शास्त्रे नव्हेत. अनुपयुक्त विद्या शिकलेले लोक श्रीमंतांचे आश्रित होतात. व्यापारातील अज्ञानामुळे कर्ज व व्याज वाढते आहे. अनुद्योगी लोकांची संख्या कमी झाली पाहिजे. धर्मवेड कमी व्हावे. देशाच्या कल्याणार्थ काय करावे, निबंधाचा सारांश : कृष्णा चिपळोणकर.

**२३९१ अ** (इंम : २७)

२३९२ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २९)
रेल नामे पाणकोंबडा या चमत्कारिक पक्ष्याचे पंख व शेपूट लांडे असते. पाण्याच्या ठिकाणी राहून तो खाद्य मिळवितो. पायास कातडी असल्यामुळे त्याला चिखलात पाय न रुपता चालता येते. (सचित्र)

२३९३ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, ३०)
लुई नेपोलियनने फ्रेंच पार्लमेंटची सत्ता झुगारून दिली.

२३९४ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, ३०)
आस्त्रियन राजा रयतेवर जुलूम करतो.

२३९५ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, २९)
मनीशाळेची लॉर्ड बिशपनी स्वतः परीक्षा घेतली. विद्यार्थ्यांना योग्यतेनुरूप इनामे वाटली.

२३९६ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, ३१)
लढाईच्या खर्चापोटी ब्रह्मदेशचा मुलुख इंग्रज सरकार घेणार. हल्लीच समजण्यांत येते की, ब्रह्मी सरकारने आपला अन्याय कबूल करून सरकार जी शिक्षा करील ती, आम्हांस मान्य आहे, असा निरोप पाठविला.

२३९७ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, ३१)
इंग्लंडमधून २ कोटी ३ लक्ष लोक गेल्या २६ वर्षांत अमेरिकेत गेले.

२३९७अ (इंम : ३१)

२३९८ (११ : २, १५ ज्यानुएरी ५२, ३१)

काळाचा योग्य उपयोग केला, तर संपत्ती व सुख प्राप्त होतात. उद्योग व सत्कर्म हाच काळाचा योग्य उपयोग होय. काळ हीच खरी संपत्ती होय. रुपये ही संपत्ती नव्हे. विद्या वाढविण्यासाठी जो काळाचा उपयोग करतो, तो खरा लक्ष्मीवान होय.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक ३, मुंबई, २ फेब्रुवारी १९५२

२३९९ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ३३)

राजे लोकांच्या स्वाऱ्या मोठ्या थाटाच्या असतात. परंतु राजे लोक जुलमी व अभिमानी असतात. जो रयतेची सदासर्वदा काळजी वाहातो, तो खरा राजा समजावा. (सचित्र)

२४०० (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ३४–३५)

'विद्या आणि देशकल्याण' : सुशिक्षितांनी दारिद्य आणि धर्मविषयक अज्ञान घालविले पाहिजे. शेतकरी-कारागिरांना ज्ञान द्यावे. हिशेब शिकवावे. लग्नप्रसंगाचा खर्च कमी करावा. शेतकऱ्यास कोंब्याचा मांडा करण्याची वेळ का येते, याचा विचार करावा. कमी व्याजाने कर्ज देण्यासाठी श्रीमंतांचे मन वळवावे. शेतकऱ्यांस नीतिमार्ग शिकवावा. यंत्रनिपुण कारागिरांना व्याख्याने द्यावीत. मंडळ स्थापून वर्तमानपत्र चालवावे. –नाना आपटे
(दुसरा निबंध)

**२४०१** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ३६)

नारायणस्वामी : स्वामीचे शिष्य त्यांलाच ईश्वरी अवतार समजतात. लोकांशी दांडगाईने वागतात. चमत्कारांचा प्रचार करून भ्रष्टता वाढवितात. (१८४९ ज्ञानोदयांत पूर्वी माहिती आली आहे.)

**२४०१ अ** (इंम : ३५–३६)

**२४०२** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ३६–३७)

कंपनीच्या नव्या सनदेबाबत लोक विचार कळविणार.

**२४०३** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ३६–३७)

पंढरपूरच्या देवळातून देवाचे कडे हरवले. देव नागोठण्यामध्ये गेला की काय?

**२४०४** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ३८–४०)

तंत्रातल्या ग्रंथांत अपवित्र कामे फार आहेत. या देशात भूगोलाबद्दल एकही ग्रंथ नाही. नौकाविद्या नाही. पृथ्वीस सपाट म्हटलेले आहे. घटकेत म्हणतात, पृथ्वी अश्वपत्राकार आहे, तर घटकेत सांगतात, चक्ररूप आहे! एकंदर विसंगती व भ्रमच फार दिसतो. (मागून चालू)

**२४०४ अ** (इंम : ३७–३८)

**२४०५** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४२–४४)

एक हिंदू पत्रात म्हणतो : प्रजेची दुर्व्यसने दूर करणे, हे सरकारचे काम आहे. ग्रंथ तयार करूनही मने बदलत नाहीत. जुगार बंद करून इंग्रजांनी न्यायाचा डंका वाजविला. जरीमरी बंद केली. पण दारूवर उपाय करीत नाही. लोक सर्व कमाई दारूमध्ये उडवितात. सरकारने नीट विचार करावा. (प्रभाकरवरून)

**२४०५ अ** (इंम : ४०–४२)

**२४०६** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४५)
देवस्थानच्या यात्रेमध्ये फार खर्च होतो. हाच पैका लोककल्याणार्थ खर्च करावा. लोकांनीच तसा अर्ज केला पाहिजे. अज्ञान कमी होऊन सुज्ञान वाढले पाहिजे.

**२४०६ अ** (इंम : ४४–४५)

**२४०७** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४५–४६)
काप्र पक्ष्याविषयी : काप्र पक्षी रात्रीचे फिरतात. वटवाघळाप्रमाणे झाडास उलटे लटकतात. एका वेळी दोनच अंडी घालतात. (सचित्र)

**२४०८** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४६)
राणीचा एक प्रधान पामर्सटन याने मंत्रिपद सोडले.

**२४०९** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४६)
पलटणी सरदारांची परीक्षा. त्यावेळी त्यांना केलेला उपदेश.

**२४१०** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४७)
तुकाराम म्हणतात : तीर्थयात्रा कशास करावी ? पूजा करण्याने पुण्य नाही, तर भजन-कीर्तनात पुण्याई आहे.
(तुकारामाचे अभंग.)

**२४११** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४७)
आस्ट्रेलिया देशात सोन्याच्या खाणी सापडल्या.

२४१२ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४७)

निजामाने कर्जापोटी ६० लाख रुपयांचा हिरा देऊ केला. तो घ्यावा की नाही, याचा सरकारांत विचार चालू आहे.
(मद्रासेतील वर्तमानपत्रावरून)

२४१३ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४७–४८)

डाक्तर मिलर दातावर उपचार करतात. दंतरोग्यांनी या उपचारपद्धतीचा फायदा घ्यावा.

२४१४ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४८)

बंगला देशात टिपरा संस्थानात डोंगरी लोक देवीला मनुष्यबळी देत असतात. सरकारने मनाई केल्यावर त्यांनी चिडून ५–१० माणसे ठार मारली. (ज्ञानप्रकाशवरून)

२४१५ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४८)

कोल्हापूरात एका बाईस मृत समजून चिता रचल्यावर आगीच्या झळ्यांनी ती ओरडत उठली.

२४१६ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४८)

गुजराथ सरकारने खाटकाच्या हातून २०० गाई सोडविल्या. तरी अशाने हे क्रूर कृत्य थांबेल असे वाटत नाही.

२४१७ (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४८)

खोटी शपत वाहू नये व खोटी साक्ष देऊ नये. याविषयी लोकांशी संभाषण. मराठी पुस्तक–पोंच.

**२४१८** (११ : ३, २ फेब्रुवारी ५२, ४८)

सोराबजी जमशेटजी जिजिभाई यांचा गुजराती ग्रंथ व परमहंसमतप्रशंसा. मराठी ग्रंथ-पोंच.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक ४, मुंबई, १६ फेब्रुवारी १८५२

---

**२४१९** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ४९)

चिनाई (चिनी) मूर्ती पाषाणाच्या तर असतातच, पण त्यांत सुभावणेपण अजिबात नसते. तिचे भक्तही उदास व निराश वाटतात. (सचित्र)

**२४२०** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५०–५१)

तेरावा लुई : हा लुई गर्विष्ठ व अभिमानी होता. (७२) बहात्तर वर्षांच्या शांत कारकीर्दीनंतर ड्यूक ऑफ मार्लबरोने त्याच्या सैन्याचा पराभव केला. मृत्यूनंतर त्याची प्रजा त्यास शाप देऊन छीथू करीत होती. चौदावा लुई उधळ्या, तर पंधरावा लुई दुर्व्यसनी होता. (प्रश्न)

**२४२१** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५१)

'भाव कोणावर ठेवावा' मध्ये अनेक अभंग प्रसिद्ध झाले. पापामुळे देवाचा राग होऊन माणूस भयानक नरकामध्ये जातो. ईश्वराची मनापासून भक्ती हाच उपाय तारून नेईल.

मनुष्यांचा सर्व पापलिप्त मेला ॥
भंग त्याणी केला देवाज्ञेचा ॥१॥



H-160—7

**२४२२** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५२)

पुण्यातील सरदार लोकांनी कंपनीच्या सनदेबाबत सूचना करण्याचे ठरविले आहे.

**२४२२अ** (इंम : ५२)

**२४२३** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५१–५२)

मुंबईच्या ७ कन्याशाळांमध्ये ५४२ विद्यार्थिनी शिकतात. मिशनच्या शाळांत १५०० मुली शिकतात.

**२४२३ अ** (इंम : ५२)

**२४२४** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५३)

जनरल असेंब्ली इन्स्टिटुशन : डाक्तर स्टीवन्सननी परीक्षा घेतली. ५०२ विद्यार्थी होते. विलायतेहून दोन गुरू येणार.

**२४२४ अ** (इंम : ५३)

**२४२५** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५४–५५)

एल्फिन्स्तन विद्यालय वार्षिक समारंभास सर अर्स्किन हजर होते. धर्मशाळा बांधण्याचे फायदे, या विषयावर भास्कर दामोधर याने उत्तम निबंध वाचला. साहेबांनी विद्यावृद्धीचे महत्त्व सांगितले.

**२४२५ अ** (इंम : ५३–५४)

२४२६ (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५६–५८)

'सेवक कल्याणेच्छू' लिहितो की : स्त्रीपुरुषांना उत्कृष्ट विद्या मिळते, हे चांगले आहे. पण धार्मिक व नैतिक दृष्टिकोन नसेल, तर व्यभिचार आणि जारकर्म वाढेल. नास्तिकपणा तर फार वाढला. नास्तिक माणसे दांडगी व भ्रष्ट असतात. शिक्षित लोक धर्मास तुच्छ मानतात. माणसास धर्म आवश्यक आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

२४२६ अ (इंम : ५५–५६)

२४२७ (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ५९–६०)

'शाक्तचा शत्रू' लिहितो की : मेंढरांसारखी माणसे मद्यप्राशन करून डुकरांसारखी घाणीत लोळतात. शाक्तांच्या राजरोस पिण्यामुळे मोठाच अनर्थ होतो. दारू म्हणजे जिवंत जरीमरी होय. तिच्या तावडीतून लोकांना सोडवावे. इतक्या सुधारणा करणाऱ्या सरकारने दारूच्या उत्पन्नाची हाव ठेवू नये. (प्रभाकरावरून)

२४२७ अ (इंम : ५८–५९)

२४२८ (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६०)

ईश्वर धनको, तर मी ऋणको आहे. माझे पापरूपी कर्ज फेडण्यास जामीन मिळत नाही. ईश्वराच्या रागामुळे नरकाची आग पेटली आहे. शेवटी त्यालाच दया येऊन त्याने आपला पुत्र आम्हांस तारण्यासाठी पाठविला. (आशय)

२४२९ (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६१)

सरकारी तहनामा फाडला, म्हणून मुरादची चौकशी होऊन अमीरपद रद्द झाले. तसेच मुलूख खालसा झाला. (ज्ञानप्रकाशवरून)

**२४३०** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६१)

सन् १८५१ चा आक्ट ९ प्रमाणे :
मुंबईत लहान कज्यांचे कोडत सुरू झाले. मुख्य जड्ज्यास दोन हजार रुपये पगार आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

**२४३१** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६१)

पारचीतचा राजा नारायणदेव वारला. त्याची राणी महादेवी सती गेली.

**२४३२** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६१–६३)

"एक फिरणारा" लिहितो की : भुलेश्वरच्या गुजराथी महाराजाने ईश्वर सप्ताह करून २५ ब्राह्मणांची समाराधना केली. विचार न करता पैसा देण्यात काही फायदा नाही. ब्राम्हणांनीही लोभ सोडून ईश्वरभक्ती करावी. महाराजाने शिष्यांच्या माना मुरगाळून १०–१२ हजार रुपये खर्च केला. प्रामाणिकपणाने पोथी वाचणारे ब्राह्मण दोनसुद्धा नसतील !

**२४३३** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६३)

१८५४ मध्ये पार्लमेंटकडून नवी सनद मिळणार. २१ वर्षांपूर्वी मिळालेल्या सनदेप्रमाणे कारभार चालू आहे. कंत्रोल बोर्डाचे डिरेक्टर्स आपसात नफा वाटून घेतात. (ज्ञानप्रकाशवरून)

**२४३४** (११ : ४, १६ फेब्रुवारी ५२, ६३)

मरणाकडून प्रत्येक घरात दुःख होते. राजमंदिर किंवा गरिबाची झोपडी असा फरक तो करीत नाही. मरणाचे राज्य सदासर्वदा चालते. आकाशलोकात मात्र मृत्यू नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२४३५** (११ : ५, १ मार्च ५२, ६६–६७)

"खोटी शपत वाहू नये, खोटी साक्ष देऊ नये, याविषयी लोकांशी संभाषण :" ज्ञानप्रकाशने हे पुस्तक प्रसिद्ध केले. लेखक म्हणतो की, खोटी शपथ व खोटी साक्ष ही महापापे आहेत. धर्माच्या दृष्टीने तो गुन्हाही आहे. त्याने थोराचे रक्षण होते. परंतु गरिबाचे घर बुडते. ईश्वराविषयीचे भय जागृत राहिले. तर असे प्रकार बंद होतील, ही दुष्ट खोड सोडा.

**२४३५ अ** (इंम : ६५–६६)

**२४३६** (११ : ५, १ मार्च ५२, ७०–७२)

मिशनरीशाळेत खरा धर्म कोणता हे शिकवितात. खाजगी शाळांत हिंदू पुराणांतल्या खोट्या गोष्टी सांगतात. सरकार कराचा पैसा शाळेसाठी खर्च करते. सुशिक्षित मुले नास्तिक होऊन तोच परिणाम होणार. मिशनेरी इतक्या दुरून येऊन खऱ्या देवाची ओळख करून देतात.

**२४३६ अ** (इंम : ६७–७०)

**२४३७** (११ : ५, १ मार्च ५२, ७२)

करंजा येथे ६० नेटिवांची सभा भरून मद्यपानविरोधी प्रचार करण्याचा ठराव झाला.

**२४३७ अ** (इंम : ७२)

**२४३८** (११ : ५, १ मार्च ५२, ७३)

नव्या कायद्यात दारूच्या उत्पादनावर परिणामकारक नियंत्रण बसेल, असे काहीच नाही. सरकारी कागद म्हणजे लहान पोरांनी चिरखाडलेले कागदच असतात!

**२४३८ अ** (इंम : ७२)

**२४३९** (११ : ५, १ मार्च ५२, ७४–७५)

होळीच्या दिवसांत रंगलेल्या तोंडातून अवाच्य शिव्या बाहेर पडत असतात. असल्या सणांचा विचारपूर्वक त्याग केला पाहिजे. वाईट चालीस सुजन त्रासतात, दुर्जन मात्र तिचे सेवन करतात.

**२४४०** (११ : ५, १ मार्च ५२, ७५)

दोनग्याच्या यात्रेत गळ टोचणे, बगाड चालविणे, यांसारखे क्रूर प्रकार चालतात. लोक दारू पिऊन मस्त होतात. दारूच्या धुंदीत त्यांस आई–बहिणीही चालतात! ढोंगी वैद्यसुद्धा बक्कळ कमाई करतात. अशाच एका वैद्याचा सरकारने बंदोबस्त केला. असा मजकूर एका विद्यार्थ्याने लिहिला आहे.

**२४४१** (११ : ५, १ मार्च ५२, ७६)

ब्रम्हदेशचा राजा मूर्खपणाने इंग्रजांना आव्हान देत आहे ! त्याचे राज्य खालसा होणार!

**२४४२** (११ : ५, १ मार्च ५२, ७६)

देवाने फार कृपा केली. पाऊस पडून तो अन्नवस्त्रांची चंगळ करतो. देवपुत्र येशू पृथ्वीवर आला, ही सर्वांत मोठी कृपा होय.

२४४३ (११ : ५, १ मार्च ५२, ७६–७७)

मागील महिन्याच्या २३ व्या तारखेस भायखळ्यात लोखंडी रस्त्यावर वाफेची गाडी चालू झाली.

२४४४ (११ : ५, १ मार्च ५२, ७७)

इस्त्रायली स्त्रिया नेहमी बुरखा घेऊन वावरतात. पण आता राजा दाउदने पाच स्त्रियांना शिक्षण देण्याचे ठरविले. (प्रभाकरवरून)

२४४५ (११ : ५, १ मार्च ५२, ७७)

"यत्नांची आवश्यकता" या कवितेत कवी म्हणतो की : प्रयत्न हा सुखाचा राजा व प्राणांचा विसावा आहे. प्रयत्न करा, इहपरलोकी सार्थक होईल.

२४४६ (११ : ५, १ मार्च ५२, ७७)

दुर्विंचु पक्षी (सचित्र) : याची चोच पसरट वाटोळी आहे. पाण्याजवळ राहून तो खाणे मिळवितो. बदकाप्रमाणे दिसतो.

२४४७ (११ : ५, १ मार्च ५२, ७८–७९)

विद्यासंपादन व स्वदेश कल्याण (निबंध) :
वाईट मार्ग सोडून सदाचरण करावे. रावबाजीप्रमाणे लोक कर्ज काढून धर्म करतात. त्यातून कर्ज वाढते. सभा करून नीतीचा विचार करावा. पूर्वी इंग्रजही रानटी अवस्थेत होते. पण अखंड प्रयत्नाने ते विद्वान व श्रीमंत झाले. संपत्ती वाढविण्याचे मार्ग शोधा. (तिसरा निबंध)
– कृष्णा गोडबोले.

२४४८ (११ : ५, १ मार्च ५२, ७९–८०)

कोल्हापुरास दक्षिण काशी म्हणतात. अगस्तीने हे क्षेत्र स्थापिले. एकूण ३६ हजार श्लोकांचा ग्रंथ या क्षेत्राची महती सांगतो. शंकराचा नंदी रंकाळ्याजवळ आहे. महादेव रानात हिंडतो. तेथे एक स्थापित लिंग आहे. परकीय आक्रमकांनी अंबाबाईचे देऊळ २०० वर्षांमागे भ्रष्ट केले होते. क्षेत्रात घाण फार असते. इंग्रजी राज्य आल्यापासून बालहत्या कायद्याने बंद झाली. दाजी पंडित नावाच्या कारभाऱ्याने पंढरीचे वातावरण तयार करून एक देऊळ बांधले आहे.

२४४९ (११ : ५, १ मार्च ५२, ८०)

प्रत्येक जिल्ह्यास नेटिव डेप्युटी कलेक्टर नेमणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय पुस्तक ११, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८५२

२४५० (११ : ६, १५ मार्च ५२, ८१)

काफल्याची गोष्ट. (सचित्र)

अरब लोकांच्या टोळीस काफला म्हणतात. उंट हे त्यांचे मुख्य वाहन आहे. यांच्यात गुलामांचा व्यापारही चालतो.

२४५१ (११ : ६, १५ मार्च ५२, ८२–८३)

सोळावा लुई याची राणी मेराय अंतनेट सुरूप व नखरेबाज होती. अमेरिकेला स्वातंत्र्य मिळाल्यावर फ्रेंच जनतेनेही बंड केले. १७८९ मध्ये बास्टीलची गढी पाडून कैद्यांना मोकळे केले. मोठा रक्तपात होऊन त्यात राजा लुईचाही बळी गेला. (प्रश्न)

२४९२ (११ : ६, १५ मार्च ५२, ८३–८४)

स्त्रियांस सुधारण्याविषयी ग्रंथ : पुस्तक मंडळीने बाबा पद्मनजी यांना या उत्तम ग्रंथाबद्दल १०० रु. चे बक्षीस दिल्हे. गोविंदशास्त्री लेले यांस ५० रु. दिल्हे. काही दिवसांनी हे ग्रंथ छापले जातील.

२४९२ अ (इंम : ८३)

२४९३ (११ : ६, १५ मार्च ५२, ८४)

नारायणबाबाचा वृत्तांत : हे पुस्तक मंडळीने छापला. ढोंगी गुरूची कथाही त्यात आहे. पृ. ४० किं. पाव आणा.

२४९३ अ (इंम : ८४)

२४९४ (११ : ६, १५ मार्च ५२, ८६–८८)

परमहंसमतप्रशंसा : गुजाबा उर्फ रामकृष्ण अनंत जोशी यांनी या ग्रंथात अवाच्य भाषा वापरली आहे. परमहंससभेचे मतखंडन करण्यासाठी हे पुस्तक लिहिले आहे. हिंदू धर्माचा बचाव करण्याची त्याची इच्छा आहे. सरकारी व मिशनेरी शाळांवरही खोटे आरोप केलेत. एल्फिन्स्तन शाळा म्हणजे मद्यालय होय, असे हे कवीश्वर म्हणतात ! हा एक पाचकळ कवी आहे. (प्रभाकरवरून)

२४९४ अ (इंम : ८४–८६)

२४६५ (११ : ६, १५ मार्च ५२, ८८)

ब्रह्मावर्तास बाजीरावाजवळ दोन खुशमस्करे ब्राह्मण आहेत. रोज सकाळी एक म्हणतो, "काशीस चला," तर दुसरा म्हणतो, "नको महाराज ! आपणांस राज्य चालवायचे आहे !" असा प्रकार प्रत्येक राजाकडे चालतो.

२४६५ अ (इंम : ८८)

२४६६ (११ : ६, १५ मार्च ५२, ९०–९१)

शेषारूढ पृथ्वी ही खुळचट कल्पना होय. त्यास कूर्म व अष्टदिग्गज यांची जोड दिलेली आहे. यातून फक्त भ्रमच दिसतो. भास्कराचार्यांनी हे मत चुकीचे ठरविले होते. (मागील पृष्ठावरून चालू)

२४६६ अ (इंम : ८९–९०)

२४६७ (११ : ६, १५ मार्च ५२, ९१)

नामदार राणीने पार्लमेंटात भाषण दिले. फेब्रुवारी ३ तारखेस पार्लमेंट सभा भरली होती.

२४६८ (११ : ६, १५ मार्च ५२, ९१–९४)

उपदेशपद्धती : आकाशातला बाप निष्पाप पाखरांचेही रक्षण करतो. अल्प विश्वासी लोकांनी बोध घ्यावा. कारण तो निसर्ग निर्माण करतो. चुकार मेंढरांनाही कळपात बरोबर पोहोचवितो. एक उधळ्या मुलगा बापापासून वेगळा निघाला. अगदी दरिद्र आल्यावर परत बापाघरी आला. त्याप्रमाणे नास्तिकही देवाकडे येतील.

२४५९ (११ : ६, १५ मार्च ५२, ९५)

एका लग्नात सासू व जावई यांचे भांडण झाले. पुढे सासूने आपली मुलगी तो घरी नसताना माहेरी नेली. भांडण कोर्टात गेले. लग्नकार्यात नेमाने व प्रामाणिकपणाने वागावे, असे "कल्याण इच्छिणारा" लिहितो.

२४६० (११ : ६, १५ मार्च ५२, ९५)

पुढील एप्रिलपासून डिपुटी माजिस्त्रेटच्या कामावर लोक नेमले जाणार. या अधिकाऱ्यांना तीनशे रुपये द. म. पगार मिळणार.
(ज्ञानप्रकाशवरून)

२४६१ (११ : ६, १५ मार्च ५२, ९६)

इंग्रज सरकारचे सैन्य बारा आगबोटी घेऊन ब्रह्मदेशाकडे निघाले. आता राजाचा टिकाव लागणे कठीण आहे.

२४६२ (११ : ६, १५ मार्च ५२, ९६)

दशावतार (अभंग) : दहा अवतारांसाठी ठोस प्रमाण काही दिले जात नाही. अवतारांतल्या पशुपक्ष्यांना देव कसे मानावे ? कलंकी तर सर्वनाश करणार आहे. देवांच्या गैर वागणुकीचेही कौतुक केले जाते.

अवतार दाहा ।। बोलताती जन ।।
न त्याचे प्रमाण ।। पाहे कोणी ।।१।।
मासा देव नको ।। नको ते कासव ।।
नको नको देव । शूकर तो ।।२।।

२४६३ (११ : ६, १५ मार्च ५२, ९६)

हिंदुधर्मसभा : ही सभा धर्माची बाजू सांगण्याकरिता दोन ग्रंथ प्रसिद्ध करणार होती. परंतु अद्याप काही हालचाल नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक ७, मुंबई, १ एप्रिल १८५२

**२४६४** (११ : ७, १ एप्रिल ५२, ९७)
शेतालींत फ्री चर्च मिशनच्या शाळेत २४ मुली शिकतात. सैत्स मडम त्यांना चांगले शिकविते.

**२४६४ अ** (इंम : ९७)

**२४६५** (११ : ७, १ एप्रिल ५२, ९८)
गंगाधरशास्त्री फडके इन्स्पेक्टर ऑफ गव्हर्नमेंट व्हर्नाक्युलर स्कूल्स यांनी (हिंदू धर्मतत्त्व) हा ग्रंथ रचिला. हिंदू धर्माच्या तत्त्वाबद्दल अनेक प्रमाणे ते देतात. लोकांनी वाचून शोध करावा. पृष्ठे–१७६.

**२४६५ अ** (इंम : ९७)

**२४६६** (११ : ७, १ एप्रिल ५२, ९८–९९)

गेल्या वर्षातील महत्त्वाच्या घडामोडी दिल्या आहेत. शके १७७३. पुण्यांत काय झाले, त्याचा सारांश.

१) पुण्यात पाठशाळा होती, ती मोडून कॉलेज स्थापन झाले.
२) दक्षणा ग्रंथकारास देण्यास आरंभ होऊन ग्रंथ तयार होऊन छापले गेले.
३) ज्ञानप्रकाश छापखान्यात चार नवीन ग्रंथ झाले.
४) मुलींच्या शाळा स्थापन झाल्या (एतद्देशीय लोकांच्या.)
५) ज्ञानप्रकाशसभा स्थापन होऊन उत्तम प्रकारची संभाषणे सभेत होण्याचा पाठ पडला.
६) कंपणी सरकारची सनद १८५४ साली होणार, त्याचा विचार होऊन वकील व अर्ज्या पाठविण्याची तयारी झाली.
७) मोठाले सरदार पुष्कळ मेले व त्यांचे सरंजाम जप्त झाले.
८) इनाम कमिशन सुरू झाले.
९) कनिष्ठ वर्णांचे मुलांस विद्या शिकविण्याची शाळा घोरपडे यांचे पेठेत सुरू झाली.

**२४६६ अ** (इंम : ९८–९९)

**२४६७** (११ : ७, १ एप्रिल ५२, १००–१०१)

हिंदुशास्त्रातील पदार्थविज्ञानाच्या चुका :

समकेंद्रात सात द्वीपे व सात समुद्र आहेत. दह्याचा, मद्याचा, असे समुद्र देवाने निर्माण केले. स्वायंभुव मनूने सूर्याभोवती सात प्रदक्षिणा केल्या. त्यातून सप्तसागर निर्माण झाले म्हणे ! त्यांच्या रूंदीविषयी व घेराबद्दल विलक्षण तर्क प्रगट करतात.

**२४६७ अ** (इंम : ९९–१००)

२४६८ (११ : ७, १ एप्रिल ५२, १०२–१०४)

दारूने ज्ञानप्राप्ती होऊन समाधी लागते, असली खुळचट कल्पना घेऊन लोक वागतात. इष्टमित्रांना दारूचीच मेजवानी देतात. हे छाकटे लोक गुन्हेही करतात, मारामाऱ्यासुद्धा करतात. या दुराचारसंपन्न लोकांस सुधारण्यासाठी ग्रंथ तयार करावेत, असे प्रभाकरमित्र लिहितो.

२४६८ अ (इंम : १०१–१०२)

२४६९ (११ : ७, १ एप्रिल ५२, १०५)

अर्ल ऑफ देर्बींना इंग्लंडचे पंतप्रधान नेमले.

२४७० (११ : ७, १ एप्रिल ५२, १०५)

फ्रान्समध्ये लुई नेपोलियनचा जुलूम चालूच आहे.

२४७१ (११ : ७, १ एप्रिल ५२, १०५)

कलियुगाचे ४९५३ वे वर्ष सुरू झाले. आता विद्यावृद्धी व उद्योगवृद्धी होईल.

२४७१ ब (११ : ७, १ एप्रिल ५२, १०५)

कालपासून शके १७७३ बदलून शके १७७४ ला प्रारंभ झाला. (ज्ञानप्रकाशवरून)

२४७२ (११ : ७, १ एप्रिल ५२, १०५)

सर जमशेटजी जिजीभाई यांच्या धर्मशाळेविषयी : या धर्मशाळेत ३२४ असाम्या आहेत. त्यांत अनेक रोगी आहेत. यावर्षी ११ हजार रुपये खर्च झाला. भिकाऱ्यांकरिता शाळा स्थापन करण्याचा विचार आहे. भिक्षेपेक्षा विद्या बरी.

**२४७३** (११ : ७, १ एप्रिल ५२, १०६)

मुंबईत दोन खुनी इसमांना फाशी दिले.

**२४७४** (११ : ७, १ एप्रिल ५२, १०६)

बडोद्याबाबत चौकशी :

बडोद्याचा रेसिडेंट औटराम यास काढून टाकल्याबद्दल संस्थानची चौकशी होणार.

**२४७५** (११ : ७, १ एप्रिल ५२, १०६)

एका शेटजीच्या घरी जातिबाह्य मुलास शुद्ध करून घेण्याचा समारंभ रंगपंचमीच्या सणास साजरा झाला.

**२४७६** (११ : ७, १ एप्रिल ५२, १०७)

चाक्या म्हसोबा : स्वदेशहितेच्छूने रेल्वेस "चाक्या म्हसोबा" म्हटले आहे. या म्हसोबाला बळीची आवश्यकता नसते. तो भूतचेष्टा करीत नाही, तर व्यापारास व उद्योगास मदत करतो. इंग्लिश प्रभूंनी हा धुराच्या गाडीचा खेळ यशस्वी केला.

(नव्याने रेल्वेगाडी आली त्याचे औपरोधिक वर्णन)

**२४७७** (११ : ७, १ एप्रिल ५२, १०८)

मुलींच्या विद्याभ्यासाविषयी : काकडवाडीचा रहिवासी लिहितो की : मुली विद्याभ्यास करीत आहेत. येणेकरून देशाचे कल्याण होईल. सध्या यथा नवरे तथा बायका, अशी स्थिती आहे. मुली शिकल्या, तर बायकोस टाकणाऱ्या नवऱ्यांची डोकी जागेवर येतील. विद्यासंपादन करण्याची गरज खरी पुरुषांनाही आहे.

२४७८ (११ : ७, १ एप्रिल ५२, १०९)

एक सुबोधक लिहितो की : काही सरकारी नोकर रजा घेतात; पण त्या बेताने हजर होत नाहीत. क्षुल्लक कारणे सांगून रजा वाढवितात. त्यातून कामाचा खोळंबा होतो.

२४७९ (११ : ७, १ एप्रिल ५२, १०९)

हल्ली सरकारने दुय्यम कलेक्टरांच्या ३५० रुपयांच्या नवीन जागा ठरवून त्यांवर नेमणूका केल्या आहेत.

रत्नागिरीस व्राटसाहेब, ठाण्यास एच्. शोएलसाहेब, सुरतेस विनायक गणेश, भडोचेस नवरोजी फर्दमजी, अहमदाबादेस टी. जॉर्डन, खेड्यास टी. स्पै, धुळ्यास राम नायदु, नगरास दादोबा पांडुरंगजी, पुण्यास विनायक वासुदेवजी, सोलापुरास नानाभाई मोरोजी.

२४८० (११ : ७, १ एप्रिल ५२, १०९)

दक्षणी प्रांतस्थ मंडळी : कंपनी सरकारची नवीन सनद होणार. त्यामध्ये फेरफार काय केला पाहिजे, यासाठी पुण्यात मंडळ स्थापन झाले. सरंजामी वारसाहक्काने चालू रहावी. इनाम जमिनी चालू ठेवाव्यात. कारभारात नेटिवांना हुद्दे व अधिकार द्यावा. रयतेचे दारिद्य कमी करण्याचा प्रयत्न व्हावा. सरकारी कारभार व्यवस्थित असावा. दुय्यम फडणीस गोपाळ हरी देशमुख आहेत.

२४८१ (११ : ७, १ एप्रिल ५२, ११२)

हिंदु धर्मसभा : या सभेमध्ये पळशांचा नक्की दर्जा कोणता आहे, यावरून वाद होऊन गोंधळ झाला. सभा बरखास्त करावी लागली.

**२४८२** (११ : ७, १ एप्रिल ५२, ११२)

आबुळमडीचा एक साधू ५ हजारांचे दागिने चोरून पळाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक ८, मुंबई, १५ एप्रिल १८५२

**२४८३** (११ : ८, १५ एप्रिल ५२, ११३)

राजाच्या जुलमास न जुमानता इस्त्रायली लोकांनी नावेवर भजनस्थान तयार केले.

**२४८४** (११ : ८, १५ एप्रिल ५२, ११४–११७)

येशूच्या आदेशानुसार मूर्तिपूजकांच्या देशात पालक जाऊन पोहोचले. मलबारात फार पूर्वी बार्थुलोमा व थोमा आले होते. दुसऱ्या शतकामध्ये पांतियस आला होता. ३२५ इसवीमध्ये एक मोठी धर्मसभाही भरविली होती. पोर्तुगीजांनी हजारोंना बाप्तिस्मा दिला, पण तो मनापासून घेतला गेला, असे म्हणवत नाही. गोव्यात ख्रिस्त्यांना बुटलेर किंवा बबर्जी यापेक्षा जास्त मान नाही.

**२४८५** (११ : ८, १५ एप्रिल ५२, ११७)

"लोकहितेच्छू" पत्रात लिहितो की, पोलिसांनी पोस्त मागू नये.

**२४८५ अ** (इंग्र : ११७)

**२४८६** (११ : ८, १५ एप्रिल ५२, ११७–११८)

पुण्यातील एका सरदारावर शाक्त असल्याचा संशय आल्यामुळे ब्रह्मवृंदांनी त्याच्या घरी भोजनास जाणे नाकारले.

**२४८६ अ** (इंम : ११७)

**२४८७** (११ : ८, १५ एप्रिल ५२, ११९–१२१)

भरतखंड सुधारायास पहिला उपाय : "एक मित्र" लिहितो की : ईश्वराचे भय बाळगणे, हा सुधारणेचा पहिला उपाय आहे. लक्ष्मी त्यामानाने कमी महत्त्वाची होय. ईश्वर हा ज्ञानाचा व दयेचा झरा आहे. तो मनुष्याचे सर्वस्व आहे.

**२४८८** (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२२–१२३)

तुकारामाने एका यात्रेकरूबरोबर कडू भोपळा दिला होता. त्या भोपळ्यास प्रत्येक तीर्थक्षेत्रात स्नान घातले, तरी तो कडूच राहिला. म्हणून तीर्थयात्रा हे वेडेपण आहे, असे 'जगदीशदास' म्हणतात.

**२४८८ अ** (इंम : १२१)

**२४८९** (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२५–२६)

'वेदांतमताचे खंडन : ' कलकत्ता खिस्ती मंडळाने हा ग्रंथ छापला. देवमंडळीची वागणूक पापावर प्रीत ठेवणारी आहे. लाकूड व पाषाण यांच्या मूर्ती म्हणजे केवळ भ्रम होय. त्यांच्याकडून तरणोपाय मिळणे अशक्य आहे. (लेखक–रे. जे. मुलेन्स (इंग्रजी) पृ. २५३, किंमत आठ आणे.

**२४८९ अ** (इंम : १२३–१२५)

**२४९०** (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२६–१२७)

काही शेणव्यांनी वैष्णवांचे सोंग घेऊन पंक्तीत जेवण केले. आता त्यांना प्रायश्चिताची व दंडाची शिक्षा होईल.

२४९१ (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२७)
ब्रह्मी राजाने तह केला नाही, तर त्याचे फार हाल होतील.

२४९२ (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२७)
जुगाराचा अड्डा चालविल्याबद्दल फणसवाडीत दोघांना दंड झाला.

२४९३ (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२७)
आम्ही पापामुळे नरकास योग्य आहोत. देवपुत्र लोकांसाठी मेला. तोच तारणारा आहे.

सर्व भ्रष्ट आह्मी योग्य नरकासीं ।
परी तो जनासीं साह्य झाला ॥ २ ॥

२४९४ (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२७–१,२८)
उत्तर अमेरिकेत ३० संस्थाने व लोकवस्ती ४॥ कोटी आहे. नव्वद आगबोटी आहेत. लोखंडी रस्त्याची सर्वत्र सोय आहे. ख्रिस्ती धर्म व विद्याभ्यास या कारणांनी त्यांची फार प्रगती झाली.

२४९५ (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२८)
कलकत्त्याचा एक ब्राह्मण विधवेशी विवाह करणार.

२४९६ (११ : ८, १५ एप्रिल ५२, १२८)
एका पापाने मनुष्य व्यभिचारी ठरत नाही काय? एका पैशाने देव संतुष्ट होत असताना तो पैसा पापाकडे लावावा काय?

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

२४९७ (११ : ९, १ मे ५२, १२९)

सिंद प्रांतातील मिशन : रे. माचेट आणि राजर्स कराचीस धर्मप्रसाराचे काम करणार.

२४९७ अ (इंम : १२९)

२४९८ (११ : ९, १ मे ५२, १२९)

ग्रांट वैद्य पाठशाळा : पाच विद्यार्थ्यांना वैद्यकीची सनद देण्यात आली.

१) नारायण दाजी
२) मंचरजी सोराबजी
३) सदाशिव हेमराज
४) डोसाभाई बेझानजी
५) बाळकृष्ण चिन्तोबा

२४९८ अ (इंम : १२९)

२४९९ (११ : ९, १ मे ५२, १३०)

सणांविषयी उत्कृष्ट ग्रंथ रचणारांना अनुक्रमे १०० आणि ५० रुपयांची बक्षिसे दिली जातील. मात्र होळीबद्दल बरेच ग्रंथ असल्यामुळे त्याबद्दल फार लिहू नये. आर. डब्ल्यु. ह्युम व जे. एम्. मिचेल, पुस्तक व निबंध करणार मंडळीचे चिटणीस. २ एप्रिल १८५२, मुंबई.

२४९९ अ (इंम : १३०)

२५०० (११ : ९, १ मे ५२, १३१)

गेल्या वर्षापेक्षा दारूचा मक्ता चार हजार रुपयांनी वाढला. सरकार जर दारूबंदी करीत नसेल, तर शरमेची गोष्ट आहे.

२५०० अ (इंम : १३१)

२५०१ (११ : ९, १ मे ५२, १३२)

पुस्तकमंडळीने लूथराचा इतिहास छापला. लूथर हा जर्मनीतील धर्मसुधारक होता. ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त असून पोपची मक्तेदारी नको, असे तो म्हणे.

पृ. १८३ प्रका. बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी,
किंमत ४ ते ८ आणे (बांधणीप्रमाणे) इंग्रजी ग्रंथावरून तयार केला.

२५०१ अ (इंम : १३१)

२५०२ (११ : ९, १ मे ५२, १३३-१३४)

जंबुद्वीपाचा विस्तार अंदाजानेच एक लक्ष योजने सांगतात. परंतु त्यात तथ्य नाही. शिवतंत्रातील विपरीत कथांवर विश्वास ठेवण्यात अर्थ नाही. सप्तपर्वत व सप्तनद अगदी काल्पनिक आहेत. त्यांचा भूगोल सर्व चुकीचा व कविकल्पित आहे.

२५०२ अ (इंम : १३२-१३३)

२५०३ (११ : ९, १ मे ५२, १३६-१३९)

गंगाधर शास्त्रीने केलेला ग्रंथ : या ग्रंथात अभिमान व आवेश फार दिसतो. लेखक आपला धर्म दुर्लभ असल्याबद्दल दावा करतो. भक्ष्य अभक्ष्य पदार्थांची यादी सांगणारे तत्त्वज्ञान म्हणून त्यास हे प्रिय आहे. प्रसंगोपात्त कुकर्मासच सुकर्माचा दर्जा मिळवून देणारी तत्त्वे चांगली कशी म्हणावी ? शास्त्रांचा कर्ता अलौकिक पुरुष होता.

२५०३ अ (इंम : १३५-१३६)

२५०४ (११ : ९, १ मे ५२, १३९–१४०)

सोळाव्या लुईच्या वधानंतर युरोपियन देशांनी फ्रान्सकडे लष्कर रवाना केले. या अंदाधुंदीतच नेपोलियनचा उदय झाला. त्याने इजिप्तसुद्धा जिंकले. तो स्वार्थी महत्त्वेच्छु आणि जबरदस्त होता. (प्रश्न)

२५०५ (११ : ९, १ मे ५२, १४०–१४१)

'गुड फ्रायडे'ला फिरंगी नाच करतात ते अयोग्य आहे, असे गिरगाववासी लिहितो.

२५०६ (११ : ९, १ मे ५२, १४१)

हिंदुधर्मतत्त्व पुस्तकाविषयी 'सत्याभिमानी' म्हणतो की : या ग्रंथाने ज्ञान तर झालेच, पण तत्त्वज्ञानाचा पोकळपणासुद्धा कळून आला. सवंग धर्मास पवित्र कसे म्हणावे, ते कळत नाही.

२५०७ (११ : ९, १ मे ५२, १४१–४२)

'पैजद्वेष्टा' लिहितो की : द्रव्याच्या लोभाने घोड्यांच्या शर्यती लावल्या जातात. बिचारे घोडे मात्र उरी फुटून मरतात; त्यांची कोणाला दया येत नाही. स्वतावरून दुसऱ्याचा जीव ओळखावा.

२५०८ (११ : ९, १ मे ५२, १४१)

१५ अप्रेल सन माहे मजकूरी सावंतवाडीस वाचनालय होणार. (ज्ञानप्रकाशवरून)

२५०९ (११ : ९, १ मे ५२, १४२)

इंग्लंडमध्ये एका अनाथ मुलीसाठी अल्पावधीत ५ हजार रुपये जमविले.

२८१० (११ : ९, १ मे ५२, १४२)
निजाम कर्जाने डबघाईस आला असून फौजेचा पगारसुद्धा देऊ शकत नाही.

२८११ (११ : ९, १ मे ५२, १४२)
अर्ल आफ देर्बीचे प्रधानपद थोडेच दिवस टिकणार.

२८१२ (११ : ९, १ मे ५२, १४२)
फ्रान्सचा प्रेसिडेंट नेपोलियन आजारी झाला.

२८१३ (११ : ९, १ मे ५२, १४२–१४४)
गुरू जर अधर्माचरणी असेल, तर धर्मरूप नाव आपणांला कशी तारून नेणार ? धर्माच्या नावावर लबाडी व पाप होत असेल, तर देवाला ते आवडेल का ? निर्गुण परमेश्वर सगुण सृष्टी कशी तयार करतो ?

२८१४ (११ : ९, १ मे ५२, १४४)
शुद्धाशुद्धतेचा विचार ही एक व्यर्थ बडबड आहे. खाण्यापिण्यात जेवढे नियम सांगतात, तेवढे वागणुकीबाबत सांगत नाहीत. मुखातून शिव्याशाप उच्चारणारे पवित्र कसे ठरतात ?

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२६१५** (११ : १०, १५ मे ५२, १४५)

'साक्रेटीस ह्याचे चरित्र' कृष्ण शास्त्री चिपळोणकर यांनी रोलिनच्या ग्रंथावरून भाषांतरित केले. ज्ञानप्रकाश प्रेस, पुणे १८५२ प्रका. दक्षिणा प्राईज कमिटी, पृ. १३०, रु. १५० गतवर्षी बक्षीस मिळाले.

**२६१५ अ** (इंम : १४५)

**२६१६** (११ : १०, १५ मे ५२, १४६–१४७)

अफीण व त्यासंबंधी व्यापार यांविषयी : हा ग्रंथ गुजराथी भाषेत आहे. अफीणीच्या व्यापाऱ्यांना शिव्या देऊन उपयोग नाही. कारण ते लोभाच्या स्वाधीन आहेत. नफ्यातून थोडाफार पैका धर्मशाळेस देऊन ते दानशूर बनतात! हा नाशकारक व्यापार सोडण्याची त्यांना बुद्धी व्हावी, अशी प्रार्थना आहे.

**२६१६ अ** (इंम : १४५–१४७)

**२६१७** (११ : १०, १५ मे ५२, १४९–१५०)

मेरूचे वर्णन : हा पर्वत देवगंधर्वांचा आवडता आहे, असे हिंदू शास्त्राचे मत आहे. या विशाल सुवर्णपर्वतात सगळ्या देवता सतत राहातात. त्याचा आकार गोपुछाकार आहे, पण उंचीचे माप मात्र अविश्वसनीय आहे. तो पृथ्वीच्या ३२ पटीने उंच असेल, तर तो कसा उभा राहील? सात नरकांचे वर्णनही वाचण्यास मिळते. पण त्याचा पडताळा मिळत नाही. तात्पर्य, या सगळ्याच दंतकथा आहेत.

**२६१७ अ** (इंम : १४७–१४८)

२६१८ (११ : १०, १५ मे ५२, १५१–१५४)

ख्रिस्ती लोकांनी भरतखंडात मागील ५० वर्षांत मिशने स्थापली त्यांविषयी वृत्तांत : डच मिशनेऱ्यांनी लंकेत मिशनांच्या शाळा सुरू केल्या. डच मिशनरी मद्रासजवळ त्रानकुवार येथे राहिले. प्रियजनांपासून हजारो मैल दूर राहून ते ख्रिस्ताची सेवा करतात. स्थानिक बोली शिकून घेतात. श्वार्ट्स् याने ५० वर्षे धर्मप्रसार केला. हैदरासही त्याच्याबद्दल आदर वाटे. इंग्रजांशी लढाई चालू असताना त्यास सुखरूप जाऊ दिले. जेव्हा इतर धर्म नव्हते, तेव्हा ख्रिस्ती धर्म होता.

२६१९ (११ : १०, १५ मे ५२, १५४)

असंख्य मूर्ती करून त्यांना देव मानणे, हा वेडेपणा होय. मूर्तीस भावना कशी असेल ? म्हणून मूर्ती नकोत.

२६२० (११ : १०, १५ मे ५२, १५४–१५५)

कंपनीची नवी सनद तयार करण्याकरिता पार्लमेंटने समिती नेमली.

२६२१ (११ : १०, १५ मे ५२, १५४–१५५)

फ्रान्समध्ये आता शांतता आहे.

२६२२ (११ : १०, १५ मे ५२, १५५)

दारूच्या धुंदीत भावाचा खून केल्यामुळे आमदाबादेस एकास फाशी झाली.

२६२३ (११ : १०, १५ मे ५२, १५५–१५८)

एक विद्यार्थी पत्रात म्हणतो की : जीवनविषयक बोध करणे, हे शिक्षकाचे खरे काम आहे. वडलांच्या आज्ञा पाळून अभ्यास करावा. शिक्षकांचा मान राखावा. एकमेकांबरोबर प्रीतीची वर्तणूक करावी. स्वतःच्या अज्ञानाची जाणीव ठेवावी. दयाळू परमेश्वरास विसरू नये.

२८२४ (११ : १०, १५ मे ५२, १५८–१५९)
इंग्रजांनी रणगुणवर तोफांचा भडिमार करून ब्रह्मी फौजेस सतावले.

२८२५ (११ : १०, १५ मे ५२, १५९)
शिपायांनी दोन जुगारखान्यांवर धाड घालून १३ असामी पकडले.

२८२६ (११ : १०, १५ मे १२, १५९)
विद्या न येणे, हे खरे दरिद्र आहे. शहाणे, सुज्ञ, बलिष्ठ कामगार निपजले पाहिजेत.

२८२७ (११ : १०, १५ मे ५२, १५९)
धुळ्याचे मुन्सफ भीमराव रामजी यास १० वर्षे नियमित काम केल्याबद्दल सन्मानपत्र दिल्हे. (ज्ञानप्रकाशवरून)

२८२८ (११ : १०, १५ मे ५२, १५९)
साताऱ्याजवळील माहुली क्षेत्रात एक गाय रोज सूर्याकडे तोंड करून पाण्यात उभी राहाते. तिला दैवी अवतार समजून लोक तिची पूजा करतात. भिक्षुकांना पैसा काढण्याचा नवा मार्ग सापडला.

२८२९ (११ : १०, १५ मे ५२, १५९)
एका श्रीमंत गृहस्थाने घोड्याकरिता तबेला तयार केला आहे. घोड्याचा मोतद्दार घोड्यासाठी गवत मिळवितो व त्याचा पैसा करतो. काडीचोर तो माडीचोर असतोच.

२८३० (११ : १०, १५ मे ५२, १६०)

एका अग्निहोत्री गृहस्थाने घरी लग्न झाले म्हणून देवीचा गोंधळ घातला. विद्यार्थ्यांच्या अभ्यासाचे मात्र खोबरे झाले.

: एक विद्यार्थी

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक ११, मुंबई, १ जून १८५२

---

२८३१ (११ : ११, १ जून ५२, १६२)

पंजाबची वस्ती २४ लाख ७० हजार आहे. त्यापैकी ११६२८ विद्यार्थी व मुली शाळेत जातात.

२८३१ अ (इंम : १६१-१६२)

२८३२ (११ : ११, १ जून ५२, १६२-१६४)

बालिकाहत्येवर ग्रंथ रचणारास सहाशे रुपयांचे बक्षीस जाहीर झाले आहे. परंतु अफूमुळे घडणाऱ्या हत्यांचेप्रमाण यापेक्षा कितीतरी जास्त आहे. बालहत्या एकदम घडते, तर अफू सावकाश परिणाम करून ठार मारीत राहाते. अफू खाण्यात जे सन्मान समजतात, ते भ्रमिष्ट समजावे. ही आत्महत्याच समजावी. कित्येक राजपूत व ठाकूर चीजवस्तू विकून अफीण घेतात, हे लांछन होय. काही लोक रोजी ५-६ रुपये अफूत घालवितात.

२८३२ अ (इंम : १६२-१६४)

२८३३ (११ : ११, १ जून ५२, १६७–१६९)

कर्नल स्लीमनने शिकारीच्या आठवणी लिहिल्या आहेत. तो म्हणतो की : वाघाने मारलेल्या माणसाचे भूत वाघास वाचवित असते, अशी या लोकांची समजूत आहे. म्हणून प्रथम भुताची शांती करतात. काही तांत्रिक मंडळी विद्येच्या साहाय्याने 'मनुष्यवाघ' बनतात, असेही अडाणी लोक समजतात. गोंड लोक मात्र भुताला 'बंधन' करून वाघ मारतात.

२८३३ अ (इंम : १६५–१६७)

२८३४ (११ : ११, १ जून ५२, १६९)

जसा देव तसा भक्त असतो. पाषाणाची पूजा करणारे मनाने तसेच असणार.

डुकराचा भक्त डुकर निश्चित ।
लोळे तो मातीत सर्वकाळ ॥ २ ॥

२८३५ (११ : ११, १ जून ५२, १६९)

भरतखंडाची पहाणी करण्याकरिता पार्लमेंटची कमिटी येणार.

२८३६ (११ : ११, १ जून ५२, १६९)

पिसाळलेल्या कुत्र्यास ठार मारणे, हीच दया आहे. त्यांना पांजरपोळात सोडून सडू देणे, हा क्रूरपणा होय.

२८३७ (११ : ११, १ जून ५२, १६९)

नगरला मिशनच्या कन्याशाळेत गजाबाई नावाच्या हुशार व सुस्वभावी मुलीला काम देण्यात आले.

२६३८ (११ : ११, १ जून ५२, १६९–१७०)
काही लोक तिकिटे न लावता पत्रे पाठवतात. अशी पत्रे पाठवणे, हे हलके व अयोग्य काम आहे.

२६३९ (११ : ११, १ जून ५२, १७०)
कॅलिफोर्नियातून सोने निर्यात होते. न्यूयॉर्कमध्ये शिक्षणाचा प्रसार मोठा आहे. इल्क्‌त्रिक टेलिग्राफने बातम्या पाठवितात. नऊ हजार खडे सैन्य तयार आहे.

२६४० (११ : ११, १ जून ५२, १७०–१७१)
जामेजमशेद पत्र लिहिते की : मुंबईत दारूचे व्यसन वाढत आहे. दिवसानदिवस खराबी वाढत आहे. दारूचे अवगुण मुद्दाम लिहावयाची गरज नाही. लोकांचे डोळे उघडतील तर बरे!

२६४१ (११ : ११, १ जून ५२, १७१)
बडोदा सरकार २५ लाखांचे कर्ज मागत असून इंग्रज सरकारने जामीन राहावे, अशी त्याची अपेक्षा आहे.

२६४२ (११ : ११, १ जून ५२, १७१)
माजी कमिशनर सातारा फ्रेर यांच्या स्मरणार्थ धर्मशाळा बांधण्याकरिता २५ हजारांची आश्वासने मिळाली. पण ४ हजारच रोख जमले. कबूल करून लोक पैका देत नाहीत.

२८४३ (११ : ११, १ जून ५२, १७१–१७३)

बोनापार्टचे पतन : सन १८०४ मध्ये नेपोलियन फ्रान्सचा बादशहा म्हटला गेला. अनेक राजे त्यास शरण आले. पण १८१२ नंतर त्याची सद्दी फिरली. रशियावर स्वारी केल्यावर थंडीने त्याचे सैन्य कंटाळून गेले. एवढ्यात इतर राजांनी त्याच्याविरुद्ध एकी करून त्याचा पराभव केला. त्यास कैद करून एल्बा बेटावर ठेवले. तेथून तो सुटला. पण वॉटर्लूच्या लढाईत त्याचा जबरदस्त पराभव झाला. मरेपर्यंत तो सेंट हेलिना बेटावर कैदेत होता. (प्रश्न)

२८४४ (११ : ११, १ जून ५२, १७३–१७४)

ढोंगद्वेष्टा लिहितो की : मांत्रिक लोक आजाऱ्यावर लिंबू, शेंदूर, असल्या वस्तूंचे प्रयोग करतात. करणीच्या कथा सांगून पैसा उकळतात. ते लबाड, ठक आणि व्यभिचारी लोक आहेत. यापेक्षा विद्यानिपुण डॉक्तराकडून औषध घ्यावे. मंत्रादिक व्यर्थ आहेत.

२८४५ (११ : ११, १ जून ५२, १७४–१७५)

'सत्ययाजक' लिहितो की : शेणवी उपाध्ये महामारीच्या शांतीकरिता यज्ञ करतात. लाकडे, तांदूळ आणि तीळ जाळण्याने रोग नाहीसा होईल काय? त्यापेक्षा अज्ञान जाळून टाकले पाहिजे. यज्ञाची चाल सोडून औषधादि उपाय करावेत.

२८४६ (११ : ११, १ जून ५२, १७५)

ऐक्यमताचारी पत्रात म्हणतो की : उद्योग-व्यापाराबद्दल नेहमी विचार चालतो. पण कौटुंबिक एकमताचीही फार गरज आहे. कुटुंबातील माणसांनी एकमेकांच्या सल्ल्याने चालावे. ज्या घरात भांडणे असतात, तेथे अकाबाई दारावर पहारा करीत असते.

२८४७ (११ : ११, १ जून ५२, १७५–१७६)
कुकर्मी देवांचे भक्तही कुकर्मी बनतात. समर्थाला पाप लागत नाही म्हणता, मग विष्णूचा ब्राह्मणशापाने शालिग्राम कसा झाला ते सांगा. पुराणातील चमत्कारांनी पापविनाशाचा खरा मार्ग सापडत नाही.

२८४८ (११ : ११, १ जून ५२, १७६)
साताराच्या धाकट्या राणीचा मृत्यू झाला.

२८४९ (११ : ११, १ जून ५२, १७६)
कष्टम कचेरीत कमिशनर बैठक भरवणार व शेतकऱ्यांच्या तक्रारी ऐकणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक १२, मुंबई, १५ जून १८५२

२८५० (११ : १२, १५ जून ५२, १७७)
स्फिंक्स ही राक्षसीण होती. तिचे शरीर जनावराप्रमाणे होते. सध्या तिच्या दगडी मूर्ती मिसरमध्ये सापडतात. लोक त्यांची पूजा करतात. तिच्या दगडी मुखाची उंची २६ फूट आहे. (सचित्र)

२८५१ (११ : १२, १५ जून ५२, १७८)
रे. सी. डब्ल्यु. इसेन्बर्ग : हे साहेब अबीसीनियात उपदेशक होते. तेथून १८४४ त भारतात आले. मनी शाळेचे मुख्यही होते. ते फार मेहनती व परोपकारी आहेत. प्रकृतीसाठी मडमीसुद्धा विलायतेस गेले आहेत.

२८५१ अ (इंम : १७८)

**२५५२** (११ : १२, १५ जून ५२, १७९)

खुसरू राजाचा इतिहास, हे रोलिनच्या पुस्तकाचे भाषांतर वि. मो. भिडे यांनी केले. (पृ. १८०)

**२५५३** (११ : १२, १५ जून ५२, १७९)

गोखलेशास्त्र्यांनी 'व्यवहारदर्पण' ग्रंथ प्रकाशित केला. ज्ञानप्रकाश छापखान्यात छापला. दक्षिणा प्रैज कमिटीने त्यांस बक्षीसे दिल्ही. (पृ. १६५)

**२५५४** (११ : १२, १५ जून ५२, १७९–१८०)

जैन व हिंदू यांमध्ये परस्पर तंटा : पारसनाथ व शिव यांची मंदिरे शेजारी आल्यामुळे दोन्ही जमातींत कुरबूर सुरू आहे.

**२५५४ अ** (इंम : १७९)

**२५५५** (११ : १२, १५ जून ५२, १८१–१८३)

फ्रीचर्च शाळेतील मुलीला स्वतःच्या मताप्रमाणे योग्य वाटेल तो धर्म स्वीकारण्यास कोर्टाने परवानगी दिल्ही. तिच्या नातेवाईकांची तक्रार फेटाळून लावली. बाप तिच्या बाजूने होता. पण माता वगैरे विरुद्ध होते. जो-तो आपल्या मताचा मुखत्यार आहे. (टाईम्सवरून)

**२५५५ अ** (इंम : १८०–१८१)

**२५५६** (११ : १२, १५ जून ५२, १८५–१८७)

जंबुद्वीपातील नऊ खंडांचा विस्तार अतिशयोक्तीने सांगितला आहे. एवढी पृथ्वीची लांबी नाही. सूर्य आणि चंद्रमंडळावरून वाहणाऱ्या नद्या यांचे कल्पित वर्णनही भरपूर आहे. शिवाय त्या नावांच्या नद्या कोठेही आढळत नाहीत. सात महासागरातल्या बेटांचा पत्ता लागणार नाही. अगस्ती एका आचमनात समुद्र प्याला, हे अविश्वसनीय आहे.

**२५५६ अ** (इंम : १८३–१८५)

**२५५७** (११ : १२, १५ जून ५२, १८७–१८८)

लग्नामध्ये नेटिव लोक अशा स्त्रियांचा नाच ठेवतात की त्यांचे मुखावलोकनसुद्धा करू नये. अडाणी भोळे तर ही रीत चालवितातच, परंतु भिन्न सुज्ञही चालवितात. लग्नसमयी कसबिणी नाचविणे, हे अनुचित आहे. लोकांनी विचार करावा.

**२५५८** (११ : १२, १५ जून ५२, १८९)

'सद्‌बोध ग्रहणशील' लिहितो की : नाटपेड पत्रे टाकू नयेत. लोकांनी ती स्वीकारू नयेत.

**२५५९** (११ : १२, १५ जून ५२, १८९)

'यात्रेपासून बोध घेणारा' पत्रात म्हणतो की: महालक्ष्मीच्या यात्रेमध्ये धाकलेश्वर नावाचा देव असून त्यावर दागिने घालतात. पुजाऱ्याच्या अंगात वारे येऊन तो भक्तांना भस्म देतो. खोट्या गोष्टी सांगून फसवितो.

२८६० (११ : १२, १५ जून ५२, १९०–१९१)
काकडवाडीकर लिहितात की : विहिरीत गाळ काढण्यास उतरलेला माणूस मेला, तर लोक भूतबाधेचा संशय घेऊ लागले. खरी गोष्ट अशी की, जुन्या विहिरीतील विषारी वायूने गाळवाला मरण पावला. भूत वगैरे सब झूट आहे.

२८६१ (११ : १२, १५ जून ५२, १९१)
'हिंदुधर्मतत्त्व' हा ग्रंथ नवीन प्रसिद्ध झाला. पण त्यात धर्मावर दोष लावणारास अवाच्य शब्द वापरले आहेत, तर दुसरीकडे 'चुक्या कळवाव्यात' अशीही विनंती आहे. ही विसंगती खटकते. (पृ. १७४)

२८६२ (११ : १२, १५ जून ५२, १९१–१९२)
या देशात मुलामुलींच्या लग्नाची फार उताविळी केली जाते. विशेषतः मुलीचे नुकसान यात जास्त होते. ती दासीवटीक बनून राहाते. विवाहितांची प्रकृती बिघडली की, मांत्रिक-भगतास बोलावतात. औषधे घेण्याऐवजी अंधकारात चाचपडत राहातात. असे 'रथकर सोनार' लिहितात.

२८६३ (११ : १२, १५ जून ५२, १९२)
इंग्लंडमध्ये सात हजार मैल लोखंडी रस्ता आहे.

२८६४ (११ : १२, १५ जून ५२, १९२)
इंग्रजांनी बाशीन (ब्रह्मदेश) शहर हस्तगत केले.

२८६५ (११ : १२, १५ जून ५२, १९२)
मुंबई बंदरात १५ कोटी ५७ लाख रु. चा माल आला, तर २८ कोटी ३७ लाखाचा माल निर्यात झाला.

२६६६ (११ : १२, १५ जून ५२, १९२)

रत्नागिरी मुक्कामी एका मुलीचे दागिने चोरून तिचा खून करणारास फाशी झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक १३, मुंबई, १ ज्युलै १८५२

२६६७ (११ : १३, १ जुलै ५२, १९३–१९४)

गोम (सचित्र) : ओलीत किंवा अंधेऱ्या भेगरीत राहणाऱ्या या प्राण्यास १५–१५ पाय असतात. तिला शतपदी म्हणतात. तिची लांबी सहा इंचांपर्यंत असू शकते. गोमीच्या दंशाने वेदना झाल्या, तर नवसागराचा रस पिण्यास द्यावा.

२६६८ (११ : १३, १ जुलै ५२, १९४–१९७)

भरतखंडातील मिशनांविषयी : आत्मिक सुखाबरोबर लोकांना ऐहिक कल्याण देणे, हा मिशनांचा उद्देश आहे. रानटी लोकांना त्यांनी विद्याप्रवण व सदाचरणी बनविलेले आहे. परंतु नास्तिक असे विघ्नकारक विद्वान त्यामध्ये अडथळे आणतात. जगासंबंधी ज्ञान मिळविणे त्यांना पुरेसे वाटते. हे बुद्धिधर्मी लोक आपसात झगडत बसतात. कारण त्यांना आत्मिक ध्येय नसते. १८०८ मध्ये अमेरिकेत पहिले मिशन सुरू झाले. एका मुलाने खाऊचे पैसे देऊन पहिली देणगी दिली. मूर्तिपूजकांच्या देशात धर्मप्रसार करण्यासाठी २४ हजार रुपये जमा झाले.

२६६९ (११ : १३, १ जुलै ५२, १९७)

मद्रास सरकारने हुकूम काढून कोणत्याही जातीच्या विद्यार्थ्यास शाळेत बिनशर्त प्रवेश देण्यास सांगितले आहे.

**२५६९ अ** (इंम : १९७)

**२५७०** (११ : १३, १ जुलै ५२, १९९–२०२)

गंगाधर शास्त्री फडके म्हणतात की : हा 'हिंदुधर्मतत्त्व' ग्रंथ धर्माचे रक्षण करण्यासाठी लिहिला. परंतु वृद्ध मंडळींना ही लाखाची मूठ उघडी करून दाखविणे आवडत नाही आणि शिक्षित तरुणांचा त्यावर विश्वासच बसत नाही. वर्णाश्रमधर्माची जुनी इमारत आता पडण्यास आली आहे. आसन्नमरण व्यक्तीस कोणतेच औषध उपयोगी पडत नसते. गीतेतील अभिवचनाप्रमाणे ईश्वराने पुन्हा अवतार घेतला, तरच काही आशा आहे.

**२५७० अ** (इंम : १९८–१९९)

**२५७१** (११ : १३, १ जुलै ५२, २०४–२०६)

कर्नल स्लीमनला असे आढळले की : गव्हावर कीड पडली की, तिचे कारण म्हणून इंग्रजी राज्यातील व्यभिचार असे दिले जाते. गोवधामुळेच परमेश्वर रागावून पीक नष्ट करतो. म्हणून गुजराथी लोकांनी गोवधबंदीचा अर्ज केला. गव्हाची कीड घालविण्यासाठी शेतकरी घागर घेऊन शेताभोवती प्रदक्षिणा करतात, हा भोळेपणा होय.

**२५७१ अ** (इंम : २०२–२०४)

**२५७२** (११ : १३, १ जुलै ५२, २०६)

वडलांचा धर्म सोडू नये म्हणतात. पण ठकपेंढाऱ्यांनी असे मानले, तर दरोडेच वाढतील. हजारो फसले. मी मात्र एकटा राहिलो, तर मला पटलेल्या धर्मानेच चालेन.

२८७३ (११ : १३, १ जुलै ५२, २०६–२०७)
एक वेगवान बोट अवघ्या २५॥ दिवसांत भारतात आली.

२८७४ (११ : १३, १ जुलै ५२, २०६–२०७)
न्यूयॉर्कमध्ये ४३० मैल लोखंडी रस्ता बांधला आहे.

२८७५ (११ : १३, १ जुलै ५२, २०७)
'न्यायाची वाट पहाणारा' पत्रात म्हणतो की : वृत्तपत्रे सुरू झाल्यापासून निंदानालस्ती वाढली. द्वेषपूर्वक स्वतःच लिहितात आणि 'सोम्या-गोम्या-कापस्या' चे नाव पुढे करतात.

२८७६ (११ : १३, १ जुलै ५२, २०७–२०८)
बोरघाटातील दस्तुरीची रक्कम निम्मी केली आहे.

२८७७ (११ : १३, १ जुलै ५२, २०७–२०८)
दादोबा पांडुरंग डिपुटी माजीस्त्रेट नगर यांनी परीक्षामाजीस्त्रेटचे कामाचा देऊन काम घेतले.

२८७८ (११ : १३, १ जुलै ५२, २०८)
फणसवाडीत जुगारी लोकांना दंडाची शिक्षा झाली.

२८७९ (११ : १३, १ जुलै ५२, २०८)
पिगु प्रांतातील रहिवासी इंग्रज फौजेचे स्वागत करणार आहेत. पिगूचा किल्ला इंग्रजांनी जिंकला.

२५८० (११ : १३, १ जुलै ५२, २०८)

धोबी तळ्याचा पुस्तकखाना : सात हजार रुपयांची दोन हजार पुस्तके घेतली. १११ सभासद वाचक आहेत.

२५८१ (११ : १३, १ जुलै ५२, २०८)

'हिंदुधर्मतत्त्वा'च्या किंमतीविषयी : या पुस्तकाची किंमत दुप्पट ठेवली आहे. लेखक म्हणतात, काहींना पुस्तक मोफत देणार. परंतु ब्राह्मणभोजनासाठी खोटे माप लावणाऱ्या वाण्याप्रमाणेच ही लबाडी आहे. पत्र : "एक स्पष्ट वक्ता," खत्रोली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक १४, मुंबई, १५ ज्युलै १८५२

२५८२ (११ : १४, १५ जुलै ५२, २०९–२१०)

कक्रचनासिक (सचित्र) (चिकोटा) : हा मासा सोळा फूट लांब असून त्याच्या नाकासमोर सहा फूट लांबीचे कठीण हाड असते. त्याचा करवतीप्रमाणे उपयोग करून तो इतर माशांना ठार मारतो.

२५८३ (११ : १४, १५ जुलै ५२, २१०–२१२)

इराणदेश : तुर्कस्थानच्या पूर्वेस असणाऱ्या या देशास पर्शिया असे नाव आहे. पूर्वी पर्शियन साम्राज्यात अफगाणचे व बुल्बुल्चे लोकही समाविष्ट होते. जार्जिया व आर्मीनियाही त्यांनी जिंकला होता. इराणात आझरबैजान हा अत्यंत निसर्गरमणीय प्रदेश आहे. उरीमियात ३०० मैल पसरलेले खाऱ्या पाण्याचे सरोवर होते. कास्पियन सागराच्या किनाऱ्यावर भाज्या व फळे विपुल होतात. माजरिंदान डोंगराळ असूनही रमणीय शहरांनी गजबजले आहे. फराबाद व मशदशीर या बंदरांचा निर्यातीसाठी फार उपयोग होतो.

**२५८४** (११ : १४, १५ जुलै ५२, २१२)

दक्षणेतून ७५ रु. मुलींच्या शाळेस देण्याचा ठराव झाला. सनातनी ब्राह्मण गुरूंना ही गोष्ट आवडणार नाही.

**२५८४ अ** (इंम : २१२)

**२५८५** (११ : १४, १५ जुलै ५२, २१३)

मंत्राने जर माणसास वाघ बनविला, तर त्यास शेपूट नसते, अशी समजूत आहे. पण 'खऱ्याचा सोबती' पत्रात विचारतो : यास अज्ञान म्हणू नये तर काय म्हणावे ? लोकांना पराचा कावळा करण्याची सवय आहे.

**२५८५ अ** (इंम : २१२–२१३)

**२५८६** (११ : १४, १५ जुलै ५२, २१३)

मथुरा येथील अमेरिकन मिशन: १२ मिशनरी उपदेश करतात. श्रोत्यांची संख्या २७७५ आहे. ७५ शाळांत १३१३ मुले शिकतात. शाळेच्या मदतीकरिता लोकांनी ३४० रुपये जमविले.

**२५८६ अ** (इंम : २१३)

**२५८७** (११ : १४, १५ जुलै ५२, २१४–२१५)

चौहान जमातीतली स्त्रीबालहत्या थांबविण्यासाठी सरकारने सतत आठ वर्षे प्रयत्न केला. नंतर सरकारने हुकूम काढला की : कोणीही हुंडा व आंदण १५० रु. पेक्षा जास्त मागू नये. भिक्षुकांनीही अडवणूक करू नये. लग्नात फार खर्च करू नये. या कायद्याचा परिणाम चांगला दिसून आला. आठ वर्षांपूर्वी मादनपुरी या गावात एकही कन्या जिवंत नव्हती. आता १४८८ आहेत.

२५८७ अ (इंम : २१३–२१४)

२५८८ (११ : १४, १५ जुलै ५२, २१५–२१९)

मातृबोध : पुस्तकमंडळीने प्रसिद्ध केलेले हे पुस्तक बापाच्याही उपयोगी आहे. आईबापांनी मुलांना शिक्षण देऊन सद्‌गुणी बनवावे. लाड करणे किंवा धाक लावणे यात समतोल साधावा. आपल्या आज्ञेचा उद्देश नीट समजावून सांगावा. शिक्षा करताना तारतम्य पाळावे.
पृ. २२०, बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी प्रकाशक.
इंग्रजी ग्रंथकार जे. एस्. सी. ॲबट यांच्या ग्रंथाचे भाषांतर.

२५८८ अ (इंम : २१५)

२५८९ (११ : १४, १५ जुलै ५२, २१९)

सत्यनिरूपण : गोविंद नारायण यांनी अनावृत पत्र लिहून विनंती केली की : या पुस्तकासाठी कोणी देणगी दिली, तर ते प्रकाशित करू. कौन्सिलर उल्वो यांनी बक्षीसही दिले आहे. (पत्र १४ जुलै १८५२)

२५८९ अ (इंम : २१९)

२५९० (११ : १४, १५ जुलै ५२, २१९)

उच्चनीचपणाच्या भावनेने एकीकडे गर्व, तर दुसरीकडे न्यूनगंड वाढला. उंच माणसे तर देवाहून श्रेष्ठ झाली ! देवाला सगळी माणसे सारखीच प्रिय असतात. आचरणावरून माणसाचा दर्जा ओळखा.

२८९१ (११ : १४, १५ जुलै ५२, २२०)

मेजर क्यांडीने शास्त्र्यांच्या नादी लागून परभूस संस्कृत शिकविण्यास नकार दिला. ही अयोग्य गोष्ट आहे. ब्राह्मणांनीच उदार दृष्टी ठेवली पाहिजे. सर्वांनीच विद्या करावी, असे दिवस आले आहेत. जे सर्वांना विद्या देत नाहीत, ते विद्याशत्रू व देशशत्रू समजावेत. (प्रभाकरवरून)

२८९२ (११ : १४, १५ जुलै ५२, २२०)

सदाशिव पेठेतील ब्राह्मण व कास्त यांचा पाण्यावरून नेहमी होणारा तंटा आता कोर्टात गेला आहे.

२८९३ (११ : १४, १५ जुलै ५२, २२०–२२१)

नेटिवांना वाटते की : डोंगरात लेणी कोरणे, हे फक्त पांडवांचेच काम आहे. पण त्यांनी ठाणे-कल्याणकडे पहावे. तेथे आता डोंगर फोडून सुंदर रस्ते केले आहेत. त्यावरून बिनबैलाची गाडी चालणार.

२८९४ (११ : १४, १५ जुलै ५२, २२१–२२२)

इंग्रजांनी महान पराक्रमाने हिंदुस्थान, अरबस्थान, अमेरिका, या देशांत मोठी राज्ये जिंकली. धैर्य व मर्दुमइतकीच त्यांची ज्ञानवृद्धीही अनुकरणीय आहे. हिंदूंना मात्र जावापलीकडे काय आहे, याची जाणीव नाही. म्हणून आळस सोडा व विद्या वाढवा.

२८९५ (११ : १४, १५ जुलै ५२, २२२)

मुंबईत दारूचे दुर्गुण प्रसिद्ध करण्याकरिता एक तीनमाही ग्रंथ निघतो. दारूसारखे दुष्ट व्यसन दुसरे नाही. लोकांनी सावध राहावे. (ज्ञानप्रकाशवरून)

**२५९६** (११ : १४, १५ जुलै ५२, २२२)

पुण्यांत येसोबा बिडवई या नावाचा एक विख्यात ठक आहे. ५० वर्षांच्या या ठकाने सात वर्षांच्या मुलीशी लग्न केले. मुलीचे आईबापही लोभाविष्ट दिसतात.

**२५९७** (११ : १४, १५ जुलै ५२, २२२)

कॅलिफोर्नियात १४ कोटींचे, तर आस्त्रेलियात १० कोटींचे सोने सापडले.

**२५९८** (११ : १४, १५ जुलै ५२, २२२)

सरकारी नेमणूक बंद झाल्यामुळे जगन्नाथाची यात्रा फारच कमी भरते.

**२५९९** (११ : १४, १५ जुलै ५२, २२२)

सर जमशेदजींनी विद्यावृद्धी व विवाहविधी यांकरिता ७॥ लाख रुपये जमविले असून गरीब पारशांना मदत मिळेल.

**२६००** (११ : १४, १५ जुलै ५२, २२२–२२३)

जपानमध्ये लोकवस्ती दाट आहे व संपत्ती पुष्कळ आहे. पण सुधारणूक नाही. स्वतः देशाबाहेर जात नाहीत व अमेरिकन जहाजांना येऊ देत नाहीत. यावरून अमेरिका जपानशी युद्ध करण्याचा संभव आहे.

**२६०१** (११ : १४, १५ जुलै ५२, २२३)

सातारा संस्थानचे सरकारला दरवर्षी येणारे उत्पन्न.

१८४९ : १४,३३,८१३
१८५० : १२,९०,६४६
१८५१ : १३,६७,०००

२६०२ (११ : १४, १५ जुलै ५२, २२३)

ग्रहण हा नैसर्गिक चमत्कार असताना जप व दान हा वेडेपणा होय. त्याचा विटाळ मानण्यात काही अर्थ नाही. राहूकेतूंच्या कथा सांगत बसू नये. असे 'एक हिंदू' लिहितो.

२६०३ (११ : १४, १५ जुलै ५२, २२३–२२४)

'लोकांचे दुःख पाहून शोक करणारा' लिहितो की : सुधारक मत सांगणाऱ्याची सर्वत्र निंदा होते. सुधारणा म्हणजे स्वेच्छाचार, अशी यांची समजून दिसते. सत्य समजून घेण्याची वृत्ती वाढली पाहिजे.

२६०४ (११ : १४, १५ जुलै ५२, २२४)

गोविंदराम जयराम यांना श्रीमंत बायजाबाई शिंदे यांचे चिटणीस नेमले आहे.

२६०५ (११ : १४, १५ जुलै ५२, २२४)

महादेवशास्त्रींनी सातारला शाळा स्थापन केली. (ज्ञानप्रकाशवरून)

२६०६ (११ : १४, १५ जुलै ५२, २२४)

अमेरिकन मिशनात दर मंगळवारी धर्मचर्चा होईल.

२६०७ (११ : १४, १५ जुलै ५२, २२४)

धी आब्झर्वन्स ऑफ ट्रुथ विथ स्पेशल रेफरन्स टू ॲडमिनिस्ट्रेशन ऑफ जस्टिस ॲण्ड ॲडव्हान्समेंट ऑफ बेस्ट इंटरेस्ट ऑफ सोसायटी : मराठी वा इंग्रजी ग्रंथांस पारितोषिक स्पर्धा जाहिरात.

२६०७अ (इंम : २२४)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२६०८** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २२५–२२६)

कासवाच्या अंगावर त्वचेचे सुदृढ कवच असते. या कवचात अंग गोळा करण्याची कला कासवात असते. समुद्रकाठचे लोक कासवाचे मांस खातात. कासवांचे वजन ४०० ते ८०० पौंड असते. कासवाची मादी एका वेळी १०० अंडी घालते. त्यांच्या कवचाच्या तुकड्यातून फण्या व करंडे तयार होतात.

**२६०९** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २२६–२२७)

अंड्यांतून जन्मणाऱ्या व सरपटणाऱ्या प्राण्यांस उरःसर म्हणावे. चालणे व सरपटणे दोन्ही कृती असतील, त्यांस उभयचर म्हणतात. कच्छप, समुद्रपल्ली, उरगी, असे यांचे प्रकार होतात.

**२६१०** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २२७–२२८)

ग्रांट वैद्य पाठशाळेजवळ बाळंतघर सुरू झाले आहे. सर जमशेद यांनी ४६ हजारांच्या देणग्या जमविल्या. सुईणींच्या अज्ञानातून बाळंतिणीची सुटका करणे, हा मुख्य उद्देश आहे.

**२६१० अ** (इंम : २२७)

**२६११** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २२८)

ज्ञानप्रसारक सभेतील सुशिक्षित पारशी जुन्या चालींविषयी निबंध वाचून जागृती करीत आहेत.

**२६११ अ** (इंम : २२८)

**२६१२** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २२९)

(पुणे कॉलेज) 'जातिमात्र विद्यापात्र' झाल्यामुळे परंपरावादी शास्त्री घाबरले आहेत. आमच्या भूदेवांनी जुन्या कल्पना सोडून सर्वांना शिकवावे.

**२६१२ अ** (इंग : २२८–२२९)

**२६१३** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३१–२३३)

विचारलहरी : हे पत्र ख्रिस्तीमतखंडनासाठी निघाले. ख्रिस्त भिकारी होता, असे तो संपादक सांगतो. भिकाऱ्यांतच ख्रिस्ती धर्म वाढतो, असेही आवर्जून लिहितो. ख्रिस्ती धर्मात जुलूम फार असल्याबद्दल प्रचार सतत करतो. मिशनरी दुराग्रही व पोटार्थी आहेत, असेही लिहितो. त्याच्या लिखाणात अज्ञान व द्वेष यांचे प्राबल्य दिसते.
(पाक्षिक) ८ पृष्ठे, ज्ञानप्रकाश प्रेस.

**२६१३ अ** (इंग : २२९–२३१)

**२६१४** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३४–२३५)

"वास्तविक धर्म पृथ्वीवर हिंदुधर्माखेरीज नाही." हे विधान विचारलहरीमध्ये केले आहे. हे लिहिणारा लेखक अज्ञानी व गर्विष्ठ असावा. समंजस वादास आम्ही तयार आहो. परंतु त्यात द्वेष किंवा कपट नसावे. ख्रिस्तास देवपुत्र म्हटल्यावर देवाची बायको कोण, असा अचरट प्रश्न तो करतो.

**२६१४ अ** (इंग : २३३–२३४)

२६१५ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३६–२३७)

या जगात ईश्वर आहे. शास्त्र देणे हे त्यास कठीण नाही. त्या शास्त्रास अनुसरावे. केवळ सृष्टी पाहिल्यावर देव समजतो, या म्हणण्यात काही अर्थ नाही. बुद्धीनेही जगाचे रहस्य कळणार नाही. बुद्धी कोठपर्यंत कळणार? ईश्वराची कृपा होणे अगत्याचे आहे : अमेरिकन मिशन देवळांतील २० जुलैच्या भाषणांचा वृत्तांत.

२६१५ अ (इंम : २३५–२३६)

२६१६ (शून्य नोंद)

२६१७ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३८–२३९)

ईश्वराचे ज्ञान देणारे शास्त्र असावे. त्यात परस्परविरुद्ध गोष्टी नसाव्यात. शास्त्राने ईश्वराच्या सेवेला माणूस प्रवृत्त झाला पाहिजे. मनुष्याचे कल्याण करणारे शास्त्र असावे. पापाची आवड नाहीशी करावी. सृष्टीचे रहस्य कळावे.

२६१७ अ (इंम : २३७–२३८)

२६१८ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३९)

'गंगाधर हितेच्छू' म्हणतो की : रथकार स्वतःला संकर ज्ञाती म्हणवितात, हे अयोग्य आहे. ऋषींना हरिणीपासून पुत्र झाले. म्हणजेच उत्पत्तीवर मोठेपण अवलंबून नाही.

२६१९ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३९)

आठ मुनसफांची साताऱ्यात नेमणूक होणार.

२६२० (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३९)
उत्तर भारतात विजेचे यंत्र चालू होणार.

२६२१ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३९)
बडोद्याचा कारभार भारत सरकार स्वतःकडे घेणार.

२६२२ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३९)
आस्त्रेलियाकडे मोठ्या प्रमाणार लोक वसतीस जातात.

२६२३ (११ : १५, १ ऑगस्ट ५२, २३९)
गेल्या महिन्यात २१ तारखेस गोपाळ खेमजीस खुनाबद्दल फाशी दिले.

२६२४ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २३९–२४०)
कलकत्यास इलेक्त्रिक तेलिग्राफ यंत्र बसविणार.

२६२५ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २४०)
ना. गवरनर जनरल ब्रह्मदेशाचा दौरा करणार.

२६२६ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २४०)
एल्फिन्स्तनचे हे गुरू (सर प्याटन) प्रकृती बिघडल्यामुळे इंग्लंडला जाणार.

२६२७ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २४०)
मुंबईत जुलै ५२ मध्ये ५० इंच पाऊस पडला.

२६२८ (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २४०)
एकदा येऊन गेलेल्या मजकुराविषयी पुन्हा पत्र आले, तर ते छापीत नाही.

**२६२९** (११ : १५, २ ऑगस्ट ५२, २४०)

निवेदन : अमेरिकन मिशन देवळांत दर मंगळवारी साडे पाच वाजता धर्मासंबंधी उपदेश व संभाषण होत असते. विरुद्ध किंवा काही प्रश्न कोणास करणे असतील, तर त्यांनी तेथे बोलावे.

**२६२९ अ** (इंम : २४०)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक १६, मुंबई, १६ ऑगस्त १८५२

---

**२६३०** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४१–२४२)

जर्मनांची संख्या १ कोटी २० लक्ष आहे. जर्मन लोकसभेला डाएट म्हणतात. जर्मन देवळे गाथिक धाटणीची बांधलेली असतात. घड्याळाचा व्यवसाय मुख्यतः चालतो. वाद्ये वाजविण्याची आवड दिसते. जर्मनीत ओसाड गढ्या फार दिसतात. (प्रश्न)

**२६३१** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४२–२४५)

अमेरिकन मिशन धर्मोपदेशकांची प्रथम परीक्षा घेते. १८१२ साली मिशनरी भारतात आले. पण इंग्रज सरकार त्यांना धर्मप्रसारास परवानगी देईना. म्हणून मिस्तर न्यूवेल मारिशसला गेले. तेथील हवेने त्याची बायको व मुलगी मरण पावली. त्याच्या बायकोने मरतानाही ईश्वरावरील निष्ठा सोडली नव्हती. प्रार्थना करीत मृत्यू स्वीकारला.
(१५४ वे पानावरून)

२६३२ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४५)

कलियुग हे दुःखाचे युग आहे. सत्याचे युग आल्यावर पाप व दुःख नाहीसे होईल. भक्ती व करुणा सर्वत्र दिसेल. (दास म्हणे) ईश्वराकडे या (अभंग)

२६३३ भ्रष्टता टाकून देवाकडे चला. सर्वांवर प्रीति करा. भ्रम सोडा (अभंग)

२६३४ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४५)

शुक्रोदय : हे नवे मराठी वृत्तपत्र सुरू झाले आहे. गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यात छापितात. दर शुक्रवारी निघते. वार्षिक वर्गणी १२ रुपये.

२६३४ अ (इंम : २४५)

२६३५ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४६)

स्त्रीविद्याभ्यास निबंध : पुस्तक मंडळीने छापला. मुलीला शिकविले, तर अमोलिक लाभ आहेत. बाबा पद्मनजीस या निबंधाकरिता १०० रु. बक्षीस दिले. बक्षीसपात्र निबंध पृ. ५९, बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी १८५२, किंमत २ आणे.

२६३५ अ (इंम : २४५–२४६)

२६३६ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४७)
या देशाची भूमी सुपीक आहे. पण यातूनच लोक निरुद्योगी बनतात. कला व उद्योग यांची वाढ होत नाही. श्रीमंतांभोवती पोटभरू लोक गोळा होतात. लक्ष्मीप्रभावाने श्रीमंत उन्मत्त होतात. स्त्रिया व शूद्र यांवर जुलूम करतात. परकीय आक्रमकांविरुद्ध मात्र एक अक्षरही उच्चारीत नाहीत. धर्मशास्त्र पेटीमध्ये ठेवून अधिकार गाजवितात. (ज्ञानप्रकाशवरून)

२६३६ अ (इंम : २४६–२४७)

२६३७ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४७)
मुंबईत ६० इंच पाऊस पडला.

२६३८ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २४९–२५२)
विष्णूच्या नाभीपासून पृथ्वी उत्पन्न झाली, ही कल्पना चमत्कारिक आहे. पृथ्वीस कमलपत्र म्हणणे योग्य नाही. मेरू पर्वताच्या कर्णिकेबद्दल प्रत्येक ऋषी निराळेच माप सांगतो. नरक व सात तळी हे अगदी कपोलकल्पित वर्णन होय. (नकाशासह)

२६३८ अ (इंम : २४८–२४९)

२६३९ (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २५३–२५४)
एक शास्त्र असणेच हिताचे आहे. देव एकच आहे. तेव्हा शास्त्र एकच असणार. ईश्वर निःपक्षपाती आहे. मानवाच्या शरीरामध्ये साजात्य आहे. बुद्धी व भावनाही सारख्याच आहेत.

२६३९ अ (इंम : २५३)

**२६४०** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २५५–२५८)

ईश्वरदत्त शास्त्रात दोष नसतात. ईश्वर अचेतन आहे, असे वर्णन करणे अयोग्य होय. हिंदुशास्त्रातील गोष्टी एकमेकांशी विपरीत आहेत. वेदात व पुराणात एकवाक्यता नाही. नैसर्गिक चमत्काराबद्दल पुराणे बालिश गोष्टी सांगतात. पुनर्जन्माच्या कथाही सापडतात. पापानिवारणाचे तर्कशुद्ध उपाय त्यात नाहीत. अवतारांच्या कथांमुळे खरे काय ते समजत नाही.

**२६४० अ** (इंम : २५४–२५५)

**२६४१** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २५८)

मुंबई व मद्रास येथील एकेक कामदार बंगालच्या कौन्सिलात नेमला जावा, अशी सूचना आहे.

**२६४२** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २५९)

गेल्या महिन्याच्या ९ तारखेस प्रोम शहर इंग्रजांनी जिंकले, अशी ब्रह्मी देशाहून बातमी आली आहे.

**२६४३** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २५९)

इंग्रज सरकारचे रोजचे उत्पन्न ७ लक्ष ४० हजार रुपये आहे.

**२६४४** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २५९–२६०)

एक सोनार रथकार लिहितो की : गरिबांचे नाव सांगून फंड जमवितात. पण गरजू लोकांना मदत देत नाहीत. उडवाउडवीची उत्तरे देतात. फंडाच्या व्यवस्थेस पंच नेमावेत.

**२६४५** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २६०)

नामदार गवरनर कोन्सलाने दिपुटी कलेक्टर व दिपुटी मॅजिस्त्रेट नेमले त्यांची यादी.

**२६४६** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २६०)

जुगारखाना चालविल्याबद्दल १४ असामींना दंड झाला.

**२६४७** (११ : १६, १६ ऑगस्ट ५२, २६०)

अमेरिकन मिशन देवळांत २४ वे, ३१ वे तारखेस व सप्टेंबर महिन्याचे ७ तारखेस संभाषण होणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक १७, मुंबई, १ सप्टेंबर १८५२

---

**२६४८** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६१)

गेल्या महिन्याच्या २१ वे तारखेस शनिवारी अमेरिकन मिशनातील फायबार्क मडम मरण पावली. प्रकृती बरी नसतानाही ६ वर्षे धर्माचे काम केले. मोठ्या मेहनतीने ती मराठी शिकली. खरी ईश्वरभक्त होती.

**२६४८ अ** (इंम : २६१)

**२६४९** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६२)

एल्फिन्स्तन इन्स्तीटुशन : या शाळेत चांगला विद्याभ्यास चालतो. ८५३ विद्यार्थी आहेत. फी वाढल्यामुळे हिंदू विद्यार्थी मात्र कमी झाले.

**२६४९ अ** (इंम : २६२)

२६५० (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६२)
खरे प्रायश्चित : रे. निजूबिटने हे पुस्तक लिहिले. पाप घालवून खरा उद्धार कसा मिळवावा, याचे त्यात वर्णन आहे. (एके बाजूस इंग्रजी व दुसऱ्या बाजूस मराठी, असे छापले आहे.) : बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी पृ. ५१, केवळ मराठी पृ. १००.

२६५० अ (इंम : २६२)

२६५१ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६३)
सनदेबाबत सूचना करण्यासाठी गावोगाव मंडळ्या स्थापन झाल्या. पण त्यांच्यात मतभेद फार आहेत. सर्वांनी भाग घेऊन सूचना कराव्यात, नाहीतर दुर्दशा वाढेल.
(शुक्रोदय पत्रावरून)

२६५१ अ (इंम : २६३)

२६५२ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६४–२६६)
खिस्ती शास्त्रातील ईश्वरविज्ञान खरे आहे. विसंगती अजिबात नाही. सृष्टिज्ञानाविरुद्ध काही नाही. गुह्य गोष्टींचे स्पष्टीकरण आहे. पापापासून सुटका करून घेण्याचा मार्ग आहे. निराकार ईश्वराने देह धारण केला, तरी त्याचे निराकारपण बुडणार नाही. येशू देव व माणूसही होता. देव, देवपुत्र व आत्मा यांच्यात ऐक्य आहे.

२६५२ अ (इंम : २६३–२६४)

**२६८३** (११ : १७, १ सप्तेंबर ५२, २६७–२६८)

जुन्या करारात येशूच्या जीवनातील प्रत्येक घटनेबद्दल भविष्यप्रमाण दिले होते. ते तंतोतंत खरे ठरले. येशूने जीवनभर अलौकिक असे चमत्कार केले. त्याचा उपदेश रंजल्यागांजल्यांनी स्वीकारला. अविश्वासी विश्वासू बनले. त्यांचे कल्याण झाले. अग्नीने बाप्तिस्मा होईल, याचा अर्थ पापमळ जळून जाईल.

**२६८३ अ** (इंम : २६६–२६७)

**२६८४** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६८)

एल्फिन्स्तन शाळेत जादूचे प्रयोग करून त्यातली हस्तचलाखी सर्वांच्या लक्षात आणून दिली. जादू वगैरे सत्य मानतात, ते न मानावे म्हणून खातरी करून दिली.

**२६८५** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६९)

तुमच्या देवापेक्षा आम्हांला जो देव भेटेल, तो सूर्याहून तेजःपुंज आहे. हजारोहजार पुण्यवान आत्मेही भेटतील. देवदूत हे आमचे थोरले भाऊ आहेत. आम्ही श्रेष्ठ यात्रेकरू आहोत (दास म्हणे.)

**२६८६** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६९)

तारक ख्रिस्तही दुःखी जनांची विश्रांती होय. तुमचा सगळा शीण तो अजिबात दूर करील. जे दूर राहिलेले आहेत, त्या सर्वांनी ख्रिस्ताच्या आश्रयास यावे. दुःखाचे मूळ तो दूर करील.

२६५७ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २६९–२७०)

"ढोंगद्वेष्टा" लिहितो की : सध्या ज्योतिषरूपी दैत्य फार माजला आहे. एखाद्याचे डोके जरी दुखू लागले, तरी ग्रहशांती करणारे जोशी भेटत आहेत. शुभाशुभ फळ पाहणे हा केवळ मूर्खपणा होय. जन्म-मृत्यू जणू काही या ज्योतिषांच्या हातात आहे, असे समजून शेकडो उपाय केले जात असतात. जोशी लोक लबाड असतात. त्यांच्यावर विश्वास ठेवू नका.

२६५८ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७०–२७१)

"विचार करणारा" म्हणतो की : कानोबास अनेक लोक नवस करतात. अज्ञानी व देवभोळे लोक तेथे जमतात. अंगात वारे आलेले पुजारी बीभत्स चाळे करतात. द्रव्यलोभी लोक शिव्याही ऐकून घेतात. अंगातून भुते काढण्याचे प्रकार चालतात. लोकांनी या भलत्या उपायांच्या नादी लागू नये.

२६५९ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७२)

नामदार गव्हर्नर जनरल लवकरच ब्रम्हदेशास जाणार.

२६६० (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७२)

चीनमध्ये बंड चालू असून तार्तरी राज्य बुडणार आहे.

२६६१ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७२)

केप ऑफ गुड होपमध्ये लढाई चालू आहे.

२६६२ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७२)

पार्लमेंटमध्ये नवीन नेमणुका होणार.

**२६६३** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७२)

जोती गोविंदराव फुले यांनी म्हार, मांग, कैकाडी, इत्यादि अति नीच मानलेल्या जातींस कांही विद्येचा संस्कार घडून त्यांचे दुर्भाग्य व दुराचार घालवावे, म्हणून शाळा, पेठ जुनागंज एथे घातली. हल्ली दक्षणाकमीटीने गरीब लोकांची दया करून, तीनशे रुपये दरसाल दक्षणेतून त्यांस देण्याचे ठरविले आहे. (ज्ञानप्रकाश)

**२६६४** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७२)

धनजीभाई नौरोजी यांनी दोन महिन्यांवर सुरतेस धेड्यांसाठी शाळा सुरू केली. ४५ विद्यार्थी शिकतात. (शुक्रोदयावरून)

**२६६५** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७३)

मुंबई असोसिएशन : या सभेचे अध्यक्ष जगन्नाथ शंकरशेट असून कंपनीच्या सनदेबद्दल सूचना करणार आहेत. गेल्या महिन्याच्या २६ तारखेस गुरुवारी एल्फिस्टन विद्यालयांत सभा झाली. डॉ. भाऊ दाजी व विनायक जगन्नाथजी चिटणीस.

**२६६६** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७३–२७४)

विजेच्या यंत्राने तीन हजार मैल दूरवर बातमी पाठविण्याची सोय सरकारने केली. (ज्ञानप्रकाश)

**२६६७** (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७४)

कालिफोर्णिया, आस्त्रेलिया व रशिया येथे ३७ कोटींचे सोने सापडण्याचा संभव आहे.

२६६८ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७४)
देव पराक्रमी असून दैत्यांचे बंदिवान् कसे झाले, हा प्रश्नच आहे. मंत्राने मूर्तीत खरोखर जीव येतो काय ? सध्या ज्यांची पूजा होते त्या देवांची नावेही वेदात नाहीत. देव पौराणिक आहेत. धातूच्या व काष्ठाच्या मूर्ती तारण करतात काय ?

२६६९ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७४)
नेटिव लायब्ररीसाठी साताऱ्यात समिती स्थापन झाली. कमिशनसाहेबाने बाराशे रुपये जमविले. श्रीमंत महाराज राणीसाहेब यांनी एक बंगला दिला आहे. (ज्ञानप्रकाश)

२६७० (११ : १७, १ सप्तेंबर ५२, २७६)
मद्यप्राशक ब्राह्मणांना जातीत घेण्यावरून दोन तट पडले आहेत. (ज्ञानप्रकाश)

२६७१ (११ : १७, १ सप्टेंबर ५२, २७६)
अमेरिकन मिशन देवळांत ७, १४, २१ तारखांस संध्याकाळी साडेपाच वाजता मराठी भाषेत संभाषणे होतील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक १८, मुंबई, १५ सप्टेंबर १८५२

२६७२ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २७७–२७८)
दारू आफीण या व्यसनांनी दुष्टाई व बिघाड फार होतात. सरकारनेही अफूचा व्यापार बंद केला पाहिजे. पैशाचा लोभ सोडावा.

**२६७२ अ** (इंम : २७७)

**२६७३** (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २७९–२८१)

निर्गुण ब्रह्माने सगुण विश्व कसे तयार केले, याचे समाधानकारक उत्तर मिळत नाही. शिवाय सत्त्व, रज, तम हे तिन्ही गुण परस्परविरुद्ध आहेत. देवांच्या हातून अनेक वेळा अपवित्र कार्य घडल्याबद्दल पुराणेच सांगतात. देवांची प्रवृत्ती विषयभोगाकडे होती असे दिसते. या कथा लाक्षणिक समजणे कठीण आहे.

**२६७३ अ** (इंम : २७८–२७९)

**२६७४** (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८१–२८२)

हिंदूंकरिता लंडनात धर्मशाळा :

वरील विषयावर भास्कर दामोदर यांनी निबंध लिहिला, त्यास सोन्याचे पदक बक्षीस मिळाले. (ज्ञानोदयकर्त्याचा निबंधावरील अभिप्राय)

**२६७४ अ** (इंम : २८१)

**२६७५** (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८३–२८६)

'एक ज्ञानप्रसारक वाचणारा' लिहितो की : लोकांना भारताच्या वास्तविक स्थितीचे ज्ञान झाले आहे. परदेशी जाण्यात वाईट काही नाही, याबद्दल खात्री पटली. लंडनमध्ये धर्मशाळा बांधून स्वतः विहिरी खणल्या, तरच ते पाणी पिण्यास तयार आहेत ! आपला धर्म स्वतःसिद्ध आहे, असे ते समजत आहेत. पण जे तर्क व अनुभव यांच्या विरुद्ध आहेत, ते सोडण्याची तयारी ठेवली पाहिजे. [भास्कर दामोदर (पाळंदे) यांच्या हिंदूंकरिता लंडनात धर्मशाळा या निबंधावरील प्रतिक्रिया]

२६७५ अ (इंम : २८२–२८३)

२६७६ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८६)
मुंबईत दररोज ५० माणसांचा मृत्यू होतो.

२६७७ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८६)
कुवारीच्या पोटी जन्मास येऊन येशूने जगावर कृपा केली. ज्यांची कोणासही दया आली नाही, त्यांना जवळ केले. आमच्या पापाचे प्रायश्चित भोगून तो मरण पावला.

२६७८ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८६–२८८)
मि. हॉल आणि नॉट या मिशनऱ्यांना मुंबई इलाख्यात धर्मप्रसाराची परवानगी मिळाली नाही, तेव्हा ते कोचीन मिशनात राहिले. (२४५ पानावरून पुढे)

२६७९ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८८)
कलकत्ता शहराचा व्यापार वीस वर्षांत तिपटीने वाढला.

२६८० (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८८)
दुर्व्यसनी गोऱ्या खलाशांना आसरा मिळून भोजनही मिळावे, तसेच त्यांची स्थिती सुधारावी, म्हणून खलाशी गृह बांधण्यासाठी पंधरा हजार रुपये जमा झाले आहेत.

२६८१ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २८८–२९१)

मुलांच्या पोषणास मोकळा वायू व विपुल तेज फार आवश्यक आहेत. रात्री एकाच ठिकाणी पुष्कळ मुलांचा समुचय कधीही करू नये. स्वच्छतेविषयी दक्ष असावे. खाणे व व्यायाम यांत नियमितपणा असावा. घरात मुलांना एकटेच रडत टाकू नये. मुले शरिराने सुदृढ व मनाने निरोगी झाली पाहिजेत.

२६८२ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २९१)

'सोवळा ब्राह्मण' लिहितो की : कानोबाच्या संस्थानापासून लोकांच्या सदाचरणास व नीतीस बाधा येते. कानोबा मुंबईबाहेर कोणास ठाऊकसुद्धा नाही. पोट भरण्याच्या ढोंगातून धर्माचे मातेरे होते. तात्पर्य : कल्पित देवास भजणे सोडा. (ज्ञानोदयकर्त्यांचा अभिप्राय)

२६८३ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २९२)

गोपाळराव देशमुखांना सातार्‍यास मुनसफ नेमले.

२६८४ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २९२)

कमिटी ग्रंथ तपासण्यासाठी पगारी नोकर नेमणार आहे.

२६८५ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २९२)

आयुर्वेद : बाबू नारायण राय आयुर्वेदाचे बंगाली भाषांतर छापणार. असे केल्यामुळे वेद ह्मारापोरांच्यादेखील हाती जातो व यामुळे हिंदुधर्म नाहीसा होतो, ह्मणून कित्येक निंदा करतील.

२६८६ (११ : १८, १५ सप्टेंबर ५२, २९२)

या महिन्याचे २१ व २८ तारखेस अमेरिकन मिशन देवळांत पांच वाजतां संभाषण होणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२६८७** (११ : १९, १ आक्टोबर ५२, २९३–२९४)
कृष्णशास्त्री साठ्ये हिंदु धर्माच्या श्रेष्ठतेविषयी व्याख्याने देणार आहेत पण मिशन देवळाप्रमाणे वादविवाद झाला, तर चांगले ठरेल. (प्रभाकरवरून बातमी व संपादकांचा अभिप्राय)

**२६८७ अ** (इंम : २९३)

**२६८८** (११ : १९, १ आक्टोबर ५२, २९५–२९७)
देव हा आत्मा असून अदृश्य, स्वपालक, सार्वकालिक, न बदलणारा, सर्वशक्तिमान, सर्वज्ञानी, आणि एकच आहे. तो कृपाळू पवित्र, पापाचा तिटकारा करणारा, स्वतंत्र आहे. मानवधर्मेकरून येशु दाविदाचा पुत्र, तर गौरवेकरून देवाचा पुत्र आहे. येशु मृत्यु पावला, तरी देवपणाविषयी मेला नाही.

**२६८८ अ** (इंम : २९४–२९५)

**२६८९** (११ : १९, १ आक्टोबर ५२, २९७–२९८)
एका गावातली मूर्ती देवळातून गायब झाली. काही दिवसांनंतर ती चिखलामध्ये सापडली.

**२६८९ अ** (इंम : २९७)

**२६९०** (११ : १९, १ आक्टोबर ५२, २९८)

झाडावर राहणाऱ्या पक्ष्यांना वृक्षारोही म्हणतात. बळकट नखे व चोच असणाऱ्यांना ग्राही म्हणतात. कोंबड्या वगैरेना विकिरी म्हणावे. चोच लांबट असेल, तर तीरविहारी म्हणावे. पाण्यात पोहणाऱ्यांना जलविहारी म्हणावे. चोच बाकडी असेल, तर वक्रचंचू म्हणावे. (सचित्र) (इंग्रजी शब्दांना मराठी शब्द दिले आहेत.)

**२६९१** (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३०४–३०८)

इस्लामधर्म खिस्तीच्या मानाने अलीकडला आहे. कुराणामधील अलौकिक चमत्कारांना प्रमाण नाही. शिवाय त्यात व्यक्तिनिष्ठा आहे. तुलनेने पाहिल्यास जीझस अधिक निष्पाप आहे. पापनिवारण, तसेच प्रायश्चित हे उपाय त्यांच्या धर्मात नाहीत.

**२६९१ अ** (इंम : ३०२–३०४)

**२६९२** (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३०९–३११)

खिस्ती झालेल्या बाळारामने पत्नीने आपल्याजवळ राहावे यासाठी दावा लावला. कायद्याने नवऱ्याचा हा हक्क मान्य केलेला आहे.

**२६९२ अ** (इंम : २०८)

**२६९३** (११ : १९, १ ऑक्टोबर ५२, ३१३)

बाळाराम गणपत याने पत्नीला आपणाकडे ठेवावे, म्हणून अर्ज केला असता, सर अर्स्किन पेरी यांनी 'हेबियस कॉर्पस' ॲक्टाप्रमाणे फिर्याद करण्याचा सल्ला दिला.

**२६९३ अ** (इंम : ३११–३१३)

२६९४ (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१४)
दारूच्या धुंदीत खून करणारास चिनी लोकांनी फाशी दिले आणि दारूविक्यासही फाशी देण्याचे ठरविले.

२६९५ (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१४)
मिसर देशात रेल्वेसाठी लोखंडी रस्ता तयार करीत आहेत.

२६९६ (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१४)
इंग्लिश सैन्याने भात नेणारे हजार मचवे पकडले. ब्रह्मदेशामध्ये अन्नाचा तुटवडा पडला आहे.

२६९७ (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१४)
गंगा आणि अग्निदेव, तुळस आणि गायत्री, विष्णु आणि शिव या देवतांत वैर असावे, हे विपरीत आहे. असे 'उत्तराची प्रतीक्षा करणारा' पत्रलेखक म्हणतो.

२६९८ (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१५)
दारूबाज गृहस्थांना प्रायश्चित देणाऱ्या ब्राह्मणांना पुण्यामधील ब्राह्मणांनी वेगळे प्रायश्चित द्यावयाचे ठरविले.

२६९९ (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१५)
मयत भीमाशंकर गंगाधरशास्त्री यांच्या वारसांना नेमणूक मंजूर झाली. पण ते वारस आपल्या नेमणूकीस इंग्रज सरकारची मान्यता मिळविणार आहेत.

२७०० (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१६)
इंग्लंडमध्ये गेल्यावर्षी ७६ कोटीचा कापूस विकाला गेला. सूतगिरण्यात १२ लक्ष ५० हजार कामगार आहेत.

**२७०१** (११ : १९, १ आक्टोबर ५२, ३१६)

या महिन्याच्या ५ वे १२ वे व १९ तारखेस मंगळवारी अमेरिकन मिशन देवळांत पांच वाजता संभाषण होणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक २०, मुंबई, १५ आक्टोबर १८५२

---

**२७०२** (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३१७)

मद्रास इलाख्यात २ कोटी २३ लाख लोक राहातात. त्यांपैकी स्त्रिया ९ कोटी ५ लाख आहेत.

**२७०२ अ** (इंम : ३१७)

**२७०३** (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३१८–३१९)

फ्रीयर म्हणाले की : सिंधमध्ये खिस्ती देऊळ बांधले पाहिजे. कारण इंग्रजांचे राज्य हे त्यांच्या पवित्र धर्माचे प्रतीक आहे. जातपात नसल्यामुळे व एकच तारणारा असल्यामुळे इंग्लिश लोक सर्वत्र जय पावले. जे अयोग्य वर्ततात, त्यांना त्याचा बराबर हिशेब द्यावा लागेल. (गेल्या महिन्याच्या ९ तारखेस पायाचा पहिला दगड कमिशनर क्रियरसाहेबांनी आपल्या हाती घातला.) (पहिले प्रॉटेस्टंट चर्च)

**२७०३ अ** (इंम : ३१७–३१८)

**२७०४** (११ : २०, १५ ऑक्टोबर ५२, ३१९)

'सत्यनिरूपण' : गोविंद नारायण यांनी हे पुस्तक लिहिले. पृष्ठे ८४, किं. ८ आणे. सत्याने वागण्यातच खरा लाभ आहे, हे मत दिलेले आहे. यात ९ अध्याय आहेत.

**२७०४ अ** (इंम : ३१९)

**२७०५** (११ : २०, १५ ऑक्टोबर ५२, ३२०–३२१)

विचारलहरी : या पत्राचा संपादक सद्धर्माविषयी लिहीत नाही. निंदारूप बडबड मात्र करतो. हिंदू धर्मच काय तो वास्तविक धर्म आहे, असी त्याची खात्री असल्यामुळे ख्रिस्ताची निंदा करतो. अशाने धर्मरक्षण होत नसते.

**२७०५ अ** (इंम : ३१९–३२०)

**२७०६** (११ : २०, १५ ऑक्टोबर ५२, ३२२–३२३)

'सत्यवादी हिंदू' लिहितो की : मिशनेरी हिंदू धर्मास दोष देतात. म्हणून बैबलातील दोष दाखविणे आम्हांस भाग पडते. एकाने शस्त्र हाती घेतल्यावर दुसरा उगीच कसा राहील ? पण अशा भांडणात दोघांचीही शोभा राहात नाही. सर्वांनी नम्रतेने ईश्वराजवळ ज्ञान मागून त्यास सत्यतेने भजावे.

**२७०६ अ** (इंम : ३२१–३२२)

**२७०७** (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३२४–३२७)

पाखंडी लोकांचे शास्त्र ऐकल्यामुळे हिंदुधर्मास ओहोटी लागते, असे प्रतिपादन ठाकुरद्वारात केले जाते. इंग्रजी राज्यामुळे हे पाखंड वाढले, असेही शास्त्रीमंडळी समजतात. खरी गोष्ट अशी आहे की, मानवातील परस्पर प्रेमावर आधारलेला खिस्ती धर्म लोकांना आवडतो, म्हणून ते आपल्या धर्मास गौण समजू लागले. (ठाकूरद्वारच्या सभेस जाणारा)

**२७०७ अ** (इंम : ३२३–३२४)

**२७०८** (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३२८–३३०)

पोथीपठण, भजन, पूजा, यात्रा, हे पुराणातील तरणोपाय आहेत. या उपायांना लाक्षणिक मानले, तर हजारो वर्षे आपली फसवणूक झाली, हेच सिद्ध होते. परमेश्वराचे गुण मूर्तीमध्ये येणे अशक्य आहे. ज्याची योग्यता आहे, त्याच्यावरच विश्वास ठेवावा.

**२७०८ अ** (इंम : ३२७–३२८)

**२७०९** (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३०–३३१)

पापासाठी नरकदंड असतो, म्हणून पापाचा पश्चाताप करावा. येशूने मानवाच्या पापासाठी वधस्तंभ पतकरला. जे विश्वासी आहेत, त्यांचा दंड त्याने भोगला.

**२७१०** (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३१)

विचारलहरी पत्र खिस्ती मिशनऱ्यांना शिव्यांची लाखोली वाहात असते. खिस्ती धर्मास खोटा म्हणणे, हे हिंदू धर्माविरुद्ध आहे, कारण हिंदूधर्म तत्त्वशोधक आहे, लबाड नाही. जे डोळस आहेत, ते निर्भय बनून सत्य शोधतात. शिव्या देऊन सत्याची सिद्धता होत नसते. (प्रभाकरवरून)

२७११ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३२)

'हिंदधर्माभिमानी' लिहितो की : ज्ञातिमात्राचे जे धर्म आहेत त्या धर्मेंकरून वागावे, असे हिंदू समजतात. वर्णाश्रमधर्माचा व्युत्क्रम त्यांना मान्य नाही. मग या नियमानुसार परक्यांनी हिंदू धर्मात यावे, असे कोण म्हणेल ?

२७१२ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३२)

'अल्लारक्षी' म्हणतो की : सोमवतीनिमित्त समुद्रावर लोक स्नानास येतात. लोक ढकलाढकली करतात. भिकारी सतावतात. चोऱ्याही होतात. खोल पाण्यात गेल्यामुळे काही मरतात. छोट्या गावात तळे असते, तेथेच लोक स्नान करतात. त्यामुळे अस्वच्छता वाढते.

२७१३ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३३)

मागच्या वर्षी मुंबईत १४७२४ लोकांचे मृत्यू झाले.

२७१४ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३४)

स्त्रियांची अगदी लहानपणी लग्ने होतात. दुर्दैवाने पती वारला, तर सगळे जन्म दुःखात काढावे लागते. पुरुषांना मात्र पुन्हा विवाह करता येतो. मग स्त्रियांनी का करू नये ? (एका विधवेचे पत्र प्रभाकरवरून)

२७१५ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३४)

मुंबईत टेमपरान्स युनियन या सभेत तेरा जणांनी दारू सोडण्याची शपथ घेतली.

२७१६ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३४)

इंग्लंडची राणी विश्रांतीसाठी स्कॉटलंडकडे गेली.

२७१७ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३४)

'प्रेसिडेंट' नेपोलियन आता 'बादशहा' होणार.

२७१८ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३४–३३६)

मिस्तर हाल व नाट यांना इंग्रज सरकारने १० दिवस कैदेत ठेवले होते. त्यांच्याकडून दंड मागितला. सक्तीने विलायतेस पाठविण्याची तयारी केली. तेव्हा त्या दोघांनी मुंबईच्या गव्हर्नरला अर्ज केला की, धर्माचे काम करण्यात वाईट काही नाही. मूर्तिपूजकांच्या देशात खिस्ती धर्म येणे आवश्यक आहे. तेव्हा सरकारने आपला हुकूम तहकूब केला.

२७१९ (११ : २०, १५ आक्टोबर ५२, ३३६)

या महिन्याच्या १९ वे व २६ वे तारखेस, पुढील महिन्याच्या २ च्या तारखेस मंगळवारी अमेरिकन मिशन देवळांत संभाषण होईल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक २१, मुंबई, १ नोव्हेंबर १८५२

२७२० (११ : २१, १ नोव्हेंबर ५२, ३३७–३३८)

भटकणारा आल्बत्रास (सचित्र) : समुद्रातून आहार मिळवून जीवन पावणारा असा हा प्राणी आहे. याची लांबी ४ फूट असून चोच पिवळी असते. पायाला तीन बोटे असून ती कातडीने जोडलेली असतात. त्याची अंडी हंसाइतकी मोठी असतात. समुद्राच्या पाण्यावर बसणारे हे प्राणी कधीकधी आकाशातून उडत जाताना दिसतात.

**२७२१** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३३८)

जनरल असेंब्ली इन्स्तितुशनचे मिलरसाहेब आजारीपणामुळे स्वदेशास गेले. त्यांच्यासह प्याटनही गेले आहेत.

**२७२१ अ** (इंम : ३३८)

**२७२२** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३३८)

गंगाधरशास्त्री फडक्यांनी आपल्या पुस्तकात म्हटले की, वाममार्ग नरकास नेणारा आहे. त्यावरून मोरभट दांडेकरांना राग आला. ते सभा भरवून वाद करणार आहेत. (प्रभाकरवरून)

**२७२२ अ** (इंम : ३३८)

**२७२३** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३३९–३४०)

कृष्णशास्त्री साठे म्हणतात की : हिंदुधर्म हा सद्धर्म आहे. परंतु पाखंडी लोकांच्या सहवासाने हिंदू बिघडले. बैबलातील साप बोलण्याच्या कथेवर विश्वास ठेवायचा, मग रामायणात वानर बोलतात, यावर विश्वास ठेवायला काय हरकत आहे? आपल्या धर्माप्रमाणे वागले की मुक्ती मिळते. (कृष्णशास्त्री साठे यांच्या २६ सप्टे., ३ आक्टो., ठाकुरद्वारी झालेल्या भाषणाचा वृत्तांत) (प्रभाकरवरून)

**२७२३ अ** (इंम · ३३८–३३९)

**२७२४** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३४२–३४४)

माणूस मुळात पवित्र होता. नंतर त्याचे अंतःकरण भ्रष्ट झाले. म्हणून पापाची क्षमा मागून अंतःकरण नवे करावे. स्वभावच बदलून टाकावा. ज्ञानशक्तीने माणूस पूर्ण बनतो. पापापासून दूर राहूनच हे जमेल.

**२७२४ अ** (इंम : ३४०–३४२)

**२७२५** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३४५–३४७)

हिंदुशास्त्रात असे मत आहे की : ८४ लक्ष जन्म आहेत. पापी माणसे नीच जातीत जन्म घेतात. पण मागल्या जन्मीच्या पापाची आठवणही राहात नाही. प्रत्येक प्राण्यास स्वतःची थोडीफार बुद्धी असतेच. मग त्यांस हीन कसे लेखावे ? जनावरांना तर कोणताच धर्म नसतो. विदेही आत्मासुद्धा मुक्तीचे सुख भोगतो.

**२७२५ अ** (इंम : ३४४–३४५)

**२७२६** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३४९–३५२)

हिंदूधर्मशास्त्रात व्यवहारी गोष्टी बऱ्याच आहेत. यावरून हे सिद्ध होते की, ते शास्त्र मनुष्यलिखित आहे. ईश्वरप्रेरित नाही. शिवाय त्यातील चमत्कार खरेच घडले, याची साक्ष कोणी दिसत नाही. त्यांच्या मनस्वी व्यभिचारामुळे मतवाईट होते. वेद अनादि नाहीत. ऋषींनी ब्रह्मणेतर स्त्रियांशी विवाह केले. सृष्टीच्या उत्पत्तीबद्दल वेगवेगळ्या कथा सापडतात. ख्रिस्ती धर्माबद्दल मात्र ते अभद्र भाषणे करतात, असे 'सभेस जाणारा' लिहितो.

**२७२६ अ** (इंम : ३४७–३४९)

**२७२७** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५२–३५४)

मोश्याने स्वताच्या मरणाविषयी कसे लिहिले आहे ? याचे उत्तर असे की, मोश्याचा मृत्यूचा अध्याय इतरांनी लिहून जुना करार पूर्ण केला होता. सिद्धार्थाचे प्रमाण न देताच विचारलहरीकार इतरांवर टीका करीत असतो.

२७२८ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५५–३५७)

गव्हर्नर जनरलकडे केलेल्या अर्जात म्हटले आहे की, इंग्रजी राज्यात हा महा अनर्थ सुरू झाला. साहेब लोक आल्यापासूनच दारूची दुकाने सुरू झाली. व्यसनी लोक कुटुंबाचे हाल करितात. रयत दारूबाजीने लाचार होत्ये आहे. सरकारला एकट्या सातारा जिल्ह्यात यंदा दारूतून १९ हजार रुपये मिळाले.

२७२८ अ (इंम : ३५४–३५५)

२७२९ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५७)

इंदूरच्या महाराजांनी सरकारास विनंती केली आहे की : इंदूर ते मुंबई पर्यंत विद्युत्यंत्राने बातमी पोहोचविण्याची व्यवस्था व्हावी. खर्च इंदूरकर देतील. (प्रभाकरवरून)

२७३० (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५८)

पापाचा भार लोकांना सोसवेना म्हणून त्याच्या प्रायश्चितासाठी देवसुत जन्मास आला. त्याच्या रक्तरूप जलात स्नात करून पवित्र व्हावे. तारकाचे रक्त हेच तीर्थ आहे. (दास म्हणे)

२७३१ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५८)

मुंबई असोसिएशन : ही सभा पार्लमेंटला एक अर्ज देणार आहे. त्यात राज्यकारभाराविषयी सूचना असतील.

२७३२ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५८)

सप्टेंबर महिन्याच्या १४ तारखेस नामदार ड्यूक आफ वेलिंग्टनचा मृत्यु झाला. ३९ वर्षांपूर्वी त्याने अहमदनगर जिंकले होते. पुढे तो इंग्लंडचा पंतप्रधान झाला होता.

२७३३ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५८)

'बैलांची दया करणारा' पत्रात म्हणतो की: गाडीवान स्वतः दारू पितात आणि बैलांनाही दारू पाजतात. दारूच्या धुंदीत वेगाने पळून बैल अशक्त होतात. ही गोष्ट अयोग्य आहे.

२७३४ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५९)

'लग्न करणाऱ्यांचे बरे पाहणारा' म्हणतो की : लोक कर्ज काढून लग्ने करतात. सावकारांचा मात्र फायदा होतो. लग्नासाठी कर्ज काढू नये.

२७३५ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५९)

सध्या भरतखंडात तीन लक्ष गोऱ्यांची पलटण आहे. एवढी मोठी तयारी असताना कोणता शत्रु त्यांच्यासमोर उभा राहील?

२७३६ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३५९)

नवीन दवाखाना: फोर्ट विभागात गरिबांना मोफत औषधे मिळावीत म्हणून १३ हजारांच्या देणग्या मिळाल्या. देणगीदार बहुसंख्य पारशी आहेत.

२७३७ (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३६०)

उपास करून शरिरास कष्टवू नये. आंघोळीने मन शुद्ध होत असते, तर बेडूक सर्वांत पवित्र समजावा लागेल! गुहेमध्ये बसून ईश्वर भेटला असता, तर बिळात राहणारे उंदीर स्वर्गाला नसते का गेले? बगळे डोळे झाकून गंगेत बसतात, साप वारा पिऊन राहतात, तरी ईश्वर त्यांच्यापासून दूरच राहातो. (भक्त म्हणे)

**२७३८** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३६०)

पृथ्वीपासून सूर्य नऊ कोटी पन्नास लक्ष मैल दूर आहे. अचल तारे सूर्यापासून २ लक्ष ६ हजार मैल दूर आहेत. सूर्याच्या प्रकाशाची गती एके सेकंदास १ लक्ष ९२ हजार मैलांची असते.

**२७३९** (११ : २१, १ नोवेंबर ५२, ३६०)

या महिन्याच्या २ ऱ्या, ९ व्या, १६ व्या तारखेस मंगळवारी संध्याकाळी पांच वाजता मिशनदेवळांत संभाषण होणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक २२, मुंबई, १५ नोवेंबर १८५२

**२७४०** (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३६)

रेवरंड फ्रेझर या विद्वान साहेबास पुणे कॉलेजांत प्रोफेसर नेमले आहे.

**२७४० अ** (इंम : ३६१)

**२७४१** (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३६१)

सर अर्स्किन पेरी विलायतेस जाणारा. त्यांच्या स्मरणासाठी ४० हजार रुपये जमा झाले. या निधीतून एल्फिन्स्टन शाळेत दोन गुरूंची नेमणूक होईल.

**२७४१ अ** (इंम : ३६१)

**२७४२** (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३६२)

कलकत्ता रेव्यु नामे कलकत्तेमध्ये तीन महिन्यांनी ग्रंथ निघतो. त्यांत हिंदुस्थानांत दारू हा अनर्थ सरकारच्या हातून वृद्धि पावला, असे म्हटले आहे.

**२७४२ अ** (इंम : ३६१–३६२)

**२७४३** (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३६४–३६८)

पृथ्वीने गाईचे रूप धारण केले, शेषास सहस्त्र फणा आहेत, किंवा आठ दिग्गज आहेत; हे वर्णन लाक्षणिक समजले पाहिजे. कारण पोरकट गोष्टी सांगून धर्माचे महत्त्व वाढणार नाही. एलिया योहानाचा जन्म घेऊन आला, यास प्रमाण आहे. पण तुकाराम हा उद्धवाचा अवतार आहे, यास काहीच साक्ष नाही. येशूने दारू केली नाही, तर द्राक्षरस तयार केला. कृष्णाच्या चोऱ्यांचे समर्थन फार लंगडे आहे. शास्त्रीलोक अक्षम्य धीटपणा करून येशूस मात्र उगीच दोष लावतात. असे 'सभेस जाणारा' लिहितो. (कृष्णशास्त्री साठे यांच्या भाषणाचा वृतांत)

**२७४३ अ** (इंम : ३६२–३६५)

**२७४४** (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३६८–३६९)

"लोकहितेच्छू" लिहितो की : मोहरमाच्या उत्साहात फार अनर्थ होतात. सकू नावाच्या स्त्रीचा तिच्या सासरच्या मंडळींनी रस्त्यात खून केला. ताशेवाजंत्रीच्या आवाजात तिच्या किंकाळ्या कोणासही ऐकू गेल्या नाहीत.

**२७४४ अ** (इंम : ३६८)

**२७४५** (११ : २२, १५ नोव्हेंबर ५२, ३७०–३७१)

कपिल सांख्यांच्या मताने २४, तर पतंजलीच्या मताप्रमाणे २५ मूळ तत्त्वे आहेत. जगाचे मूलकारण पुरुष मानले आहे, तर वेदान्त म्हणतो की, ब्रह्म ही एकच मूलवस्तू आहे; बाकी सर्व भासमय असते. पुराणे मात्र सांगतात : जग ही वस्तुरूप गोष्ट आहे. शिवाय ब्रह्मा, विष्णू, शिव, यांचे अनुयायी वेगळी मते सांगून त्या त्या देवाला एकमेव परमेश्वर मानतात. (सोळावे संभाषण)

**२७४५ अ** (इंम : ३६९–३७०)

**२७४६** (११ : २२, १५ नोव्हेंबर ५२, ३७१–३७२)

कृष्णशास्त्री साठे यांस प्रश्न : उत्तराची वाट पहाणारा विचारतो की : हिंदूखेरीज इतर धर्म भयावह आहेत, असे आपण प्रतिपादन करता, मग ब्राह्मण लोक पिराला नवस कसे करतात ? अनुष्ठान-व्रताची प्रचीती येते म्हणावे, तर सतत अनुष्ठाने करणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाचे राज्य कसे गेले ? ब्राह्मण पवित्र आहेत, असे आपण म्हणता, मग ते चोरी-व्यभिचार वगैरे कुकर्मे का करतात ? केवळ देवास बिल्वपत्र वाहिल्यामुळे पाप नष्ट होते काय ? (प्रभाकरवरून)

**२७४७** (११ : २२, १५ नोव्हेंबर ५२, ३७३)

"येशूकृत उपदेश" या पुस्तकात राममोहन रायने म्हटले आहे की : खरा एकच देव मानणारा खिस्ती धर्म फार चांगला आहे. तो इहलौकिक उच्चनीचत्व मानीत नाही. म्हणून हा धर्म सुलभ व उत्कृष्ट होय. (प्रभाकरवरून)

२७४८ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७३)

कृष्णशास्त्री म्हणतात की : सूर्यकिरण सोन्याप्रमाणे पिवळे दिसतात, म्हणून तो सूर्य सुवर्णहस्त देव आहे. पण मूळ कथा अशी आहे की : एकदा सूर्याने अमंगळ हस्ताने देवास अर्पण दिल्हे, म्हणून त्याचा हात ऋत्विजांनी तोडला. पुढे त्यास देवानेच सुवर्णहस्त दिला.

२७४९ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७३–३७४)

'सदसद्विचारी' लिहितो की : एका ब्राह्मण गुरूजींनी 'चाक्या म्हसोबा'च्या गोष्टीची टिंगल करून लेखकास निरुद्योगी म्हटले. स्वतःला उंच समजणाऱ्या या लोकांना कधी समजणार की, उंचपणा मूळचाच असावा लागतो ? चुलीपासी बडबड केल्याने काहीच होत नाही.

२७५० (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४)

बोहऱ्याची दोन मुले अंगावर दागिने घालून खेळत असताना चोरांनी त्याना पळविले. तपासानंतर त्यांची प्रेते विहिरीत तरंगताना दिसली. दागिन्यांच्या लोभाने बालहत्या होतात. त्यापेक्षा विद्यारूपी गुप्तधन मुलांना द्यावे.

२७५१ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४)

निजामचा रेसिडेंट कर्नल फ्रेझर याच्या जागेवर हेन्री लारेन्सची नेमणूक झाली. (प्रभाकरवरून)

२७५२ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४)

बॉम्बे असोसिएशन : या सभेच्या अर्जावर एकूण दोन हजारांच्या सह्या झाल्या आहेत. (प्रभाकरवरून)

२७५३ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४)

धारवाडला ताबुतांच्या दिवसांत हिंदु व मुसलमान यांत मारामारी झाली.

२७८४ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४)
ऑक्टोबरमध्ये पार्लमेंटची सभा भरणार.

२७८५ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४)
लुई नेपोलियनला बादशहाची पदवी मिळणार.

२७८६ (११ : २२, १५ नोव्हेंबर, ३७४)
बंगालच्या व मद्रासच्या लोखंडी रस्त्यांस सरकारने मंजुरी दिली.

२७८७ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७४–३७६)
गाथ, वाल्‌देन्स, हेरूली, ही जर्मनीची प्राचीन कुळे समजली जातात. प्राचीन जर्मन लोक रानटी होते. ते जनावरांची कातडी पांघरीत. रोमन साम्राज्यात ते सुधारले. पुढे चार्लमेन बादशहाने जर्मन लोकांना जिंकले. सन ९१२ पासून बादशहाची निवड करण्याची प्रथा सुरू झाली. रोमचा पोप व जर्मन बादशहा यांची नेहमी भांडणे होत असत. (प्रश्न)

२७८८ (११ : २२, १५ नोवेंबर ५२, ३७६)
या महिन्याच्या १६ वे २३ वे ३० वे तारखेस मंगळवारी संध्याकाळी पांच वाजता अमेरिकन मिशन देवळांत संभाषण होणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक २३, मुंबई, १ दिसेंबर १८५२

२७८९ (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३७७)
वालेन्टैन स्वदेशाहून गेल्या महिन्याच्या १९ तारखेस, सहकुटुंब परत आले असून ते नगर मिशनमध्ये राहणार.

**२७५९ अ** (इंम : ३७७)

**२७६०** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३७७)

मुंबई ते ठाणे वाफेची गाडी गेल्या महिन्याच्या १८ तारखेस सुरू झाली. तसेच कल्याणपर्यंत लोखंडी रस्ता तयार होत आहे. भरतखंडात जणू नवा शकच सुरू झाला.

**२७६० अ** (इंम : ३७७)

**२७६१** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३७८)

एका उतद्देशीय सुज्ञ गृहस्थाने मद्यपानविषयक निबंध लिहिणारास ३०० रु. चे बक्षीस जाहीर केले आहे.

**२७६१ अ** (इंम : ३७८)

**२७६२** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३७९–३८२)

ज्ञानोबाविषयी दंतकथा बऱ्याच आहेत. परंतु अशा कथांत असत्याचे मिश्रण असते. महिपतीने लिहिलेल्या चरित्राचा आधार नामाजीची भक्तिमाला हा आहे. नामाजी २७० वर्षांपूर्वी झाला, तर ज्ञानोबा ५६२ वर्षांमागे झाला. तात्पर्य, यास पक्के प्रमाण नाही. रेड्याकडून वेद वदविणे, मृत गाय जिवंत करणे, श्राद्धास प्रत्यक्ष पितर बोलावणे, यास पुरावा नसल्यामुळे खिस्ताच्या चमत्कारांशी त्यांची तुलना करणे अशक्य आहे. दंतकथा टाकून अमोल्य सत्य घ्यावे.

**२७६२ अ** (इंम : ३७८–३७९)

**२७६३** (११ : २३, १ डिसेंबर ५२, ३८३–३८४)

प्रारंभी देवाने आकाश व पृथ्वी उत्पन्न केली. देव बोलला उजेड होवो आणि उजेड झाला. नंतर त्याने अंतराळ निर्माण केले. दिवस आणि रात्री वेगळ्या केल्या. त्यासाठी सूर्य, चंद्र, तारे केले. सहा दिवस जग निर्माण करून सातव्या दिवशी विश्रांती घेतली.

**२७६३ अ** (इंम : ३८२–३८३)

**२७६४** (११ : २३, १ डिसेंबर ५२, ३८५–३८७)

कृष्णशास्त्री साठे म्हणतात : देवास विग्रह आहे, पण शरीर नाही. मग ते विग्रह याचा अर्थ ऐश्वर्य, सर्वज्ञता असा करितात. साधारण भक्तजन मात्र स्वतःप्रमाणे देवाला गुण आहेत, असे समजतात. अवतारपरत्वे देवांनी परस्परविरुद्ध गुणधर्म धारण केले. एकच शंका येते. ती अशी की, विष्णु जग निर्माण करणारा आहे, म्हणजे पर्यायाने तो शिवाचा पिता ठरतो; मग त्यांचे ऐक्य मानणे, हा परस्परविरोधी विचार नाही काय ? बाप व मुलगा एकच कसे ? (ठाकुरद्वारातील भाषणांचा वृत्तांत)

**२७६४ अ** (इंम : ३८४–३८५)

**२७६५** (११ : २३, १ डिसेंबर ५२, ३८८–३९०)

कोकणात भैरोबाचे भक्त म्हणविणारे लोक भुते काढण्यासाठी घरोघर जातात. त्यांत काही स्त्रियाही असतात. त्यांस हटकले, तर भैरोबाचा शाप बाधेल, असा धाक घालतात. एखाद्याने माजिस्त्रेताकडे तक्रार केली, तर या स्त्रिया भैरोबास कौल लावतात. ग्रामदेवाची देवस्की अनेक वर्षे सुरू आहे. कोणावर संकट आले की, त्याच्या शत्रूचे नाव सांगून भांडणे लावून देणे, हाच यांचा उद्योग दिसतो.

**२७६५ अ** (हंम : –३८७–३८८)

**२७६६** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९०)

लॉर्ड फित्स क्लारेन्स मुंबई खात्याचा सेनापती म्हणून दाखल झाला.

**२७६७** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९०)

बंगालमध्ये अशी गप्प उठली की, गवरनर जनरलसाहेबास सहाशे मण मनुष्यांचे तेल पाहिजे आहे. त्यावरून काही दिवस लोक फार भयभीत झाले होते.

**२७६८** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९०)

अमेरिकेत केवळ गर्मीवर चालणारे जहाज तयार झाले आहे.

**२७६९** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९०)

सरकारी शाळांची परीक्षा चार दिवस चालू होती.

**२७७०** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९०)

मद्रासेत सभा भरून पुनर्विवाहबंदी वगैरे वाईट चाली मोडून काढण्याकरिता मंडळ स्थापन झाले.

**२७७१** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९०–३९१)

मद्रासच्या २०० लोकांनी ना. पेरीना मानपत्र देण्याचे ठरविले, परंतु ते परदेशी गेल्यावर मानपत्र मुंबईत पोहोचले. त्यात निंदारूप स्तुती बरीच असल्यामुळे पेरींनी ते पाहिले नाही, हेच बरे झाले !

२७७२ (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१)

तारीख १६ माहे नोवेंबर रोजी पाठशाळेत मोठा समारंभ होऊन मेजर क्यांडी यांनी सर्कार बोर्ड ऑफ इज्युकेशन यांच्या मार्फतीने राजश्री जोती गोविंद फुले माळी यांस एक शालजोडी बक्षीस दिल्ही. (ज्ञानप्रकाशवरून)

२७७३ (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१)

विष्णु मोरेश्वर भिडे यांना सातारच्या सरकारी शाळेवर मुख्य गुरू म्हणून नेमले आहे. (ज्ञानप्रकाश)

२७७४ (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१)

हौस ऑफ लॉर्डस् आणि कॉमन्स यांच्या कमिट्यांचे असे मत आहे की, हिंदुस्थानचे राज्यकारभारात काही फेरफार करण्याची गरज नाही. (प्रभाकरवरून)

२७७५ (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१)

रूस्तुमजी कामा यांनी शिवडीच्या उद्योगशाळेस ३०० रुपये देणगी म्हणून दिले. (प्रभाकरवरून)

२७७६ (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१)

टागोर कुटुंबातील एका स्त्रीने खिस्ती धर्म स्वीकारला असून आणखी दोन-तीन स्त्रियाही धर्मान्तर करणार आहेत.

**२७७७** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१)

'सभेस जाणारा' लिहितो की : कृष्णशास्त्री पुरी माहिती देतात, पण श्रोते मात्र शंका विचारणारांची निंदा करतात. प्रश्न विचारणाऱ्या ब्राह्मणास वेढा घालून धक्काबुक्की करतात. शिवीगाळ होऊन मारामारीची वेळ येते. या चांडाळचौकडीचा बंदोबस्त करण्यासाठी पोलीस ठेवावेत.

**२७७८** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९१–३९२)

निजामाचा रेसिडेंट फ्रेझर आपले काम सोडून गेला असून त्याच्या जागेवर आउटरामची किंवा कर्नल लोची नेमणूक होईल.

**२७७९** (११ : २३, १ दिसेंबर ५२, ३९२)

या महिन्याच्या ७ वे, १४ वे, २१ वे तारखेस मंगळवारी संध्याकाळी पांच वाजता अमेरिकन मिशन देवळांत संभाषण होणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक ११, अंक २४, मुंबई, २२ दिसेंबर १८५२

---

**२७८०** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ३९४)

परमेश्वराने स्वतःची प्रतिमा म्हणून मानव निर्माण केला. याचा अर्थ आत्मिक गुणही स्वतःसारखे केले. पुढे मानव भ्रष्ट झाला. म्हणून तारणाचा उपायही दिला. परमेश्वर येशू ख्रिस्ताकडून प्रगट झाला. शास्त्रीबुवा मात्र म्हणतात की, भक्ताच्या योग्यतेप्रमाणे देव दिसतो ! पण देवांमध्ये द्वेष, लढाया, शाप देणे, हे प्रकार दिसतात. म्हणून त्या देवांमध्ये खरा प्रकाश दिसत नाही.

**२७८० अ** (इंम : ३९३–३९४)

**२७८१** (११ : २४, २२ डिसेंबर ५२, ३९५)

श्रीमंत गणपतराव गायकवाड आणि दिवाण भाऊ तांबेकर यथेच्छ दारू पितात. रेसिडेंट आउटरॅम लवकर मरावा, म्हणून जादू-टोणा करतात ! ही दुष्टाई आणि अज्ञान आहे. लाच दिल्यामुळे भुते आणि देव आपले काम करतील काय ?

**२७८१ अ** (इंम : ३९५)

**२७८२** (११ : २४, २२ डिसेंबर ५२, ३९५)

त्रिंबकशास्त्री हे पुण्यातील दारूबाजांचे अधिपती, शुद्धपक्षाचे अधिपती जे मोरशास्त्री यांजवर विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्यास सरकारने नेमले आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**२७८३** (११ : २४, २२ डिसेंबर ५२, ३९५–३९६)

फ्री चर्च इन्स्तिटुशनची परीक्षा : या शाळेत वार्षिक परीक्षेस १२७३ विद्यार्थी बसले होते.

**२७८३ अ** (इंम : ३९५)

**२७८४** (११ : २४, २२ डिसेंबर ५२, ३९६)

मनी इन्स्तिटुशन या शाळेच्या परीक्षेस ४२७ विद्यार्थी बसले.

**२७८४ अ** (इंम : ३९६)

**२७८५** (११ : २४, २२ डिसेंबर ५२, ३९६)

कलकत्त्यात एक मंडळ स्थापन झाले असून ते धर्मान्तरित लोकांना प्रायश्चित देऊन पुन्हा जातीत घेण्याची व्यवस्था करणार आहे.

**२७८५ अ** (इंम : ३९६)

**२७८६** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ३९७)

सर विल्यम यार्डली यांनी मुंबईचे मुख्य न्यायाधीश म्हणून काम सुरू केले.

**२७८६ अ** (इंम : ३९६–३९७)

**२७८७** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ३९७–३९८)

इंग्रजी अंमलात दारूचे दुर्व्यसन वाढले. जागोजाग सुराभक्त दिसतात. हिंदवी व मोगल अंमलात दारू पिणे हा अपराध मानला जात असे. सध्या मात्र जागोजाग कलालांची दुकाने आहेत. झिंगलेले लोक दुर्गंधीत् लोळताना दिसतात. कित्येक दयाळू साहेब व्यसन मोडावे म्हणून प्रयत्न करीत आहेत.

**२७८७ अ** (इंम : ३९७)

**२७८८** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ३९८–३९९)

भारत व लंका या देशांत ४१३ मिशनरी आहेत. ६९८ माणसे पालक बनण्याचे शिक्षण घेत आहेत. एतद्देशीय खिस्त्यांची संख्या १ लक्ष, १२ हजार, १९१ आहे. मिशनच्या १३४७ शाळा चालू असून त्यांत ४७,५०४ मुले शिकतात. ९३ शाळांत मुलांची राहाण्या-जेवण्याची व्यवस्था होते. मुलींच्या शाळा ३४७ असून ११,५१९ कन्या शिकतात. १०२ शाळांत राहणे व जेवण याची सोय आहे.

शुभवर्तमानाचे ग्रंथ ५ भाषांत छापले असून त्यास १९ लाख रुपये खर्च आला. त्याचा एक षष्ठांश खर्च लोकांनी दिला.

**२७८८ अ** (इंम : ३९८)

२७८९ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०१–४०३)

येशूच्या जन्म-मृत्यूविषयी तपशीलवार भविष्य जुन्या करारामध्ये वर्तविले होते. येशूचे जीवन तसेच घडत गेले. मानवाच्या पापाचे प्रायश्चित्त घेण्यासाठी त्याने मरणदंड भोगला. त्याने लाज, दुःख व मरण सोसले. मृत्यूनंतर तिसऱ्या दिवशी कबरेतून उठून तो देवाजवळ गेला. भ्रष्ट माणसांच्या तारणासाठी त्याने हा त्याग केला. सर्व देशांत जाऊन आपले शिष्य वाढविण्याचा त्याने संदेश दिला.

२७८९ अ (इंम : ३९९–४०१)

२७९० (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०४)

बडोद्याचा दिवाण भाऊ तांबेच्या दुष्टवर्तनावर रेसिडेंट डेवीस नियंत्रण घालू शकत नाही, म्हणून कपतान फुलजेम्स किंवा मेजर लांग यांची नेमणूक होणार आहे.

२७९१ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०४)

खानदेशातले देशमुख व देशपांडे सरकारविरुद्ध शेतकऱ्यांना चिथावीत आहेत. रेव्हिन्यूच्या मोजणीमुळे त्यांचे नुकसान होईल, या भीतीपोटी ते शेतकऱ्यांना सांगतात की, खुंटीच्या दगडाकरिता तुम्हांला फार खर्च येईल. भोळ्या लोकांना बनवून ते स्वार्थाकरिता बंड करीत आहेत.

२७९२ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०४)

कलकत्त्यात एक हिरा ५९ हजार रुपयांना विकला गेला. असे म्हणतात की : हा हिरा हैदराबादच्या दिवाणाकडून रणजितसिंगाकडे आला होता. इंग्रजांनी पंजाब खालसा केल्यावर तो लिलावात विकला गेला.

**२७९३** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०४)

कलकत्ता हिंदू कॉलेज : या संस्थेमध्ये हिंदूंप्रमाणेच मुसलमानांनाही प्रवेश द्यावा, असा हुकूम सरकारने काढला. त्याविरुद्ध हिंदू लोक अर्ज करणार आहेत.

**२७९४** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०४)

मोरशास्त्री साठे यांना सुरतेचे मुनसफ नेमले आहे.

**२७९५** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०४–४०५)

पुण्यातील कारागिरांची शाळा : ही शाळा पाहिल्यावर असे वाटते की, आपल्या दुर्दैवी देशास चांगले दिवस येणार. तेथे ब्राह्मण मुलेही संकोच न बाळगता सुतारकामाचे शिक्षण घेतात.
(ज्ञानप्रकाशवरून)

**२७९६** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)

धर्मशास्त्रात ज्यांचे विधान नाही आणि निषेध आहे, अशा चालीरीती काढून टाकण्याकरिता मद्रासेत सुधारक-सभा स्थापन झाली आहे. जामेजमशेदच्या कार्यकर्त्यांनीही पुनर्विवाहाची चाल रूढ व्हावी म्हणून सभा सुरू केली. (प्रभाकरवरून)

**२७९७** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)

जमाबंदीच्या दोन परभू कारकुनांना लाच खाण्यावरून बडतर्फ केले आहे. (प्रभाकरवरून)

**२७९८** (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)

सर पेरी यांनी (१८४७ साली) मेमन लोकांच्या वारसाविषयी दिलेला निकाल कुराणाविरुद्ध आहे म्हणून त्यांनी पार्लमेंटकडे अर्ज पाठविला.

२७९९ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)
बंगालचे वैद्यकशास्त्राचे विद्यार्थी प्रेतविच्छेदनाखेरीज आपणाला ही विद्या येणार नाही, हे ओळखून त्यात भाग घेऊ लागले. (प्रभाकरवरून)

२८०० (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)
इंग्रजाच्या सक्त कैदेत असणारे चतरसिंग, शेरसिंग व अत्तरसिंग यांना कामदाराच्या देखरेखीखाली आठवड्यातून तीनदा तुरूंगाबाहेर फिरावयास जाण्याची सवलत मिळाली.

२८०१ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)
इंग्रज फौजेने पेगू शहर दुसऱ्यांदा जिंकले. पण त्यांची लढाईत मोठी हानी झाली.

२८०२ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०५)
मोहरम, शिमगा, वगैरे कुत्सित सणांची प्रतिबंदी :
लोकहितेच्छू आपल्या पत्रात लिहितो की : ताबुतात सामाजिक शांतीचाच नव्हे, तर प्राणांचाही नाश होतो. उघड्या तलवारी घेऊन हिंडणारे लोक क्षुल्लक कारण सापडले, तरी मारामाऱ्या करतात. ताबुताच्या मानावरून सतत भांडणे होत असतात. या उत्साहात हिंदूही सामील होतात. हे केवळ अज्ञान होय.

२८०३ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०७)
कर्नेल लावसाहेबास निजामाचा रेसिडेंट नेमले आहे.

२८०४ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०७)
मिस्तर एच्. लीक यांना मुंबई टापूचे शेरीफ नेमले आहे.

२८०५ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०७)

संत तुकाराम म्हणतात : आपण चारी वर्णांत श्रेष्ठ, हा अभिमान ब्राह्मण बाळगतात. पण त्यांना ब्रह्मखूण कळलेली नाही. अमंगळ शरीराचा ब्राह्मण निर्मळ कसा होणार? तो काय कानावाटे जन्मला आहे काय? जो ब्रह्म जाणतो, तोच खरा ब्राह्मण होय. (तुकाराम)

२८०६ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०७)

सर ऐर्स्किन पेरीच्या जागेवर वार्डन यांना मुख्य सभासद नेमले आहे.

२८०७ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०७)

इब्राहीम मखबाच्या जागेवर डॉ. भाऊ दाजी यांची नेमणूक झाली.

२८०८ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०७)

नवे पंचाग :

१८५३ चे मराठी पंचांग मिशनने छापले. किंमत १ आणा आहे.

२८०९ (११ : २४, २२ दिसेंबर ५२, ४०८)

अमेरिकन मिशन देवळांत मंगळवारी, शुक्रवारी मराठींत होणारे संभाषण काही दिवस बंद राहील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १, मुंबई, १ ज्यानुएरी १८५३

**२८१०** (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १)
ज्ञान वाढून लोकांचे कल्याण व्हावे, हा या पत्राचा उद्देश आहे. शेकडो संभावित सुज्ञ लोक ज्ञानोदय घेऊन वाचितात. इंग्रजी मजकूरही असल्यामुळे इंग्लंड-अमेरिका देशातही खप होत आहे. ज्ञानोदयाची बांधीव पुस्तकेही मिळतात.

**२८१० अ** (इंम : १)

**२८११** (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, २)
अमेरिकन मिशनने सन १८५३ चे पंचांग छापिले. किं. १ आणा आहे.

**२८११ अ** (इंम : २)

**२८१२** (१२ : १, ५, ज्यानुएरी ५३, २)
पुण्याच्या संगमावर ब्राह्मणांना दक्षिणा वाटली जाते. कित्येक लबाड लोक पटात नांव नसताना दक्षिणा घेतात. अधिकाऱ्यांनी नावे नीट तपासून दक्षिणा द्यावी.

**२८१२ अ** (इंम : २)

**२८१३** (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ३–५)
दारू व अफीण या अनार्थांच्या बंदीबद्दल मिशनेरींची पार्लमेंटात अर्जी : सरकार दुकानांचे परवाने देते. त्यातून व्यसनांचा अनर्थ वाढतो. कराच्या उत्पन्नाचा मोह सरकारास फार असतो. तो मोह सोडून सक्त उपाय करण्याची जरूरी आहे. चीनशी अफूचा व्यापार करू नये. अशी विनंती करीत आहोत.

२८१३ अ (इंम : ३)

२८१४ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ५)

भुज मुक्कामी अधिकाऱ्यांच्या विरोधास न जुमानता एक स्त्री सती गेली. आता भुज संस्थानने सतीबंदीचा हुक्म काढला आहे.

२८१४ अ (इंम : ५)

२८१५ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ५)

आग्रा विभागात मिशनरी, सरकारी व खाजगी, अशा प्रकारच्या शाळा चालतात. या वर्षी २ कोटी ४३ लाख रुपये खर्च झाला.

२८१५ अ (इंम : ५)

२८१६ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ५–६)

शास्त्रात पुनर्विवाहास विरोध नाही, याविषयी लोकांची खात्री पटली आहे. रूढी मोडण्यासाठी मद्रासमध्ये सभा स्थापन झाली आहे.

२८१६ अ (इंम : ५)

२८१७ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ६)

लंकेमध्ये दारूचा अनर्थ फारच वाढत चालला आहे. तेथील लोकांनी सरकारपाशी अर्ज करून निम्मी दुकाने बंद केली आहेत. हा अनर्थ बंद होण्यास सक्त मेहनत घेऊ, अशी शपथ घेतली आहे. याप्रमाणे भरतखंडातील सुज्ञ लोकांनी करावे.

२८१७ अ (इंम : ६)

२८१८ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ७)
भरतखंडाचा आकार व लांबी यांबद्दल हिंदु शास्त्रात चुकीची व काल्पनिक माहिती आढळते. ९ हजार योजने, हा चुकीचा आकडा आहे. पुराणात दिलेल्या २३८ विभागांपैकी १४ च विभाग खरे आहेत. सात बेटे व सात नद्या यांचे वर्णनही चुकीचे आहे.

२८१८ अ (इंम : ६–७)

२८१९ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ८–१०)
मोश्याच्या पुस्तकात म्हटले आहे की : शाब्बाथाच्या दिवशी संसारी कामे करू नयेत. देवाची प्रार्थना करावी. मिसर देशामधून इस्त्रायली लोकांची सुटका झाली, म्हणूनही हा दिवस पवित्र मानतात. रविवार हा सातवा दिवस असून येशूच्या कबरेतून उठण्याचा दिवस आहे. म्हणून तो शाब्बाथाचा दिवस ठरला. आठवड्यातून एक दिवस विश्रांती घेणे प्रकृतिलाही उपकारक असते.

२८१९ अ (इंम : ७–८)

२८२० (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, ११–१३)
काल्पनिक विज्ञानाविषयीचे संक्षेपेकरून कथन : डाक्तर स्टिवेन्सन या पुस्तकात लिहितात : माणूस अनियमित मनाची कल्पना करतो. ग्रीक लोक असे मानीत की, बाह्य पदार्थांचे ज्ञान इंद्रियांच्या योगाने होते. परंतु इंद्रियांनाही भ्रम होऊ शकतो. चांगला शोध घेतला, तर हा भ्रम नाहीसा होऊ शकतो. केवळ अनुमान व तर्क यांचा काही उपयोग नाही.
हिस्टारिकल स्केच ऑफ दी डिफरंट सिस्टीम किंवा स्पेक्युलेटिव्ह फिलॉसॉफी : इंग्रजी आणि मराठी, प्रका.– बॉम्बे ट्रक्ट ॲण्ड बुक सोसायटी, पृ. ६०, मराठी किंमत १ आणा.

२८२० अ (इंम : १०–११)

२८२१ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १३–१५)
कृष्णशास्त्री साठे म्हणतात : प्रायश्चित्तविधीने शरिराबरोबरच मनाचीही शुद्धता होते. हिंदू लोक प्रार्थना करीत नाहीत, हा आक्षेप योग्य नाही. कारण त्यांचे प्रत्येक कर्म प्रार्थनास्वरूप आहे. बैबलातही पाय धुण्याचे उल्लेख आहेत. पण पाद्री ते सांगत नाहीत ! परंतु पाद्री लोकांना लबाड मानणे अयोग्य होय. खिस्ती शास्त्रात मृत्तिका अशुद्ध मानतात व पाय धुण्याचे उल्लेख प्रासंगिक आहेत, असे 'सभेस जाणारा' लिहितो.

२८२२ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १५)
नामदार राणीने आपल्या पार्लमेंटमधील भाषणात सांगितले की, कंपनीच्या नव्या सनदेकरिता ३१ जणांची कमिटी नेमली आहे. ड्यूक ऑफ वेलिंग्टनचा सन्मानपूर्वक अंत्यसंस्कार झाला.

२८२३ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १५)
रणगुण गावाहून इंग्रजी फौजा पिगूकडे गेल्या आहेत.

२८२४ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १५)
नानाशास्त्री आपट्यांची ७५ रु. वेतनावर तपासनीस म्हणून नेमणूक झाली. परंतु शंभर रुपये दरमहाच्या पगारांत पंचवीस कां कमी केले, हे आम्हास समजत नाही. (प्रभाकर)

२८२५ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १५–१६)
बंबे असोएशियन या सभेने पार्लमेंटास अर्जी केली की, कंपनीच्या सनदेचे स्वरूप ठरविण्याकरिता ३ इंग्रज व ३ नेटिव अशी सहा मनुष्यांची समिती नेमावी. (प्रभाकरवरून)

२८२६ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १६)
जगन्नाथ सदाशिवाच्या पुणे येथील उद्योगशाळेत धातूवर मुलामा चढविण्याचे काम चांगले चालते.

२८२७ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १६)
मुनसिफ व सदर अमीन यांच्या परीक्षांचा निकाल जाहीर झाला. (नांवे दिली आहेत).

२८२८ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १६)
शास्त्री व मौलवी यांच्या परीक्षांसाठी टौन हालात २० ज्यानु. १८५३ रोजी जमायचे आहे.

२८२९ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १६)
जोधपूरच्या महाराजांनी सतीबंदीचा कायदा केला.

२८३० (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १६)
गवरनर जनरलने एक हुकूम काढून जाहीर केले की, सोन्याची नाणी सरकारी बँकेत स्वीकारली जाणार नाहीत.

२८३१ (१२ : १, ५ ज्यानुएरी ५३, १६)
पुस्तके व निबंध करणारी मंडळी : या मंडळीचा सभासद म्हणून मि. आल्बर्ट जार्णची नेमणूक झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२८३२** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, १७)

एल्फिन्स्टनचा गुरू पाटनसाहेब मायदेशाच्या रस्त्यावर केप आव गुड होप येथे मृत्यू पावला. स्त्रीविद्याभ्यास आणि देशाची सुधारणूक यांविषयी त्याने फार प्रयत्न केले.

**२८३२ अ** (इंम : १७)

**२८३३** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, १७)

'वेदांताचें खंडन' : हे इंग्रजी पुस्तक कलकत्त्याहून आले आहे. पृष्ठे २५५ असून किंमत ८ आणे आहे.

**२८३४** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, १९–२१)

ज्ञानोबा–तुकाराम ही नावे महाराष्ट्रात फार प्रसिद्ध आहेत. तुकाराम तर जगद्‌गुरू समजला जातो. तो सदेह वैकुंठास गेला, अशी समजूत आहे. या दंतकथेविषयी परस्परांस बाधक अशा कथा ऐकू येतात. तुकारामाचे स्वतःचे खास अभंग कोणते, याचाही निर्णय होत नाही. तुकाराम स्वतःला पापी म्हणवितो. महिपतीने त्याचे चरित्र लिहिले आहे. पण त्यास प्रमाण नाही. स्वतःला पापी म्हणविणारा संत सदेह स्वर्गास जाऊ शकेल का, हा प्रश्नच आहे. सत्य शोधून स्वीकारावे.

**२८३४ अ** (इंम : १७–१९)

**२८३५** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, २२–२३)

ख्रिस्ती लोक हिंदुधर्माचे खंडन करितात, म्हणून ख्रिस्ती धर्म लयास जाईल, असा शाप कृष्णशास्त्रीने दिल्हा. स्वतः एकतर्फी वाद करून इतरांवर एकतर्फीपणाचा आरोप तो लावतो. स्वतः शिव्या देऊन ज्ञानोदयावर शिवीगाळीचा आरोप करतो. नवशिक्या तरुणावर तोंडसुख घेतो. इंग्रजांच्या सहवासाने तरुणांमध्ये उद्धटपणा आला, असा त्याचा आरोप आहे. असे 'यथार्थवादी' आपल्या पत्रामध्ये लिहितो.

**२८३५ अ** (इंम : २१–२२)

**२८३६** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, २५–२७)

'सभेस जाणारा' लिहितो की : कृष्णशास्त्री वृथा आरोप करतात आणि म्हणतात की, येशूच्या मृत्यूने पाप गेले. मग अधिक माणसे मेल्याने जास्त जास्त पाप जाईल काय? तसेच मिशनऱ्यांना लांडग्याची उपमा देतात! मिशनऱ्यांना दरमहा ३ शे ते ५ शे वेतन मिळते. बैबलात गाईचे शेण पवित्र मानलेले आहे, असाही आरोप करतात. शास्त्र्यांचे हे सर्व बोल खोटे आहेत.

**२८३६ अ** (इंम : २३–२५)

**२८३७** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, २८)

ब्रह्मी देशातील पिगू प्रांत इंग्रज लष्कराने जिंकला असून या प्रांतातील रहिवासी इंग्रजांची रयत आहेत, असा जाहीरनामा सरकारने काढला.

**२८३७ अ** (इंम : २७–२८)

२८३८ (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, २९–३०)

(पृ. ११ वरून पुढे चालू...) कर्मेकरून शरीरस्वीकार होतो व शरीर स्वीकारल्यामुळे आपला आत्मा दुःख पावतो. आपल्या अज्ञानातून अविवेक निर्माण होतो. असे शंकराचार्य म्हणतात. पण अज्ञानाचे कारण अगम्य आहे, असे त्यांचे मत आहे. आणि आत्मा तर ज्ञानसंपन्न मानला जातो. म्हणून सूफी व वेदांत यांची मते सारखीच आहेत. हेगेलच्या मताप्रमाणे कल्पनेवाचून दुसरी वस्तूच नाही. ही कल्पना कशी निर्माण होते, हे तो सांगू शकत नाही. म्हणून जगाचा कारणभूत अनादि ईश्वर आहे, हे मान्य करावे लागते.

२८३९ (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३०)

लुई नेपोलियन जर्मनीचा बादशहा झाला.

२८४० (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३०)

कोर्ट ऑफ डिरेक्टर्स डाकेचे हसील कमी करणार आहे.

२८४१ (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३०)

लंकेमध्ये गौतम बुद्धाच्या दाताचे रक्षण करण्याची जबाबदारी सरकारने स्वीकारू नये, असे पार्लमेंटचे मत आहे.

२८४२ (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३०)

अमेरिकेत पीर्ससाहेब ४ वर्षांसाठी अध्यक्ष नेमला गेला.

२८४३ (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३०)

विश्रामबागेतील शास्त्रीमंडळींचा द्रव्यलोभ आणि स्वधर्म यांचा प्रचंड झगडा चालू आहे. यांना गुरूच्या व उपगुरूच्या जागांचा चिरकालपर्यंत उपभोग घेण्याचे ईश्वरदत्त प्रमाण आहे काय ? (ज्ञानप्रकाशवरून)

**२८४४** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३१)

'एक विचार करणारा' लिहितो की : सुज्ञ हिंदूचे मत असे दिसते की, हे कृष्णशास्त्री साठे सत्याचा अर्थ खोटा करून नेहमी सांगतात.
'विचार लहरीची'ही तारीफ करणारा कोणी दिसत नाही.

**२८४५** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३१)

नारायणशास्त्री अपटे यांची पुस्तके शोधण्याच्या कामावर द. म. ७५ रु. पगारावर नेमणूक झाली आहे. (प्रभाकरवरून)

**२८४६** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३१–३२)

खानदेशातील गडबडीचा इंग्रज सरकारने पुरता बंदोबस्त केला आहे. जमिनीच्या मोजणीवरून जमीनदारांनी शेतकऱ्यांना सरकारविरुद्ध चिथावले होते. सरकारने जाहीरनामा काढून बंड करणाऱ्यांना कडक ताकीद दिली आहे.

**२८४७** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३२)

मद्यपानवर्जक सभेच्या वार्षिक सभेत अनेक सभ्य गृहस्थांनी भाषणे करून दारूचा व अफिणीचा अनर्थ समजावून दिला.

**२८४८** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३२)

ब्रह्मी युद्धात इंग्रजांची अवघी चार माणसे मरण पावली आणि चाळीस घायाळ झाली. ब्रह्मी फौजेचे मात्र अतिशय नुकसान झाले.

**२८४९** (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३२)

यंग मेन्स असोसिएशन :

मुंबईत युरोपियन व नेटिव अशा चाळीस जणांनी तरुणांची सभा स्थापन केली आहे. या सभेत विद्या व कलाकौशल्य या विषयांवर दर १५ दिवसांनी निबंधवाचन होईल.

२८५० (१२ : २, १५ ज्यानुएरी ५३, ३२)
तिसरा नेपोलियन आपला चुलता नेपोलियन बोनापार्ट याच्या पराभवाचा सूड घेण्यासाठी युद्धाची तयारी करीत आहे. इंग्रजांनीही तीन लाखांवर सेना जमविली आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी १८५३

२८५१ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ३३–३४)
बलून उर्फ विमानयंत्र याचे प्रयोग पहाण्यासाठी मुंबईत फार गर्दी झाली होती. १८ जानेवारी १८५३ रोजी बलूनने आकाशात झेप घेतली आणि ते पनवेलजवळ खाली आले. मांतगाल्फिये या गृहस्थाने ७९ वर्षांपूर्वी ही युक्ती शोधून काढली. हायड्रोजन गॅसची युक्ती वापरून तो बलून हवेत उडवीत असे. रानटी लोकांच्या हातून त्याचा मृत्यू झाला. मुंबईत हे बलून कैटसाहेबाने उडविले.

२८५२ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ३५)
के. मिचल हे साहेब आपल्या मडमेसह विलायतेहून आले आहेत. आपले वडील मिचेल यांना ते मदत करतील. ते पुण्यातील मिशनात काम करतील.

२८५२अ (इंम : ३५)

२८५३ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ३५)
जनरल असेंब्ली इन्स्टिटुशन –
या शाळेच्या वार्षिक परीक्षेस ४६८ विद्यार्थी बसले. त्यांत ६६ कन्या आहेत.

२८५३ अ (इंम : ३५)

२८५४ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ३५)
'सत्यनिरूपण' या नावाचे पुस्तक गोविंद नारायणांनी लिहिले असून त्यास दक्षिणा प्रैझ कमिटीने बक्षीस दिले. आता त्याचे गुजराथीत भाषांतर होईल.

२८५४ अ (इंम : ३५)

२८५५ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ३६)
रेव्ह. जे. मिचेल यांनी ख्रिस्ती धर्माची प्रमाणे हा ग्रंथ लिहिला. त्याचा पुष्कळ खप झाला, म्हणून तो अधिक चांगला व मोठा करून छापला आहे. साहेब लोकही तो ग्रंथ वाचतात.
लेटर टू इंडियन युथ ऑन दी इव्हिडन्स ऑफ ख्रिश्चन रिलिजन, जे. एम्. मिचेल, सेकंड एडिशन, अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई १८५२, प्रकाशक : बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, किं. १ रु. ८ आणे, इतद्देशियांस अर्धी किंमत.

२८५५ अ (इंम : ३६)

२८५६ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ३८–४१)
कृष्णशास्त्री म्हणतात की : ख्रिस्ती लोक पापास पदार्थ समजतात. जुन्या करारात देवाचे शत्रुत्व आणि जादूचे चमत्कार आहेत. हिंदूमधील जाती एक होणे असाध्य आहे. एका जातीचे काम दुसरी जात करू शकणार नाही. राज्यसंपादनाकरिता जाती एक व्हाव्यात, हे म्हणणेही अयोग्य आहे. मेरूबद्दल पुराणांचे वर्णन योग्य आहे, असे शास्त्री सांगतात.

२८५६ अ (इंम : ३६–३८)

२८५७ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४४–४७)

'दारू वगैरे अनर्थ दूर करणारी मंडळी'च्या वार्षिक सभेत भाऊ दाजींनी सिद्धांत मांडला की : दारूची दुकाने अगदी अनर्थकारक आहेत. ती काढून टाकावी हा सरकारचा धर्म आहे. मोठ्या योग्यतेचे युरोपियनदेखील दारू पितात, हे अयोग्य आहे. मद्यपानरूपी विषवृक्ष मुळासकट उखडून टाकावा. शाक्तपंथी शत्रूंना हाकलले पाहिजे. आस्टली कुप्पर साहेबांनी सांगितले की, पलटणीतील शिपायांत हे व्यसन फैलावत असून त्याचा बंदोबस्त केला पाहिजे.

२८५७ अ (इंम : ४१–४४)

२८५८ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४७)

नाझर वेजनजी फ्रामजी यांच्यावर लाच खाल्ल्याचा आरोप आला आहे.

२८५९ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४७)

कृष्णशास्त्री चिपळूणकरांना दक्षिणा कमिटीचे मेंबर नेमले. (ज्ञानप्रकाशवरून)

२८६० (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४७)

दक्षिणा घेण्यासाठी येणाऱ्या ब्राह्मणांची संख्या कमी होते आहे. काही ब्राह्मणांना त्यांच्या गावी दक्षिणा देण्याची सोय करावी, असे लोकांना वाटते.

२८६१ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४७–४८)

इंग्लंडचे पंतप्रधान डर्बी यांनी राजीनामा दिला.

२८६२ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४७–४८)

पार्लमेंटची नवी इमारत बांधण्यास अडीच कोटी रुपये खर्च येणार.

२८६३ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४८)

विद्यावृद्धीसाठी पुण्यात 'दक्षिणी सभा' स्थापन झाली असून मेजर कँडी अध्यक्ष आहेत व फ्रेजर चिटणीस आहेत. जड्जसाहेब रे. मिचल साहेब उपाध्यक्ष आहेत.

२८६४ (१२ : ३, १ फेब्रुवारी ५३, ४८)

मानवी मनात एक चांगला व दुसरा वाईट असा विभाग असतो. इराणमध्ये हिस्तापी बादशहाच्या काळात 'जोरअस्तर' या उपदेशकाने हे मत मांडले. त्यास पारशी लोक 'जेरतुष्ट्र' म्हणतात. होर्मज ही चांगली देवता, तर अभिमान ही वाईट देवता आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक ४, मुंबई, १५ फेब्रुवारी १८५३

२८६५ (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ४९)

रंग व रोगण तयार करण्यासाठी जवस उपयोगी पडतो. ओला जवस यंत्रामध्ये दाबून ताग तयार करतात. आपल्या देशातही असा ताग करता येईल.

२८६६ (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ५०–५१)

रे. डी. ओ. आलेन हे साहेब नुकतेच स्वदेशास गेले. पुस्तकमंडळी व बैबल सोसायटी या सभांमध्ये त्यांनी २५ वर्षे काम केले. त्यांची प्रकृती बिघडल्यामुळे नेटिवांस फार दुःख झाले. त्यांना मानपत्रही देण्यात आले.

२८६६ अ (इंम : ४९–५०)

**२८६७** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ५३–५६)

मनु आणि विज्ञानेश्वर यांनी विटाळ व शुद्धता यांचे नियम आखून दिले. जुन्या करारातही यहुदी लोकांत असे नियम होते. ख्रिस्ती शास्त्रातील नेम आणि विधी अंतःकरणाच्या शुद्धतेकरिता आहेत. केवळ शरिराची शुद्धता पुरेशी नाही. प्रायश्चित्ताच्या विधीने लोकांची बुडणूक फार होते. अज्ञान-अंधकाराने असणारे लोक जुलमी नेमापुढे मान तुकवितात.

येशूच्या ठिकाणी सगळे नेम पूर्ण झाले व तो आदर्श होता.

**२८६७ अ** (इंम : ५१–५३)

**२८६८** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ५७–५९)

कृष्णशास्त्री म्हणतात की : ख्रिस्ती उपदेशक लोभी असून पगार व पेन्शन घेतात. लोखंडी रस्ता नसला, म्हणून कोणताही धर्म खोटा ठरत नाही. येशूही सांगतो की, धनवानास आकाशाचे राज्य मिळणे दुर्घट असते. वेद फक्त ब्राह्मणांनीच म्हणावे, ही केवळ समाजव्यवस्था आहे, त्यामध्ये अयोग्य काही नाही.

**२८६८ अ** (इंम : ५६–५७)

**२८६९** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ५९–६०)

'सभेस जाणारा' कळवितो की : मी सभेचा इत्थंभूत वृत्तांत ज्ञानोदयास कळविला. पण काही लोक माझा मत्सर करतात. शास्त्री यांच्या निवेदनात कोणताही फरक न करता मी कळवतो. संक्षेप करताना एखादी गोष्ट गाळली जाते, एवढेच. चांगल्या कामात विघ्ने आणणारे लोक निंदा व छळणूक करतात.

**२८६९ अ** (इंम : ५९)

**२८७०** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६०-६२)

रेवरेंड टेलर म्हणाले की : गुजराथेत अफिणीचे व्यसन वाढत आहे. अफिणीचा कैफ दारूसारखा असून ती शरीराचा व मनाचा बिघाड करते. ब्राह्मण लोकही कुसुंबा पितात व तो पवित्र आहे, असे ठासून सांगतात. कित्येक ठाकुरांना या व्यसनामुळे गरिबी येऊन मजुरी करण्याची पाळी आली. सुखदुःखाच्या समारंभात अफिणीचा कैफ करण्याची चाल पडली आहे. हा मरणदायक वृक्ष स्वदेशातच उगवून प्रबळ झाला. ईश्वराने दया करून हा अनर्थ दूर करावा.

**२८७१** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६२)

इंग्लंडचे नवे मंत्रिमंडळ निपुण व वजनदार आहे.

**२८७२** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६२)

इंग्लांडात नद्यांना पूर येऊन फार नुकसान झाले.

**२८७३** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६३)

"ख्रिस्तदास" म्हणतो की : ख्रिस्ताबद्दल माझ्या मनात अपार प्रेम आहे. त्याला ध्यावे ग्यावे यातच जीवनाचे श्रेय आहे. मानवांचा भार तोच वाहातो. भक्तीच्या सुखाला उपमाच देता येत नाही. पापाचे बंधन तोडण्यासाठी त्याला शरण यावे. मग मृत्यूचीही भीती उरणार नाही. गोचिडाला खिरीची गोडी कळत नाही, त्याप्रमाणे ख्रिस्तनिंदकास सुख मिळणार नाही. ख्रिस्ताच्या पायाशी राहण्यातच जीवनाचे सार्थक दिसते.

**२८७४** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६३)

सरकारी ग्याजेटाप्रमाणे जगन्नाथ शंकरशेट, बम्मनजी होरमसजी, भाऊ दाजी, यांना बोर्ड ऑव्ह एज्युकेशनचे मेंबर नेमले आहे.

**२८७५** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६३–६४)

आयोध्येतील नदीच्या तळाची रेती साफ केली, तर बरेच सोने सापडण्याचा संभव आहे.

**२८७६** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६४)

हिमालय पर्वताच्या जवळ चहाची लागवड करण्याकरिता कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनी सरकारकडे परवानगी मागितली आहे.

**२८७७** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६४)

मिस्तर कैट बलूनचा पुन्हा प्रयोग करणार. या महिन्याच्या १९ व्या तारखेस.

**२८७८** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६४)

भारतातील वर्तमानपत्रांना डाकेचे हासील सुरू होणार.

**२८७९** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६४)

दोन आणे वर्गणीत वाचण्याची सोय करून नाशकामध्ये २९ जानेवारी ५३ पासून ग्रंथालय सुरू झाले. गोरगरिबांना मोफत वाचता येईल.

**२८७९ ब** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६४)

गोविंद त्र्यंबक धर्माधिकारी, नाशिकांतील ग्रंथशाळेच्या मंडळीचे चिटणीस.

**२८८०** (१२ : ४, १५ फेब्रुवारी ५३, ६४)

मि. फ्रेजर यांनी सांगितले की, दक्षिणी सभेसाठी स्वतंत्र घर घेण्यात येईल. या महिन्याचे २ तारखेस क्यांडीच्या अध्यक्षतेखाली सभा झाली, तिचा वृत्तांत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२८८१** (१२ : ५, १ मार्च ५३, ६५–६६)

सुधारलेला मेंढका (सचित्र) : हा मेंढपाळ शेळ्या राखीत असताना पवित्र शास्त्राचे वाचन करतो. त्याची वर्तणूक नीतीची असल्यामुळे तो धनवानापेक्षा सुखी आहे. धनदवलत राखण्यापेक्षा भक्तीचे रक्षण करणे, यातच जीवनाचे श्रेय आहे. आपल्या मुलांनाही तो शास्त्र वाचण्यास शिकवतो. विद्या आणि सत्प्रीति हे त्याचे धन आहे.

**२८८२** (१२ : ५, १ मार्च ५३, ६७–६९)

गंधर्वलोक, विद्याधर आणि अप्सरा, यांचे वर्णन पुराणात आढळते. ऊर्वशी तर वेश्यांच्या संगतीत राहात होती. यावरून दिसते की, स्वर्गातही पापी मित्रच भेटतात! त्यात सर्वकाळचे जीवन नाही. देव लढाया करतात, एकमेकांना शिव्याशाप देतात. सत्यशील माणसाला हे आवडणार नाही.

**२८८२ अ** (इंम : ६६–६७)

**२८८३** (१२ : ५, १ मार्च ५३, ७१–७३)

कृष्णशास्त्री साठे विचारतात, जेथे एकच जात आहे, अशा लोकांतही एकच राज्य कां दिसू नये? चिनी, शिद्दी, यांचे एक राज्य झाले नाही. उष्ण हवेमुळे हिंदूंच्या हातून फारसे काम होत नाही. नित्यनैमित्तिक कर्मामध्ये त्यांचा फार वेळ जातो. मांसाशन केल्यामुळे राज्य मिळत नसते. शाकाहारी हिंदूंनी समुद्रापर्यंत राज्ये मिळविली होती. वेदग्रंथ श्रेष्ठ व अपौरूषेय आहेत. त्यांचा उपयोग कोणापुढे हात पसरण्याकरिता नसतो.

**२८८३ अ** (इंम : ६९–७१)

२८८४ (१२ : ५, १ मार्च ५३, ७४-७५)

पुराणातील खगोल आणि सैद्धांतिक खगोल यांमध्ये जमीन-अस्मानाचे अंतर आहे. त्यात तर्क नसून नुसत्या कविकल्पना आहेत. ग्रहामधील अंतर अवास्तव सांगितले आहे. त्याचा फक्त मनोरंजनासाठी उपयोग होतो. विष्णुपुराण म्हणते की, ग्रह हे जिवंत प्राणी असून देवच आहेत.

२८८४ अ (इंम : ७३-७४)

२८८५ (१२ : ५, १ मार्च ५३, ७५-७७)

'रथकार सोनार' लिहितो की : सोनार जातीचा फंड फक्त मोठ्या लोकांच्या गाड्या व शालजोड्या यांतच खर्ची पडतो. गरिबास कोणी मदत करीत नाहीत. त्याला कुत्र्याप्रमाणे हडहड करतात. एका दरिद्री सोनारास पारशाने मदत केली. पण जमातफंडातून काही मिळाले नाही. फंडात अंदाधुंदी फार आहे. सोनारातले शेट लोक पैशाचा दुरुपयोग करतात.

२८८६ (१२ : ५, १ मार्च ५३, ७७)

जगन्नाथ सदाशिव आणि केशव शिवराम यांनी पुण्यात शिल्पशाळा सुरू केली. तेथे सुतारकाम व मुलामा करण्याचे शिक्षण देतात. ही शाळा १ ऑगस्ट १८५२ रोजी सुरू झाली. (ज्ञानप्रकाशवरुन)

२८८७ (१२ : ५, १ मार्च ५३, ७८)

प्रथम सरदारलोकांसाठी शाळा सुरू केली. पण त्यांची मुले शाळेमध्ये येईनात म्हणून गरिबांसाठी १ आणा फी घेऊन त्यांना प्रवेश दिला. सध्या ५० मुले शिकतात. नेटिव असिस्टंट अनंत बल्लाळ आहेत. श्री. कृष्णशास्त्री तळेकर यांना संस्कृतचे गुरू नेमले आहे.

२८८८ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९)

सदर अदालतीच्या अधिकाऱ्यांनी असा जाहीरानाम काढला आहे की, कोर्टात इनसाफाचे काम चालविणाऱ्या लोकांना इंग्रजीचे ज्ञान असणे आवश्यक आहे.

२८८९ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९)

इंग्लंडमध्ये फौजेची नवी भरती सुरू झाली.

२८९० (१२ : ५, १ मार्च ५३, ७९)

लुई नेपोलियनची पत्नी राजघराण्यातील नाही.

२८९१ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९)

नुसत्या गरम वाफेवर चालणाऱ्या आगबोटी भारतात येऊ लागल्या.

२८९२ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९-८०)

बंगालमध्ये युरोपियन अधिकाऱ्यांना देशी भाषा शिकण्याची सक्ती केलेली आहे.

२८९३ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९-८०)

होळकर सरकारने तारेच्या यंत्रासाठी परवानगी मागितली.

२८९४ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९-८०)

इंग्लड शहरातील मंडळीने चहाच्या लागवडीसाठी भांडवल गोळा केले.

२८९५ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९-८०)

कैटच्या आकाशरथाचा प्रयोग १९ मे रोजी होणार.

२८९६ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९–८०)

कराचीच्या वार्षिक बाजारात सुकी फळे व लोकर यांस फार मागणी असते.

२८९७ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९–८०)

ब्रह्मी लोकांत फूट पडून आपसांत लढाईचा प्रसंग चालला आहे.

२८९८ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९–८०)

अयोध्येच्या राजाने कुटुंबनिर्वाहाकरिता नेमणूक द्यावी, असा सरकारास अर्ज केला आहे.

२८९९ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९–८०)

पासिफिक महासागरामध्ये न्युजिलेड बेटांत सोन्याची खाण सापडली.

२९०० (१२ : ५, १ मार्च ५३, ७९–८०)

रे. डब्ल्यु प्रैससाहेब यांनी मनीस्कूलमध्ये दर मंगळवारी संध्याकाळी सात वाजता रसायनशास्त्राविषयी इंग्लिश भाषेत व्याख्याने देण्याचे आरंभिले आहे.

२९०१ (१२ : ५, १ मार्च ५३, ७९–८०)

ग्रांट वैद्य पाठशाळेत जीरोद साहेब दर शनिवारी विद्युतविद्येविषयी व्याख्यान देणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८५३

**२९०२** (१२ : ६, १५ मार्च ५३, ८१-८२)

आपल्या अंगावरचे कोड बरे व्हावे म्हणून सेनापती नामान शोमरोनचा भविष्यवादी आलिशा याच्याकडे गेला. आलिशाने त्याला यार्देन नदीमध्ये बुडी मारण्यास सांगितले. तसे केल्यावर नामानचे अंग शुद्ध झाले व कोड गेले. आलिशाचा नोकर गेहजी याने धन्यास न कळविता लोभीपणाने नामानकडून दोन मण रुपे बक्षिसी म्हणून घेतले. तेव्हा अलिशाने त्यास शाप दिला की, नामानचे कोड तुझ्या वंशास लागेल. तात्पर्य : अति लोभ करू नये. (सचित्र)

**२९०३** (१२ : ६, १५, मार्च ५३, ८३-८४)

ग्रांट आणि लेजेट या न्यायाधिशांना हलक्या हुद्यावर नेमले आहे. कारण बदचालीमुळे ते कर्जदार बनले आहेत. डागळलेल्या कामदारांना जर शिक्षा झाली नाही, तर प्रजा द्वेषी बनते. सरकारी नोकरांना हे लांछन आहे.

**२९०३ अ** (इंम : ८२)

**२९०४** (१२ : ६, १५ मार्च ५३, ८५-८६)

विचारलहरी : या पत्राचा संपादक असत्य व क्रोध यांचा अवलंब करणारा आहे. त्याने मिशनऱ्यांना पोटार्थी व मतलबी म्हटले आहे. ख्रिस्ती लोकांत शंभर पंथभेद आहेत व ते परधर्मी माणसांना नीच समजतात, असे तो म्हणतो. हे सर्व विचार अज्ञानोत्पादित आहेत. बनाऊ गोष्टी सांगण्यातच त्यांना धन्यता वाटते. वास्तविक पाहाता, जो कोणी माणूस अंतःकरणाचा शुद्ध व पवित्र आहे, त्याला असले विचार पटणार नाहीत.

**२९०४ अ** (इंम : ८४-८५)

**२९०५** (१२ : ६, १५ मार्च ५३, ८७–८९)

'एक सभेस जाणारा' लिहितो की : कृष्णशास्त्री साठ्यांनी सांगितले की : सुधारणा म्हणजे लुच्चेगिरी आहे. इंग्रजांजवळ दुष्टपणा फार आहे. इंग्रज साहेब नोकराचाकरांशी नीट वागत नाहीत. हिंदू व मुसलमान मात्र दयाळू वृत्तीचे असतात. इंग्रजी राज्यात साहेबाची भेट घडविण्यासाठी कामदार पैसे घेतात. शिपायांना विशिष्ट पोषाकाची सक्ती करतात. गरीब शिपायांना ते परवडत नाही. शूद्रादिकांना वेदांचा काही उपयोग नाही. इंग्रज हे ताम्रमुख राजाचे वंशज आहेत, असे पोरकट विधानही शास्त्रीजींनी केले !

**२९०५ अ** (इंम : ८६–८७)

**२९०६** (१२ : ६, १५ मार्च ५३, ८९–९०)

पूर्वी कडेलोट, साखळखंड, हत्तीच्या पायदळी देणे, टिपऱ्या लावणे, चाप लावणे, तापल्या तव्यावर उभे करणे, पाठीवर धोंडे ठेवणे, सुळावरती देणे, डोळे काढणे, अशा भयंकर व क्रूर शिक्षा होत्या. रामोशी व भिल्ल दरोडेखोरांपासून काही संरक्षण नव्हते. इंग्रजांनी मात्र अनेक सुखसाधने निर्माण केली. या दयाळू सरकारने क्रूर शिक्षा कायद्याने बंद केल्या. असे 'सभेस जाणारा' लिहितो.

**२९०६ अ** (इंम : ८९)

२९०७ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९०–९५)

'सत्यशोधक' म्हणतात की, गोंधाजींनी नामस्मरणाचे महात्म्य सांगितले. त्यावर श्रोत्याने विचारले की : अजामिळाने नारायणाचे नाव घेताक्षणी जर त्याचे पाप नाहीसे झाले, तर देवास ते अनुचित ठरणार नाही काय? यात देवाचा न्यायीपण कोठे दिसतो? कृष्णाने बभ्रूचा घात केला, मग ती लबाडीची गोष्ट नव्हे का? अशा कृत्यास थोर कसे म्हणावे? आमचे लोक खऱ्याखोट्याचा विचार करीत नाहीत. कधेकरीही प्रश्न विचारला की, गलिप्रदान करतात.

२९०८ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९५–९६)

आस्त्रियात देवाविरुद्ध भाषण केले, तर तीस रुपये दंड होतो.

२९०९ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९५–९६)

त्रावणकोर राज्यात गुलामगिरीची प्रथा चालू आहे.

२९१० (१२ : ६, १५ मार्च ५३, ९५–९६)

पांडुरंग हरिश्चंद्र यास किमयेची थाप मारून २९०० रुपयांस चोरांनी लुबाडले. (मुंबई)

२९११ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९५–९६)

क्यापतन हार्ड यांचा मृत्यू झाला. त्यांच्या ठिकाणी क्यापटन वॉलिस साहेब नेमले.

२९१२ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९५–९६)

हैद्राबादच्या निजामास पुन्हा ६६ लाखाचे कर्ज झाले आहे.

२९१३ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९५–९६)

एल्फिनस्तन विद्यालयातील प्रो. पाटन साहेब मरण पावले म्हणून दादाभाई नवरोजी यांस त्यांच्या जागी नेमले.

२९१४ (१२ : ६, १५ मार्च ५३, ९६)

मंगळवारी संध्याकाळी ७ वाजता शास्त्रवर्जुन तर्कांने ईश्वरीमत विषयावर पहिले संभाषण अमेरिकन मिशन देवळांत होईल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक ७, मुंबई, १ एप्रिल १८५३.

२९१५ (१२ : ७, १ एप्रिल ५३, ९७–९८)

डाळिंब (सचित्र) : या फळाची साल अत्यंत आरोग्यदायक असते. डाळिंबाचे जन्मस्थान अरबस्तान हे आहे. डाळिंबाच्या दाण्याचा रस तुरट पण गोड लागतो. त्याचे सरस दाणे लेकराच्या दातांप्रमाणे दिसतात.

२९१६ (१२ : ७, १ एप्रिल ५३, ९८–९९)

कलकत्ता रिव्ह्यु लिहतो की : बंगाल्यात पूजेच्या सणाची सुट्टी एक आठवडा असते. त्यातून मूर्तिपूजेस उतेजन मिळते. शिवाय सणात दुष्टाई व अनर्थ फार घडतात. आळशी लोकांना मात्र उत्तेजन मिळते. सरकारने अशा सणांना उत्तेजन देऊ नये.

२९१६ अ (इंम : ९८)

**२९१७** (१२ : ७, १ एप्रिल ५३, १००–१०१)

मद्रासच्या फ्री चर्च शाळेचे काम नामदार गवरनरसाहेबांना फार पसंत पडले. जनरल असेंब्ली शाळेच्या परीक्षांबद्दल फार आनंद वाटला. नागपूर शाळेच्या परीक्षेस अनेक साहेब आले होते. मिशनेरी अतिशय चांगले काम करतात, असा अभिप्राय त्यांनी दिला. डाका सरकारी विद्यालयात जातिभेद किंवा श्रीमंत-गरीब भेद नाही. याचा बिथुनसाहेबांनी मुद्दाम उल्लेख केला. काशीच्या सरकारी शाळेसाठी नवी इमारत तयार झाली.

**२९१७अ** (इंम : ९९–१००)

**२९१८** (१२ : ७, १ एप्रिल ५३, १०२)

दुलपसिंग यांनी फत्तेघर मुक्कामी ख्रिस्ती धर्माचा बाप्तिस्मा घेतला. महाराजांचे वय १६ वर्षांचे आहे. डाक्तर लोगीनकडे ते इंग्रजी विद्या शिकले. त्यांना संस्थानिक म्हणून चार लक्षांची नेमणूक आहे.

**२९१८अ** (इंम : १०१)

**२९१९** (१२ : ७, १ एप्रिल ५३, १०३–१०५)

ठाकुरद्वारातील धर्मसंवाद : कृष्णशास्त्री म्हणतात : व्यापार जातीवर अवलंबून नसून सद्दीवर असतो. म्हणून जातिभेदाने व्यापारास अडथळा येण्याचे कारण नाही. शिवाय आपद्‌धर्म म्हणून आजारात जातिभेद पाळीत नाहीत. पैक्याने धर्म चांगला वाईट ठरत नसतो. आपल्या उत्पन्नकर्त्या ईश्वराच्या पूजा-प्रार्थनेबाबत प्रत्येक धर्मात काही आचारधर्म असतोच. पशू व माणूस देवानेच केले, हे खरे असले, तरी माणसाला गाढवाची उपमा देणे अयोग्य होय. धर्मशील राहून सृष्टीचा उपभोग घेण्यात पाप नाही. असे 'सभेस जाणारा' लिहितो.

**२९१९ अ** (इंम : १०२-१०३)

**२९२०** (१२ : ७, १ एप्रिल ५३, १०६)

एक चिनारी आपण रंगविलेली भिंत पाहात फळीवरून चालत अशा ठिकाणी पोहोचला की, तो पडून खलास झाला असता. तेव्हा त्याच्या मित्राने आपला कुंचला फेकून रंग मुद्दाम खराब केला. तेव्हा तो चिनारी रागावून त्या मित्राकडे धावला. अशा रीतीने मित्राने त्याचे प्राण वाचविण्यासाठी युक्ती वापरली. दयाळू ईश्वर आमचे असेच रक्षण करतो.

**२९२० अ** (इंम : १०५-१०६)

**२९२१** (१२ : ७, १ एप्रिल ५३, १०६)

स्त्रीविद्याभ्यासाविषयी अण्णासाहेब चिपळूणकर यांचे बोलणे : स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांच्यात सुधारणूक घडवावी. त्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांना सन्मानाने वागवावे. शास्त्र-पुराणात स्त्रियांची निंदा फार आहे. पण स्त्रियांच्या नीचावस्थेमुळेच देशावर अनेक वेळा संकटे आली. पुण्याची मुलींची शाळा फार चांगले कार्य करीत आहे. स्त्रियांचे अज्ञान दूर होऊन त्या पतीच्या चांगल्या साह्यकर्त्या व आवडत्या होतील. (फेब्रुवारी १२ वे तारखेस पुणे मुक्कामी मुलींच्या शाळेची दुसरी वार्षिक परीक्षा झाली. त्यावेळच्या मराठी भाषणाचा सारांश)

**२९२२** (१२ : ७, १ एप्रिल ५३, १०८-१०९)

'अभंग टिमकी' या कवितेत कवी म्हणतो की : अंगावर हेंदर घेऊन लोकांनी माकड बनू नये. भुकल्यासारखे ओरडू नये. मुलांलेकरांदेखत अभद्र शब्द बोलू नये. कर्ज काढून सावकाराच्या पेचात येऊ नये. सेवा हाच देव आहे. म्हणून हे अभद्र सण व खेळ सोडून द्या.

२९२३ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १०९-१११)

१८१३ च्या ब्रिटिश सरकारच्या सनदेप्रमाणे मिशनरी लोकांना इकडे येण्यास परवानगी मिळाली. मिस्तर हाल आणि नाट हे या देशात आले. पण त्यांना दुःखे-संकटे भोगावी लागली. इंग्रज सरकारच्या मदतीची त्यांना काहीच गरज नव्हती. लोकांना मात्र वाटले की, इंग्रजाचे राज्य आले, म्हणूनच मिशनरीही आले. एतद्देशीयांनी अहंकार सोडून सद्गुणी बनावे. पण लोक मिशनऱ्यांना शिव्यागाळी करतात. (पृ. ३३६ वरून चालू)

२९२४ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १११)

इंग्लंडचे पंतप्रधान मोठे वजंदार आहेत. पार्लमेंटचे काम आता चांगले चालेल.

२९२५ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १११)

लुईस नेपोलियन सध्यातरी लढाई करणार नाही.

२९२६ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १११)

कालिफोर्णियात दर आठवड्यास पंधरा लाखाचे सोने निघते.

२९२७ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १११)

चीनमधील बंड अद्याप विझले नाही.

२९२८ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १११)

ठाणे जिल्ह्यात मिस्तर बाकरने होळीवर बंदी घातली.

२९२९ (१२ : ७, १ एप्रिल ५३, १११)

भारतातील इंग्रज फौजेची संख्या ३ लक्ष २२ हजारावर जाते.

**२९३०** (१२ : ७, १ एप्रिल ५३, ११२)

मुंबई-भिवंडी तेथून नासिक, धुळे, मालेगांव, इंदूर, ग्वॉल्हेर आग्रा, दुसरे पुणे, सातारा, बेळगांव, धारवाड, बेलारी, बंगलोर, मद्रास व बलोरीहून हेदराबादेस टेलिग्राफ यंत्र चालू होणार.

**२९३१** (१२ : ७, १ एप्रिल ५३, ११२)

मुंबईतील स्टूडन्टस् सौसैटी व नेटिव लायब्ररी ही दोन वाचनालये एकत्र होऊन नवा पुस्तकखाना निघणार.

**२९३२** (१२ : ७, १ एप्रिल ५३, ११२)

मान्चेस्टर या ठिकाणी असे यंत्र तयार झाले आहे की, त्याच्या साह्याय्याने शत्रूची जहाजे सहज बुडविता येतील.

**२९३३** (१२ : ७, १ एप्रिल ५३, ११२)

दागिन्यांच्या लोभाने दोन इसमांचा खून केला म्हणून लालू गंगादीन व रामदीन कल्याणसिंग यांना फाशीची शिक्षा झाली.

**२९३४** (१२ : ७, १ एप्रिल ५३, ११२)

या महिन्याचे ५ वे व १२ वे तारखेस मंगळवारी ५ वाजतां संध्याकाळी अमेरिकन मिशन देवळांत शास्त्र नाकारून केवळेश्वरमत स्थापना याविषयी व्याख्यान व संभाषण होणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**२९३५** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, ११३)
लोखंडी रस्त्याविषयी ग्रंथ (गुजराती) : केखसरा होरमसजी आलपाईवाला यांना या ग्रंथाबद्दल १५० रुपयांचे इनाम बोर्ड आव्‌ एज्युकेशनने दिले आहे.

**२९३५ अ** (इंम : ११३)

**२९३६** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, ११३)
सुबोधक अभंग : रेवरंड जे. एम्. मिचेल यांनी हे लहान पुस्तक रचले आहे. पुष्कळ लोक ते विकत घेऊन तुकारामाच्या अभंगाप्रमाणे वाचतील असे वाटते. पृ. ३०
(बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी मुंबई, १८५२)

**२९३६ अ** (इंम : ११३)

**२९३७** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, ११४)
वर्तमानदीपिका : शुक्रोदय पत्राचा तीन अंकानंतर कायमचा शुक्रास्त झाल्यामुळे काही सुज्ञांनी वर्तमानदीपिका सुरू केली. हिचा प्रकाश शुक्रोदयाहून चांगला होईल, असे वाटते. वार्षिक वर्गणी सहा रुपये. दर शनिवारी निघेल.

**२९३७ अ** (इंम : ११३–११४)

**२९३८** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, ११४–११५)

बंगालच्या एका सनदी अधिकाऱ्याने ग्रंथलेखकांना आवाहन केले आहे की : वेदांत मतखंडनावर ग्रंथ रचणारास तीन हजार रुपये इनाम मिळतील. सृष्टी मायाकल्पित नसून वास्तविक आहे, आत्मे अनादि नसून ईश्वरकृत आहेत, अणुरेणूपासून जग झाले, हे कल्पित विधान होय, हे सर्व मुद्दे त्यात प्रमाण देऊन सिद्ध केले पाहिजेत.

**२९३८ अ** (इंम : ११४)

**२९३९** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, ११६–१२०)

लंकेमध्ये बिभीषण अजूनही गुप्त आहे, असे शास्त्री म्हणाले. धुळवडीच्या दिवसात जातिभेद नाहीसा होतो, असाही विचार त्यांनी मांडला. येशूकृत चमत्कार योहानाने वर्णन केले. तुकाराम व रामदास यांनीही अनेक चमत्कार केले होते. लंकेत सोन्याची घरे आहेत, हा शास्त्रींचा दावा खोटा आहे. योहानाची साक्ष खोटी ठरविण्याचा प्रयत्न तर अयोग्यच वाटतो. असे 'सभेस जाणारा' लिहितो.

**२९३९ अ** (इंम : ११५–११६)

**२९४०** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२१–१२३)

सर्वांना आपल्या धर्माप्रमाणे वागू दिले, तर ईश्वराचा आशीर्वाद कायम राहील. खरा धर्म कोणता, ते सांगणे आमचे कर्तव्य आहे. विद्यावृद्धीच्या कामात वंजदाराची मदत पाहिजे. शिक्षण घेतल्यामुळे विद्यार्थी उद्धट होतात, हा समज चूक आहे. आमचे कित्येक विद्यार्थी उपदेशक झाले आहेत.

**२९४० अ** (इंम : १२०–१२१)

**२९४१** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२३)

सरकारी शाळेत धर्म शिकवीत नाहीत, म्हणून ज्ञानोदयाने कधी दोष दिला नाही. कलाकौशल्य आणि विद्या पुरेशी आहेत. पण कोणी नास्तिकपणाचा उपदेश केला, तर मात्र टीका केली. धार्मिक उदासीनता मात्र आम्हांस मान्य नाही. धर्मच नको, हे मत मात्र चुकीचे आहे. सरकारी शाळांची संख्या जास्त वाढली पाहिजे.

**२९४२** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२३)

निरनिराळ्या सभा-समित्यांनी आपल्या अर्ज्या दाखल केलेल्या आहेत. परंतु कंपनीच्या सनदेबाबत अजून निर्णय झालेला नाही.

**२९४३** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२४–१२५)

आग्रा व पंजाब येथे ३० वृत्तपत्रे असून त्यांचा खप १५३९ आहे.

**२९४४** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२४–१२५)

मिर्जापूर मिशनच्या उर्दू पत्राचा खप ५०० आहे.

**२९४५** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२४–१२५)

वृत्तपत्रांच्या वाचनाने आळस जाऊन लोक विचारवंत होतात.

**२९४५ अ** (इंम : १२४)

**२९४६** (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२५)

मुंबई ते ठाणे लोहमार्ग तयार झाला म्हणून आनंदाप्रीत्यर्थ सरकारने एक दिवसाची सुटी जाहीर केली. लोकांची फार मोठी सोय झाली आहे. (१६ शनिवार, एप्रेल १८५३)

२९४७ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२५)

आगीच्या गाडीचा मार्ग लोखंडी आहे. ही गाडी पाहून माणसे वेडी झाली. युरोपखंडातून ती इकडे आली. आता हत्तींची, घोड्यांची आवश्यकता नाही. गोरगरिबांचा व्यापार मोडून दारिद्य वाढेल, असे वृद्ध मंडळींना वाटते. पण या गाडीचा महिमा अगाध आहे. व्यापार वाढणारच आहे. (मुंबई–ठाणे रेल्वे सुरू झाली, त्यावर 'वर्तमानदीपिके'त प्रसिद्ध झालेला कटाव)

२९४८ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२५)

पुण्याच्या फौजदाराने बंदी केलेली असूनही लोकांनी धुळवडीचा गोंधळ केला. चिखल फेकून शंखध्वनी केला. ही गोष्ट अज्ञानाची व लाजिरवाणी आहे.

२९४९ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२५)

'व्यसनत्रासक हिंदू' पत्रात म्हणतो की : तपकीर हे एक त्रासदायक व्यसन आहे. तपकीर ओढणारी माणसे त्यात फार वेळ घालवितात. हाच अमोल्य काळ ईश्वरभक्तीकडे लावावा. काही योग्य काम करावे.

२९५० (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२६)

गावोगावी काही देवऋषी लिंबे पसरून बसतात. चित्रविचित्र हावभाव करतात. मुलांचा आजार बरा करण्यासाठी भोळ्या बायाबापड्या ते सांगतील तसा खर्च करतात. या पंक्तिबारगीरांना जेवण देतात. केवळ लिंबे फेकून भूतबाधा नाहीसे करणाऱ्या या ढोंग्यांपासून सावध राहिले पाहिजे. सर्वशक्तिक असा परमेश्वर त्यांच्या ठिकाणी आढळणार नाही.

२९५१ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२७)

एक अयाचित बाबा नुकताच प्रगट झाला आहे. बऱ्याच स्त्रियांकडून त्याने पैसे उकळले. तरी या ढोंग्याकडे कोणीही जाऊ नये.

२९५२ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२७–१२८)
ब्रह्मदेशात राज्यक्रांती होऊन पूर्वीच्या राजाच्या मेव्हण्याने राज्य जिंकले.

२९५३ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२७–१२८)
पुणे लष्करात असा नियम झाला आहे की, पगाराच्या रकमेपेक्षा कोणालाही जादा कर्ज देऊ नये.

२९५४ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२७–१२८)
जगात एकूण ३० हजार मैल लोखंडी रस्ते आहेत.

२९५५ (१२ : ८, १५ एप्रिल ५३, १२७–१२८)
अमेरिकेच्या ६ संस्थानांनी दारू दुकानांवर बंदी घातली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक ९, मुंबई, २ मे १८५३

२९५६ (१२ : ९, २ मे ५३, १२९)
सरदार विंचुरकरांनी आपली कन्या शाळेत शिकावयास पाठविली. ही गोष्ट मोठी स्तुत्य आहे. ज्ञानाचा प्रकाश सुरू झाला. (ज्ञानप्रकाशवरून)

२९५६ अ (इंम : १२९)

२९५७ (१२ : ९, २ मे ५३, १३०)
ज्ञानप्रसारक कन्या शाळेत पाचशे मुली परीक्षेस उपस्थित होत्या. या कामात पारशी लोक फार मेहनत घेत आहेत. शाळेचे काम सुंदर रीतीने चालते. मुंबई बेटात दोन हजार मुली शिकतात. ही मोठी हर्षकारक गोष्ट आहे. (गेल्या महिन्याच्या २१ तारखेस)

२९५७अ (इंम : १२९–१३०)

२९५८ (१२ : ९, २ मे ५३, १३०)

लहान गणित : या पुस्तकाची तिसरी आवृत्ती मिशन छापखान्यात छापली गेली. रेखागणिताचे विवेचन उत्तम आहे.

२९५८अ (इंम : १३०)

२९५९ (१२ : ९, २ मे ५३, १३०)

पुस्तकमंडळीने 'शत तथा अशतनी परीक्षा' हे गुजराथी पुस्तक छापले असून त्यात इंग्रजी मजकूरसुद्धा आहे. तो संभाषणरूप आहे.

२९५९अ (इंम : १३०)

२९६० (१२ : ९, २ मे ५३, १३१–१३२)

१६ एप्रिल १८५३ हा दिवस नवीन शकाप्रमाणे मोठा ठरला. कारण आशियातील पहिली आगगाडी त्या दिवशी सुरू झाली. बिनघोड्याचे हे रथ पहाण्यास शेकडो लोक उभे राहिले होते. युरोपियन लोक एवढी अमानुष कृत्ये करू शकतात, तर त्यांजपुढे कोण उभे राहाणार? आता डोळे मिटून जुन्या चाली सोडल्याच पाहिजेत, शोध केले पाहिजेत.

२९६०अ (इंम : १३०–१३१)

२९६१ (१२ : ९, २ मे ५३, १३३–१३४)

टैम्स पत्राने म्हटले आहे की : १८३३ च्या दुष्काळात लोखंडी रस्ता असता, तर एवढी माणसे अन्नावाचून मेली नसती. आता मात्र शेतमाल आणि सैन्य यांची जलदगतीने वाहातूक होऊ शकेल.

२९६१ अ (इंम : १३२–१३३)

२९६२ (१२ : ९, २ मे ५३, १३४)

पुणे पाठशाळेत प्रवेश देताना जातिभेद केला जात नाही, म्हणून शास्त्री मंडळी गडबड करीत आहेत. सर्व जातींनी विद्या करून सुज्ञ व अब्रूदार व्हावे, अशी इंग्रज सरकारची इच्छा आहे. ज्ञानप्रकाश पत्रही शास्त्रीमंडळाचा बाजू घेते, तेव्हा त्याचे नाव 'अज्ञानांधार' ठेवले पाहिजे. (ज्ञानप्रकाशातील उतारा दिला आहे.)

२९६३ (१२ : ९, २ मे ५३, १३६–१३८)

'सभेस जाणारा' लिहितो की : साठेशास्त्री म्हणाले : होळीचा सण चांडालाप्रमाण साजरा करण्याची शास्त्राची आज्ञा आहे. शिवाय होळीची लाकडे घरमालकाच्या समोरून घेतली जातात. त्यामुळे यास 'चोरी' म्हणता येत नाही. श्रोत्यांना वाटले की, ही विधाने पोरकट आणि उपहासास्पद आहेत. श्रोत्यांची संख्याही कमी होत आहे.

२९६३ अ (इंम : १३५–१३६)

२९६४ (१२ : ९, २ मे ५३, १३९–१४२)

होळीच्या सणात अनाचार होतो, हे शास्त्री कबूल करीत नाहीत. शास्त्राज्ञाच असल्यामुळे लोक घाणेरडे बोलतात, असे समर्थन ते करतात. बैबलात शारीरिकच काय, पण मानसिक अमंगळपणाचाही निषेध केला आहे. शिमग्यातील अवाच्यपणाचे युक्तिद्वारा प्रतिपादन हा केवळ अट्टाहास आहे, अशी टीका 'सभेस जाणारा' याने केली आहे.

२९६४ अ (इंम : १३८–१३९)

२९६५ (१२ : ९, २ मे ५३, १४२)

व्यभिचार, गुह्य गोष्ट, जारकर्म, अमंगल बोल, या सर्वांना खिस्ती शास्त्राने बीभत्स ठरविले आहे. जे काही बोलण्याची लाज वाटते, ते सर्व अमंगळ आहे. संपूर्ण मनाने जो देवावर प्रीत करतो, तो असे काही बोलणार नाही. द्राक्षरस पिऊन अडखळत व अवाच्य बोलणे तर फार वाईट आहे. (कृष्णशास्त्री साठे यांच्या भाषणाची प्रतिक्रिया)

२९६६ (१२ : ९, २ मे ५३, १४३)

इंग्रज सरकारने निजामास इशारा दिला आहे की, निजाम सरकारने दरमहा कर्जाचे हप्ते नियमित पाठवावेत, किंवा त्याच्या मोबदल्यात प्रांत तोडून द्यावा.

२९६७ (१२ : ९, २ मे ५३, १४३)

काशीमध्ये १ लाख ८० हजार लोक राहतात, तर आसपासच्या प्रदेशात ६ लाख ६६ हजार लोक आहेत.

२९६८ (१२ : ९, २ मे ५३, १४३)

कंपनीच्या सनदेबद्दल सूचना करण्यासाठी काही सुज्ञ गृहस्थांनी इंडियन रिफार्म असोसीएशन स्थापन केली असून तिच्यात काही पार्लमेंटचे सभासदही आहेत.

२९६९ (१२ : ९, २ मे ५३, १४३–१४४)

डॉ. डेविडसन यांना मुंबईत पोस्त मास्तर जनराल नेमले आहे.

२९७० (१२ : ९, २ मे ५३, १४३–१४४)

केप आव गुडहोपची लढाई थांबली.

२९७१ (१२ : ९, २ मे ५३, १४३–१४४)

कंपनी सरकार १२४ बिशपांसाठी ११ लाख ५५ हजार रुपये खर्च करते.

**२९७२** (१२ : ९, २ मे ५३, १४३–१४४)

भारतात डाकेचा एकच दर अंमलात येणार.

**२९७३** (१२ : ९, २ मे ५३, १४३–१४४)

पुस्तक मंडळीची गतवर्षी १ लाख पाच हजार पुस्तके खपली.

**२९७४** (१२ : ९, २ मे ५३, १४४)

सरकारी नोकरांवरील आरोप पुराव्यासह सिद्ध करणारास तीनशे रुपयांचे बक्षीस जाहीर झाले.

**२९७४ अ** (इंम : १४४)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १०, मुंबई, १६ मे १८५३

**२९७५** (१२ : १०, १६ मे ५३, १४५)

भरतखंडात २९ वर्षे कार्य करून मंगरसाहेब या महिन्याचे १० वे तारखेस स्वदेशास गेले.

**२९७५ अ** (इंम : १४५)

**२९७६** (१२ : १०, १६ मे ५३, १४५–१४६)

सातारा मिशनातील बर्जीस मडम गेल्या महिन्याच्या २६ तारखेस निधन पावली. येशू हाच तारणारा आहे, अशा विश्वासाने ती कार्य करीत असे. स्त्रियांना शिकविण्यास ती फार मेहनत घेत असे.

**२९७६ अ** (इंम : १४५)

**२९७७** (१२ : १०, १६ मे ५३, १४६)

धूमकेतू : हे नवे वृत्तपत्र असून देशाची सुधारणा हे त्याचे उद्दिष्ट आहे. दर शुक्रवारी प्रसिद्ध होते. वार्षिक वर्गणी चार रुपये आहे. मे महिन्याच्या शुक्रवार ६ तारखेपासून सुरू झाला. धुमकेतूचे प्रस्तावनेतील उतारा :

'हिंदुस्थानच्या या भागात दर्पण हे मराठी वर्तमानपत्र पहिल्याने निघाले. तेव्हापासून आजपर्यंत सहा वर्तमानपत्रे निघाली. धुमकेतू पत्र निघाले ही आठवी पिढी आहे. दर्पणनंतर पुढे अखबार, त्याच्यापुढे प्रभाकर, तद्नंतर ज्ञानोदय, तद्नंतर पुण्यातील ज्ञानप्रकाश, त्यापुढे शुक्रोदय, त्याच्यापुढे वर्तमानदीपिका व आता शेवटी हे धुमकेतू पत्र निघाले आहे.'

**२९७७ अ** (इंम : १४६)

**२९७८** (१२ : १०, १६ मे ५३, १४६–१४७)

महंमदाचा वृत्तांत : पुस्तक प्रसारक मंडळीने हे पुस्तक छापले. निःपक्षपाती व वास्तविक वर्णन दिले आहे. पृष्ठे १६० व किंमत तीन आणे. १८५३. इंग्रजीवरून भाषांतर अहमदनगरच्या हरीपंत रामचंद्र यांनी रे. बोवेन यांच्या मार्गदर्शनाखाली केले.

**२९७८ अ** (इंम : १४६)

**२९७९** (१२ : १०, १६ मे ५३, १४७–१४८)

कलकत्त्याच्या सरकारी शाळेत ख्रिस्ती शास्त्र शिकवितात, अशी बातमी आल्यावर 'ज्ञानप्रकाश' ने हिंदूंना आवाहन केले की, पुण्यात हिंदू विद्यालय सुरू करावे. लाडूबाजी सोडून शाळा काढावी. यावर संपादक म्हणतात की, कलकत्त्याच्या शाळेत ख्रिस्ती शास्त्राची सक्ती केली जात नाही. कल्याणकारक सत्यधर्म स्वीकारण्यास उत्तेजन दिले जाते. खरे काय ते लोकांनी पहावे. (ज्ञानप्रकाशवरून)

**२९७९ अ** (इंम : १४७)

**२९८०** (१२ : १०, १६ मे ५३, १४९–१५१)

'मद्यद्वेष्टा हिंदू' पत्रात लिहितो की : दारूचा पाण्याप्रमाणे व्यापार होत आहे. धर्माचे मिषाने मद्यपानाचे समर्थन केले जाते. शाक्तमार्गी प्रतिष्ठित बनले आहेत. सरकार दारूदुकानांवर अफाट पैसा मिळवीत आहे. मक्त्याने दारूची दुकाने देणे बंद झाले पाहिजे. ज्ञानी सरकारला कलालाची दुकाने हे लांछनास्पद होय. सर्वच धर्म मद्यपानास पापरूप समजतात. हे व्यसन जर बंद झाले नाही, तर सर्वांनाच हायहाय करीत बसावे लागेल (ज्ञानप्रकाशवरून)

**२९८० अ** (इंम : १४८–१४९)

**२९८१** (१२ : १०, १६ मे ५३, १५२–१५३)

एक श्रोता लिहितो की : कृष्णशास्त्री सांगतात की, फाल्गुन वद्य प्रतिपदेस वसंत ऋतू सुरू होतो. त्यादिवशी आंब्याचा माहोर खाल्ला, तर रोगपीडा होत नाही. गुह्यवाचक शब्द बोलले, तर पीडा न होता द्रव्य मिळते. असल्या इवल्याशा आज्ञा घेऊन आमचे लोक अनन्वित गोंधळ घालतात. व्यभिचारासंबंधी हिंदू शास्त्रात अनेक शिक्षा सांगितलेल्या असताना होळीतील अनीती चालते, हे आश्चर्य होय. शास्त्री ख्रिस्ती धर्मास मात्र उगीचच दूषणे देतात.

**२९८१ अ** (इंम : १५१–१५२)

**२९८२** (१२ : १०, १६ मे ५३, १५४–१५५)

'सभेस जाणारा' म्हणतो की : हिंदू शास्त्रात नीति व अनीती यांसंबंधी अनेक विपरीत गोष्टी आहेत. ज्यास एके ठिकाणी निषेधिले, त्यास दुसरे ठिकाणी वाखाणितात. होळीच्या दुराचरणास यातूनच मोकळीक मिळते. प्रायश्चित विधी तर दिखाऊ व आयुष्याचे मातेरे करणारा आहे. हा ओंगळ व हेंगाडा सण म्हणजे दुष्कर्मनिधी आहे. शास्त्री-पंडित या घाणेरड्या शिव्यांना कंटाळत कसे नाहीत ? नाच-तमाशाचा अनाचार करणारांची स्वधर्मावर प्रीती असू शकेल काय ?

**२९८२ अ** (इंम : १५३–१५४)

**२९८३** (१२ : १०, १६ मे ५३, १५६)

ठाकुरद्वारात कृष्णशास्त्री म्हणाले की : सरकाराच्याने क्रूरतेशिवाय चालत नाही. परंतु मनुस्मृती सांगते की, राजाचा धर्मरूप दंड ब्रह्मदेवाने निर्माण केला. हा दंडच शासन व संरक्षण करतो. दंड वापरला नाही, तर लोक बलाढ्य होऊन गरीबगुरीबांस मारून टाकतील.

**२९८३ अ** (इंम : १५५–१५६)

**२९८४** (१२ : १०, १६ मे ५३, १५६–१५७)

कलकत्त्याच्या द्वारकानाथ ठाकुराच्या सुनेने खिस्ती धर्म स्वीकारला आहे. घरच्या लोकांची मनाई असूनही ती बाळबोध लिपीतील पुस्तके वाचीत असे. हिंदू लोकांमध्ये असे कधीही घडले नव्हते. म्हणून नातेवाईक तिला परत हिंदू करून घेण्याच्या प्रयत्नात आहेत. एकाने तर दहा हजार रुपये देण्याचे आमिष दाखविले. परंतु ती म्हणाली, एक कोटी दिले तरी मी परत येणार नाही. येशू खिस्ताकडून पापाची क्षमा मिळविण्याचा तिचा निर्धार कायम आहे.

२९८५ (१२ : १०, १६ मे ५३, १५७–१५९)

हाल आणि नाट यांनी मराठी भाषा मोठ्या मेहनतीने शिकून घेतली. खिस्ती धर्माचे सार सांगणारे निबंध लिहिले. रात्रंदिवस कष्ट करून धर्मप्रसार केला. येशू खिस्त म्हणत असे की : 'लेकरांस वर्जू नका.' 'त्यांना दुर्व्यसनात पडू देऊ नका.' यासाठी मिशनरीद्वयाने मुंबईत शाळा सुरू केली. तेथे ८०० मुले शिकतात. विद्येच्या प्रसारासाठी सतत प्रयत्न केले. यातून आमची भाषाही सुधारत आहे.

(पृ. ११ पासून चालू)

२९८६ (१२ : १०, १६ मे ५३, १५९–१६०)

भारतात विद्यावृद्धीवर जास्त खर्च होणार.

२९८७ (१२ : १०, १६ मे ५३, १५९–१६०)

नामदार पेरी यांचे मत असे आहे की, सनदी व बेसनदी नोकरी ही वर्गवारी अनावश्यक आहे.

२९८८ (१२ : १०, १६ मे ५३, १५९–१६०)

तुर्कस्थानचे सरकार फार दुर्बळ झाले आहे.

२९८९ (१२ : १०, १६ मे ५३, १६०)

मद्रासच्या गवरनरांचे असे मत आहे की, मिशनरी शाळेलाही सरकारने पैशाची मदत करावी.

२९९० (१२ : १०, १६ मे ५३, १६०)

दक्षिणा फंडाबद्दल लाच खाल्ल्याचा आरोप हेड कारकून कुशाबा लिमये यांच्यावर आला आहे.

**२९९१** (१२ : १०, १६ मे ५३, १६०)

ठाण्याचे ग्रंथालय उत्तम चालते. १०० वर्गणीदार आहेत.

**२९९२** (१२ : १०, १६ मे ५३, १६०)

मुंबईत मोफत औषधे पुरविण्यासाठी नवीन दवाखाना निघाला आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक ११, मुंबई, १ जून १८५३

**२९९३** (१२ : ११, १ जून ५३, १६१)

मि. रॉजर्स यांनी साडेसहा वर्षांपूर्वी येऊन ख्रिस्ती धर्मोपदेशकाचे काम केले. प्रकृती बरी नसल्यामुळे ते विलायतेस गेले आहेत.

**२९९३ अ** (इंम : १६०)

**२९९४** (१२ : ११, १ जून ५३, १६१)

'लोखंडी रस्ता म्हणजे काय?' या नावाचे इंग्रजी पुस्तक टैम्स छापखान्यात छापले आहे. चित्रेही दिली आहेत. त्यांत मुंबईतल्या लोखंडी रस्त्याविषयी बरेच लिहिले आहे.

**२९९४ अ** (इंम : १६१)

२९९८ (१२ : ११, १ जून ५३, १६३–१६५)

ठाकुरद्वारातील धर्मसंवाद :

कृष्णशास्त्री म्हणाले की : हिंदूंच्या सणविषयक कल्पनांना पक्का शास्त्राधार आहे. खिश्चनांनी मात्र यहुदी लोकांच्या कल्पना घेतल्या आहेत. येशू खिस्त म्हणतो की, हे लोक अल्पविश्वासी आहेत. येशू मानवपुत्र आहे, तर राम हा प्रत्यक्ष देव होता. असे 'सभेस जाणारा' म्हणतो. यावर संपादक टिप्पणी करतात की : लोकांचा आळस जाऊन विश्वास वाढावा, म्हणून येशूने प्रयत्न केला. कृष्णशास्त्र्याचे मत अंधारमय आहे. येशू आपल्या मरजीने मरण पावला. पापी लोकांसाठी त्याने तारणाचे कार्य केले.

२९९८ अ (इंम : १६१–१६३)

२९९९ (१२ : ११, १ जून ५३, १६६–१६८)

अमेरिकेतील इंद्यान लोकांनीही दारूविषयी कायदे केले आहेत. छाक्ता प्रांतात तर एकच माणूस निर्व्यसनी होता. मिशनऱ्यांनी त्यांच्यात जाऊन व्यसनमुक्तीचे प्रयत्न केले. ते अज्ञानी लोक सुधारले. आता ते खिस्ती धर्मामध्ये आले आहेत. १८२३ च्या कायद्यानुसार शिपाई सापडेल ती दारू लगेच ओतून देतात. चेरोकी विभागातही व्यसन कमी झाले. चेरोकी लोक शिक्षण घेतात, सभा भरवितात. त्यांनी दुष्टपण टाकिले.

२९९९ अ (इंम : १६५–१६६)

**२९९७** (१२ : ११, १ जून ५३, १६८–१७१)

रांजणगावी (शेवगांव तालुका) धर्मोपदेशकास असे दिसले की : दहा हजारांची यात्रा भरली आहे. प्रत्येकजण बगाड घेण्यासाठी प्रयत्न करीत होता. त्यांतून माऱ्यामाऱ्या व चोऱ्या झाल्या. नरकाच्या मार्गाने जाणाऱ्या हिंदूंना त्याने उपदेश केला की : अघोरी भक्तीचा काही उपयोग होत नसतो. नवसाची कल्पनाच खोटी आहे. ईश्वराच्या इच्छेने जग चालते. बिरोबाचा काही उपयोग नसतो. गंमत अशी की, व्यभिचारी स्त्रिया नवरा मरावा म्हणून नवस करतात ! शाक्तांचे वागणे तर अक्षम्यच असते.

**२९९८** (१२ : ११, १ जून ५३, १७२)

येथून पुढे डाकेचे हसील वजनावर ठरणार आहे. पत्रास मात्र अर्धा आणा पडेल. सरकारने वृत्तपत्रांना कसलीही सवलत दिली नाही.

**२९९९** (१२ : ११, १ जून ५३, १७२)

मद्रास असोसिएशन : कंपनीच्या नव्या सनदेसाठी ही सभा सूचना करणार आहे. त्यात चौकशी कमिटी नेमण्याची विनंती राहील.

**३०००** (१२ : ११, १ जून ५३, १७२–१७३)

'यथार्थवादी शास्त्री' लिहितात : भागवताच्या परीक्षेमध्ये शास्त्री आणि पगारवाले यांची परीक्षा न घेताच नावे लिहिली ! निराश्रितांना मात्र भागवत येत असूनही त्यांची नावे लिहिली नाहीत. ज्यांच्याकडून काही लाभांश मिळेल, अशा अविद्वानांनाही उत्तीर्ण झाल्याबद्दल शिफारस मिळाली !

**३००१** (१२ : ११, १ जून ५३, १७३)

हैद्राबादच्या निजामाकडून ३६ लक्षांच्या कर्जापोटी त्याचा मुलूख इंग्रज सरकारने ताब्यात घेतला.

३००२ (१२ : ११, १ जून ५३, १७३–१७४)
ईस्ट इंडिया रिफार्म असोसिएशन इंग्लंडमध्ये स्थापन झाली असून अनेक सावकारांनी सभेला मदत पाठविली आहे.

३००३ (१२ : ११, १ जून ५३, १७३–१७४)
मुंबईतील पुस्तक मंडळी नवे पुस्तकालय बांधणार आहे.

३००४ (१२ : ११, १ जून ५३, १७३–१७४)
एका गुजराथी भाट्याने भागवताची १०८ पारायणे सुरू केली आहेत.

३००५ (१२ : ११, १ जून ५३, १७३–१७४)
कुलाबा संस्थानला मुंबई इलाख्याचे कायदे लागू झाले.

३००६ (१२ : ११, १ जून ५३, १७४)
मुंबई गॅस कंपनी धुराचे दिवे लावून उजेड करण्यासाठी भांडवल जमवीत आहे. (प्रभाकरवरून)

३००७ (१२ : ११, १ जून ५३, १७४–१७५)
वेलिंग्टन एण्डाउमेंट फंड : विलायतेहून लष्करी खात्यात येणाऱ्या लोकांच्या शिक्षणाकरिता वेलिंग्टनच्या नावे निधी जमा झाला आहे. ही रक्कम ७७ हजारांवर आहे. या पैशाचा उपयोग विद्यावृद्धीकडे करावयास हवा होता.

३००८ (१२ : ११, १ जून ५३, १७५)
'वर्तमानदीपिका' कार लिहितात : सत्पात्री दान करण्याऐवजी भागवताच्या सभारंभावर कुपात्री दान झाले. पैका मिळाली की, शास्त्रीलोक काहीही करण्यास तयार होतात. विद्वान पंडितांना सोडून नातलगांना संधी दिली गेली, हे वाईट होय.

३००९ (१२ : ११, १ जून ५३, १७५)

एल्फिन्स्तन शाळेतून मराठी व गुजराथी प्राथमिक विभाग मोडून टाकण्याचा बोर्डाचा विचार आहे. असे करण्याने मुले सावकारी शाळेत जातील व सरकारचा खर्च कमी होईल, अशी बोर्डाची अटकळ दिसते. पण असे केल्यामुळे विद्यार्थ्यांना स्वभाषेचे ज्ञान राहाणार नाही. बोर्डाची कृती अगदी अयोग्य आहे. (धुमकेतू मे २० वरून)

३०१० (१२ : ११, १ जून ५३, १७५–१७६)

गरीब विधवांचा उदरनिर्वाह व मुलांचे शिक्षण यांकरिता परभू मंडळीने ७०० रुपये जमविले आहेत.

३०११ (१२ : ११, १ जून ५३, १७६)

गरीब विधवांचे पोषण होऊन त्यांच्या पुर्नविवाहाची तरतूद व्हावी, यासाठी बंगालमध्येही मोठा निधी जमा झाला आहे. (वर्तमानदीपिकावरून)

३०१२ (१२ : ११, १ जून ५३, १७६)

पोलिसांनी फणसवाडीत छापा घालून एक जुगाराचा अड्डा पकडला. पण अनुभव असा आहे की, प्रत्यक्ष खटले मात्र भरले जात नाहीत. सरकार स्वतःच कायदा पाळीत नाही !

३०१३ (१२ : ११, १ जून ५३, १७६)

आंग्र्यांच्या कुलाबा संस्थानात मुंबई सरकारचे कायदे सुरू झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३०१४** (१२ : १२, १५ जून ५३, १७७)
गोविंद नारायणांनी लिहिलेल्या 'सत्यनिरूपण' पुस्तकाचे गुजराथी भाषांतर प्रसिद्ध झाले. पृ. १०० (अ. मि. छापखाना)

**३०१४ अ** (इंम : १७७)

**३०१५** (१२ : १२, १५ जून ५३, १७७)
बुद्धिवर्धक सभेने देशाटनविषयक ग्रंथ गुजराथीमध्ये प्रसिद्ध केला. मुशाफरीचे अनेक फायदे त्यात वर्णन केले आहेत. (पृ. ९७)

**३०१५ अ** (इंम : १७७)

**३०१६** (१२ : १२, १५ जून ५३, १७८–१७९)
वायव्य प्रांतात भीमसिंग नावाच्या गृहस्थास शेजाऱ्याच्या भांडणात आपले मूल आपटून मारल्याबद्दल फाशीची शिक्षा झाली. हा खटला सदर अदालतीत गेला असता काजी म्हणाले की, स्त्री व मूल ही धर्माप्रमाणे स्वतःची मालमत्ता असतात, म्हणून त्यांनी फाशीची जन्मठेप केली. पण हा न्याय चमत्कारिक आहे. खुनाबद्दल फाशी हवीच.

**३०१६ अ** (इंम : १७७–१७८)

**३०१७** (१२ : १२, १५ जून ५३, १८०–१८१)

बी पेरताना लहान दिसले, तरी त्याचा वृक्ष सर्वांना छाया देतो. नगरचे खिस्ती लोक दर १५ दिवसांनी एकत्र जमून धर्मकार्याचा विचार करतात. देणग्याही जमवितात. गुजराथी शुभवर्तमान प्रसारक मंडळीनेही देणग्या जमविल्या. घ्यावे यापेक्षा द्यावे हे चांगले आहे.

**३०१७अ** (इंम : १७९–१८०)

**३०१८** (१२ : १२, १५ जून ५३, १८१–१८२)

मोरशास्त्री साठे सुरत येथे राहात असून बरोबर शुद्धोदक घेऊन ते रेल्वेने प्रवास करतात. रेल्वे कंपनीस काही लोकांनी विनंती केली आहे की, हलालखोर शूद्र मळक्या कपड्यात असतात, म्हणून त्यांना रेल्वेत प्रवेश देऊ नये. कंपनी असे काही करीत नाही. तरी साठ्यांचा धर्म कसा काय रक्षिला जातो, हे समजत नाही. (प्रभाकरवरून)

**३०१८अ** (इंम : १८१)

**३०१९** (१२ : १२, १५ जून ५३, १८३–१८४)

सूर्याच्या रथाचे सात घोडे, मेरू पर्वताभोवती सूर्याचे भ्रमण, सारथी अरूण, हे वर्णन भ्रामक आहे. सूर्य हा स्थूल पदार्थाचा गोल असून मेघातून किरण येतात. चंद्रही मेरूभोवती प्रदक्षिणा घालतो. सासऱ्याच्या शापामुळे त्यास क्षय व वृद्धी होते, या कल्पनाही खोट्या आहेत. ताऱ्यांना आकाशवासी प्राणी समजणे किंवा अमृतमंथनातील प्रसंगावरून राहूने सूर्यचंद्रास गिळणे, हेही खोटेच आहे.

**३०१९अ** (इंम : १८२–१८३)

**३०२०** (१२ : १२, १५ जून ५३, १८६–१८८)

खिस्ती देवभक्तांवर आरोप करण्यात विचारलहरी पत्र प्रमुख दिसते. परंतु बायबलातील गोष्टी संपूर्ण खरेपणाने लिहिल्या आहेत. पापात उत्पन्न झालेल्या माणसावर दया करण्यासाठी शास्त्र प्रगट झाले. आपल्या लबाडीचे फळ अब्राहमासही भोगावे लागले. ऋषी व साधू पुण्यवान आहेत, ही समजूत चुकीची आहे. हिंदू पुराणांत देवांच्या पापांचे वर्णन आहे. खिस्ती शास्त्रातील देवभक्त खरे निष्पाप होते.

**३०२० अ** (इंम : १८४–१८५)

**३०२१** (१२ : १२, १५ जून ५३, १८८)

कंपनीच्या नवीन सनदेबाबत चौकशी-समिती पार्लमेंटला अहवाल देईल.

**३०२२** (१२ : १२, १५ जून ५३, १८८)

मॅडम् डलहौसी जलमार्गाने स्वदेशी जात असता रोगी होऊन मृत्यु पावल्या.

**३०२३** (१२ : १२, १५ जून ५३, १८८–१९०)

डिसेंबर १८१५ पासून भारतात मिशनचा छापखाना चालू आहे. हालंड् देशातील लारेन्स कास्तर यांनी लाकडाच्या सालीचा उपयोग करून छपाईचा शोध लावला. (सन् १४४०.) त्याचा शिष्य जान फास्तस याने ही युक्ती जर्मनीत नेली व श्रेय स्वतःकडे घेतले ! छापण्यामुळे ज्ञानाची वृद्धी होते. परंतु हल्ली नास्तिक मते शिव्यागाळीसह पसरविली जात आहेत, म्हणून चिंता वाटते. ही दुधारी तलवार मालकाचाच गळा कापील. मिशनरी लोक फक्त सदाचरणी पुस्तके तेवढीच छापतात.

३०२४ (१२ : १२, १५ जून ५३, १९०–१९१)

सिंदमध्ये निळीचे उत्पादन सुरू झाले असून बंगालपेक्षा जास्त नफा मिळेल.

३०२५ (१२ : १२, १५ जून ५३, १९०–१९१)

वाफेच्या गाडीत भंगी लोकांना प्रवेश मिळणार नाही.

३०२६ (१२ : १२, १५ जून ५३, १९०–१९१)

मे १८५३ मध्ये मुंबईत १२५७ जणांचा मृत्यू झाला.

३०२७ (१२ : १२, १५ जून ५३, १९०–१९१)

वाळवे पेठ्याच्या मामलेदारास तीन वर्षे तुरुंगवास व १५ हजार रु. दंड झाला.

३०२८ (१२ : १२, १५ जून ५३, १९२)

एक वाचणारा लिहितो की : हल्ली विचारलहरी मुंबईस येतच नाही. ती दुखण्यात पडली असावी. आपल्या धर्मात सहस्त्रावधी चुक्या व खोटी मते असताना दुसऱ्याच्या डोळ्यातील कुसळ शोधण्याचा रिकामा उद्योग तिने केला. तिला 'निंदालहरी' म्हणावयास हवे.

३०२९ (१२ : १२, १५ जून ५३, १९२)

'लोकहितेच्छू' आपल्या पत्रात म्हणतो की : गुजराथी सप्ताहामध्ये नीट परीक्षा झाली नाही. अक्षरशत्रूही पसंत होऊन भागवत-सप्ताहात बसले. खऱ्या विद्वानांची कुचंबणा झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३०३०** (१२ : १३, १ जुलाई ५३, १९३)
पुनर्जन्मनिर्णय : रे. रामकृष्ण विनायक मोडक यांनी लिहिलेले हे पुस्तक २० पृष्ठांचे आहे. यातील विचार मोठा व उपयोगी आहे. रचना चांगली आहे. बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी मुंबई.

**३०३० अ** (इंम : १९३)

**३०३१** (१२ : १३, १ जुलाई ५३, १९३–१९४)
पश्वदि भूतदया : कोल्हापूरचे रे. वेल्डर यांनी हा ग्रंथ लिहिला. काही भाग भाषांतरित आहे. पृ. ९९, (मराठी). बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, मुंबई, किंमत ३ आणे. या पुस्तकांत कित्येक पशूंची सुंदर चित्रे काढली आहेत.

**३०३१ अ** (इंम : १९३)

**३०३२** (१२ : १३, १ जुलाई ५३, १९५–१९७)
समुद्रमंथनाच्या प्रसंगाने समुद्रात भरती ओहोटी सुरू झाली, असे पुराणे म्हणतात! गंगेची ओहोटी म्हणजे समुद्राबद्दलाची लाज होय, असेही विधान आहे! ऋग्वेद सांगतो की, चंद्रापासून पाऊस येतो! अष्टदिग्गज पाणी शिंपतात, अशी समजूत आहे! वीज म्हणजे आकाशवासी यक्षिणींच्या अंगाचा प्रकाश, तर भूकंप म्हणजे शेषाची हालचाल! देवांची सभा भरली की, चंद्रास खळे पडते, अशी भ्रामक कल्पना हिंदूंजवळ आहे.

**३०३२ अ** (इंम : १९४–१९५)

**३०३३** (१२ : १३, १ जुलाई ५३, १९८–१९९)

मुंबई बेटात कैफाचा कारखाना मातला आहे. कामगार गिरणीतून येतानाच दारूच्या पिठ्यात शिरतात. झिंगून रस्त्यात पडतात. या कैफरूप राक्षसापासून सरकार आपली पिशवी भरते. यातून बेबंदराज्य व झोटिंग बादशाही निर्माण होईल.

**३०३३ अ** (इंम : १९७–१९८)

**३०३४** (१२ : १३, १ जुलाई ५३, १९९)

हिंदूमताप्रमाणे आत्मा कुडी बदलतो व पुन्हा जन्म घेतो. म्हणजे देह नवा असला, तरी आत्मा जुनाच असतो. पण स्मरण हा आत्म्याचा गुण आहे, देहाचा नव्हे. ज्याअर्थी माणसाला पूर्वीच्या जन्माचे स्मरण राहात नाही, त्याअर्थी पुनर्जन्माची कल्पना चूक आहे. (पुनर्जन्मनिर्णय)

**३०३५** (१२ : १३, १ जुलाई ५३, १९९)

चीनमध्ये मोठे बंड माजले असून दुसरे राज्य स्थापित होणार आहे. बंडखोर मूर्तिपूजा मानीत नाहीत. अफूच्या व्यापाराला त्यांचा सक्त विरोध आहे. ते ख्रिस्ती शास्त्र घेऊन फिरतात, तरी त्यांचा शास्त्राचा अभ्यास कमी आहे. त्यांनी मिशनऱ्याजवळ राहून अभ्यास केला पाहिजे.

**३०३६** (१२ : १३, १ जुलाई ५३, २००–२१०)

'गायनविद्याः' गायन हे मनोरंजक म्हणून सर्वांस सहज प्रिय आहे. मंदिरात समुदायामध्ये आणि घरी नित्याच्या प्रार्थनेत तालबद्ध गायन आवश्यक आहे. म्हणून काही गाण्याच्या पद्धती दिलेल्या आहेत. चार आण्यास प्रत मिळेल.

**३०३६ अ** (इंम : १९९–२००)

**३०३७** (१२ : १३, १ जुलाई ५३, २११–२१२)

पुनर्विवाह हे कल्याणकारक व सुधारणुकीचे कृत्य आहे. सती जाण्याचे दुःख एकदाच होत असे. वैधव्य हे मृत्यूपर्यंत जाळणारे दुःख आहे. म्हणून पुनर्विवाह प्रतिबंधरूप विषवृक्ष तोडून टाकला, तरच आत्महत्या व बालहत्या वगैरे अनर्थ कमी होतील. कोणीतरी पुढारी झालेच पाहिजे. अर्थात जगन्नाथ शंकरशेट किंवा गंगाधरशास्त्री फडके यांचे कार्य विसरता येणार नाही.

**३०३८** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१२–२१३)

टाचणी हा क्षुल्लक पदार्थ दिसत असला, तरी अलीकडे तो एक स्वतंत्र व्यापारच झाला आहे. टाचण्यांच्या कारखान्यात अनेक माणसे काम करीत असतात. एका माणसाने काम केले, तर दसपट वेळ लागेल. यावरून अंगमेहनतीपेक्षा यंत्रादिकाची हिकमत मोठी आहे, हे लक्षात येते.

**३०३९** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१३)

'सर जमशेदजी उद्योगशाळा' : सर जमशेद यांनी उद्योगशाळेसाठी १ लाखाची देणगी दिली. सरकारने बाकी तरतूद करावी, अशी त्यांची अपेक्षा आहे. (धुमकेतूवरून)

**३०४०** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१३)

अटक नदी ओलांडू नये, अशी मूर्ख समजूत पडून गेली आहे. परंतु 'देशाटन' ग्रंथावरून असे दिसते की, पूर्वीचे हिंदु फार लांबच्या मुलखामध्ये मुशाफरी करीत होते. ते अज्ञानी किंवा संकुचित बुद्धीचे नव्हते. स्पेनपर्यंत त्यांनी प्रवास केला. सध्याही काही ब्राह्मण, वाणी व भाटे आशिया व आफ्रिका खंडांत राहातात. विलायतेस गेलेल्या एका गुजराथ्यास लोकांनी संतोषाने परत जातीत घेतले. (धुमकेतूवरून)

**३०४१** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१४)

कलकत्त्याचा एक माणूस बाप्तिस्मा घेत असताना नातेवाईकांनी त्यास फूस लावून नेले, पण त्याने परत येऊन आग्रहाने दीक्षा घेतली. नातेवाइकांच्या वागण्याने त्यांच्या धर्मासच बट्टा लागला.

**३०४२** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१४)

धारच्या पवारांनी गवरनर रूदव्यास वाकब यांचा दापोडीस सत्कार करून त्यांना मेजवानी दिली. मेजवानीची व्यवस्था फार उत्तम होती. तोफांच्या गजरात पानसुपारी झाली.

**३०४३** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१४)

संगमनेरच्या मुनसफाने आपल्या कन्येस शिकविण्यासाठी एका शिक्षकाची नेमणूक केली. या घटनेने देशहितेच्छू मंडळींना संतोष झाल्यावाचून राहणार नाही. (ज्ञानप्रकाशवरून)

**३०४४** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१४)

बागलकोटजवळ गलगला येथे पाण्याची टंचाई असल्यामुळे कृष्णा नदीतून पाणी उपसून शेतीस देण्याची योजना इंजिनियर वाल्टर स्काट यांनी तयार केली.

**३०४५** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१४–२१५)

आनंदराव खारकर लिहितात की : देवीभागवत व विष्णुपुराण यांसह १८ पुराणांचे दान करावे. इतर पुराणांना व्यासोक्तीप्रमाणेच मान दिला पाहिजे.

**३०४६** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१५)

मागल्या वर्षात खिस्ती शास्त्रप्रसारक मंडळीने १० लाख ९१ हजार रुपये जमविले आणि १ कोटी १६ लक्ष ८७ हजार ९४० शास्त्राच्या प्रती छापून देशोदेशी रवाना केल्या.

**३०४७** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१५–२१६)

तिनवेल्ली मिशनमध्ये गेल्या वर्षी एक हजारांनी खिस्ती धर्म स्वीकारला.

**३०४८** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१५–२१६)

कलकत्यात एका गृहस्थाने आपल्या विधवा मुलीच्या पुनर्विवाहाकरिता पाचशे जणांच्या अनुकूलतादर्शक सह्या मिळविल्या.

**३०४९** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१५–२१६)

काशीच्या परिसरात पटकीचा वाखा सुरू झाला.

**३०५०** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१५–२१६)

सर जमशेटजी जीजीभाई यांस सत्तरावे वर्ष लागले.

**३०५१** (१२ : १३, १ जुलाई ५३, २१६)

मुंबईमध्ये ५९४ सरकारी कामदार असून त्यांना वर्षास २४० रुपयांपासून ६००० रुपयांपर्यंत वेतन मिळते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १४, मुंबई, १५ जुलाई १८५३

**३०५२** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २१७)

गव्हर्नरच्या कौन्सिलचे सभासद नामदार बेल यांचा मृत्यू झाला. त्यांनी ३६ वर्षे चाकरी केली. त्यात एकदाही रजा घेतली नाही.

**३०५२ अ** (इंम : २१७)

**३०५३** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २१७–२१८)

'एलफिन्स्टन विद्यालयाचा वार्षिक रपोट' : १८५२ च्या अहवालावरून दिसते की, शाळेचे काम फार सुंदर चालले आहे. विद्येची साधने भरपूर व चांगली आहेत. एकंदर ८७१ विद्यार्थी शिकतात.

**३०५३ अ** (इंम : २१७)

**३०५४** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २१९–२२२)

पुण्यातील पाठशाळेच्या वार्षिक समारंभात धारचे राजे पवार यांचे हस्ते बक्षीसे देण्यात आली. याप्रसंगी मि. वार्डन म्हणाले : इंग्रजीबरोबर संस्कृतचा व मराठीचा अभ्यास केलाच पाहिजे. शिकलेल्या लोकांना इंग्रज सरकार मोठ्या हुद्याच्या जागा देते. स्वतःच्या भाषेकडे दुर्लक्ष न करता स्वतःची पात्रता वाढवावी. ईश्वराचे भय बाळगून नीतीने वागावे. लहानपणी लग्न करण्याच्या रीतीचे योगाने शाळेत कन्यांची संख्या कमी पडत असते, ही दुःखाची गोष्ट आहे. खेडाऱ्या शाळेवर जाऊन शिकविण्याइतके ब्राह्मणांनी उदारमतवादी बनले पाहिजे.
(धुमकेतूवरून)

**३०५४ अ** (इंम : २१८–२१९)

**३०५५** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २२२)

मंगळवारी ५ वे तारखेपासून सेशनचे काम सुरू झाले. एकंदर २४ मुकदमे आहेत. ३६ असामी केदी आहेत.

**३०७६** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २२४–२२७)

अम्मलवर्जक सभा : या सभेत रे. बोएन म्हणाले की, दारूचे व्यसन भरतखंडामध्ये वाढत चालले आहे. दारूबाजास शुद्धीवर आणावे, एवढेच पुरेसे नाही. आपल्यामधले सुधारक या कामासाठी पुढे येत नाहीत. दारूच्या दुर्व्यसनामुळे या देशाची एवढी नासाडी होईल की, इंग्रजांना हा देश सोडून जावे लागेल. चीन देशातही अफिणीमुळे लोकांची दुर्दशा झाली. ईश्वरावर विशवस ठेवून सुधारणेचा प्रयत्न करावा. मग वाळवंटातही हरूळ रुजेल.

**३०७६ अ** (इंग : २२२–२२४)

**३०७७** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २२८–२३६)

संस्कृत ग्रामर : संस्कृत मूळाक्षरे व व्याकरण तपशिलाने दिली आहेत. (इंग्रजी–देवनागरी.)

**३०७८** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २३६)

एप्रिल १८५४ पासून कंपनीस नवी सनद देण्यात येणार आहे. इंग्लंडचे पंतप्रधान म्हणाले की : विश्वासू व चांगले सरकार नेमणे आवश्यक आहे. भरतखंडातील परिस्थिती सुधारत आहे. भारतीय सभांकडून आलेल्या अर्जामध्ये काही गोष्टी अतिशयोक्त आहेत. इंग्रज सरकार कोणाच्याही धर्मात हात घालणार नाही. लोकांच्या कल्याणासाठी अनेक कायदे केले आहेत.

**३०७९** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २३९–२४०)

मिस्तर लुबार्ड यांचे सस्पेन्शन रद्द करून त्यांस कामावर घेणार.

**३०८०** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २३९–२४०)

१२ मे रोजी सावंतवाडीस भूकंप झाला.

**३०६१** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २३९–२३९)

कृष्णा नदीच्या पुराने माहुलीत व कराडमध्ये फार नुकसान झाले.

**३०६२** (१२ : १४, १५ जुलाई ५३, २४०)

ब्रह्मदेशचा राजा इंग्रजांशी तह करण्यास तयार झाला आहे. सगळा देश तो इंग्रजांच्या ताब्यात देणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १५, मुंबई, १ ऑगस्ट १८५३

**३०६३** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २४१)

सर जमशेटजी जिजीभाई नावाची पार्शी शाळा आहे. एकूण ८६४ विद्यार्थी शिकतात. शाळेचे काम चांगले चालते. लहानपणी लग्ने करण्याच्या पद्धतीमुळे स्त्रीशिक्षण मात्र फार कठीण आहे.

**३०६३ अ** (इंम : २४१)

**३०६४** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २४२)

सर्व जातींना संस्कृत शिकविल्याबद्दल अभ्यंकर व गोखले या शास्त्रीद्वयावर पुण्यातले ब्राह्मण बहिष्कार घालणार आहेत. खरे तर असल्या भिकार ग्रामण्यात काही हशील नाही.

**३०६४ अ** (इंम : २४१–२४२)

**३०६५** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २४४–२४६)

चीनची लोकसंख्या ३६ कोटी असून तेथे तार्तरी लोकांचे राज्य आहे. परंतु टैन ते या गृहस्थाने आपण प्राचीन राजवंशाचे वारस आहे असे जाहीर केले. त्याने ख्रिस्ती धर्म स्वीकारला आहे. पूर्वीचे राजे मूर्तिपूजक होते. याला मात्र प्रार्थनेच्या द्वारे तारण हवे आहे. त्यास दहा आज्ञा व ख्रिस्तगीते फार आवडतात. टैन ते याने मोठा प्रदेश जिंकला. तेव्हा, चीनची सुधारणूक लवकर होणार, यात शंका नाही.

**३०६५ अ** (इंम : २४२–२४४)

**३०६६** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २४७–२५०)

हरिविजय : आत्मज्ञानावर टीका : 'एक शोधक' याने वरील विषयावर निबंध वाचला. श्रीधर कवी स्वतःस ईश्वरप्रेरित कवी म्हणवीत असे. कृष्णाच्या विरहामुळे तळमळणाऱ्या गोपींचे त्याने विस्तृत वर्णन केले आहे. श्रीकृष्ण व गोपी यांच्या कथेत कामातुरपणा बराच आहे. उद्धव गोपींना सांगतो की, श्रीकृष्ण तुमच्या हृदयातच आहे. या कुस्वभावी स्त्रियांचे मन फिरण्याविषयी केलेल्या आत्मज्ञानात शुद्ध बोध काहीच दिसून येत नाही. त्यांच्या हृद्रूप दर्पणात 'खरा ईश्वर' अवतरलाच नाही.

**३०६७** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५०–२५३)

'एक ख्रिस्ती तरुण' लिहितो की : यात्रेत लोक मारामाऱ्या करतात. दारूचा अनर्थ तर फारच चालतो. निर्गुण ईश्वराची गाणी ऐकू येतात. परंतु वर्तन मात्र चमत्कारिक आहे. मल्हारी खंडोबास आपला नवरा मानणाऱ्या मुरळ्या वारी मागत असतात. यांना पापाच्या मार्गावरून फिरवून शाळेमध्ये शिक्षण दिले पाहिजे.

**३०६८** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५३–२५४)

'एक दुर्व्यसन द्वेष्टा' लिहितो की : सुज्ञ व सुशिक्षित लोकदेखील विवाहसमारंभात रांडांचे ताफे आणून त्यांची गाणी करतात. अज्ञाने या देशात व्यभिचारी व सोदे लोकांचीच वृद्धी होईल. अब्रूदार व वजनदार लोकांचे अनुकरण इतर लोक करीत असतात.

**३०६९** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५४–२५५)

'लोकहितेच्छू' लिहितो की : एका मुसलमान संताने मोहरांचा हंडा जमिनीतून काढून देण्याचे आमिष दाखवून हजारो रुपये उकळले आहेत. लोकांनी अज्ञान सोडून रसायनशास्त्राची माहिती मिळवावी.

**३०७०** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५५)

मुंबईत सोजीर लोक दारू पिऊन छाकटे होतात. पोलिसचे शिपाई अगतिक होऊन पहात असतात. मद्यपानरूप राक्षसीचे कायमचे उच्चाटन झाले पाहिजे.

**३०७१** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५५)

भीमेस पूर येऊन ५० माणसे वाहून गेली.

**३०७२** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५५)

बाजीराव पेशव्याच्या दत्तक पुत्राची पत्नी नवऱ्याशी बनत नसल्यामुळे नाशकास राहणार आहे.

**३०७३** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५५)

यंदा पावसाने १५०० घरांचे नुकसान झाले.

**३०७४** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५५)

गेल्या महिन्याच्या १९ वे तारखेस पुणे मुक्कामी सिमसनसाहेब मरण पावले.

**३०७५** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५६)

डाक्तर स्टिवेन्सन यांच्या अध्यक्षतेखाली बुक क्लबची सभा भरली. सभेचे कार्य उत्तम चालले. सभासद आनंद पावले. चिटणीस भवानी विश्वनाथ यांनी रपोट वाचला.

**३०७६** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५६)

मथुरा मिशनमध्ये एका मडमेचे थडगे आहे. लोक तिला देवी मानून नवस करतात. ती नवसाला पावते. याप्रमाणे लोकांत देव पुष्कळ झाले आहेत.

**३०७७** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५६)

विलायतेतील इंडिअन रिफार्म या संस्थेस लोकांनी शेकडो रुपयांच्या देणग्या दिल्या आहेत, परंतु या संस्थेपासून लोकांचे विशेष कल्याण होईल, असे दिसत नाही.

**३०७८** (१२ : १५, १ ऑगस्ट ५३, २५६)

एका चांभाराने राजासाठी उत्तम जोडा तयार करून दिला, तेव्हा राजाने मुकुटातील रत्ने जोड्यात गुंफून जोडा परत दिला. म्हणून म्हणतात : गव्हाराची देणगी, पायपोसाची परवानगी. तात्पर्य, कोणाचीही योग्यतेनुरूप स्तुती करावी.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

**ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १६, मुंबई, १५ ऑगस्ट १८५३**

---

**३०७९** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २५७)

स्कॉटलंडचे दोन मिशनरी मुंबईस येणार आहेत. तसेच, अमेरिकेतून एक मिशनरी नगरला येणार आहे.

**३०७९ अ** (इंम : २५७)

**३०८०** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २५७)

सर कावसजी जहांगीर यांनी गरीब पारशांच्या पोषणाकरिता तीस हजार रुपये दिले. जमशेदजी जीजीभॉय यांनी शिल्पशाळेस एक लाख रुपये दिले. म्हणून त्यांची स्तुती करणे योग्य आहे.

**३०८० अ** (इंम : २५७)

**३०८१** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २५८)

वर्तमानदीपिकेत एका लेखकाने म्हटले आहे की : एल्फिन्स्तनमध्ये बैबल शिकवीत नाहीत, म्हणून मिशनरी शत्रू आहेत आणि बंबे असोसिएशन स्थापन करणारे सिविलियनसुद्धा शत्रू आहेत. एकूण आपल्या मनात घोळणारे शत्रुत्व त्याने प्रगट केले आहे.

**३०८१ अ** (इंम : २५८)

**३०८२** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २५८)

दररोज पोलिसांकडे तक्रारी येतात आणि दोनतीन तरी दारूच्या झिंग्याना दंड होतो. तरी सरकारचे डोळे उघडत नाहीत.

**३०८२ अ** (इंम : २५८)

**३०८३** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २५९)

मिस्तर पेरी इंग्लंडमध्ये निवडणुकीस उभे राहिले आहेत. आपली मते सांगताना त्यांनी म्हटले की, शाळेत धर्म शिकवावा, याच मताचा मी पूर्वीही होतो व आजही आहे. परंतु ते विधान अगदी खोटे आहे. भारतात त्यांनी वेगळी मते सांगितली. असे कपट करणे सुज्ञांस उचित नाही.

**३०८३ अ** (इंम : २५८)

**३०८४** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६०–२६१)

वेदप्रकरण : ऋग्वेदात गंगेचे नांव एकदाच आहे आणि तेही सिंधू नदीच्या सन्मानासाठी आले. यावरून ऋग्वेदकाळात आर्य पंजाब प्रदेशात राहात असावे, असे दिसते. शेतीपेक्षा पशुपालनाचा व्यवसायच त्यांना महत्त्वाचा वाटे. लढाईत रथांचा उपयोग ते करीत असत. वन्य पशूंचा त्यांच्या कळपास फार त्रास होई.

**३०८४ अ** (इंम : २५९–२६०)

**३०८५** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६२–२६३)

रसायनविद्येविषयी प्राचीन हिंदूंना थोडकेच ज्ञान होते. हाडे व मांस पृथ्वीचा भाग आहे, असे ते समजत. प्रत्येक पदार्थात पंचमहाभूतांचे तत्त्व आहे, हे त्यांचे मत बरोबर नाही. आकाशापासून वायू, वायूपासून तेज, तेजातून रसबोध उदक, उदकापासून पृथ्वी, या कारणपरंपरेस तर्क काहीच नाही. असंभाव्य व तऱ्हेवाईक गोष्टी मात्र भरपूर आहेत.

**३०८५ अ** (इंम : २६१–२६२)

**३०८६** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६३–२६६)

मुंबईत अनेक जाती व कुळे येऊन राहिली. सुरतेहून पारशी आले. पेशवाई खालसा झाल्यावर ब्राह्मणही आले. मोगल व अरब व्यापारीही आले. मद्रासी कामगार येऊन राहिले. कोळी, भोंगळे भंडारी, पळशे जोशी, पाताने परभू, पाचकळशी, सुतार हे मात्र सर्वात जुने आहेत. अल्लाउद्दीनने साष्टी जिंकल्यावर परभू मुंबईस आले. साष्टीचे कित्येक कोळी-भंडारी खिस्ती झाले. मुंबईत राहावयास गेल्यावर त्यांच्या कोकणी भाषेत थोडा बदल झाला. भंडारी लोक भोंगळी नावाचे शिंग वाजवितात. (बोधसागरवरून)

**३०८७** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६६–२६७)

दिवाणांनी भारताचा कारभार चालवावा, या सूचनेवर पार्लमेंटात बहुमत आहे.

**३०८८** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६६–२६७)

ग्रेट ब्रिटनचा वसूल दोन कोटींनी वाढला.

**३०८९** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६६–२६७)

डाकेचे जहाज बुडाल्यामुळे दोन पंधरवाड्याची डाक बुडाली.

**३०९०** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६६–२६७)

विष्णुपुराण व ऋग्वेद यांचा तर्जमा करणाऱ्या डाक्तर विल्सनचे निधन झाले.

**३०९१** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६७–२६८)

कलकत्ता बंदर गाळाने बुजू नये, म्हणून योजना तयार होत आहे.

३०९२ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६७–२६८)

पुणे : पेशवाईचे वारस अमृतराव पेशवे यांनी दत्तकाचा वारसा रद्द करून आठ वर्षांचा मुलगा मांडीवर घेतला.

३०९३ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६७–२६८)

पेशावरला मिशन स्थापन होणार असून दहा हजाराची देणगी मिळाली आहे.

३०९४ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६७–२६८)

नगरच्या मुलकी परीक्षेस १२२ असामी बसले, पैकी २२ उत्तीर्ण झाले.

३०९५ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६८–२६९)

गेले शनिवारी डाक्तर आत्माराम पांडुरंग, रामचंद्र बाळकृष्ण व रघुनाथ नारायण शेणवी यांनी भर दुपारी आपल्या पत्नीस बरोबर फिरावयास नेले. बम्बे टैम्स पत्रात पत्र लिहिणाराने या संदर्भात असे लिहिले होते की, डाक्तर आत्मारामजीची पत्नी या टोळीबरोबर होती. यांनी सुधारणुकीचा आजचा परिपाठ पाडला, हे पाहून आम्हांस मोठा हर्ष होतो. (वर्तमानदीपिकावरून)

३०९६ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६९)

गोदावरी, कृष्णा व भीमा नद्यांचा पूर : या पुराने तैलंगण व पंढरपूर येथे मोठा नाश झाला. माणसे व गुरे वाहून गेली. सन १७९२ पेक्षाही हा पूर मोठा होता.

३०९७ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २६९–२७०)

नेक नामदार गव्हरनरांनी ५ ऑगस्ट ५३, दापोडीस मोठा दरबार भरविला. दरबारची व्यवस्था उत्तम होती. गवरनरांनी स्वतः विडे दिले. (ज्ञानप्रकाशवरून)

**३०९८** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७०)

मराठी ज्ञानप्रसारक सभा : 'एक श्रोता' पत्रात लिहितो की : बरेचसे सभासद नियमित येत नाहीत. ही दुःखाची गोष्ट आहे. सुज्ञांही अवश्य येत जावे.

**३०९९** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७०)

कंपनीच्या नव्या सनदेविषयी पार्लमेंटातील चर्चा वाचून कलकत्त्याचे बाबू लोक दुःखी झाले. ते नवा अर्ज पाठविणार आहेत. कायदे करणाऱ्या सभेत एतद्देशीय असावेत, असे त्यांना वाटते.

**३१००** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७०)

पुणेकर शेट-सावकार आपल्या अर्जात लिहितात की : दत्तकपुत्रास संस्थानिकाचा हक्क मिळावा. रस्त्याच्या कामावरून नवे कर बसवू नयेत. (धुमकेतूवरून)

**३१०१** (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७१)

'मुंबईकर रथकार' लिहितो की : रीम्यारेज सोसायटीची स्थापना म्हणजे सुर्योदयच आहे. रथकाराची पुतणी ११ वर्षांची विधवा आहे. लग्नानंतर सहाच दिवसांनी तिचा पती वारला. जर कोणास विधवांविषयी कळवळा असेल, तर त्याने तसे कळवावे. ज्ञानोदयकर्ता व्यक्तीचा पत्ता देऊ शकेल.

३१०२ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७१)

'एक हिंदू' लिहितो की : जालन्याजवळील आंबाडे गावी एका अरबाने वानर मारला. त्यानंतर बरेच वानर सरकारवाड्याजवळ घोटाळत होते. मामलेदार त्या दुःखी कपींची क्षमा मागू लागला. दुसऱ्या दिवशी वाड्यास आग लागून सर्वच भस्मसात् झाले. तो अरब तर एकाएकी सुजून बंब झाला. शेवटी गावकरी वानरांच्या पाया पडले. मारुतीस अभिषेकही झाला. या मिथ्यावादरूप व मूर्तिपूजारूप महद्रोगाच्या सपाट्यातून भरतखंड केव्हा सुटेल कोणास नकळे !

३१०३ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७२)

दारूचा अनर्थ दूर करण्याविषयी नेहमी अनेक पत्रे येतात. लोकांनी सह्या घेऊन सरकारास पुन्हा अर्जी द्यावी. तसेच दारूबाजांचे मन वळवावे. दुकानदारांनाही समजावून सांगावे.

३१०४ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७२)

बंडखोरांना चिनी जनता अनुकूल होत आहे. आता चीनमध्ये सुधारणूक होईल.

३१०५ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७२)

रे. फॅरन यांनी वार्षिक रपोट वचला. रे. क्यासीडी यांनी मनूच्या ग्रंथातले मद्यपाननिषेधाचे उतारे वाचून दाखविले.

३१०६ (१२ : १६, १५ ऑगस्ट ५३, २७२)

जुलै अखेर साताऱ्यास ५५ इंच पाऊस झाला. ऑगस्टमध्ये मात्र पाऊस पडला नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३१०७** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २७४–२७५)

बाळाराम गणपत शेणवी या गृहस्थाने प्रथम बाप्तिस्मा घेतला. नंतर एका वर्षाने महंमदी धर्म स्वीकारला. चारच दिवसांनी विष खाऊन आत्महत्या केली. तो एक प्रतिष्ठित कुटुंबातला होता. बिशपाच्या आज्ञेवरून त्याने भांग व अफू खाणे सोडले होते. कैफी माणूस ख्रिस्ती असूच शकत नाही. बाळारामाच्या हकीगतीवरून असा निष्कर्ष निघतो की, धर्म बदलणाराने प्रथम नीट विचार करावा. ज्याची वागणूक पवित्र आहे व मन खंबीर आहे, त्यानेच धर्म बदलावा. बाळाराम नावाचाच ख्रिस्ती ठरला.

**३१०७अ** (इंम : २७३–२७४)

**३१०८** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २७६–२७७)

चिनी बंडखोरांनी नवे पंचांग तयार केले आहे. शुभाशुभ विचार, सणवार, त्यातुन गाळले आहेत. भविष्यावर त्यांचा विश्वास नाही. रविवार मात्र पवित्र मानला. कारण तो देवांच्या विश्रांतीचा दिवस आहे. एका अमेरिकन मिशनेरीने त्यांच्यात ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला.

**३१०८अ** (इंम : २७५–२७६)

**३१०९** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २७९)

पेरीसाहेबाच्या बोलण्यात मोठाच फेरफार झाला. मुंबईमध्ये असतांना ते म्हणत की, शाळेत धर्म शिकवू नये. लिव्हरपूरला ते सांगतात की, पहिल्यापासून मी सांगत होतो की, शाळेत धर्म शिकवावा. सुज्ञ लोकांना त्याच्या बोलण्यातली विसंगती समजली आहे.

**३१०९ अ** (इंग : २७७-२७९)

**३११०** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८०-२८२)
पळशांबरोबर कोणताही ब्राह्मण अन्नव्यवहार करीत नाही, तरी ते स्वतःला ब्राह्मण म्हणवितात. पाताणे प्रभू सूर्यसोमवंशी आहेत, असी समजूत आहे. ब्राह्मण मात्र त्यांना अत्यंत हीन मानतात. भीम राजाने माहीमचे राज्य स्थापन केले. त्याच्या वंशावळीने कोरलेल्या शिलालेखात विसंगत माहिती फार आहे. पाताणे प्रभूंनी कधी सरदारकी केली, याचा पुरावा नाही. माहीमच्या बखरीत काही प्रभूंचा उल्लेख आढळतो. भीमराजाचा पुत्र प्रतापशा आणि चौलचा राजा नागरशा यांचे युद्ध झाले होते. भंडारी भोंगल्यांच्या शूरपणामुळे नागरशाचा पराभव झाला. पुढे वसई पोर्तुगीजांच्या ताब्यात आली.
(बोधसागरवरून)

**३१११** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८२-२८३)
न्यायशास्त्राचे मते परमाणु अनादि आहेत. त्यांच्यातून सृष्टी तयार झाली. सांख्यमतानुसार पुरुष व प्रकृती एक आहेत. प्रकृतीकडून सर्व उत्पन्न झाले.

**३११२** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८३-२८४)
शिवाच्या प्रेरणेने प्रकृतीने सत्व-रज-तम हे तीन गुण उत्पन्न केले. रजोगुणातून ५ प्रकारची अविद्या तयार झाली. त्यातून भौतिक सर्ग उत्पन्न झाला. नंतर दैविक व मानुष सर्ग प्रगट झाले. प्रथम सनत्कुमार व नंतर ९ ऋषी जन्मले. त्यांच्यासाठी स्त्रिया उत्पन्न केल्या.

**३११३** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८३-२८४)
ब्रह्मदेवाच्या शरिरापासून नऊ ऋषी उत्पन्न झाले. त्याच्या क्रोधातून शिव जन्मला. त्याच्या मुखापासून देव, वक्षस्थळापासून असुर, कटीपासून मनुष्ये, हे जन्मले.

**३११४** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८४)

एक दारूबाज आपल्या पाळलेल्या वानरास दारू पाजण्याचा प्रयत्न करीत असे. पण ते वानर कपाळास हात लावून नकार देई. त्यास बंदुकीचा धाक दाखविला, तेव्हा तो वानर निघून गेला. माणसापेक्षा वानरास जास्त अक्कल असते.

**३११५** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८४–२८५)

कंपनीस नवी सनद देताना कायदेमंडळात एक हिंदू व एक मुसलमान घ्यावा, अशी पार्लमेंटात चर्चा चालू आहे.

**३११६** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८४–२८५)

एवढा खर्च करून ब्रह्मदेश घ्यायला नको होता, असे लार्ड एलेन्बरोचे मत आहे.

**३११७** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८४–२८५)

सर अर्स्किन पेरीस निवडून देण्यास लिव्हरपूलचे नागरिक तयार नाहीत. त्याची मेहनत वाया गेली.

**३११८** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८५)

एतद्देशी राजेरजवाड्यांजवळ ३ लक्ष ९८ हजार ९१८ लोक शिपाई म्हणून आहेत. खालसा मुलखात २ लक्ष, ८९ हजार ५२९ शिपाई व अधिकार आहे. (प्रभाकरवरून)

**३११९** (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८६)

'नेटिव इम्प्रुव्हमेंट सभेस जाणारा' लिहितो की : विधवा पुतणीचा पुनर्विवाह करू इच्छिणाऱ्या नेटिवाने आपले नाव व पत्ता जाहीर करावा. माझा मित्र अशा विवाहास तयार आहे.

३१२० (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८६)

विचारलहरीचा 'वाचणारा' लिहितो की : यंदा पाऊस फार पडला. लोकांची बहुत नासाडी झाली. पुण्यामध्ये नदीस एवढा पूर आला की १०–२० वर्षांत असे पाणी आले नव्हते. पुण्यात मोठी स्वच्छता झाली. त्यानेच की विचारलहरी पुण्यास येत नाही. पावसामुळे व थंडीमुळे तिचे सांधे धरले असावेत! (विचारलहरीसंबंधी एका वाचकाचे उपरोधपूर्ण पत्र)

३१२१ (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८७)

'दुःख पावणारा' लिहितो की : मराठी ज्ञानप्रसारक सभेस क्षयरोग जडला आहे. तिची अवस्था दुर्घट झाली. माझे पूर्वीचे मित्र जर सभेत असते, तर ही वेळ आली नसती.

३१२२ (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८७–२८८)

बंडामुळे चीनचा व्यापार थंडावला आहे. नवी राजवट आल्याशिवाय व्यापार सुरळीत होणार नाही.

३१२३ (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८७–२८८)

ग्रामण्याच्या भीतीने एका बंगाल्याने पुनर्विवाहाचा विचार सोडला.

३१२४ (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८७–२८८)

प्रभाकरकर्ता लिहितो की : दारूबाजापेक्षा जलचर म्लेंछ बरे आहेत. ते निदान दारूबद्दल गौरवाने बोलत नाहीत.

३१२५ (१२ : १७, १ सप्टेंबर ५३, २८७–२८८)

वाई क्षेत्रात अतिवृष्टीने दहा हजारांचे नुकसान झाले.

**३१२६** (१२ : १७, १ सप्तेंबर ५३, २८७–२८८)

सदर अदालतीचे वकील गणेश नारायण यांची सनद रद्द झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १८, मुंबई, १५ सप्तेंबर १८५३

---

**३१२७** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, २८९–२९०)

धारवाड-मंगलोरमध्ये ईश्वराच्या कृपेने जर्मन मिशनचे कार्य उत्तम रीतीने चालले आहे. १६९९ ख्रिस्ती लोक असून ७८० नेहमी मंडळीत असतात. मिशनच्या शाळेत १६९२ मुलगे-मुली शिकतात. मिशनच्या व्यवस्थेसाठी गतवर्षी ६४,८९३ / – रुपये खर्च झाला.

**३१२७ अ** (इंम : २८८)

**३१२८** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, २९१–२९४)

हरी केशवजीने 'यात्रिक क्रमण' हा तर्जमा सन १८४१ त प्रसिद्ध केला. आता त्याची दुसरी आवृत्ती निघाली. या पुस्तकाने गंभीर लोकांना आनंद वाटतो व आनंदी लोकांस ज्ञान मिळते. या पुस्तकाचा कर्ता जान बन्यन् हा प्रथम दुराचरणी होता. नंतर तो ईश्वरभक्त बनला. धर्मकृत्याने व स्वपुण्याईने तारले जाण्याचा त्याने प्रयत्न केला. इंग्रज सरकारचा रोष पतकरून उपदेश चालू ठेवला. तुरुंगवासही सोसला. बुद्धी व विश्वास यांच्याविरुद्ध कधीही वागला नाही. शरीर कैदेत असले, तरी मन स्वतंत्र होते. तुरुंगातच बन्यनने हे पुस्तक लिहिले.
(२५० पृष्ठे, बॉंबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, १००० प्रती. किं. ८ आणे, १० आणे दुसरी आवृत्ती)

**३१२८ अ** (इंम : २९०–२९१)

**३१२९** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, २९५)

सर्वोत्तम सखाराम परभू यांनी (सृष्टीतील चमत्कार) हा तर्जमा केला व फेरबँकसाहेबांनी काही फेरफार करून प्रसिद्ध केला. कवड्या, झाडे, जीवजंतू, वगैरेंचे चमत्कारिक वर्णन संवादरूपाने या पुस्तकात आढळेल. मराठी, पृ. १९१, बाँबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, १००० प्रती, किं. ८ आणे, १० आणे. (बांधणीप्रमाणे)

**३१२९ अ** (इंम : २९४–२९५)

**३१३०** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, २९७–२९८)

अस्पृश्यांना शिकविल्याशिवाय या देशाचे हित होणार नाही. हे ओळखुन जोतीराव फुले व त्यांचे जिवलग मित्र यांनी एक मंडळी स्थापन केली. शिक्षण हे एक सत्कर्मच आहे. माहिती कमी असल्यामुळे एतद्देशीय लोक अज्ञानांधकारात, कुकर्मात व परतंत्र नरकात बुडाले. त्यांस सुधारणूक पाहिजे.

मुख्यस्थानी – सदाशिव बल्लाळ गोंड्ये
चिटणीस – मोरो विठ्ठल वाळवेकर
खजीनदार – सखाराम येशवंत परांजपे
सभासद – जोतिराव गोविंद फुले, बाबाजी मनाजी ढेंगळे

ही सभा १० सप्तेंबर १८५३ रोजी झाली. असे मोरो विठ्ठल वाळवेकर कळवितात.

**३१३० अ** (इंम : २९७)

**३१३१** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, २९८)

कंपनीच्या नव्या सनदेच्या बीलाचे तिसरे वाचन लवकरच पार्लमेंटात होणार.



H-160—17

**३१३२** (१२ : १८, १५ सप्टेंबर ५३, २९८)

रशिया व तुर्क यांच्यात लढाई होण्याचा संभव आहे.

**३१३३** (१२ : १८, १५ सप्टेंबर ५३, २९८)

उदेपूरचे अर्धे राज्य इंग्रजांनी पूर्वीच घेतले. तेथील अंदाधुंदीमुळे उरलेले राज्यही खालसा होणार.

**३१३४** (१२ : १८, १५ सप्टेंबर ५३, २९९–३००)

सत्यासत्यशोधक प्रवासी लिहितो की : वैष्णव ब्राह्मण ढोंगी असतात. स्त्रियांनाही ते तप्तमुद्रा घेण्याची सक्ती करतात. दक्षिणेचा करार आधी करून पैसे उकळतात. मुद्रांचेही सोने, रुपे आणि तांबे, असे दर्जाप्रमाणे धातूंचे प्रकार आहेत. हा धडधडीत भोंदूपणा व लूट आहे. एतद्देशी हिंदू अज्ञानसागरात बुडत आहेत.

**३१३५** (१२ : १८, १५ सप्टेंबर ५३, ३००)

थोडी दारू घेतली, तर काही बाधा नाही, असे लोक समजतात. पण डॉक्टरांचे मत असे आहे की, दारू अजिबात वर्ज केली, तर मुळीच बाधा होणार नाही.

**३१३६** (१२ : १८, १५ सप्टेंबर ५३, ३०१–३०३)

माहीमच्या बखरीत भीम राजाच्या ताब्यातील गावे व त्यांचा वसूल यांचे वर्णन आढळते. भीमाख्यान ग्रंथात म्हटले आहे की, पाचकळसे लोक हे सोमवंशी क्षत्रिय आहेत. भीमराजाचा वंश संकरज आहे, असाही उल्लेख आहे, तर वसईच्या लेखात म्हटले आहे की, भीमराजा शूद्र होता. पाताणे, पळशे, क्षत्रिय, यांच्याबद्दल सुसंगत माहिती मात्र कुठेच मिळत नाही. (बोधसागरवरून)

**३१३७** (१२ : १८, १५ सप्टेंबर ५३, ३०३–३०४)

ब्रह्मदेशात महागाई वाढत आहे.

**३१३८** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, ३०३-३०४)

विलायती कोळसा महाग झाला, म्हणून बंगालच्या खाणीतून कोळसा आणणार.

**३१३९** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, ३०३-३०४)

बुंदेलखंडावर इंग्रज अधिकारी नेमला जाईल.

**३१४०** (१२ : १८, १५ सप्तेंबर ५३, ३०३-३०४)

श्रीभवानी विश्वनाथाने दारूच्या उत्तेजनास उपकारक असे भाषण दिले. पण तो ही गोष्ट कबूल करीत नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक १९, मुंबई, १ ऑक्टोबर १८५३

**३१४१** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३०५)

श्री. मनगमरीसाहेब सहकुटुंब स्वदेशास गेले.
त्यांनी ११॥ (साडेअकरा) वर्षे पोरबंदरला धर्मप्रसार केला.
पुस्तके रचली. भाषणे दिली.

**३१४१ अ** (इम : ३०५)

**३१४२** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३०६)

मिर्झापुर मिशनतर्फे स्वतंत्र वृत्तपत्र चालविले जाते.
मिशनने ६२३ रु. वर्गणी जमविली. एकूण ५ मंडळ्या कार्य करतात.

**३१४२ अ** (इंम : ३०५–३०६)

**३१४३** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३०६–३०७)

हिमालयाच्या पायथ्याशी एका खडकातून ज्वालाग्राही वायू बाहेर पडत आहे. नुसत्या स्पर्शाने तो पेट घेतो. नेटिवांचे अज्ञान असे की, ते दुरून येऊन खडकाची पूजा करतात.

**३१४३ अ** (इंम : ३०६)

**३१४४** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३०८–३१०)

जे. टोमासन साहेबांनी आग्र्याच्या शाळेची पहाणी केली, तेव्हा त्यांना असे आढळले की, खाजगी शाळाच सरकारी शाळेपेक्षा चांगल्या चालतात. मिशन शाळेत सरकारी शाळेच्या तिप्पट मुले शिकतात. सरकारला त्याबद्दल काहीच खर्च येत नाही. देवाने सगळा भरतखंड इंग्रजांच्या हाती सोपविला आहे व लोकांचे वास्तविक कल्याण करण्यास आम्ही बांधलेले आहोत. मिशनऱ्यांचे कार्य स्तुतीस पात्र आहे.

**३१४४ अ** (इंम : ३०७–३०८)

**३१४५** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३०९–३१३)

मार्शमनसाहेबांचे असे मत आहे की : सरकारने मोठ्या शहरामध्ये विद्यालये सुरू करावीत. सरकारी शाळेच्या विद्यार्थ्यांनाच सरकारी चाकरी मिळावी. शाळेत धर्मपुस्तक शिकवू नये. हाल्लीडेसाहेबांचेही असेच मत आहे की : शिक्षणाचा खर्च वाढवावा. धर्मसंबंधात मात्र सरकारने तटस्थ राहावे. रेवरंड टकर म्हणतात की : मिशनरी मंडळी सरकारकडून पैसे घेत नाहीत. त्यांनी आपल्या शाळेतून धर्मपुस्तक शिकवण्यास हरकत नाही.

**३१४६** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१४)

हिंदू शास्त्रात साधारण वनस्पतीविषयी फारशी माहिती आढळत नाही. असाधारण स्वर्गीय अशा ४ वनस्पतींची मात्र माहिती मिळते. मंदार पर्वतावरील कदंब वृक्षास जी फुले येतात, त्यांचा सुगंध हजारो योजनेत जातो. जंबुवृक्षाची फळे अमृतकल्प आहेत. न्यग्रोधाच्या फांद्या हजार योजनांवर पसरल्या आहेत. मानवी शरीराबद्दलही त्यांचे विवेचन शास्त्रीय नाही.

**३१४६ अ** (इंम : ३१३–३१४)

**३१४७** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१५–३१७)

इराण देश : खुरासन हा इराणचा सर्वात मोठा प्रांत आहे. मशद या मुख्य शहरात इमाम रिजाची सुंदर कबर आहे. नशिबूर हे शहरही सुंदर होते. परंतु अरब व तार्तरी लोकांच्या स्वाऱ्यांत त्याची नासधूस झाली. अराक अजमी प्रांतात डोंगराच्या रांगा आहेत. राजधानी तेहरानमध्ये करीम बादशहाने मोठी तटबंदी केली. वाईट हवेमुळे लोक तंबू बांधून तेहरानबाहेर राहातात. रेज हे प्राचीन शहर लढायातच नेस्तनाबूत झाले. इस्पहानला व्यापाराची मोठी पेठ आहे. जुलफा या शहरात ख्रिस्तीधर्मी बरेच राहातात. सुलतान्या या ठिकाणी भींतीवर कुराण कोरलेले आहे. सनामध्ये मेवा व तंबूखू यांचे चांगले पीक येते. रेशीम, गालिचे व भांडी, यांचा व्यापार चालतो.

**३१४८** (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१७–३१८)

लोकहितेच्छू लिहितो की : मेंडी बाजारातून कसबिणी काढावयाचा हुकूम केला, म्हणून संतोष वाटतो. कसबिणींच्या गोंधळाचा लहान मुलांवर वाईट परिणाम होतो. आता दारूच्या दुकानांचाही बंदोबस्त करावा.

३१४९ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१८)
कंपनीच्या नव्या सनदेवर राणीची सही झाली.

३१५० (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१८)
मिठावरील कर कमी करण्यास लॉर्डस् सभा कबूल नाही.

३१५१ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१८)
नगरमध्ये ४७४६ घरे आहेत. २८५९६ लोक नगरमध्ये राहातात. पैकी १४,१९० स्त्रिया आहेत.

३१५२ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१८)
नगरच्या मुलींच्या शाळेचा पंतोजी विष्णु भास्कर करमरकर या आठवड्यात बाप्तिस्मा घेणार आहे. (प्रभाकरवरून)

३१५३ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१८)
सरकारने वाळकेश्वरला नवीन रस्ता बांधला. पण त्या रस्त्यावरून जाण्यास बैलगाड्यांना बंदी केली. बगीवाले मात्र जाऊ शकतात. सरकारची बंदी असूनसुद्धा यात्रेत जुगार चालतो, हे फार वाईट आहे.

३१५४ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१९)
डाक्तर स्टिवन्सन यांनी नाशिक, कार्ले, कान्हेरी, येथील गुहालेख छापले आहेत. मूळ संस्कृत आळा देऊन त्याचे मराठी भाषांतरही दिले आहे. तरुण शोधकांनी हे पुस्तक अवश्य वाचावे. (बंबे ब्रांच आफ दी रायल एशियाटिक सोसैटी.) (वर्तमानदीपिकावरून)

३१५५ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१९)
जहागीरदार चंद्रचूड यांची ३८ हजारांची नेमणूक इंग्रज सरकारने रद्द केली. त्यांचा वारसाहक्कही नामंजूर झाला. दादाजी गंगाधर चंद्रचूड ह्याच्या बापाने सन १८४९ मध्ये दत्तक घेऊन ह्यास जहागिरीचा मालक केले होते. (ज्ञानप्रकाशवरून)

३१५६ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३१९–३२०)
लाचेबद्दल सरकारचे पत्रक : गवरनर जनरल यांनी सरकारी अधिकाऱ्यांनी लाच घेतली, तर त्यांस योग्य ती शिक्षा देण्याचे फर्मान काढले आहे. संस्थानिकांनाही तशी पत्रे पाठविली आहेत.

३१५७ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३२०)
मद्रासेतील हिंदू देवळांना दरवर्षी सरकारी खजिन्यातून सहा हजार रुपये मिळत असत. आता इंग्रज सरकारने ही नेमणूक बंद केली आहे.

३१५८ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३२०)
सरकारी शाळेवरील मुख्य गुरू, उपगुरू आणि गुरू यांना पेन्शन देण्याचे सरकारने ठरविले आहे.

३१५९ (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३२०)
औरंगाबादला काही अरबांनी इंग्रज सरकारविरुद्ध बंड पुकारले. इंग्रज सैन्याशी झालेल्या लढाईत ते सर्व मारले गेले.

३१६० (१२ : १९, १ ऑक्टोबर ५३, ३२०)
डाकेबद्दल नवा ठराव होणार असून पाव तोळ्यापर्यन्त अर्धा आणा व त्यापुढे एक आणा डाक पडेल. वर्तमानपत्रास १ आणा डाक राहील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३१६१** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३२२–३२३)

टोमासनसाहेब आणखी एक वर्ष भरतखंडात राहणार होता. टोमासनच्या कर्तबगारीने आग्रा इलाखा इतर प्रांतांहून श्रेष्ठ बनला. एकादे काम मनात घेतले की, ते तो शेवटास नेई. त्याचे अंतःकरण शुद्ध होते. सरकारी अधिकारी हजारो आहेत. परंतु १० वर्षे लेप्टनंट गवरनरचे काम इतक्या मेहनतीने करणारा टोमासनसारखा साहेब विरळाच सापडेल. लोकांस त्याच्या मरणाचा शोक होईल यात शंका नाही.

**३१६१ अ** (इंम : ३२१–३२२)

**३१६२** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३२४–३२५)

रामया हा भुईहर जातीचा आहे. सर्व हिंदू रिवाज तो प्रामाणिकपणे पाळीत असे. एकदा देवाने त्यास स्वप्नात सांगितले की, सर्व भरतखंडच ख्रिस्ती होणार आहे. तेव्हा त्यास मूर्तिपूजेचा फार पश्चाताप होऊ लागला. लूपोल्टसाहेबाकडून त्याने ख्रिस्ती धर्माची माहिती मिळवली. स्वमार्ग धिक्कारून तो मिर्जापूर मिशनात गेला. काशीच्या राजाने त्यास हलक्या दराने जमीन दिली असून तेथे घर बांधून तो ख्रिस्ती धर्माचा प्रचार करील.

**३१६२ अ** (इंम : ३२३)

**३१६३** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३२६–३२८)

बाबू गंगा गोविंद या श्रीमंत गृहस्थाजवळ एक मानवी आकृतीचे चित्र आहे. त्यात तंत्रशास्त्रातील शतचक्रभेदाची स्थाने दाखविली आहेत. मूलाधारस्थानापासून चंद्रतळ्यापर्यंत आकडे देऊन स्थाने सांगितली आहेत. पण हे सर्व कल्पित आहे. माणूस मेला की, हे चक्र नष्ट होते, असे हिंदू लोक समजतात. (सचित्र)

**३१६३ अ** (इंग : ३२५–३२६)

**३१६४** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३२८–३३०)

शूलचंचू वर्गाची चोच लांब पण बारीक असते. मधुमक्षिरूप गट मध गोळा करतो. गुंजीरव वर्ग गुणगुणत मध खात राहातो. अमृताशरूप वर्गातला नर फार देखणा असतो. सुतार पक्षी तर जमिनीवर हिंडतो. स्वर्गपक्षी फार सुंदर दिसतो, तर वृक्षावलंबी वर्ग झाडास टेकून बसतो. याखेरीज पोपट व कोकिळ तर सर्वप्रसिद्ध आहेत.

**३१६५** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३०–३३२)

खुजिस्तानच्या पूर्वेस डोंगराच्या ओळी आहेत. शुशान उर्फ सुसा हे पडके शहर आहे. फारिस्तान विभागात सुपीक मैदाने आहेत. शिराज हे फारिस्तानचे मुख्य शहर असून तेथील मद्य प्रसिद्ध आहे. काजेरून येथे लिंबांचे व तमाखूचे फार पीक येते. अबू आणि लार यांचा दाट लोकवस्तीसाठी विशेष उल्लेख करावा लागेल.

३१६६ (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३२–३३३)

देशकल्याणेच्छु हिंदू लिहितो की, रत्नागिरीत जोग व बिवलकर यांनी वर्गणी गोळा करून वेदाची शाळा काढली. वेदाने ईश्वरी ज्ञान प्राप्त होईल, याची काही खात्री नाही. स्वतः शंकराचार्यांनीच म्हटले आहे : 'संस्कृतातले धातू तारणारे नाहीत. म्हणून गोविंदाची सतत भक्ती करा. वेद पाठ करणे, म्हणजे माणसास गोणीचा बैल बनविण्याप्रमाणे आहे. त्यापेक्षा सामाजिक सुधारणुकेचा प्रयत्न करावा.

३१६७ (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३३–३३५)

'सत्यवक्ता' लिहितो की : हिंदूंच्या दूषणार्ह वर्तणुकीमुळे काही संस्थांना लांछन प्राप्त होते. काही सुधारक लोक खिस्ती धर्माचा अकारण द्वेष करतात. मिशनरी लोकांची वास्तविक हकीगत समजून घेण्याचा ते प्रयत्न करीत नाहीत. एखाद्याने खिस्ती धर्म स्वीकारला, तर त्याच्यावर शिव्यांची लाखोली वाहतात. हे परधर्मनिंदक म्हणजे पढतमूर्ख असतात. कोरड्या ब्रह्मज्ञानावर त्यांचा अतिशय विश्वास असतो.

३१६८ (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३५)

मुंबईची मर्कन्टील बँक (नवी बँक) : या बँकेचा व्याज दर ४३ टक्के असल्यामुळे तिचे अनेक भाग (शेअर्स) विकले गेले.

३१६९ (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३५)

बाणकोटहून महाडला जाणाऱ्या बोटीस अपघात झाला. अनेक माणसे बुडून मेली. त्यात मालेटसाहेबाची बायको व लेकरूही गेली. परंतु मालेट गवरनरचा चीफ सेक्रेतार मात्र एका फळीच्या आधाराने वाचला. ईश्वरी इच्छेपुढे कोणाचे काही चालत नाही.

**३१७०** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३५–३३६)

जपानमध्ये पूर्वी फक्त डच लोकांनाच व्यापाराची मुभा होती. आता अमेरिकन व्यापारी प्रेसिडेंटचे पत्र घेऊन जपानात आले आहेत. जपानी बादशहाने त्यांना तेथे राहण्यास परवानगी दिली आहे.

**३१७१** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

रूशा व तुर्कस्थान यांचा अद्याप समेट झालेला नाही.

**३१७२** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

लॉर्ड एल्फिन्स्टन यास मुंबईचा गवरनर नेमले आहे.

**३१७३** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

अमेरिकन आगगाडी ताशी ४० कोस जाते.

**३१७४** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

मोझांबिकहून काही दास (गुलाम) आणल्याबद्दल एका व्यापाऱ्यास ३ वर्षांची शिक्षा झाली.

**३१७५** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

मुंबईत सप्टेंबरमध्ये ९६२ माणसे वारली.

**३१७६** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

आस्त्रेलियातून दोन पारशांनी सोने चोरून आणले आहे.

**३१७७** (१२ : २०, १५ ऑक्टोबर ५३, ३३६)

अमेरिकेत लोकवस्तीचे प्रमाण दर चौरस मैलास सात असे आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३१७८** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३३७–३३८)

सन १८५२ या वर्षात मुंबईत १३,७६३ माणसांचे मृत्यु झाले. त्यांपैकी ११३५ जरीमरीने आणि १००७ देवीने मरण पावली. लहान मुलांना देवी काढून घेण्यात अज्ञान व आळस यांमुळे हयगय होते. त्यातून देवीचे रोगी वाढतात.

**३१७८ अ** (इंम : ३३७)

**३१७९** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३३८)

'महमदनीवार्ताः' रेवरंड बोएनसाहेबाच्या मराठी पुस्तकाचे हे गुजराथी भाषांतर प्रसिद्ध झाले. पृष्ठे १५२ असून किंमत सात आणे आहे. गुजराती भाषांतर नानाभाई हरिदास, सुप्रीम कोडतातील दुभाषी, यांनी केले.

**३१७९ अ** (इंम : ३३८)

**३१८०** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३३८–३३९)

हिंदू लोकांच्या सणांविषयी निबंध : बाब पदमनजी यांनी हा ग्रंथ केला आहे. त्या ते म्हणतात की, असल्या सणांपासून ऋण व दारिद्र्य घरात येते, नीतिभ्रष्टता निर्माण होते, शिवाय हे सण ईश्वरस्थापित नाहीत, तात्पर्य हे सण बाधक आहेत. बक्षिसपात्र निबंध, पृष्ठे ८६, बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, किं. २ आणे.

**३१८० अ** (इंम : ३३८)

**३१८१** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३३९–३४१)

दारूच्या अनर्थाविषयी : भवानी विश्वनाथ (जनरल असेंब्लीच्या शाळेत उपगुरू) यांनी हे पुस्तक लिहिले. दारूमुळे देशाची सर्वस्वी नुस्कानी, दारू प्रकृतीस बाधक आहे. दारूचे दुष्परिणाम माहीत असूनही लोक या व्यसनास प्रवृत्त होतात. इंग्रेज लोकांपासूनच हिंदूंना दारू पिण्याची चट लागली. वॉटर्लूच्या लढाईत जेवढे इंग्रज मेले, त्याच्या तिप्पट माणसे दारूच्या व्यसनाने भरतखंडात दरसाल मरत आहेत. दारूमुळे अनेकांना क्षयरोग जडतो. आजाराने अशक्त झालेल्या माणसास काही काळ दारू उपयुक्त ठरते. पण निरोगी माणसाला मात्र घातक ठरते.
पृ. ७२, किं. सव्वा आणा.

**३१८१ अ** (इंम : ३३९)

**३१८२** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३४२)

कंपनीची नवी सनद ३० एप्रिल १९५४ पासून लागू होत आहे. कंपनीसरकार सुस्तीने काम करते, हा आक्षेपही लवकरच दूर होईल.

**३१८२ अ** (इंम : ३४१–३४२)

**३१८३** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३४३–३४४)

मगज किंवा मेंदू हा सर्व मनोवृत्तींचे मुख्य स्थान असून त्याचा साधा उल्लेखसुद्धा हिंदू शास्त्रात नाही. आधारचक्र, अधिष्ठानचक्र, अवाहन चक्र, ही काल्पनिक असून त्यावर विश्वास ठेवणे हा शुद्ध वेडेपणा आहे.

**३१८३ अ** (इंम : ३४२–३४३)

३१८४ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३४४)

हीच प्रार्थना लोकासी । त्यांत मुख्य भिक्षुकासी ॥ १ ॥
सोड नीच पूर्व वृत्ति । तींत फारच फजिती ॥ २ ॥
असे तुझी वृत्ति जरी । स्नान संध्या स्वस्थ करी ॥ ३ ॥
वेदा विना विप्र नोहे । ब्रह्म यज्ञापूर्ता पाहे ॥ ४ ॥
इाकारोनी सांगेदास । धरा उद्योगाची कास ॥ ५ ॥
लक्ष्मणशास्त्री हळबे – वर्तमानदीपिका

३१८५ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३४४–३४७)

मिस्तर नाट यांनी धर्मप्रसाराचे काम सुरू केल्यावर त्यांच्या मदतीला अनेक अमेरिकन मिशनेरी आले. मिशनचे छापखाने व्यवस्थित चालू लागले. मिशनाच्या शाळेत मुलामुलींची गर्दी होऊन लागली. धर्मोपदेशकांनी मराठीत व्यावहारिक विद्यांवर पुस्तके लिहून प्रसिद्ध केली. ब्राह्मण पंतोजी जी चुकीची माहिती देत होते, त्यातून मुलांचे अज्ञानच वाढत होते. म्हणून संशोधनातून प्रगट झालेले ज्ञान मिशनरी पुस्तकांतून सांगितले. ग्रहणे व सूर्यचंद्र यांविषयीची खरी हकीगत मुलांना समजू लागली. पंतोजीचे नीतिशास्त्र मनुस्मृतीवर आधारलेले असे. म्हणून मुलांना खरा देव व खरी नीति यांची माहिती या उपदेशातून मिळत नसे.

३१८६ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३४७–३५०)

किरमान या शहराची लढाईमुळे फार नासधूस झालेली आहे. बूम हे पूर्वीचे मोठे शहर आता लहानावले आहे. पर्शियन गल्फमधील भूकंपाने इराणजवळ अनेक बेटे तयार झाली. इराणमध्ये नद्या मात्र फार थोड्या आहेत. वाळवंटामुळे नद्यांचे पाणी मुरून जाते. फिजल ही नदी इराण देशाच्या मध्यावरून वाहाते. उरूमिया नावाचे मोठे सरोवर इराणात प्रसिद्ध असून त्याची लांबी ४० मैल व रूंदी १० मैल आहे.

३१८७ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५०)

लंडन शहर बाबेल युरोपचा एक भाग समजले जाते. या शहराचा विस्तार ७० चौरस मैल आहे. २३ लाख ६१ हजार ६४० लोक तेथे राहातात. नुसत्या घरभाड्याच्या करापासून ब्रिटिश सरकारला बारा कोटी रुपये मिळतात. भाडोत्री गाड्यांपासून ९ कोटीचा कर मिळतो. लंडनचा बकालीपणा वाढल्यामुळे नुसत्या चोरीवर ३० हजार माणसे आपला उदरनिर्वाह करतात. शहरात ३ लाख ६० हजार धुराचे दिवे आहेत.

३१८८ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३३५)

अमेरिका देशात दिवसानुदिवस वस्ती व पीक इतकी वाढत चालली आहेत की, एका चौरस मैलावर सात कुटुंबांचे पोषण होते. (वर्तमानदिपीकावरून)

३१८९ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५०–३५१)

वर्तमानदीपिकेच्या संपादकांनी एका लेखात विनंती केली आहे की : अद्यापही मुलींच्या शाळा जशा चालाव्या तशा चालत नाहीत. मुली एक दिवस हाजीर, तर चार दिवस गैरहजीर असतात. तरी आईबापांनी मुलींचे शिक्षणाचे वय वाया जाऊ देऊ नये.

३१९० (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

'एक रामभक्त' लिहितो की : रामवाडीच्या देवळातून नेहमी जोड्यांची चोरी होते. देवस्थानी जे चोरी करतात, त्यांच्यासारखी नीच योग्यता त्यांचीच समजावी. त्यांना तुरुंगाचा रस्ता दाखवावा.

३१९१ (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

जनरल असेंब्लीच्या शाळेत सभा भरून तरुण विधवांच्या दुर्दशेबद्दल वादप्रतिवाद झाला. दुर्दैवी स्त्रियांचा कळवळा बाळगणारे फार निघत चालले, ही चांगली गोष्ट आहे.

**३१९२** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

७ सप्टेंबरला बंडखोरांनी शांगहै शहर काबीज केले. राजधानी पिकीन हस्तगत करण्याकरिता ते प्रयत्न करीत आहेत. पिकीन जिंकले, तर जुने राज्य बुडेल. भावी राजे चिनी प्रजेस भावाप्रमाणे वागवतील, असा जाहीरनामा निघाला आहे.

**३१९३** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

ब्रह्मदेशात पिगू प्रांतात चांगला बंदोबस्त ठेवला आहे.

**३१९४** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

श्रीमंत विनायकराव पेशवे यांचे निधन झाले.

**३१९५** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

धुळे येथे नवीन शाळा सुरू झाली. उद्घाटनास अंडरसनसाहेब हजर होते.

**३१९६** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

नामदार टॉमासनच्या मृत्यूचा दुखवटा मोठ्या शहरात पाळला जाईल. ध्वज अर्धे उतरवणार आहेत.

**३१९७** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

जनरल कालविन आग्र्याचा गवरनर होणार.

**३१९८** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)

रांबाड कुत्र्यांना मारून टाकण्याचा हुकूम सुरतेच्या कोतवालाने काढला.

**३१९९** (१२ : २१, १ नोव्हेंबर ५३, ३५१)
तीन वर्षांत अफूच्या विक्रीची संख्या १६ हजारांवरून २८ हजारांवर गेली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय पुस्तक १२, अंक २२, मुंबई, १५ नवेंबर १८५३

**३२००** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५३)
चर्च ऑफ स्कॉटलंडतर्फे रे. वालेस, फर्ग्युसन आणि व्हाईट येत आहेत.

**३२०० अ** (इंग : ३५३)

**३२०१** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५३)
स्वामी मध्वाचार्यांना धारवाड येथे २० हजार रुपये मिळाले. भोळ्या बिचाऱ्या शिष्यांना यापासून काहीही उपयोग होत नाही.

**३२०१ अ** (इंग : ३५३)

**३२०२** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५४)
'वेगळे व्हा, बाहेर या!' हे एका हिंदूस रे. मिचेलने बाप्तिस्मा दिल्हा त्यावेळचे संभाषण पुस्तकरूपाने यात छापले आहे. हे पुस्तक इंग्रजीत आहे.

**३२०२ अ** (इंग : ३५३–३५४)

**३२०३** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५४)

मंडनमिश्राच्या नास्तिक मताचा पराभव करून आस्तिक मत स्थापन करणाऱ्या शंकराचार्यांची समाधी वसई तालुक्यात निर्मळ या ठिकाणी आहे. समाधीजवळ पोर्तुगीज चर्च बांधले जात आहे. त्याविरुद्ध केलेला अर्ज वसईच्या मामलेदाराने फेटाळून लावला. (प्रभाकरवरून)

**३२०३ अ** (इंम : ३५४)

**३२०४** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५५–३५६)

विष्णुपंत नगरच्या कन्याशाळेत पंतोजी होता. तो नेहमी मिशनात जात असे. ख्रिस्ती धर्मच खरा, असे त्यास वाटू लागले. मित्र व नातेवाईक यांच्या आग्रहास न जुमानता त्याने ख्रिस्तास अंगीकारले. वडील व नातेवाईक यांनी जुलुम करूनही त्याचे मन बदलले नाही. त्याला जो उजेड मिळाला, तो दुसऱ्यांना देण्यास तो तत्पर होईल.

**३२०४ अ** (इंम : ३५४–३५५)

**३२०५** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५८–३५९)

अमेरिकेच्या ३५ संस्थानांचा विस्तार ३५ लक्ष चौरस मैल आहे. १८६० मध्ये लोकवस्ती ३ कोटी १० लाख होईल व काही वर्षांनी ही लोकसंख्या युरोपएवढी होईल. मिसिसीपी नदीच्या तीरावर फार दाट लोकवस्ती आहे. अमेरिकन संस्थाने स्वतंत्र असली, तरी नाणे, लढाई, डाक व सैन्य सर्वांचे एकत्र आहे. भाषा आणि धर्म एकच आहे. आबादानी वाढते आहे.

**३२०५ अ** (इंम : ३५६–३५८)

३२०६ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३५९–३६०)

श्री. गंगाधरशास्त्री फडके यांनी प्रभाकरात पत्र लिहून विनंती केली आहे की : पुनर्विवाह चालू करावा आणि विधवा स्त्रियांचे केस काढू नयेत. स्त्रियांचा छळ होत असल्यामुळेच समाजाची दुर्दशा होते आहे. मुंडणे करून बायकांस विद्रूप करणे, केवळ व्यर्थच नव्हे, तर तो पापीच होय. (प्रभाकरवरून)

३२०७ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६०)

गोविंदा नामे मुलाचे आईबाप सुशिक्षित असून त्यास चांगले वागण्याचा उपदेश करीत. एकदा अंजीर जास्त मिळविण्याकरिता गोविंदा खोटे बोलला. नंतर त्याने आईबापांजवळ आपली चूक कबूल केली. त्याने निश्चय केला की, पुन्हा कधीही खोटे बोलणार नाही.

३२०८ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६०–३६१)

आफ्रिका खंडात दोन लक्ष मनुष्यांची वस्ती आहे. या देशात ओसाड मैदाने पुष्कळ आहेत. जमीन नरम व पिकाऊ आहे. मोठाली घोर अरण्ये असून वन्य पशू स्वैर हिंडतात. लोक मातीची किंवा माडाच्या झांपांची घरे बांधतात. कर्नल फार्बसने लिहून ठेवले आहे की : या देशातील स्त्रियाही सैनिकाचा पोषाक करून लढाई करतात. त्यांच्या धर्मात भ्रमिष्ट मते फार दिसतात. हे लोक सर्पास देव मानून त्याची पूजा करतात. (धुमकेतूवरून)

३२०९ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६१–३६२)

चीनमध्ये नव्या कराराच्या दहा लाख प्रती छापणार आहेत.

३२१० (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६१–३६२)

रशियाशी लढण्याकरिता तुर्कस्थान मोठी फौज तयार करीत आहे.

३२११ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६१–३६२)

विलायतेत जरीमरीचा वाखा सुरू झाला.

३२१२ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६२)

गंगाधरशास्त्र्यांनी प्रभाकरात लिहिलेल्या पत्रामधील काही मजकुराचा इनकार केला आहे. पुनर्विवाह व विधवामुंडन यांबद्दल आपण काहीच म्हटले नव्हते, असे शास्त्री (आता) सांगतात.

३२१३ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६२)

'बंबे असोसिएशन' : जगन्नाथ शंकरसेठ यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली. भाऊ दाजीच्याऐवजी नौरोजी फर्दुनजीस सक्रेटर नेमले. (धुमकेतूवरून)

३२१४ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६२–३६३)

भवानी विश्वनाथ यांनी 'दारूचे अनर्थ' या पुस्तकात म्हटले आहे की : सद्‌गुण लागण्यास विलंब लागतो. दुर्गुण मात्र लगेच जडतात. मद्याचा एकदा स्वाद लागला की, ताळतंत्र राहात नाही. दारूबाजास दिव्याच्या एका जोती ऐवजी दोन जोती दिसतात. दारूचा घोट घेतला की, धैर्य नाहीसे होते. माणूस वेड्यासारखी बडबड करतो. (पुस्तकातील उतारा)

३२१५ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६३–३६७)

इराणमध्ये डोंगराळ प्रदेश जास्त आहे. एक तृतीयांश भाग अरण्यमय आहे. जमीन इतकी खारट आहे की, एक इंच जाडीचा मिठाचा थर जमिनीवर येतो. तरीही इस्पहान व मोगमचे मैदान बऱ्यापैकी पिकाऊ आहेत. इतरत्र इमारती लाकूड-भरपूर मिळते. उत्तरेकडे हवा फार थंड आहे. पाण्याच्या कमताईमुळे शेती होत नाही. या देशातील घोडे देखणाऊ असतात. उंट हाही उपयुक्त प्राणी आहे. धातूच्या खाणी आहेत. पण लोकांत कसबाचा अभाव दिसतो. अरमन्यन कारवान लोक उंटावरून उदीम चालवतात. पण त्यांच्या तफ्यावर नेहमी दरोडे पडतात. इराणची लोकवस्ती एक कोटी असून लोक उद्योगी आहेत. त्यांचे भाषण मिठे व आदराचे असते. दारू पिणे ते निषद्ध मानतात. पण स्त्रियांना पडतपोशीत कोंडून ठेवतात. एक माणूस चार लग्ने करतो. शिवाय राखही बाळगतात. जोरोष्टरचा धर्म पाळतात. मुस्लीमात शिया व सुनी असे दोन तट आहेत.

३२१६ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६७–३६८)

गेल्या महिन्यात मुंबईत १२०० मृत्यू झाले. त्यापैकी २७४ वाख्याने मेले.

३२१७ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६७–३६८)

मंगलोरला धरणीकंपाचा धक्का बसला.

३२१८ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६७–३६८)

पुणे कॉलेजात गरीब विद्यार्थ्यांना फीमाफी मिळेल.
(प्रिन्सिपल मेजर क्यांडी.)

३२१९ (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६७–३६८)

वाळकेश्वरच्या यात्रेत मोठ्या प्रमाणावर जुगार चालतो.

**३२२०** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६७–३६८)

शिवरी उद्योगशाळेला सरकारने ५ हजार रुपये दिल्हे.

**३२२१** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६७–३६८)

मुंबईत पूर्वी वाख्याने दररोज २५–३० माणसे मरत. आता हे प्रमाण रोजी १२–१३ वर आले आहे.

**३२२२** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६८)

कल्याण, वसई व भिवंडी या भागांत अशी अफवा पसरली आहे की : साखर अन्य देशात तयार होते. ती करणारे म्लेंच्छ असतात. साखर साफ करण्यासाठी रक्त आणि आंडी वापरली जातात. साखर खाण्याने जान जाते. म्हणून परदेशी पदार्थ खाऊ नयेत.

**३२२३** (१२ : २२, १५ नोव्हेंबर ५३, ३६८)

मुंबई ते बडोदा रेल्वेमार्ग तयार करण्यासाठी कंपनी स्थापन झाली. आयर्लंडमधून ८ इंजिनिअर असामी येणार. (प्रभाकरवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १२, अंक २३, मुंबई, १ दिसेंबर १८५३

**३२२४** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३६९)

रे. डेविडसन बिलायतेहून आले असून ते चर्च व मनी स्कूल यांचे काम पहातील.

**३२२४ अ** (इंम : ३६९)

**३२२५** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३६९)

'यंत्रशास्त्राची मूळे' : गोविंद गंगाधर फडके यांनी इंग्रजीवरून भाषांतरित केलेला हा ग्रंथ मिशनने छापला. पृष्ठे २१४ असून तो ग्रंथ ज्ञानोपयोगी आहे. (सचित्र.) बोर्ड ऑफ एज्युकेशनने प्रकाशित केला.

**३२२५ अ** (इंम : ३६९)

**३२२६** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७०)

पुण्याच्या छावणीजवळ एका धर्मशाळेत बमनजी पारशी याने दारूचे दुकान उघडले आहे. 'कालिकेचे खाद्य' आता शाक्त लोकांना घराजवळच मिळू लागले आहे! सरकारची दृष्टी लाभावर आहे. परंतु प्रजेचा मात्र नाश होतो.

**३२२६ अ** (इंम : ३६९–३७०)

**३२२७** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७०–३७१)

पर्वती संस्थानच्या पंचांनी भाऊ नावाच्या गरीब पुजाऱ्यास काढून टाकले. कारण त्यांना यजुर्वेदी ब्राह्मणास काम द्यावयाचे नाही. अप्पासाहेब ढमढेरे यांच्या जावयास हे काम दिल्हे आहे. गरीब बिचारा भाऊ आंधळा होताच, आता बेकारही झाला. पंचांच्या या आपलपोट्या चालीविरुद्ध सरकारकडे अर्जी केली पाहिजे. (ज्ञानप्रकाशवरून)

**३२२७ अ** (इंम : ३७०)

३२२८ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७१)

कलकत्त्यात नामदार वेलिंग्टनच्या स्मारकाकरिता ६५ हजार रुपये जमा झाले. लंडनच्या पदार्थसंग्रहालयाकरिता ३ लक्ष ३० हजार रुपयांचा माल रवाना झाला होता. अर्थात हे सर्व सवसंतोषाने झाले नसून साहेबाच्या शिफारशीने झाले.

३२२८ अ (इंम : ३७१)

३२२९ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७३–३७४)

मानवी शरिरात लिंगदेह आणि सुषुम्ना नाडी असते, असे हिंदू-शास्त्र सांगते. मृत्युनंतर लिंगदेह बाहेर पडतो, अशीही कल्पना आहे. जठराग्नि हा तर अग्नी नसून रस आहे. त्यातून वागिंद्रियाचे पोषण तर अशक्य आहे. एकंदरीत हिंदू शास्त्रातील कथा पोरकट, काल्पनिक आहेत. असल्या ज्ञानास ईश्वरी प्रेरणेचे ज्ञान म्हणणे हा वेडेपणाच होय. लोकांनीच विचार करावा.

३२२९ अ (इंम : ३७१–३७३)

**३२३०** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७४–३७६)

इराणदेश : या देशात बादशहा हा कुलमुखत्यार आहे. डोंगरी विभागातले अमीर हे त्याचे सुभेदार असतात. ते स्वतंत्र फौज बाळगतात. म्हणून बादशहास त्यांची मर्जी राखणे भाग पडते. इराणी सैन्य अतिशय पराक्रमी आहे. स्वतः बादशहा दोन-चार हजार गुलामांची खडी फौज बाळगतो. इराण हा प्राचीन काळी असीरियाचा प्रदेश होता. सनपूर्व ५५० मध्ये सैरस उर्फ खुसरू या इराणी राजाने हा प्रदेश जिंकून इस्रायली लोकांना हद्दपार केले. पुढे इराणचे साम्राज्य मिसर, मासिडोनिया व ग्रीस येथपर्यंत पसरले. पुढे ग्रीक बादशहा अलेक्झांडरने इराणी साम्राज्याचा हा प्रदेश जिंकून घेतला. इराणच्या राजवंशात शापूरजी हा मोठा नामांकित व पराक्रमी बादशहा होऊन गेला. त्याचे राज्य काळ्या समुद्रापर्यंत विस्तारले होते.

**३२३१** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७६)

कोल्हापूरच्या राजाचे लग्न : कोल्हापूरचे महाराजांचे लग्न ठरविण्यासाठी मध्यस्थी करण्याला बडोद्याहून मंत्री वामनराव तांबे रवाना झाले आहेत. (ज्ञानप्रकाशवरून.)

**३२३२** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३७६–३८४)

'संक्षिप्त संस्कृत व्याकरण' : १५ जुलई १८५३ च्या अंकात पूर्वी छापले आहे. या अंकात क्रियापद प्रकरण सविस्तर दिले आहे.

**३२३३** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८५)

तुर्की सरकारने रशियास इशारा दिला आहे की, तुर्कस्थानातून १५ दिवसांत रशियन सैन्य काढून घ्यावे. लढाई झालीच, तर इंग्लंड व फ्रान्स तुर्कस्थानला मदत करतील असे दिसते.

**३२३४** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८५)

विलायतेत अनेकांना मद्यपानामुळे वाखा होतो.

३२३५ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८५)

दारूवाचून निर्वाहच होणार नाही, ही चुकीची समजूत होय. थंड हवेत दारू आवश्यक असते, हे म्हणणेही खोटे आहे. उलट थंडीत मद्यपान केले, तर पित्तादिक विकार मात्र होतात. दारू प्याल्याने शीण जातो, झोप चांगली लागते, ही गैरसमजूत आहे. (ज्ञानप्रसारकवरून)

३२३६ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८५)

मुलांसमोर मस्ती करणे, सूड उगविणे, यांसारखी वर्तणूक करू नये. मुलांना खोटी भीती दाखवू नये. त्यांना क्षमा करावी, प्रीत ठेवावी. (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

३२३७ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८५–३८६)

एका गाईस दोन तोंडे, सहा पाय आणि दोन शेपट्या असलेले वासरू झाले.

३२३८ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८६)

धारचे राजे पवार मुंबईस आले असता त्यांनी आगगाडी पाहिली. तसेच, वेधशाळा व टाकसाळ या ठिकाणांना भेट दिली.

३२३९ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८६)

पंजाबात बालहत्येवर बंदी येणार.

३२४० (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८६)

घाटावर पाऊस झाल्यामुळे महर्घता कमी झाली आहे.

**३२४१** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८७)

देवनाथ नावाचा बंगाली तरुण दारू पिऊन नदीकडे फिरावयास गेला. धुंदीत खोल पाण्यात बुडून मरण पावला. छाकटे लोकहो, तुम्ही पाहा की, त्याचे नांव देवनाथ असले, तरी तो कशाचाही 'नाथ' नव्हता.

**३२४२** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८७–३८८)

'टेम्परान्स सोसैटीची सभा' : या सभेमध्ये मि. ब्राडहोर्स्ट व रेवरंड फेरब्यांक यांनी भाषणे दिल्ही. नंतर सर्वांनी खिस्तगीत गाईले. नंतर सर्वांनी दारू किंवा अंमलकारक पदार्थ न घेण्याच्या प्रतिज्ञापत्रकावर सह्या केल्या. सरकारास कितीही अर्ज केले, तरी ते आपल्या कानाचे दट्टे उघडणार नाही. या दारूपासून देशाचे अर्धे ऐश्वर्य नाहीसे झाले. आता तरी लोकांनी डोळे उघडे ठेवून विचार करावा. (वर्तमानदीपिकावरून)

**३२४३** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८८)

कलकत्त्यातील शाळेत एका वेश्यापुत्रास प्रवेश दिल्याबद्दल अनेक मुलांनी शाळा सोडली. पण एखाद्याची आई वाईट आहे, म्हणून त्याला शाळेत प्रवेश नाकारणे योग्य नाही. (वर्तमानदीपिकावरून)

**३२४४** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८८)

कुलाब्याचे कमिशनर मि. फ्रियर यांनी कोडतात भाषण करून सांगितले की, 'कुलाबा कोर्टातील सरकारी नोकर लाच घेतात. अशा लाचखाऊ नोकरांची नावे मला कळवा. मी त्यांना ताबडतोब बडतर्फ करीन.' (वर्तमानदीपिकावरून)

३२४५ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८८)

कवी लक्ष्मणशास्त्री हळवे म्हणतात : अर्थ समजल्यावाचून पाठांतर म्हणजे वृथा भार वाहणे होय. वेदपाठक लटपटपंची करतो. परंतु त्याचे मन दुसरीकडे गुंतलेले असते. कश्यप वगैरे ऋषी वर्तनानेही आदर्श होते. पण आता विपरीत स्थिती आहे. सत्यशोधक लोकांनी चांगला विचार करून प्रगती साधावी. (वर्तमानदीपिकावरून)

दास म्हणे सत्य शोधक जनाशी ॥
खऱ्या विचाराशी पुढे सरा ॥६॥

३२४६ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८८)

पूर्वी देवीच्या रोगाने अनेक लहान बालके मृत्यु पावत असत. नवीन शोध लागल्यापासून मृत्युचे प्रमाण फारच कमी झाले. मुलांना दोन महिन्याच्या आत देवी काढाव्यात. 'दैवी असेल ते होईल,' असे म्हणून स्वस्थ बसू नये. (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

३२४७ (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८९)

बाहेर फिरण्याने माणसाला अमोलिक फायदे मिळतात. चालीरीती, भाषा, विद्या, कायदे, कला, यांचे ज्ञान मिळते. देवाने पृथ्वीवर अनेक चमत्कारिक पदार्थ निर्माण केले, ते पाहावयास मिळतात. परदेशातील चांगल्या गोष्टी आपल्या देशात चालू करता येतात. म्हणून देशोदेशी फिरणे आवश्यक आहे. न फिरल्यामुळे तोटे होतात. (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

**३२४८** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३८९–३९०)

तमाखूचे झाड तिखट असते. तमाखू वाळल्यावर त्यात कैफ आणण्याची शक्ती येते. तंबाखू खाणे, विडी किंवा गुडगुडी ओढणे, याचे व्यसन अनेकांना असते. तमाखूचे परिणाम दारू इतके वाईट नाहीत. परंतु तमाखू ओढण्याने क्षुधा मंद होऊन प्रकृती बिघडते, जाड्य वाढते. तमाखू सेवनाने माणूस फंदी होतो, त्याची कल्पनाशक्ती कमी होते. त्याचे कशातच लक्ष लागत नाही. (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

**३२४९** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३९०–३९२)

जगकर्त्या ईश्वराची अघटित कल्पना, विलक्षण चातुर्य आणि मोठी शक्ती पक्षी आणि त्यांची घरोटी यांच्या रचनांत दिसते. पक्ष्यांची हाडे पोकळ असल्यामुळे ते आकाशात उडू शकतात. पंखांच्या रचनेने हवेत उडण्यास त्यांना काही आयास पडत नाहीत. पंखांच्या मुळाशी पोकळ व मोठी पिसे आढळतात. पाण्यात राहणाऱ्या प्राण्यांना मोठी चोच ईश्वराने दिली. कापूस, रेशीम व काड्या, यांची जमवाजमव करून पक्षी घरोटी बांधतात. आपले घरोटे सुरक्षित राहावे, म्हणून ते झाडाच्या खांद्यावर लोंबत ठेवतात. (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

**३२५०** (१२ : २३, १ डिसेंबर ५३, ३९२)

'एक विद्यार्थी' लिहितो की : आंब्रोळी मिशनात धारकर पवार आले. त्यांच्या उपस्थितीत गायन, गोष्टींचे वाचन, धर्माची व भूगोलाची प्रश्नोत्तरे घेण्यात आली. राजांनी विद्यालयास ५०० रु. बक्षीस दिल्हे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी ग्रॅहॅम, प्रिंटर

**३२८१** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९३)

रे. काफ्मन व रे. किट्टेल जरमन मिशनरी या महिन्याचे ८ तारखेस आले. धारवाड आणि नीलगिरी येथे कार्य करणार आहेत.

**३२८१ अ** (इंम : ३९३)

**३२८२** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९३)

रेवरेंड प्रैस यांनी ३ वर्षे मनी शाळेचे गुरूत्व केले. आता ते नाशिकला राहायास गेले आहेत. मनी शाळेच्या विद्यार्थ्यांनी त्यांना सुंदर चंदनाची लेखनपेटी दिल्ही आहे.

**३२८२ अ** (इंम : ३९३)

**३२८३** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९४)

फ्री चर्च मिशनात दोन मनुष्यांनी बातिस्मा घेतला. नागपुरास तीन माणसे खिस्ती झाली.

**३२८३ अ** (इंम : ३९३–३९४)

**३२८४** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९४)

मुंबईत अनेक ठिकाणी जुगार चालतो. कनिस्तेबल आणि शिपाई लाच खाऊन तिकडे काणाडोळा करतात. माजिस्त्रेताने चौकशी केली पाहिजे.

**३२८४ अ** (इंम : ३९४)

**३२७५** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९४)

सन १८५४ चे पंचांग : मिशन छापखान्यात विक्रीस राहील. पृष्ठे ४०, किंमत १ आणा आहे.

**३२७५ अ** (इंम : ३९४)

**३२७६** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९५–३९६)

पंजाबात सुबत्ता आहे. पण कित्येक दंगेखोर गडबड करून शिक्षा पावतात. निरुद्योगी लोकच दंगल करीत असतात. त्यांचा धर्मपंथावरील विश्वासही कमी होत आहे. तरी सरकारी वसूल वाढत आहे.

**३२७६ अ** (इंम : ३९४–३९५)

**३२७७** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९६–३९७)

अतिशूद्रादिकांस विद्या शिकविण्याविषयी : मंडळीचे पुढारी जोतीराव गोविंद फुले आहेत. आईच्या योगे मुले सुधारतात, म्हणून नगरच्या फादर मडमेची मदत घेऊन पुण्यात मुलींची शाळा काढली. अशा कामामुळे वडील रागावले, घर सोडावे लागले, जातवाले रुष्ट झाले. कोणी शाळेस जागा देईना. शेवटी रावराऊत मांग व राणबा महार यांनी वर्गणी जमविण्यास मदत केली. सदाशिव बल्लाळ गवंडी यांनी जागा दिली. शाळा बरी चालू लागली. पण मुलींना शेजारचे लोक पाणीही देईनात. आता या शाळेस बरे दिवस आले. दक्षिणेतून २५ रुपये मिळतात.

**३२७७ अ** (इंम : ३९६)

**३२५८** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ३९८–४००)

लियांग आफा हा चिनी माणूस अमेरिकन मिशनरीकडे शिक्षण घेऊन २० वर्षांपूर्वी खिस्ती झाला. त्याने शास्त्राच्या हजारो प्रती चीनमध्ये वाटल्या. त्याने चीनी बंडाचे नेतृत्व स्वीकारून बादशहास नामोहरम केले. आता खिस्ती धर्म विश्वासाने व प्रीतीने वाढत आहे. चिनी लोक शाब्बाथ पाळतात. चीनमधील अज्ञान व मूर्तिपूजा संपली. खरा तारक जो येशू त्याच्याकडे लोक जात आहेत.

**३२५८ अ** (इंम : ३९७–३९८)

**३२५९** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४००–४०२)

इराण देश : सन ६३६ मध्ये इराण व अरबस्तान यांची घनघोर लढाई होऊन इराणी देश अरबांचा गुलाम झाला. दोनशे वर्षे अरबांचे राज्य सुरू होते. पुढे याकूब इबनी लाईस या सरदाराने उठाव करून अरब राज्यकर्त्यांना हाकलून लावले व शिराज ही राजधानी केली. त्याचा भाऊ अमीर याने तार्तर देशसुद्धा जिंकला. १०२८ मध्ये गिजनीचा महमूद आणि १२१८ मध्ये चिंगिसखान यांनी इराण देश हस्तगत केला होता. तार्तरी लोकांनीही स्वाऱ्या करून नासधूस केली. १३८१ मध्ये तैमूरलंगाने इराणवर कब्जा मिळविला. १५०२ मध्ये शिया वंशाचा ईस्माइल शाह, हा इराणचा राजा झाला. १७३० मध्ये नादिरशहाने मोठा पराक्रम करून परकीयांना पिटाळून लावले. नादिरशाह अतिशय क्रूर होता. १७४७ मध्ये तो त्याच्या सेवकाकडूनच मारला गेला. सध्या इराणात शाह महंमद हा बादशहा आहे. हिरात शहरावरील स्वारीपासून इराण व इंग्लंड यांचे शत्रुत्व सुरू झाले.

**३२६०** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०२)

रशिया व तुर्कस्थान यांची लढाई चालू आहे.

**३२६१** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०२–४०३)

'सत्यशोधक हिंदू' लिहितो की : काही लोक देवीचा देव्हारा मिरवितात. त्यांचे पोषाक चित्रविचत्र व भयासुर असतात. त्यांची देवी ही कोल्हापूरच्या देवीची बहीण आहे. पाणी, फुले, कुंकू घेऊन लोक पूजा करतात. भगतांना खोदूनखोदून प्रश्न विचारले, तर ते हळूच म्हणतात, 'कशाला गरिबाच्या पोटावर पाय आणता?' धातूच्या मूर्तीत खरा देव कोठून असणार? (तुकारामाचा अभंग दिला आहे.)

**३२६२** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०३–४०४)

अज्ञानी लोकांना काही अभूतपूर्व चमत्कार दिसला की, ते त्यास जादू समजतात. विद्येच्या ज्ञानाने हा अपसमज दूर करता येईल. जादूगाराचा उद्देश भय दाखविणे किंवा फसवणूक हाच असतो. इजिप्त वगैरे देशांत पूर्वी जादू फार होई. परंतु आता लोकांस समजू लागले की, हा खोटा प्रकार आहे. (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

**३२६३** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०४)

ता. १० डिसेंबर रोजी मिस्तर कैट विमानात बसून गेला असता विमान उंच गेले व तो नाहीसा झाला. आगबोटींनी समुद्रामध्ये शोध घेतला. पण विमान सापडले नाही. तो बहुधा बुडाला असावा, असे लोकांस वाटले. परंतु कैट आगबोटीने सुरक्षित सुरतेस पोहोचल्याबद्दल कळले आहे.

**३२६४** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०४)

महिसूरची लोकसंख्या ३४ लक्ष १० हजारांवर आहे. त्यांपैकी स्त्रिया १५ लक्ष ९६ हजार आहे. या प्रांतात स्त्री–बालहत्या होत असावी, असा अंदाज निघतो.

**३२६५** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०४–४०५)

प्राचीन ग्रंथांची नावे, लेखक व लेखनकाल यांबद्दल शोध करून कोणी माहिती पाठविली, तर ती छापली जाईल. (ज्ञानप्रकाशवरून)

**३२६६** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०५)

सालमजकुरी आळंदीची यात्रा कमी भरली. अन्नधान्याची महर्गता हे कारण असावे. एका बहिरागी बाबाने घटकाभर स्वतःस पुरू घेतले होते. अलंकापुराच्या देवास पोषाकासाठी सरकारी खर्च मिळतो. दागिनेचोरांचेही प्रमाण बरेच आहे.

**३२६७** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०५)

एक सातारकर कळवितो की : कोकणस्थांत काही कार्य झाले की, बोडणपूजन करतात. कुंकू लावून जेवण देतात. साडीचोळीही देतात. मग सर्वच विधवा स्त्रियांनी हळदकुंकू लावण्यास काय हरकत आहे?

**३२६८** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०५–४०६)

एक ठेच लागून सावध झालेला लिहितो की : दक्षिणेतून पेंढार आले आहे, ते रस्तोरस्ती माणसांना गाठून त्यांजकडून दक्षिणा उकळीत असते. आत्मनियमाचे शस्त्र हाती धरून दृढनिश्चयनामक शिपाई मनाच्या दाराशी ठेवा, मग भीती नाही.

**३२६९** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०६)

विजेचे यंत्र चालू करण्यासाठी विलायतेहून १२ असामी आले.

**३२७०** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०६)

गेल्या महिन्यात मुंबईत १५३४ मृत्यू झाले.

**३२७१** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०६)

झाशीचा राजा २१ नोव्हेंबरला मृत्यु पावला. त्यास औरस पुत्र नाही.

**३२७२** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०६)

पटकीची वाखा हा सांसर्गिक रोग नाही, असा निर्णय डॉक्टरांनी दिलेला आहे.

**३२७३** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०७–४०८)

आमचे स्वदेशाभिमानी व अंत्यजादि लाचार जातीचे शुभचिंतक राजश्री जोती गोविंदराव फुले यांनी १ वर्षापूर्वी शाळा सुरू केली. मुलींची शाळा काढल्यामुळे त्यांना त्यांच्या जातीच्या लोकांकडून फार त्रास सोसावा लागला. तीर्थरूपांनी त्यांना घरातून काढून लावल्यामुळे फार संकट गुदरले. परंतु आपल्या नीच बंधुजनांस अज्ञानसागरातून काढून त्यांनी ज्ञानाचे सेवन करवावे म्हणून सर्व त्रास सोसला. हा त्यांचा मोठा उपकार आहे. आम्हीही त्यांचे आभार मानीत आहो. जोतीरावांची लोककल्याणाच्या कामात जी दक्षता व जे श्रम दिसतात, ते पाहून त्यांची स्तुतीच करावी असे वाटते. (२३ मार्च १८५३ शुक्रवारातील तालिमखान्यात परीक्षा झाली. त्यावेळेस एक रिपोर्ट : सदरहू शाळा सुरू होण्याच्या मागील हकिकत विल्हेवार लिहिली आहे. हल्ली तो रिपोर्ट अमेरिकन मिशन छापखान्यात छापला आहे.) (ज्ञानप्रकाशवरून)

**३२७४** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०८)

सन १८५२ मध्ये एकूण १३,४९९ माणसे मृत्यु पावली. त्यांतील दोन माणसे कुत्रे चावल्यामुळे, तर एक कोल्हा चावल्यामुळे मेला.

**३२७५** (१२ : २४, १५ डिसेंबर ५३, ४०८)

भावलपूरचा नबाब नेहमी दारूच्या कैफात मंडळीसह निमग्न असतो. या मंडळीतील एका पठाणाने एक टोपकरास मारले. त्याबद्दल नबाब महाराजांनी खूष होऊन पठाणास मोठ्या हुद्यावर नेमले. अशा करण्यात नबाबाचाच नाश होईल, हे उघड आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १, मुंबई, २ ज्यानुएरी १८५४

**३२७६** (१३ : १, २ जानेवारी ५४, १)

बार्करसाहेब इंग्लंडमधून आले अमून ते मडमेसहित नगरच्या मिशनात राहणार आहेत. ते डाक्तरचेही काम शिकले आहेत. दोन्ही कामे चालवून ते लोकांचे कल्याण करतील.

**३२७६ अ** (इंम : १)

**३२७७** (१३ : १, २ जानेवारी ५४, १–२)

सन १८३९ मध्ये बर्जीससाहेब अमेरिकेहून आले. नगरच्या विद्यालयाचे काम त्यांनी चांगले चालविले. मराठी व्याकरण, खगोल, शब्दकोश, सांप्रदायिक वाक्ये, अशी उपयोगी पुस्तके रचली. प्रकृती बिघडल्यामुळे ते स्वदेशास गेले आहेत.

**३२७७ अ** (इंम : १)

**३२७८** (१३ : १, २ जानेवारी ५४, २)

तीस वर्षांपूर्वी मिशनेरांचे काम करण्याकरिता मिचलसाहेब इकडे आले. कोकणात व पुण्यात त्यांनी मेहनतीने काम केले. अलीकडेच प्रकृती बिघडल्यामुळे ते स्कॉटलंडला गेले. त्यांच्या प्रयाणाच्या वेळी रेव. फेंटन यांनी प्रार्थना केली.

**३२७८ अ** (इंम : २)

**३२७९** (१३ : १, २ जानेवारी ५४, ३)

सीलोनचे ख्रिस्ती रहिवासी धर्माबद्दल आवेशी असून संतोषाने धर्माकडे पैका खर्च करतात. प्रत्येकजण आपल्या प्राप्तीचा १० वा, १२ वा किंवा १५ वा भाग धर्मासाठी देतो. असे ७५० रुपये जमवून त्यांनी शाळा घातली. १५०० रू. जमा करून देऊळ बांधले. त्यांचे धर्मसंबंधी काम सुंदर रीतीने चालले आहे.

**३२७९ अ** (इंम : २)

**३२८०** (१३ : १, २ जानेवारी ५४, ६–९)

भास्कराचार्य ह्या महाविद्वान मनुष्य सन ११४२ मध्ये जन्मला. त्याच्या सिद्धान्तशिरोमणी ग्रंथात पृथ्वीचे वर्णन केले आहे. त्याची कल्पना अशी आहे की : उत्तर गोलार्ध म्हणजे जंबुद्वीप असून दक्षिण गोलार्धात सहा द्वीपे व क्षीरसागर-वगैरे सप्तसमुद्र आहेत. उत्तरेस भारतवर्ष, किन्नर वर्ष, हरिवर्ष, कुरू, हिरण्यमय आणि रम्यकवर्ष, असे प्रदेश आहेत. सोन्याचा मेरू पर्वत सर्वांच्यामध्ये असून त्यावर देव राहातात. भागीरथी ही नदी मोक्षदायिका आहे. भरतवर्षामध्ये नऊ खंडे आहेत. ऐंद्र, कशेरू, शकल, ताम्रपर्ण, गभस्तिक, कुमरिक, नाग, सौम्य, वारूण आणि गांधर्व, ही त्यांची नावे आहेत.

**३२८० अ** (इंम : ३–६)

**३२८१** (१३ : १, २ जानेवारी ५४, ९–१०)

हे ब्रह्मांड विवररूप असून त्यात अनेक ग्रह, सिद्ध, विद्याधर आणि मेघ भ्रमण करतात. त्याच्या पोटात ७ पाताळे असून ती रमणीय आहेत. मेरू पर्वत हा त्याचा मध्य असून मेरूच्या शेंड्यावर देव आणि ऋषी राहातात, तर बुडाशी दैत्य राहातात. क्षीरसमुद्र, हा मेरूची मेखला आहे. पूर्वदिशेस यमकोटी नगर आहे. भद्रेश्वरखंड विभाग सोन्याचा आहे. या भाग्यवान नगरीस अक्षांश नाहीत. मेरूच्या दोन्ही टोकांस उत्तर व दक्षिण ध्रुव आहेत. पुराणे सांगतात की, मेरूची उंची ८ लक्ष मैल आहे. हे सर्व वर्णन चमत्कारिक व असंबद्ध आहे. मेरूस ते पृथ्वीचा आस मानीत असावेत. ईश्वरदत्त अशा ग्रंथात एवढ्या चुक्या व विसंगती असल्यामुळे त्याच्यावर विश्वास ठेवत नाही.

**३२८२** (१३ : १, २ जानेवारी ५४, १०–१२)

बंगालच्या हिंदू नाटकात व्यभिचारादिसूचक व भ्रष्ट प्रसंग असतात. 'जखमेस औषध देणारा' आपल्या पत्रात लिहितो की, मुंबईतही अनेक नाटके होतात. संस्थानिकांनी आश्रय देऊनही दशावतारी व तमासगीर सुधारले नाहीत. कृष्णाचा व्यभिचार, भीमाचा दांडगेपणा पहाण्यासाठी लोक १५-२० रुपये देतात! हे आळशी व दिवाळखोर लोक आहेत. नाटकाच्या टोळीतील कित्येक मुले हुशार आहेत. त्यांना शिक्षण दिल्हे, तर ते विद्वान होतील. सध्या त्यांची हुशारी म्हणजे मृत्तिकेत सुवर्ण पुरल्याप्रमाणे आहे.

**३२८३** (१३ : १, २ जानेवारी ५४, १२)

तुर्क व रशियन लोकांची लढाई चालू असून इंग्लिश व फ्रेंच तुर्कांस मदत करणार, म्हणजे सर्व युरोपखंडात प्रलय माजेल.

**३२८४** (१३ : १, २ जानेवारी ५४, १२)

ब्रम्ही लोकांनी आपला मूर्खपणा सोडला नाही, तर सगळा ब्रम्हदेश जिंकावा लागेल. रणगुणमधील बंडाचा कट सरकारने मोडला.

३२८५ (१३ : १, २ जानेवारी ५४, १३)

ग्रांट वैद्य पाठशाळेत श्री. मोरहेड यांच्या अध्यक्षतेखाली सभा होऊन देवी रोगावर इलाज करण्याचा ठराव झाला. देवी रोगाने लहान मुले मरतात. तरी ग्राज्युएट विद्यार्थ्यांनी देवी काढण्याचे महत्त्व घरोघर जाऊन लोकांना पटवून द्यावे, देवी काढाव्या, असे ठरले. मूल ४ महिन्यांचे झाले की, देवी काढणे आवश्यक आहे. (धूमकेतूवरून)

३२८६ (१३ : १, २ जानेवारी ५४, १३)

आस्ट्रेलियात सोने फुकट व सहज मिळते. म्हणून बरेच लोक तिकडे जातात. आपण लखपती व्हावे, अशी त्यांची इच्छा असते. पण पुष्कळ लोक कर्ज करून व दुर्दशा होऊन परत येतात.

३२८७ (१३ : १, २ जानेवारी ५४, १३)

रे. नारायण शेषाद्री यांचा विवाह सईबाई नामक ख्रिस्ती स्त्रीशी १९-१२-५३ रोजी झाला. सईबाई ही फ्रीचर्च मधील पंतोजीची मुलगी असून सुशिक्षित आहे.

३२८८ (१३ : १, २ जानेवारी ५४, १३-१४)

लार्ड एल्फिन्स्तन मुंबईचे गव्हर्नर म्हणून आले आहेत. मद्रास प्रांतात ते पूर्वी गवरनर होते. त्यांच्या स्वागताकरिता अनेक नागरिक जमा झाले होते. टौने हालमधील समारंभात त्यांनी अनेकांच्या भेटी घेतल्या.

३२८९ (१३ : १, २ जानेवारी ५४, १४-१५)

आगबोट हा नवीन शोध आहे. अमेरिकेत फलटणनामक साहेबाने ७५ कोस आगबोट नेऊन आणली. प्रथम त्याची हेळणा करणाऱ्या लोकांनी त्याची फार वाहवा केली. आता तर ३००-३५० फुटी आगबोटी तीन हजार कोसांपर्यंत प्रवास करतात.

**३२९०** (१३ : १, २ जानेवारी ५४, १५)

धारच्या राजेसाहेबांनी मुंबईत ब्राह्मणांना दक्षिणा वाटली. पण त्यावेळी फार अव्यवस्था झाली. तोंडचाट्या कारभाऱ्यांनी यादीत ज्यांची नावे होती, त्यांनाच दक्षिणा दिल्ही. कित्येक विद्वान् शास्त्री नावे न आल्यामुळे घरी परत गेले. नंतर राजांनी त्यांना बोलावून त्यांचा सत्कार केला. एकंदरीत विद्वानांपेक्षा अविद्वानांनाच मोठा नफा झाला. (प्रभाकरवरून)

**३२९१** (१३ : १, २ जानेवारी ५४, १५)

१८१३ पासून ५३ सालापर्यंत मुंबईमध्ये १८ अब्ज ५३ कोटी २९ लाखांचा माल आयात आला, तर २९ अब्ज, ३८ कोटीची निर्यात झाली.

**३२९२** (१३ : १, २ जानेवारी ५४, १५)

पुणे जिल्ह्यात प्रतिवर्षी १५,२०० रू. ची ३८ मण अफू खपते.

**३२९३** (१३ : १, २ जानेवारी ५४, १५)

राजश्री जगन्नाथ शंकरशेट, डाक्तर भाऊ दाजी, बमनजी होरमसजी, यांना बोर्ड आव् इडुकेशनचे सभासद नेमले आहे.

**३२९४** (१३ : १, २ जानेवारी ५४, १५)

अमेरिकेत ग्रेट रिपब्लिक नावाचे ३१५ फूट लांबीचे जहाज बांधले आहे.

**३२९५** (१३ : १, २ जानेवारी ५४, १५)

फत्तेगडला थंडीने पाण्याचे बर्फ झाले.

**३२९६** (१३ : १, २ जानेवारी ५४, १६)

सेनासाहेब नागपूरकर राजे यांना देवआज्ञा झाली. मरणाच्या समयास ते अत्यंत दुःखी होते. कारण त्यांस पुत्र नाही. भरतखंडातील राजे व प्रजा यांचे दैव फिरले आहे. राजांनी इंग्रजांचे तंत्राने राहावे, म्हणजे त्यांची संस्थाने राहातील.

**३२९७** (१३ : १, २ जानेवारी ५४, १६)

रा. रा. जगन्नाथ शंकर शेठ यांनी पुणे विद्यालयास तारीख १३ डिसेंबर रोजी भेट देऊन विद्यार्थ्यांची परीक्षा घेतली. तसेच दकन इन्स्तिट्यूट संस्थेस शभर रुपये देणगी दिली. (ज्ञानप्रकाशवरून)

**३२९८** (१३ : १, २ जानेवारी ५४, १६)

गाडीवाले मुक्या जनावरांना निर्दयपणे मारहाण करतात, तरी सरकारने जनावरांचे रक्षणाचा कायदा करावा, असा अर्ज मुंबईचे काही नागरिक देणार आहेत.

**३२९९** (१३ : १, २ जानेवारी ५४, १६)

अमदाबादजवळ आलवाना येथे एका ठाकुराची स्त्री सती गेली. बडोद्याचा दिवाण भाऊसाहेब तांबे याच्या सुस्त कारभाराचा हा परिणाम होय.

**३३००** (१३ : १, २ जानेवारी ५४, १६)

चीनमधील बंडवाले राजधानीपासून तीस कोशपर्यंत पोहोचले. नद्यांचे पूल ते पाडून टाकतात. मरू पण मागे हटणार नाही असा त्यांचा निश्चय दिसतो.

**३३०१** (१३ : १, २ जानेवारी ५४, १६)

पत्र पाठविणारांस सूचना : पत्रे सुंदर व बाळबोध अक्षरांत पाठवावी. नावही कळविणे आवश्यक आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक २, मुंबई, १६ ज्यानुएरी १८५४

---

**३३०२** (१३ : २, १६ जानेवारी ५४, १७)

रे. फर्ग्युसन, त्यांची मडम व राबर्ट वाल्लेस मुंबईस आले. ते असेंब्ली शाळेचे गुरुत्व करतील. रे. फ्रास्त मडमेसह नाशकास काम करतील.

**३३०२ अ** (इंम : १७)

**३३०३** (१३ : २, १६ जानेवारी ५४, १७)

रे. जेम्स मिचेलसाहेब रोगी पडून स्वदेशी गेले. त्यांच्याऐवजी जे. एम. मिचल पुण्यास गेले आहेत.

**३३०३ अ** (इंम : १७)

**३३०४** (१३ : २, १६ जानेवारी ५४, १७–१८)

नवा जो उत्पन्न त्याचे निरूपण : हे पुस्तक मिशन छापखान्यात छापले. पृष्ठे ५१, किं. पाव आणा. दुसरी–आवृत्ती (दी न्यू क्रियेटर या पुस्तकाचे भाषांतर)

**३३०४ अ** (इंम : १७)

**३३०५** (१३ : २, १६ जानेवारी ५४, १८–१९)

पुणे मुक्कामी स्त्रीअभ्यासाच्या कामासाठी तीन शाळा चालू आहेत. लेडी क्लारेन्स यांनी काही साहेबांसह त्या शाळांना भेटी दिल्या. मुलींची परीक्षाही घेतली. हिंदू लोकांत स्त्री-विद्याभ्यास वाईट समजला जातो. साहेबलोक देणग्या देतात, म्हणून हे सुंदर काम चालले आहे. तरी लोक खुशीने मुली पाठवीत नाहीत. आर्जवाने त्यांस आणावे लागते.

**३३०५ अ** (इंम : १८)

**३३०६** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २०–२१)

रे. वर्जीस यांनी इंग्रजीत मराठी व्याकरण लिहिले. मराठीत संस्कृत शब्द फार आहेत. दादोबांनी आठ विभक्ती मानल्या. पण मराठीत सामान्यरूप होत असल्यामुळे त्याच कार्यरूप विभक्ती आहेत. सबब ८ विभक्ती मानू नयेत. डाक्तर स्टीवेन्सन् यांचे व्याकरण उत्कृष्ट आहे. वर्जीसने वाक्यरचनेचे विशेष व सामान्य असे प्रकार करून व्याकरणास पूर्णता आणली.

**३३०६ अ** (इंम : १९–२०)

**३३०७** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २१–२२)

इंग्रजांनी नागपूर राज्याचा कारभार आपल्या हाती घेतला आहे. या राज्याचा वसूल ४९ लाख रुपये आहे. इंग्रजांच्या उदारपणामुळेच इतके दिवस हे संस्थान टिकले. या प्रांतावर भोसल्याच्या कुटुंबाचा अधिकार केवळ जिंकण्याने किंवा परापहार करण्याने झाला होता. नागपूरचे राजे पूर्वी पुण्याजवळच्या हिंगणवाडीचे पाटील होते.

**३३०७ अ** (इंम : २१)

**३३०८** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २२)

कलकत्ता शहरात युरोप खंडाप्रमाणे व्यापारधंदा मोठा चालतो. पण घाण, गलिच्छपणा, हेंदर, अंदाधुंदी, हे एशिया खंडातील दोष आहेत. तेथील तेलदीपाऐवजी गॅसचे दिवे लवकरच सुरू होतील.

**३३०८अ** (इंम : २२)

**३३०९** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २२–२३)

भरतखंडातील कायदा व न्यायव्यवस्था यांत सुधारणा सुचविण्याकरिता पार्लमेंटने ८ पंच नेमले आहेत.

**३३१०** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २२–२३)

इंग्लंडमध्ये मद्यपानविरोधी सभेचे कार्य चांगले चालू आहे.

**३३११** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २२–२३)

तुर्क व रुशिया यांत सल्ला व्हावा, म्हणून इंग्रज व फ्रेंच प्रयत्न करीत आहेत.

**३३१२** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २३)

न्यूयॉर्क बेट मुंबईपेक्षा मोठे असून तेथे ८॥ लक्ष लोक रहातात. तेथे गवतापासून कागद तयार करण्याचे कारखाने असून एका तासास ३० हजार मोठे कागद निघतात. तेथे ६९१ पुस्तके या वर्षात छापली गेली. फरासीसचे व जर्मनचे तरजुमेही करतात.

**३३१३** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २३)

वाईच्या एका ब्राह्मणाने आषाढात विवाह केला, म्हणून वाईकर ग्रामण्य करीत आहेत. पण कर्क संक्रांतीपूर्वी विवाह केला तर शास्त्रविरूद्ध होत नाही. आषाढात पावसामुळे विवाहाची तजवीज नीट होत नाही, हे खरे कारण आहे. पण विवाह केल्यामुळे शास्त्रास कसलीच बाधा येत नाही. असे ज्ञानप्रकाशकर्त्यांचे मत आहे. ख्रिस्ती मत असे आहे की, फक्त ईश्वराच्या आज्ञा पाळाव्यात. मुहूर्तज्योतिषाची गरजच नाही. (ज्ञानप्रकाशातील बातमीवर ज्ञानोदयाच्या अभिप्रायासह)

**३३१४** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २३–२४)

मुंबईत अनेक ठिकाणी देवी काढण्याची सोय केलेली आहे. मि. भाऊ दाजी, नारायण दाजी, बरजोरजी दोराबजी, यांच्या दवाखान्यांतील सोयीचा फायदा घ्यावा. (वर्तमानदीपिकावरून)

**३३१५** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २४)

श्रीमंत धारकर पवार यांची मूळपीठिका : या राजवंशाचा मूळ पुरूष सुबाजी हा पुण्याजवळच्या मुलतन गावचा पाटील होता. शिलेदारी व शेतकी हा त्यांचा व्यवसाय असे. शिवाजीच्या सैन्यात पवार सरदार झाले. शाहूराजांच्या तैनातीत असताना त्यांना माळवा, गुजराथ व धार, या ठिकाणी मनसबदारी मिळाली. १७४९ त यशवंतराव पवाराने राजा ही पदवी धारण केली. पानपतच्या लढाईत पवारांनी मोठा पराक्रम केला. सध्याची विधवाराणी सकाबाई हिने एक मुलगा दत्तक घेतला असून त्याचेही नाव यशवंतरावच आहे. १८१९ मध्ये हे संस्थान इंग्रजांच्या राज्यात आले. धारची जमाबंदी ५–६ लाख आहे.

**३३१६** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २५)

इंदूरच्या श्रीमंत तुकोजीराव महाराजांनी गावामध्ये चांगल्या सडका, इलेक्ट्रिक टेलिग्राफ, विजेची यंत्रे वगैरे सुधारणा केल्या. अनेक शाळा सुरू केल्या त्यात ४५० विद्यार्थी शिकतात. आजारी माणसांकरिता इस्पिताल काढले. दसऱ्याचे दिवशी स्वतः जाऊन रोग्यांची चौकशी केली. राजधर्माच्या बाबतीत त्यांची योग्यता विशेष मानली पाहिजे. इतर संस्थानिक ऐश्वर्यात मग्न आहेत. त्यांना दिवस उगवल्या मावळल्याची खबर नसते. दिवाळी साजरी करून ते दिवाळे काढतात. तुकोजीरावांनी मात्र छापखाना काढून विद्या वाढविली.

**३३१७** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २५)

नागपूरमध्ये पाच परगणे आहेत. त्याचा आकार त्रिकोणासारखा आहे. उत्तरभाग डोंगराळ असून बहुतेक अरण्यमय आहे. रानामुळे गुरचरण व सर्पण मात्र व्यवस्थित होते. महानदी, वैनगंगा, वरदा, या नद्या आहेत. नागपूरची उष्णता कडक, तशीच थंडीही कडक असते. त्यातून ताप आणि अतिसार हे विकार वाढतात. हिवाळ्यात इतक्या गारा पडतात की, गारपुकारी नोकर ठेवावे लागतात. गारपुकारी तलवारीचे वार करून वादळ थांबवितात, अशी समजूत आहे! रस्ते चांगले नसल्यामुळे आंबा व नारिंग यांचे फळ मुबलक असूनही फायदा नाही. खाण्याच्या पानांचे उत्पन्नही बरेच आहे.

**३३१८** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २७)

दुक आफ बुकलो एकदा फिरावयास गेला असतांना त्याने एक गाय विकत घेतली. ती गाय घरी पोहोचविण्यास सांगितले. दुसऱ्या दिवशी गाय घेऊन एक मुलगा त्याच्या घरी आला. दुकाने ओळख न दाखविता त्यास गाय आत आणण्यास मदत केली. नंतर चाकराजवळ एक मोहोर देऊन मुलाला बक्षीस देण्याचा हुकूम केला. चाकराने लबाडी करून मुलास फक्त एक पावली दिली. ड्यूकच्या लक्षात ही गोष्ट आल्यावर त्याने मोहोर देण्यास भाग पाडले व त्या नोकरास हाकलून दिले. मुलाचा प्रामाणिकपणा पाहून त्यास हुजूर शाळेत पाठविले. त्याच्या शिक्षणाचा खर्च केला.

**३३१९** (१३ : २, १६ जानेवारी ५४, २८–३१)

मागा म्हणजे मिळेल, शोधा म्हणजे सापडेल, असे येशू म्हणत असे. ठोका म्हणजे उघडेल. नास्तिक न्यायाधीश अनाथ विधवेला न्याय देण्यास वेळ लावतो. पण ईश्वर लवकर न्याय देतो. काही शिष्य शेजाऱ्याला अडचणीच्या वेळी भाकरीही देत नाहीत. पण हे पाप आहे. शेजाऱ्यावर प्रेम करावे. येरूशलेमात स्त्रियांना उपदेश करून येशूने सांगितले की, मसीहा तो मीच आहे. नास्तिकांच्या देवळात जाऊ नका. ईश्वर आपल्या सैतानांचा नाश करणार आहे. नीकदेमस या युहुदी अधिकाऱ्याला येशूने सांगितले की, ईश्वर सर्वांना पुनर्जन्म देईल. मात्र आपल्या पुण्याचा उजेड असावा. पाप्याला धाक बसला पाहिजे.

**३३२०** (१३ : २, १६ जानेवारी ५४, ३१)

इंदूरचे महाराज श्रीमंत होळकर यांस पुत्र झाला.

**३३२१** (१३ : २, १६ जानेवारी ५४, ३१)

बडोद्याचे रेसिडेंट डेवीस मृत्यु पावला.

**३३२२** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३१)
धारकर पवार आगगाडीतून ठाण्यास गेले.

**३३२३** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३१)
मुंबईस इलेक्ट्रिक टेलिग्राफ यंत्राचा उपयोग पुण्यास बातमी पाठविण्यासाठी होईल.

**३३२४** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३१)
पेशावर मिशनसाठी १० हजारांची देणगी मिळाली.

**३३२५** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३१–३२)
गेल्या वर्षी अवर्षण व यंदा अतिवृष्टी झाल्यामुळे पुण्यामध्ये धान्याची नासाडी होऊन महर्घता झाली. कित्येक पुणेकर दुष्ट पदार्थांचे सेवन करून रात्रंदिवस कैफात निमग्न राहातात. छापकागदावरून दगलबाजी करणारांची संख्याही वाढत आहे. इंग्रजी व मराठी शाळांची, तसेच शिल्पशाळेची व्यवस्था झाली, ही मात्र आनंदाची गोष्ट आहे. डेक्कन इन्स्तिटुट ही संस्था स्थापन झाली. पुस्तकग्रहसुद्धा चांगल्यारीतीने चालू आहे.

**३३२६** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३२)
डिसेंबर १८५३ मध्ये मुंबईत १२७५ माणसे मरण पावली. त्यांपैकी २३४ पटकीने गेले.

**३३२७** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३२)
कैफी पदार्थ प्रतिबंधक मंडळीची वार्षिक सभा होणार आहे. त्यावेळी रे. ह्यूम रपोट वाचतील.

**३३२८** (१३ : २, १६ ज्यानुएरी ५४, ३२)

एका ढोंग्याविषयी पत्र आले होते. परंतु पत्रकर्त्याने नाव न लिहिल्यामुळे ते फाडून टाकले आहे. तरी नाव कळवीत जावे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी १८५४

---

**३३२९** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ३३)

भाट्ये लोक हे द्रव्यवान् व व्यापारी आहेत. त्यांनी २०–२५ हजार रुपये जमा करून शाळा काढण्याचे ठरविले आहे. हे अत्युपयोगी काम त्यांनी आवेशाने चालविले पाहिजे.

**३३२९ अ** (इंम : ३३)

**३३३०** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ३३)

बिशप हार्डिंज यांच्या अध्यक्षतेखाली चर्च मिशनेरी सोसायटीची सभा भरली. या मंडळाची ५ संस्थाने असून ६ मिशनेरी आहेत. १४६ जणांनी खिस्ती धर्माची दीक्षा घेतली. ५७ लोक व्याख्याने ऐकण्यासाठी येतात. त्यांच्या शाळांत २१७७ मुले शिकतात. यांत्रिक सुधारणा व शाळा हे प्रगतीचे मार्ग आहेत. ईश्वरावर श्रद्धाही हवीच.

**३३३० अ** (इंम : ३३)

**३३३१** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ३५–३७)

कैफी पदार्थवर्जक मंडळीच्या सभेत बेळगांवचे रे. टेलर मुख्य होते. ही अनर्थकारक चाल जे चालवितात, ते दोषी मानावेत, असे सभेचे मत आहे. डाक्तरांनी मत दिले की, दारू औषधी मुळीच नाही. ती घातक आहे. दारूने दरिद्र व लाचारी मात्र वाढते. दारूपान हे प्रकृतिबाधक व नीतिबाधक कल्याणशत्रू होय. दारूची दुकाने सरकारने बंद करावी. पैक्याचा मोह सोडावा. दुष्टाई व दिवाळखोरी थांबवावी. चोरी, जुगार, खोटी नाणी करणारे यांच्याप्रमाणे यांचा कडक बंदोबस्त व्हावा.

**३३३१ अ** (इंम : ३४–३५)

**३३३२** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ३९–४०)

मादक पदार्थांच्या सेवनाने लोकांचे अकल्याण होते. ब्राह्मण लोकही अट्टल दारूबाज होत आहेत. दारूचा मखता देण्याचा कायदा अगदी अयोग्य आहे. पेशवाईत बेळगावशहराचे दारूचे उत्पन्न फक्त ३६ होते. सध्या १२ हजार आहे! पुण्यात ५२ हजाराचे मखते देतात! याने लोक नीच दशेस पोहोचून दुराचरणी होतील. भरतखंडातील मिशनेऱ्यांनी आस्थापुरस्सर पार्लमेंटास अर्जी दिली. सवई ही मनुष्याचा उपस्वभाव होऊन राहत्ये. सत्य स्वीकारले, तर मनुष्य पापाच्या दास्यातून मुक्त होतो.

**३३३२ अ** (इंम : ३७–३८)

**३३३३** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४०)

रा. रा. बाबा पद्मनजी यांनी व्यभिचारनिषेधक ग्रंथ रचला. अविचारामुळे किंवा विचारी लोकांनी दुर्लक्ष केल्यामुळे पाप वाढत आहे. लोकोपकारी विद्वान श्रीमंतांनी त्यांना आश्रय द्यावा. या दुष्ट चालीमुळे लोकांची फार नासाडी होत आहे. (बाबा पद्मनजी प्रकाशन सहाय्यासाठी विनंती)

**३३३३ अ** (इंम : ४०)

**३३३४** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४२–४३)

'एक हिंदू' पत्रात म्हणतो की : आता लग्नसर सुरू होणार. शुभकार्यांत कलावंतिणी आणणे, वरातीसह त्यांना भिरवणे, हे नीच व उपहासास्पद आहे. त्याने आपली योग्यता, विद्या व लौकिक कमी होतात. सरकार दरबारी मान असणाऱ्या लोकांनी असा तमाशा करू नये. अनाचारी व जारिणी वेश्या घरात आल्यामुळे मुलगे व मुली बिघडतात. त्यांच्या पातकी हावभावांनी कित्येक कुटुंबे विलयास गेली. शास्त्रात नृत्यगायनाचा आदेश आहे. पण त्याचा अर्थ असा नाही की, कलावंतिणीच्या बैठकीचा सरंजाम मांडावा. हे ईश्वरास संताप दिल्याजोगे कर्म होय. तरी ही लज्जास्पद व भ्रष्ट चाल ताबडतोब बंद करावी.

**३३३४ अ** (इंम : ४०–४२)

**३३३५** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४३–४४)

पाण्थावरच्या लढाईत तुर्कांचा पराभव झाला.

**३३३६** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४३–४४)

सहकाऱ्यांशी मतभेद झाल्यामुळे लॉर्ड पाल्मर्स्टन या मंत्र्याने राजीनामा दिला.

**३३३७** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४४)

पुण्यातील वृत्तान्त :

पुणे येथे इन्फन्ट स्कूल निघाले. अतिशूद्रांच्या शाळा व पाद्यांच्या शाळा चांगल्या चालल्या आहेत. ज्ञानप्रकाश सभा व पुणे असोसिएशन यांचे काम उत्तम आहे. दक्षिणा प्राईज कमिटीचे ग्रंथ उत्तम आहेत. पलटणीची कवायत एक महिनाभर चालली होती. मराठी छापखाना बंद झाल्यामुळे विचारलहरी पत्रही तकूब झाले. ब्राह्मणांचे ग्रामण्य चालू असले तरी शाक्त पंथ निर्बळ होत आहे. इनाम कमिटीने कसून चौकशी करून सरकारचे दोन लक्ष रुपये वाचविले. मुंबई-इलाख्यात या वर्षी धूमकेतू व वर्तमानदीपिका ही आठवड्याची वर्तमानपत्रे नवीन निघू लागली. (ज्ञानप्रकाशवरून)

**३३३८** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४४)

गवरनर साहेबांनी बोर्ड आव् एज्युकेशनला आदेश दिला आहे की : गावोगावच्या पुस्तकालयांची माहिती गोळा करून पाठवावी. म्हणजे नवीन पुस्तकालयांना मदत देण्याबाबतचे अर्ज विचारात घेता येतील.

**३३३९** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४४)

सरदार किबे यांनी लोकोपकारक व ज्ञानाच्या अभिवृद्धीसाठी झटणाऱ्या संस्थांना ३२५ रुपयांची मदत दिली. (ज्ञानप्रकाशवरून)

**३३४०** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४५)

'एक गराडेकर' लिहितो की : बेळगाव जिल्ह्यात कृष्णा व घटप्रभा या नद्यांना पाट बांधून कालवे तयार करण्याची योजना इंजिनियर स्काटने सुचविली. ती मंजूर झाली असून युरोपियन कारागिरी व विलायती सामान आले की, काम सुरू होणार. बागायती शेतीची नक्की वाढ होईल. या देशातील संपत्ती वाढविण्याचा प्रयत्न सरकारने सुरू केला, ही आनंदाची गोष्ट आहे.

**३३४१** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४५)

सन १८५३ मध्ये मुंबई सरकारास जमिनीचे उत्पन्न १ कोटी ५८ लक्ष ७९ हजार ५२७ रुपये आले.

**३३४२** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४५)

नागपूरकर महाराज मरण पावले तेव्हा त्यांच्या अंगावरील जडजवाहीर व काश्मीरी मोलवान शाल त्यांच्याबरोबर दहन करावीं, असे लोकांनी ठरविले. तेव्हा इंग्रज रेसिडेंटाने त्यांची समजून घातली व हा व्यर्थ खर्च करू दिला नाही. त्या धनाचा उपयोग गरीब लोकांच्या पोषणाकरिता होऊ शकेल.

**३३४३** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४६–४७)

नागपूरच्या रक्षणासाठी चार सुसज्ज पलटणी असून शिवाय सशस्त्र पायदळ आहे. नागपूरचे लोक गव्हार असून त्यांची भाषाही अगदी गावठी आहे. अंगावर पुरेसे वस्त्र नसताना त्यांच्यात मद्यपान व व्यभिचार मात्र चालू असतो. चाकर लोकांचा मुशारा ३–३ वर्षे देत नाहीत. गुलामांचा व्यापार तर चालतोच. पण अनाथ मुलींचीही विक्री होते. कुळंबिणींची विक्री, दरोडे, बालहत्या चालूच आहेत. हलकट झोपड्यांच्या समुदायात एखादे उत्तम घर, अशी गावाची स्थिती आहे. रस्ते व नळ नाहीत. नदीजवळ घाण व हेंदर फार आहे. दिवाण व सेनापती आपल्या पडक्या वाड्याच्या झरोक्यातून हे सर्व पाहात बसतात.

**३३४४** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४७)

मुंबईजवळच्या आवास या गावी पुनर्विवाह करण्यासाठी ब्राह्मणाच्या दोन स्त्रियांनी धर्म बदलला. सत्ययुगात पुनर्विवाह होता, परंतु कलियुगात ती रीत बंद पडली. तरी हिंदूंनी विचार करावा. (धुमकेतूवरून)

**३३४५** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४८)

सालमजकुरी मुंबईत पाण्याचा कहर होणार.

**३३४६** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४८)
बोहारी लोक ऐकेका लग्नात २–२ लाखांचा खर्च करतात.

**३३४७** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४८)
गिरगावातील ढोंगी साधूस लोकांनी पळवून लावले.

**३३४८** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४८)
दिल्लीचा राजा मृत झाला. त्याचे मृत्तोत्तर कर्म ४० दिवस चालेल.

**३३४९** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४८)
डा. बालंटैन व प्रो. हाल संस्कृत धर्मसंबंधी ग्रंथावरून पुस्तक लिहीत आहेत.

**३३५०** (१३ : ३, १ फेब्रुवारी ५४, ४८)
'हिंदू लोकांची स्वग्रंथाविषयी समजूत' हे पत्र स्थलाअभावी पुढील अंकात छापण्यात येईल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

**ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक ४, मुंबई, १५ फेब्रुवारी १८५४**

---

**३३५१** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ४९)
दारूच्या गुन्ह्यावरून १०३९ मुकद्दमे भरण्यात आले. त्यात १४९३ अपराधी होते. पैकी एक हिस्सा सोजीर, सेलर, वगैरे साहेब होते. असी भ्रष्टकारक व अनर्थकारक दुकाने काढून टाकावीत.

**३३५१ अ** (इंम : ४९)

**३३८२** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५०–५२)

चीनच्या क्वांगसी राज्यातले रहिवासी मूर्तिपूजेच्या विरुद्ध आहेत. अशा तीन हजार लोकांनी देशाच्या मोठ्या भागावर वर्चस्व मिळविले. खरा परमेश्वर त्यांस साहाय्य आहे. जे सैतानाची मैत्री सोडतील, त्यांना विजय मिळेल. लोकांनी अफूसारखी दुर्व्यसने व दुर्गुण टाकले पाहिजेत. अफूने खिसा रिकामा होऊन शक्ती जाते. प्रभू जर आपल्या बाजूला असेल, तर आपण पैक्यावाचून धनवान आहोत. खिस्ती धर्म चिनी लोकांना आवडतो आहे. ते श्रमेंकरून बोध घेत आहेत.

**३३८२ अ** (इंम : ४९–५०)

**३३८३** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५३–५६)

'प्रवासी खिस्ती' लिहितो की : भगवती कोल्हारच्या जत्रेत नवस फेडण्यासाठी गाडेबगाड टोचण्याचे काम चालते. एकनाथ स्वामी म्हणतात : जन भुलले मूर्खपणे. निराकार परमेश्वर चर्मचक्षूंनी दिसत नाही. त्यास आत्म्याने व सत्यतेने भजले पाहिजे. रेडा, बकरू, नैवेद्य मागणारे देव खरे नव्हेत. कारण ते अमंगळ वस्तूने संतोष पावतात. थोमा आणि बारथी लोमी या प्रेषितांनी मलबार प्रांतात सन २०० मध्ये खिस्तधर्म आणला. छळ आणि पाठलाग येणेकरून तो सोन्याप्रमाणे भट्टीत तावून निघाला. गोमांस खाण्यात काही पाप नाही. आमची जात माणूस व धर्म खिस्ती आहे. सगळी माणसे एकाच रक्तामांसाची आहेत. बगाडामुळे कित्येकांचा व्यर्थ प्राण जातो.

**३३८३ अ** (इंम : ५३–५२)

**३३५४** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५६–५८)

'हिंदूचा हितेच्छू' लिहितो की : युरोपियनांचे ग्रंथ ऐहिक सुखाचेच आहेत, त्यात पारमार्थिक काही नाही, असे हिंदू समजतात. असला एकतर्फी निवाडा म्हणजे मौर्ख्य आहे. नेटिवांच्या ग्रंथांत असंभाव्य गोष्टी फार आहेत. वर कलियुग आल्यामुळे मंत्राचे सामर्थ्य गेले अशी ते मखलाशी करतात. पेशवाईत यांचे ग्रंथ प्रतिष्ठित समजले जात असत. त्यांचे ध्येय व कृती यांत मुळीच एकवाक्यता नाही. निःसत्त्व वाक्पांडित्य मात्र भरपूर आहे. टाकसाळ पाहिली की, एखाद्या धाकंभट घनपाठीस वाटते की, हा पोरकटपणा होय. चिमणीच्या हाडांची रचना म्हणजे युरोपीय ग्रंथांचा विषय, अशीही ते हेटाळणी करतात. म्हणून 'सबसे चीप भली' या म्हणीचा आश्रय घ्यावा लागतो. तरी हिंदूंनी कुत्सित मत सोडावे.

**३३५५** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५८)

रूशियन व तुर्क यांची पुन्हा लढाई होणार.

**३३५६** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५८)

लढाईचा रंग पाहून लार्ड पाल्मर्स्टन पुन्हा मंत्री झाले.

**३३५७** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५८)

ब्रिटिश मुजियम पाहाण्यास दररोज ४० हजार प्रेक्षक जातात.

**३३५८** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५८)

मि. पिंटो यांना मिशनाकडून भरतखंडातील कामासाठी ७ वर्षे दरसाल २० हजार रुपये मिळणार.

**३३५९** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५८)

न्यूयार्कच्या फेल्पसाहेबाने अमेरिकन मिशनास १२ लाख रुपये दिले.

**३३६०** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५८–५९)

मि. मिचेल यांचे मत असे आहे की : हिंदू संस्कृती सुमारे ३ हजार वर्षांपासून आहे. त्यांच्या विद्येमध्ये भूगोल नव्हता. चंद्र-सूर्यासच ते देव मानतात. संस्कृत व प्राचीन इराणी यांत साम्य आहे. यावरून इराणची व भारताची योग्यता एकच आहे.

**३३६१** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ५९–६०)

'एक मित्र' लिहितो की : निर्दय व अविचारी लोक विधवांचा छळ करतात. वर्तमानपत्रकर्त्यांनी अज्ञानांधकार दूर करण्यास झटावे. पती मेल्यावर एका स्त्रीस अवघ्या चवदाव्या वर्षी संन्यास देण्यात आला, हे क्रूर कृत्य होय. वैधव्याच्या दुःखावर डागण्या देऊन तिला शतगुणित दुःखी करण्यात आले. पुरुषांनी मात्र ८०–९० व्या वर्षी तिसरे लग्न करावे आणि विधवा बाईला दुःस्थितीत खितपत ठेवावे, हा सामजिक अन्याय होय. तांबडे वस्त्र व लाटणे एवढेच तिचे 'अलंकार' आहेत! आधुनिक विचाराच्या लोकांनी च आता पुढे आले पाहिजे.

**३३६२** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६०–६१)

ब्राह्मण सकाळीच स्नान करून पंचपात्रे घेऊन हिंडतात. रांडांचेही घरी जातात. गोड बोलून कामे साधतात. पातकी स्त्रीपुरुषांचीही धार्मिक कृत्ये करतात. पुनर्विवाह नसल्यामुळे रांडांची संख्या वाढत आहे. अगदी प्रौढ माणूस ८-९ वर्षांच्या मुलीशी लग्न करतो. शिवाय अंगवस्त्रे ठेवतो! हे सर्वजण केवळ खीरपुरी खाण्यातच मग्न आहेत. हिंदू ज्ञातीचे पुढारी आपली कामगिरी बराबर बजावीत नाहीत. जारकर्म करणाऱ्यांची पंगतही त्यांना चालते. हेच रंडाव्यसनी सोवळ्याओवळ्याचे स्तोम माजवितात. आमच्या आचारप्रधान धर्माचे हे लोक अविचारी चौकीदार आहेत. हे नादान देशाची हानी करतात.

**३३६३** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६१)

अवघ्या ७-८ महिन्यांत रेल्वेस ८७ हजार ४९९ रुपये उत्पन्न आले. ३,१६०८२ प्रवासी होते. आग्रा, मद्रास, कलकत्ता याठिकाणीसुद्धा लोखंडी रस्ते करून प्रवासी व माल यांची वाहतूक होणार आहे.

**३३६४** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६१–६२)

संयुक्त संस्थानात २७ हजार मैलांचा विजेचा यंत्रमार्ग तयार झाला व १० हजार मैलांचा मार्ग होणार आहे. बावीस हजार डाकेच्या कचेऱ्या असून त्यांचा खर्च ९० लाख आहे! लाखो घोडे, बैल व गाई अशी निरोगी जनावरे आहेत. दर महिन्यास एकेका ग्रंथाच्या १ लाख ३५ हजार प्रती छापतात. एका वृत्तपत्राचा खप १ लाख ४० हजार होतो. दारूदुकाने बंद करण्याविषयी ते जागरूक आहेत.

**३३६५** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६२)

जनरल इम्प्रुव्हमेंट लैब्ररी : कुंमार तुकड्याजवळ हे ग्रंथालय असून पुस्तकांचा मोठा संचय झाला आहे. नेटिवांनी या उपयुक्त कामास साहाय्य करावे.

**३३६६** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६२)

सरकारकडे लोकांची देणी वगैरेची २१ कोटी ३९ लाख रुपये रक्कम आहे. पण आता सरकारने व्याजाचा दर ५ टक्क्यावरून ४ टक्क्यावर आणला आहे. अशा ठेवींमुळे सरकारास २ कोटींचा नफा झाला.

**३३६७** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६२)

टाकसाळे या गृहस्थांनी तुकोजीराव होळकरांना पावणेदोन लाख रुपये आठ आणे व्याजाने दिले. तसा दस्तऐवजही त्यांचेपाशी आहे. पण रक्कम वसूल होत नाही, म्हणून त्यांनी इंग्रज सरकारकडे तक्रारअर्ज केला आहे.

**३३६८** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

सीमोरसाहेब इंडिया रीफार्म संस्थेचे अध्यक्ष असून मुंबईत त्यांची भाषणे झाली. ते विलायतेस गेले आहेत.

**३३६९** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

इंदूर रेसिडेन्सीत २८ हजार ४०० रोग्यांवर उपचार करण्यात आले.

**३३७०** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

मुंबई ते ठाणे विजेचे यंत्र सुरू होत आहे.

**३३७१** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

धारच्या पवारांनी नाशकास ३० हजारांचा दानधर्म केला.

**३३७२** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

डिसेंबर १८५३ त मुंबईत १२८२, तर जानेवारीत १२४६ मृत्यु झाले.

**३३७३** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

पुण्यात सर्वेअर व इंजिनेर लोकांसाठी वर्ग निघाला.

**३३७४** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६३)

होळकरमहाराजांनी १५ हजारांची यंत्रे इंदुरास नेली. त्यात १ आगबोटही आहे.

**३३७५** (१३ : ४, १५ फेब्रुवारी ५४, ६४)

रंगो बापूजी सातारकराचे वकील म्हणून विलायतेत होते. त्यांनी अन्नोदक वगैरे स्वतःचे स्वतः करून घेतले. अशी खातरीपत्रेही आणली आहेत. पण त्यांच्या शुद्धीकरणावरून ब्राह्मणांत दोन तट पडले.

**३३७५ अ** (इंम : ६३-६४)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक ५, मुंबई, १ मार्च १८५४

**३३७६** (१३ : ५, १ मार्च ५४, ६५)

यंदा २८ पुस्तके छापली त्यांपैकी १४ पुनरावृत्तीने छापली आहेत. ही पुस्तके व्यावहारिक विद्याविषयी असून फार सुंदर व उपयुक्त ठरतील. या कामास २० हजारांच्या देणग्या मिळाल्या.

**३३७६ अ** (इंम : ६५)

**३३७७** (१३ : ५, १ मार्च ५४, ६६)

मुंबई इलाख्यातील सरकारी शाळांकरिता ५० हजार रुपये जादा देणार. पश्चिम भारतात दरवर्षी १ लाख ९२ हजारांचा खर्च केवळ या शाळांसाठी होतो.

**३३७७ अ** (इंम : ६६)

**३३७८** (१३ : ५, १ मार्च ५४, ६७)

कित्येक वजनदार लोकांचे मत आहे की : रंगोपंतास शुद्ध करून घ्यावे. त्यांस विलायतेची चांगली माहिती असल्यामुळे त्यांचा बंबे असोसिएशनकरिता फार उपयोग होईल. वर्तमानदीपिकेची बातमी आहे की, माणकेश्वरगावी २२० ब्राह्मणांनी रंगोपंतास शुद्ध करून भोजन केले. परंतु धर्माच्या अधिकाऱ्यांनी सर्वांनाच ग्रामण्यात ढकलले !

**३३७८ अ** (इंम : ६६–६७)

**३३७९** (१३ : ५, १ मार्च ५४, ६८–६९)

'एक हिंदू' म्हणतो की : मुंबईत डानबीच्या सन्मानार्थ वेश्यांचा नाच झाला. सिमोर हे काही संस्थानचे रेसिडेंट नव्हेत. ग्रेट ब्रिटनमध्ये असले नाच हलके व अप्रतिष्ठित समजले जातात. मेजवानी करणारांना सारासार विचारच नाही. बंबे असोसिएशनने हे जारिणी स्त्रियांचे ताफे आणविले! भरतखंडात अजून सुधारणेचा पायाच पडला नाही. यापेक्षा शाळाखात्यातील विद्वानांची व्याख्याने ठेवावयाची होती.

**३३७९ अ** (इंम : ६७–६८)

**३३८०** (१३ : ५, १ मार्च ५४, ७०–७१)

'एक हिंदू' पत्रात म्हणतो की : वाडवडलांच्या दुष्ट चाली उघडपणे सोडून देण्याचे पारमार्थिक धैर्य या लोकांमध्ये नाही. इंग्रज सरकार व त्यांचे निर्लोभी कामदार यांनीच सती, बालहत्या, यांसारखे दुष्ट प्रकार बंद केले. सरकारने मौन्य धरून न राहाता इतर हीन कृत्येही बंद करावीत. होळीचा सण आमची नीतीच मळीण करून टाकतो. होळी म्हणजे नरकाचा दिवस होय. सरकारने हुकुम करून अमंगळ प्रकार थांबवावे. घरात चिखलात लोळा, पण रस्त्यावर प्रसिद्धपणे लाजिरवाणे काम करू नका.

**३३८० अ** (इंम : ६९–७०)

३३८१ (१३ : ५, १ मार्च ५४, ७३–७४)

गेल्या ५ वर्षांत मुंबई बेटात देवीने ४०३८ मेले. पैकी ३२०७ लहान मुले होती. देवीरोग झाला, तर चारांपैकी एक माणूस हमखास मरतो. जे जगतात, ते विद्रूप होतात. पूर्वी युरोपातही दर ६० वर्षांनी देवीची साथ येई. गाईचे दूध काढणारांना मात्र या रोगाची बाधा होत नाही, असा अनुभव आहे! त्यातून व्याक्सिनेशनचे तंत्र निघाले. म्हणून मुलाच्या जन्मानंतर तीन महिन्यांत देवी काढाव्यातच. अज्ञानी आणि गरीब लोकांना हे नीट समजून व पटवून द्यावे.

३३८१ अ (इंम : ७२–७३)

३३८२ (१३ : ५, १ मार्च ५४, ७४)

गेल्या वर्षी मुंबईहून चीनला कापसाचे ९०,४३५ गठ्ठे व अफूची ३१,७७५ पाकिटे रवाना झाली. विलायतेस कापसाचे ३ लाख ८४ हजार ५९८ गठ्ठे रवाना झाले.

३३८३ (१३ : ५, १ मार्च ५४, ७४)

चिनी बंडखोरांनी राजधानीचे बंदर जिंकले व ते देशाच्या मुख्य शहराकडे कूच करीत आहेत.

३३८४ (१३ : ५, १ मार्च ५४, ७५)

दवाखाने, देवी काढण्याचे वार आणि डाक्तरांची नावे अशी यादी छापली आहे.

३३८५ (१३ : ५, १ मार्च ५४, ७६–७७)

पंढरपूर हे भूवैकुंठ असल्यामुळे त्याची कीर्ती दिगंतरी पसरली आहे. पण तेथे देवब्राह्मण करण्यास खर्च फार येतो. पंढरपूर गाव घाणेरडे आहे. लोक कोठेही प्रातर्विधीस बसतात. पांडुरंगाच्या दर्शनासाठी भयानक रेटारेटी होते. (वर्तमानदीपिकेवरून)

**३३८६** (१३ : ५, १ मार्च ५४, ७६–७७)

'एक विचारी' लिहितो की : सातारचे वकील रंगो बापूजी विलायतेहून आले. १० हजार मैलांचा प्रवास त्यांनी गोगाभोगावून निभावून केला. अशा वेळी त्यांचे मनापासून स्वागत करावयाचे सोडून त्यांना वाळीत टाकणे हे केवढे क्रूरत्व आहे ? नोटिवांचा विश्वास शेणमातीं व गोमूत्र यांवरच फार दिसतो. म्हणून आधी वेडगळ समजुतींच्या गुलामगिरीतून मुक्त झाले पाहिजे. आता बंबे असोसिएशनने सोवळी आगबोट बांधून विलायतेत सोवळी धर्मशाळा बांधली, तर मात्र गोष्ट निराळी !

**३३८७** (१३ : ५, १ मार्च ५४, ७७)

तातार लोकांच्या हल्ल्यापासून बचाव करण्याकरिता चिनी लोकांनी एक भव्य तट बांधला. याची उंची २५ फूट आहे. या भिंतीवर १० लक्ष लोक पहारा देत असत. हा तट इतका पक्का बांधला आहे की, दोन हजार वर्षे होऊन गेली, तरी त्यास किंचितही धक्का लागला नाही. (ज्ञानप्रसारकवरून)

**३३८८** (१३ : ५, १ मार्च ५४, ७७–७८)

तुर्की व रूसी लढाईत रशियाचा पराभव होऊन ५ हजार रशियन मेले.

**३३८९** (१३ : ५, १ मार्च ५४, ७७–७८)

इराणचा शहा इंग्रजांशी तह करण्यास कबूल झाला.

**३३९०** (१३ : ५, १ मार्च ५४, ७७–७८)

अमेरिकेतील युनियन कॉलेजच्या मुख्य गुरूने संस्थेस १३ लाख रुपये देणगी दिली.

**३३९१** (१३ : ५, १ मार्च ५४, ७८)

'पुराणिकाचा शिष्य' लिहितो की : चातुर्मास्य सप्ताहात भाविक मंडळी दूध गोळा करून पुराणिकास देत असत. एका लबाड गृहस्थाने दूध आणण्यासाठी काही भांडी गोळा केली आणि तो भांडी घेऊन पसार झाला. ही गोष्ट अहमदनगर मुक्कामी घडली.

**३३९२** (१३ : ५, १ मार्च ५४, ७८)

'बातमीदार' लिहितो की : संगमनेरला दोन पांथस्थ गृहस्थ आले. त्यांनी दोन घोडी भाड्याने घेतली. घोड्यांच्या मालकाबरोबर १५ कोस प्रवास केला. नंतर खाण्यातून मालकास गुंगीचे औषध दिले. नंतर ते दोघे घोडी घेऊन पळून गेले.

**३३९३** (१३ : ५, १ मार्च ५४, ७८)

'सातारकर' आपल्या पत्रात लिहितो की : साताऱ्यास एक साधू आला आहे. कपाळास राख लावून व डोळे लाल करून तो बसतो. या बैराग्यास अनेक लोक पैसे देतात. ही देवाची भक्ती नसून ढोंगास भुलण्याचा प्रकार आहे.

**३३९४** (१३ : ५, १ मार्च ५४, ७९)

नामदार ब्लेनसाहेब विलायतेस गेले. त्यांचा जागी लम्सडेन येत आहेत.

**३३९५** (१३ : ५, १ मार्च ५४, ७९)

मेरवानजी सेठ याने १ लाख १० हजारांची कापडाची यंत्रे मागविली.

**३३९६** (१३ : ५, १ मार्च ५४, ७९)

कलकत्याची मिशन सोसायटी ६९,४०० रु. खर्च करून विद्यालय बांधणार.

**३३९७** (१३ : ५, १ मार्च ५४, ७९)

अलिबागचा ढोंगी संन्यासी परतला आहे. लोकांनी सावध राहावे.

**३३९८** (१३ : ५, १ मार्च ५४, ७९)

नामदार बेथुनच्या मृत्युनंतर लॉर्ड डलहौसी यांनी कलकत्याची मुलींची शाळा चालविली. स्वतः खर्च केला व त्या रकमेची देणगी शाळेस दिल्ही. द. म. ७०० रु. ते खर्च करतात. वास्तविक त्या गावात अनेक श्रीमंत बाबू आहेत. पण अशा उपयुक्त कामाकडे पैसा देत नाहीत, ही लाजिरवाणी गोष्ट आहे.

**३३९९** (१३ : ५, १ मार्च ५४, ७९–८०)

कमिशनर रिविससाहेब अतिशूद्रांच्या शाळेकरिता दरमहा १५ रुपयांची देणगी देणार आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**३४००** (१३ : ५, १ मार्च ५४, ८०)

अधिकाराचा गर्व करू नये. आर्जवी लोकांस थारा देऊ नये. उधळेपणा, डामडौल व लबाडी न करता नम्रतेने वागा. आपले रोजचे काम नीट करा. शिवाय लोककल्याणाची बिनपगारी कामे हौसेने करा. मनात भाडोत्रीपणा नसावा. विद्या द्रव्याकरिता नसून ज्ञानाकरिता असते. छापखान्याचे लाभ समजावून घ्या. त्याची हेळणा करू नका.

**३४०१** (१३ : ५, १ मार्च ५४, ८०)

घोड्यांच्या शर्यतीत पैजा लागून व्यर्थ द्वेष निर्माण होतो. यात जिंकणारासही फायदा नाही. कारण मित्रांना खाना देण्यात अनाठायी खर्च होतो. (ज्ञानप्रकाशवरून.)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक ६, मुंबई, १५ मार्च १८५४

**३४०२** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८१)

मद्रासी पाठशाळेचे तीन विद्यार्थी ख्रिस्ती धर्मात आले.

**३४०२ अ** (इंम : ८१)

**३४०३** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८१)

मुंबईपासून मालेगावपर्यंत १७६ मैल विजेच्या यंत्राच्या तारा टाकल्या जातील. आग्रा व ग्वाल्हेर ही शहरेही जोडणार आहेत.

**३४०३ अ** (इंम : ८१)

**३४०४** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८१–८२)

रंगोपंतास शुद्ध करून घेणारांवर ग्रामण्य आलेले आहे. अशा अपांक्तांपैकी कित्येकांनी गुप्तपणे घेतलेले पैसे परत देऊन ग्रामण्यातून सुटका करून घेतली !

**३४०४ अ** (इंम : ८१)

**३४०५** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८२)

लार्ड डानबी सीमोरने लंडनमध्ये धर्मशाळा बांधण्याचा सल्ला दिला. पण बोलण्यास काही विषय हवा,' म्हणून तो तसे बोलला असावा. कारण हा खर्च फुकट जाणार आहे. भरतखंडाबाहेर समुद्रमार्गे जाणे, हे शास्त्राच्या विरुद्ध असल्यामुळे हिंदू लोक विलायतेस जात नाहीत. असे असताना या सूचनेचा काय उपयोग होणार ?

**३४०५ अ** (इंम : ८२)

**३४०६** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८४–८६)

पोलिसांच्या मुख्य माजिस्त्रेताकडे सुज्ञ मुंबईकरांनी अर्ज पाठविला. होळीतील वेडेविद्रे भाषण व अमंगळ शब्द यांची बेबंदाई आता थांबली पाहिजे. प्रभाकराचा कर्ता हिंदू असून त्याने स्पष्ट शब्दांत होळीचा निषेध केला. चंद्रोदय पत्रानेही या सणास अनर्थसूचक म्हटले. धुळवड म्हणजे नरकवड! अमदाबादेत होळीची लाकडे चोरण्यासही बंदी आहे. मुंबईच्या माजिस्त्रेताने सक्त मेहनत करून होळीचे घाणेरडे प्रकार कमी केले. हा विनंती अर्ज १ मार्च १८५४ चा आहे. त्यावर ५७ लोकांच्या सह्या आहेत.

**३४०६ अ** (इंम : ८३–८४)

**३४०७** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८६–८७)

दक्षिणा प्रैज कमिटी :

१ साक्रेटिस याचे चरित्र (पृ. १३०) रोलिन.
अनुवादक : कृष्णशास्त्री चिपळोणकर.

२. खुसरू राजाचा इतिहास (पृ. १८०) रोलिन.
अनु. विष्णु मोरेश्वर भिडे.

३. व्यवहारदर्पण (पृ. १६५) शंकर शास्त्री गोखले.

४. कप्तान कुकसाहेब ह्याचे जलपर्यटनाचा वृतांत (पृ. १६३) विलियम बिंगली. अनु. सदाशिव गणेश लेले.

५. अलंकारविवेक (पृ. १५०) : कृष्णशास्त्री राजवाडे.

६. हत्तींच्या गोष्टी (पृ. ११९) चेंबर्स वरून अनुवाद : कोंडो अमृत महाराव.

७. जगाचा संक्षिप्त इतिहास (पृ. १८८) जॉन मार्शमन् : हरी रघुनाथ गाडगीळ. ही पुस्तके मुंबईत खपविणारास ५ रुपये दस्तुरी मिळेल.

**३४०८** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८७–८८)

जगाचा संक्षिप्त इतिहास (वरून) भाग–१, सृष्टीचे उत्पत्तीपासून जलप्रलयापर्यंत : ईश्वराने आकाश व पृथ्वी उत्पन्न केली. रजःकणांतून आदम आणि ईव निर्मिली. आदन बागेत ईश्वराची आज्ञा मोडल्यामुळे त्यांवर ईश्वराची अवकृपा झाली. मानवाची संतती दुःखात व दारिद्र्यात राहू लागली. हिंदु ज्यास सत्ययुग म्हणतात, ते ग्रीकांचे सुवर्णयुग होय. आदम व ईव यांचे दोन पुत्र होते. त्यांपैकी केन हा गर्विष्ठ व ईश्वरद्रोही होता, तर एबल नम्र व ईश्वरभक्त होता. केनाने भावास मारल्यामुळे पृथ्वी रक्तरंजित बनली व मानव पापी झाला. त्याची आयुर्मर्यादा १ हजार होती. सांप्रत ती ७० वर येऊन ठेपली. ईश्वरास पापाचा कंटाळा येऊन त्याने मानवजातच नष्ट करण्याचे ठरविले. सत्यधर्मी व निष्कपटी नोहास मात्र जिवंत ठेवावयाचे ठरविले. नोहाने नौका तयार करून प्राणी व पक्षी यांचा एकेक प्रतिनिधी जलप्रलयातून शर्थीने वाचविला.

**३४०९** (१३ : ६, १५ मार्च ५४, ८८–९०)

जगाचा संक्षिप्त इतिहासवरून : परिभाषाप्रकरण :

मागील गोष्टींची माहितगारी होण्यास धर्मपुस्तक उपयुक्त असते. कोणत्याही देशाचा इतिहास दंतकथांवरून कळतो. वेदांना श्रुती म्हणतात. कारण ते ऐकून तयार झाले. काही दंतकथा अघटित व संशययुक्त असतात. कित्येक राष्ट्रांत मनःकल्पित गोष्टी ऐकू येतात. थडगी, कागदपत्र, यांवरूनही इतिहास कळतो. थडगी कोसळून पडली, तरी त्यांवरील लेखांतून इतिहास समजतो. शिक्के, नाणी, ही साधनेही उपयोगी पडतात. शिक्क्यावर पराक्रमी माणसांचे चेहरे, नाव, वय, ही सापडतात. खिस्तपूर्व १२२० मध्ये ट्रोजन (Trogen) लढाई झाली. ती युरोपीय इतिहासाची ज्ञात मर्यादा होय. नंतर सायरस राजा व सिकंदर हे महत्त्वाचे राजे आहेत. त्यांच्यात निदान ६ शतकांचे अंतर आहे. येशू खिस्तापासून रोमी साम्राज्याची अखेर हा चौथा भाग होय. १४९२ त अमेरिकेचा शोध लागून नवे पर्व सुरू झाले.

**३४१०** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९०)

पार्लमेंट सभेत राणीने भाषण केले.

**३४११** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९०)

रूश्या विरुद्ध प्रश्या आणि आस्त्रिया युद्धाची तयारी करीत आहेत.

**३४१२** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९०-९१)

प्राचीन शोधपंथ :

१. द्रविडपंथ : संस्थापक : कंदकाचार्य होता. याच्या वज्रवंदी शिष्याने जैन पद्धतीचा प्रसार केला. हा शके ४०१ साली जिवंत होता.
२. सापाल्यपंथ : कलिसमुनीने सन ५६५ मध्ये ग्रंथ लिहून स्त्रियांनाही मोक्ष मिळतो, असे सिद्ध केले.
३. कालसांखी : या पंथाने कुमारसेनाकरवी सन ६६३ त काष्ठांच्या मूर्ती करून त्यांची स्थापना केली.
४. निचिकसांखी : रामसेनाचार्याचा हा पंथ सन ८६१ त मथुरेत स्थापन झाला. हा पूजापंथ होता.

(ज्ञानप्रकाशवरून)

**३४१३** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९१)

रंगो बापूजीवरून शुक्र व कृष्ण पक्षांची वादावादी चालू आहे. काकाचार्य या धूर्त वैष्णवाने पांडित्य लढवून प्रायश्चित दिल्हे. पण शास्त्रार्थांच्या भांडवलावरच व्याजबट्टा चालूच राहिला. काही ब्राह्मणांनी या 'गुन्ह्याबद्दल' प्रायश्चितही घेतले. पण आता प्रायश्चिताचा आग्रह धरणारांनाच वाळीत टाकण्याचा कट सुरू आहे!

(वर्तमानदीपिकावरून)

**३४१४** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९१)

होळी सणात व्यभिचारिणी स्त्रियांना घरी बोलावून सभ्य गृहस्थ त्यांचा नाच करवितात. अनीतिमान वेश्यांवर लाखो रुपये उधळले जातात. त्यांचे मित्रही बैठकीत येऊन थोडाफार खर्च करतात. ही रक्कम एक करून समाजोपयोगी काम केले, तर विधवांसाठी फंड, मुलींच्या शाळेस देणगी, लैब्ररी फंड, अशा गोष्टी होऊ शकतील.
(वर्तमानदीपिकेवरून)

**३४१५** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९२)

रत्नागिरीत मुलींच्या शाळेची वार्षिक परीक्षा झाली. २४ मुली परीक्षेस होत्या. पण एतद्देशी लोक अगदी कमी हजर होते. कारण गाठचे काही द्रव्य द्यावे लागेल, अशी त्यांस भीती वाटली!

**३४१६** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९२)

पोलीस कमिशनरने होळीच्या दिवसांत रस्त्यावर धिंगामस्ती करण्यास बंदी केली (धूमकेतूवरून)

**३४१७** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९२)

तुकोजीराव महाराजांचे विद्यागुरू उमेदसिंग मुंबईस आले. त्यांनी एल्फिन्स्तन विद्यालयास भेट दिली. (वर्तमानदीपिकावरून)

**३४१८** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९२–९३)

अन्न कमी खाल्ले, तर प्रकृती बिघडते. पण जास्त खाल्ले, तरीही बिघडते. कैफी पदार्थांनी तर रोग लागतात. आरेबिया व इराण येथे अफू व भांग खातात. त्यांची धुंदी अल्कोहोलपेक्षाही जास्त असते. कडू दवणा व कोकाक हे अनिष्ट पदार्थ आहेत. त्यांनी पाठीच्या कण्यास कापरी येऊन, क्षुधा कमी होत्ये, बुद्धी मंदावत्ये. अफूने श्रमपरिहार होतो, अशी रानटी जमातीची कल्पना होती. पण तीही खोटीच आहे. अफूचा परिणाम कमी करण्यासाठी अफूसह मेण खावे! (मराठी ज्ञानप्रसारकवरून)

**३४१९** (१३ : ६, १५ मार्च ५४, ९३–९६)

खिस्तानिया राणीची खाण ५५१ फूट रुंद आहे. त्यामध्ये डोली घेऊन उतरावे लागते. दूषित वायूने तेथे काही स्त्रिया मेल्या. खाणीतील पाणी काढण्यासाठी यंत्र बसविले आहे. अशोधित धातूचे शोधन करण्यासाठी कारखाना आहे. खाणीत आग लागते, म्हणून घरेही दूर अंतरावर बांधली आहेत. धातुचा रस करून शुद्ध करण्यासाठी मोठाल्या भट्या रचलेल्या आहेत.

**३४२०** (१३ : ६, १३ मार्च ५४, ९६)

मिठावरचा कर कमी करावा, या मागणीच्या चौकशीसाठी नामदार फ्लोडेनसाहेब आले आहेत.

**३४२१** (१३ : ६, १३ मार्च ५४, ९६)

गेल्या महिन्यात मुंबईत १२७२ मृत्यु झाले.

**३४२२** (१३ : ६, १३ मार्च ५४, ९६)

अंडरसन यांना राजकीय व गुप्त खात्याचा सेक्रेटरी नेमले.

**३४२३** (१३ : ६, १३ मार्च ५४, ९६)

नामदार लम्सडेनसाहेब कौंसलदार झाले. त्यांच्या जागेवर अर्स्किनसाहेब यास सेक्रेटारी नेमले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३४२४** (१३ : ७, १ एप्रेल ५४, ९७)

रे. जी. क्यांडी : ३३ वर्षांपूर्वी पलटणीचे काही काम केल्यावर क्यांडी यांनी धर्मोपदेशकाचे काम सुरू केले. सध्या ते विश्रांतीसाठी विलायतेस गेले आहेत. ते १६ वर्षे उपदेशक होते.

**३४२४ अ** (इंम : ९७)

**३४२५** (१३ : ७, १ एप्रेल ५४, ९७)

जनरल असेंब्ली शाळेच्या कामासाठी रे. विल्यम फरग्युसन हे साहेब आले होते. पण त्यांच्या मडमेची प्रकृती बिघडल्यामुळे ते स्वदेशास गेले.

**३४२५ अ** (इंम : ९७)

**३४२६** (१३ : ७, १ एप्रेल ५४, ९८)

शिप्री येथून पार्लमेंटातील संभाषण तारेच्या यंत्राने १७० मैलांवरील गावी पोहोचविण्यात आले. हे एक चमत्कारिक व उपयोगी काम आहे.

**३४२६ अ** (इंम : ९८)

**३४२७** (१३ : ७, १ एप्रेल ५४, ९९)

बगाडाचे आढे मोडल्याने एक स्त्री जखमी झाली. पण या यातना लोक आनंदाने सहन करतात. कारण पुढच्या जन्मी सुख होईल, अशी त्यांना आशा असते. बगाडाची चाल ब्राह्मणेतरांतच जास्त दिसते. कोणती तरी कांक्षा धरून लोक हाल सोसतात. पाचवीची पूजा व सटवी निष्ठेने करतात. पण जे सटवी पुजीत नाहीत, त्यांची मुले काही आजारी पडत नाहीत. नेटिव लोक तुकाराम व खिस्त यांची तुलना करतात. पण तुकारामाच्या निर्याणाबद्दल एकवाक्यता नाही. तीर्थयात्रेने काही पाप जाणार नाही. वधस्तंभावर खिळलेला येशू मात्र सगळीकडे गाजतो आहे.

**३४२७ अ** (इंम : ९८-९९)

**३४२८** (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०३-१०४)

शिकलेले लोक सरकारी कचेरीतील कामात वाकबगार असतीलच, असे नाही. मंगलोरचा जड्ज अडरसनसाहेब याने शिकलेल्या उमेदवारांनासुद्धा गुरूकडून अनुपत्र आणण्याची सक्ती केली. शिवाय कोडताची विशेष परीक्षा ठेवली. उमेदवारी करायला लावून योग्य माणसांसच काम दिले. यात काही नीच जातीच्या लोकांना काम मिळाले, तेव्हा उंच जातींनी गडबड केली व गवनरकडे तक्रारअर्ज दिल्हे. पण सरकारने या तक्रारीस महत्त्व दिल्हे नाही. जातपात न पाहाता योग्यता पहावी, असे सरकारचे मत आहे.

**३४२८ अ** (इंम : १०२-१०३)

३४२९ (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०४–१०५)

कोल्हापूरच्या शिवाजीराजांचे लग्न बडोद्याच्या गणपतराव गाइकवाडांच्या मुलीशी होणार आहे. महाराज आपला लवाजमा घेऊन पुण्यात आले, तेव्हा त्यांस मोठी मेजवानी देण्यात आली. हल्ली भरतखंडात हिंदू राजांची संस्थाने फार थोडी राहिली आहेत. (ज्ञानप्रकाशवरून)

३४३० (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०५)

बुद्धिप्रकाश या नावाचे गुजराथी वृत्तपत्र सुरू झाले. विद्याभ्यासक मंडळ ते पत्र चालविते. वर्नाक्युलर सोसायटीने मदत दिली आहे. स्वदेशीय लोकांनीही मदत केली पाहिजे.

३४३१ (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०५–१०६)

रशियन लढाईसाठी इंग्लंडचे व फ्रांसचे लाखो सैनिक रवाना झाले.

३४३२ (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०५–१०६)

अमेरिकेत दारूदुकानांविरुद्ध मोठी चळवळ चालू आहे.

३४३३ (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०६)

युद्धात जिंकलेल्या पंजाबी सरदारांना इंग्रज सरकारने किमान ६०० रुपयांपासून ४८०० रु. पर्यंतच्या नेमणुका करून दिल्या.

३४३४ (१३ : ७, १ एप्रेल ५४, १०६)

सरकारी हपिसातील बेसनदी चाकरांना बडतर्फ केले तर त्यासाठी वरिष्ठ अधिकाऱ्याकडे रपोट करावा. या बडतर्फीस भारत सरकारची मान्यता घ्यावी असा हुकुम सरकारने जारी केला आहे. आता कोणासही हकनाहक बडतर्फी भोगावी लागणार नाही.

३४३५ (१३ : ७, १ एप्रिल ५४, १०६–१०७)

१६९२ मध्ये जमेकात भूकंप होऊन जमिनीस ४० वाव खड्डा पडला. कित्येक घरे जमीनदोस्त झाली. मेघगर्जनेसारखा आवाज झाला. समुद्राचे पाणी जमिनीवर पसरले. अनेक ठिकाणी दऱ्या निर्माण झाल्या. पर्वतसुद्धा कोसळले. झाडांची खूणसुद्धा राहिली नाही. लोक गलबतात बसून बेट सोडून गेले. तीन हजारांहून जास्त माणसे मृत्यु पावली.

३४३६ (१३ : ७, १ एप्रिल ५४, १०७–१०८)

परप्रांतीय गुजराथी, मारवाडी, पारशी व्यापारी एखाददुसरा रुपया भांडवल घेऊन येतात. पाटलाकडून फुकट जागा मिळवून धंदा सुरू करतात. चार दोन वर्षांत चिरेबंदी वाडा बांधून शेट बनतात. ब्राह्मण हे त्यांचे प्रतिष्ठित बंधू आहेत. कोठेतरी पूजा करून जेवणाची सोय लावतात. पण त्यांचा मनू आता गेला आहे. लोक किटकिट करतात, तरी यांची याचनावृत्ती संपत नाही. यापेक्षा दगड फोडून पोट भरावे. व्यापाराचे ज्ञान तर राहू द्याच, यांच्याजवळ विद्वत्ताही अगदी नसते. बहुधा ते अक्षरशून्य असतात. वागणूक व तोरा मात्र दशग्रंथी ब्राह्मणाचा असतो. गवतापेक्षा कापूस हलका, पण कापसापेक्षा याचक भिक्षुक हलका समजावा. वारादेखील त्यांस उडवून लावीत नाही. कारण ते वाऱ्याजवळही याचना करतील !

३४३७ (१३ : ७, १ एप्रिल ५४, १०९)

'एक सुधारणूक इच्छिणारा सोनार' पत्रात म्हणतो की : लग्नकार्यात जेवणावळी होतात. पण यजमान सोनार दुजाभाव दाखवून निमंत्रितांचा अपमान करतात. पितांबर नेसून रुप्याचा गडवा आणणाऱ्या व गळ्यात दागिने मिरवणाऱ्या सराफांना रंगीत पाटाभोवती रांगोळी काढून जेवायला बसवितात. त्यांना उत्तमोत्तम पक्काने वाढतात. गोरगरिबांना मात्र कनिष्ठ प्रतीची पत्रावळ देतात. गरिबांचा असा अपमान करणे या जातिश्रेष्ठांना शोभत नाही.

**३४३८** (१३ : ७, १ एप्रिल ५४, ११०)

पारा ही धातू रुप्यासारखी व चकचकीत पांढरी असते. इतर धातूत, पाषाणात व मातीत ती सापडते. सिनाबारमध्ये किंवा कोळशाच्या खाणीमध्ये पारा असतो. पालाटिनेट, आलमेडन व आयड्रा येथे पाऱ्याच्या खाणी आहेत. या धातूचा शोध अगदी सहजगत्या चार शतकांपूर्वी लागला. पाण्यामध्ये तो मिश्रित होता. शुद्ध पारा जलद वाहातो. खाली पडला, तर त्याचे वाटोळे लहान भाग होतात. थंडीतही तो पातळच राहातो. उष्णतेने तो प्रसरण पावत नाही. म्हणून हवामापक यंत्रात तो वापरतात.

**३४३९** (१३ : ७, १ एप्रिल ५४, १११)

देवीपासून लहान मुलांचा फार नाश होत असे. आईबापांनी नीट काळजी घेऊन २ महिन्यांत मुलांना देवी काढाव्यात. नशिबात असेल, ते होईल, अशा भोळ्या समजुतीत राहू नये. (ज्ञानप्रसारकवरून)

**३४४०** (१३ : ७, १ एप्रिल ५४, १११)

धारच्या पवारांनी नाशकात देवासाठी १२०० रु. दिले. ब्राह्मणभोजनास ५ हजार रु. खर्च करून जेवण दिले. पण काही ब्राह्मणांनी उष्ट्या पानांवर दोनदोनदा बसून दक्षिणा घेतली. सुतक आलेला उपाध्यायही ब्रह्मकर्म करतो, हे नवल आहे. सप्तशृंगीच्या देवळावर झेंडा लावणारास इनाम मिळणार होते, तेव्हा तिघांनी पैशासाठी जीव धोक्यात घातला. मूर्ख लोक लुच्चांच्या नादी लागतात.

**३४४१** (१३ : ७, १ एप्रिल ५४, ११२)

ब्रह्मदेशचा राजा वारला. त्याचा भाऊ राज्य सांभाळतो. तो लढाऊ आहे. पण इंग्रजांविरुद्ध न जाण्यातच त्याचे कल्याण आहे.

**३४४२** (१३ : ७, १ एप्रिल ५४, ११२)

चीनमध्ये थंडीमुळे लढाई थांबली.

**३४४३** (१३ : ७, १ एप्रेल ५४, ११२)

बडोद्याचा कारभारी तांबेकर याच्या गैरवर्तणुकीची चौकशी होणार.

**३४४४** (१३ : ७, १ एप्रेल ५४, ११२)

होळीमहात्म नावाचे एक बीभत्स पुस्तक छापले गेले. पण त्याचा कर्ता व छापखाना समजत नाही.

**३४४५** (१३ : ७, १ एप्रेल ५४ ११२)

जनावरास मारझोड होऊ नये, असा कायदा व्हावा, म्हणून एक अर्ज गवरनर जनरलकडे गेला आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक ८, मुंबई, १५ एप्रेल १८५४

---

**३४४६** (१३ : ८, १५ एप्रेल ५४, ११३).

नवीन चंद्रिका मासिक सुरू झाले आहे. यात एक लेख असून त्या विषयावरच कविता घातली आहे. हे चांगले पुस्तक नीट चालावे असी आमची आशा आहे. पृ. ३२, मुंबईहून मार्च (१८५४) पासून सुरू झाले.

**३४४६ अ** (इंम : ११३)

**३४४७** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, ११३)

बास्तनची प्रजा १ लाख ३० हजार असून शाळेच्या इमारतीसाठी ३५ लाख रुपये खर्च झाला आहे. तुरुंग, फौजदारी, यांपेक्षाही विद्येवर तेथे जास्त खर्च होतो. हे शहर मासाचुसेच प्रांतात असून त्यात १० लाख प्रजा आहे. मुलाच्या ५ व्या वर्षापासून १५ व्या वर्षापर्यंत शिक्षण सक्तीचे असून त्याचा एकदशांश खर्च सरकार करते. या लोकसत्ताक राज्यात दारू, वेश्या, जुगार, यांना अगदी बंदी आहे. देवळे व शाळा यांवर सतत खर्च होतो.

**३४४७अ** (इंम : ११३)

**३४४८** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, ११४)

रंगोबास परभूंनी शुद्ध करून घेतला, परंतु ब्राह्मणांनी अपांक्तच ठेविला. परभूतही मतभेद आहेतच. जातीच्या बंधनातून हे नागरिक कधी मुक्त होणार, हे कळत नाही.

**३४४८अ** (इंम : ११४)

**३४४९** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, ११५)

ग्रांट मेडिकल कॉलेज या पाठशाळेचा बक्षिसे व सनदा देण्याचा समारंभ नामदार गवरनरांच्या उपस्थितीत झाला. या शाळेचे सर्वच गुरू आपले काम फार चांगले चालवितात.

चार विद्यार्थ्यांना सनद मिळाली ते असे :

१) रतनजी होर्मशजी
२) शामराव नारायण
३) मोरेश्वर जनार्दन
४) बाळकृष्ण सखाराम.

**३४४९ अ** (इंम : ११५)

**३४५०** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, ११६)

चर्च ऑफ स्कॉटलंडच्या मद्रास शाळेची परीक्षा मे. पार्टेजरसाहेबाच्या उपस्थितीत झाली. ७०९ मुलांपैकी ३९२ कन्या आहेत. हे पाहून साहेब फार खुष झाले. विद्यार्थ्यांनी विद्येचे साफल्य दाखविले, तसा बैबलाचाही अभ्यास करावा, असा त्यांनी बोध केला.

**३४५० अ** (इंम : ११५)

**३४५१** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, ११६–११७)

कैफी प्रतिबंधक सभेची सभा झाली. काठेवाडात अफिणीचा दुर्गुण वाढल्यामुळे लोक लाचार होत आहेत. मुलांनाही कुसुंबा दिला जातो, हे खेदजनक आहे. अमेरिकन लोकांप्रमाणे दारूदुकानाविरुद्ध चळवळ करावी, असेही ठरले. चोरी-मारामारीच्या अपराधात गुन्हेगाराइतकेच दारूविक्यासही दोषी धरावे, अशी सूचना सभेने केली.

**३४५१ अ** (इंम : ११६)

**३४५२** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, ११८–११९)

मिस्तर बाबा पद्मणजी म्हणतात की : (दारू) हे व्यसन अगदी खेदकारक आहे. पश्चिम हिंदमधील कनिष्ठ जातीत त्याचा फार प्रसार होत आहे. लोकांच्या नीतिकल्पना शिथिल असल्यामुळे व्यसन वाढते. पण त्यापेक्षा मक्तयाच्या दुकानांत सुलभ दारू मिळण्याने ते वाढते, हे खरे आहे. दारूच्या नीच धंद्याला सरकारने परवानगी देऊ नये. हिंदू राज्यधारकांची वृत्ती याबाबतीत अत्यंत स्तुत्य असे. इंग्रज सरकार कृपण व नीच बुद्धी धरून दारूच्या दुकानास परवानगी देते. या अर्थाचे मूळ समूळ उपटून टाकले पाहिजे. सरकारी कर नाममात्र असून त्याने दारूचा अनर्थ वाढण्यास मदत होते.

**३४५२ अ** (इंम : ११७–११८)

**३४५३** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, १२०–१२१)

हे राजे (कोल्हापूरचा राजा) शिवाजीमहाराजांच्या वंशातले असल्यामुळे त्यांचा मुंबईमध्ये मोठा सन्मान करण्यात आला. त्यांच्या स्वागतास गवरनर एल्फिन्स्तन साहेबांचा सकतार सामोरा गेला. स्वागतासाठी तोफा सुटल्या. १७६० मध्ये संभाजीराजाची पत्नी जिजीबाई हिचा दत्तक पुत्र सिराजी यांचे ते वंशज आहेत. कोल्हापूरच्या राणीने दहा वर्षांपूर्वी इंग्रजांशी लढाई केली. त्यात कोल्हापूरराज्याचा पराभव झाला. म्हणून हे महाराज वयात आले, तरी रेसिडेंटाचाच कारभार चालू आहे. महाराजांना विद्येचा छंद आहे. म्हणून त्यांस अमोलिक विद्याधन प्राप्त करून देण्यास सरकारने साहाय्य करावे.

**३४५३ अ** (इंम : ११९–१२०)

**३४५४** (१३ : ८, १५ एप्रिल ५४, १२३)

एल्फिन्स्तन विद्यालय :

या शाळेचा बक्षिससमारंभ झाला, तेव्हा मुख्य गुरू हार्कनेससाहेब यांनी रपोट वाचला. मुंबईच्या सरकारी शाळांमध्ये १५१८ विद्यार्थी आहेत. सर्व विषय स्वभाषेत शिकविले जातात. मराठीत व गुजराथीत प्रावीण्य दाखविणारांना बक्षिसे दिली जातात.

**३४५४ अ** (इंम : १२१–१२३)

३४५५ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२३-१२५)

अरबस्तानच्या ओसाड प्रदेशात जो वादळी वारा सुटतो, त्यास 'सामील' असे नाव आहे. धुरळ्याचे ढग तयार करणारा वारा फार थोडा वेळ टिकतो. अरब लोक हा घातकी वारा सुटला की, जमिनीवर पालथे पडून राहातात. या वातुक वाऱ्यास गंधकासारखा वास येतो. वादळात मरणारांचे शरीर अगदी करपून जाते. काही दुष्ट बाफेमुळे हा वायू तयार होत असावा. त्याचा शरीरावर अनिष्ट परिणाम होतो. म्हणून अरब लोक काळा व मृदु रुमाल डोक्यास गुंडाळून थंड औषधे घेतात. एकदा मक्केचे १००० यात्रेकरू या वाऱ्याने मेले.

३४५६ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२५-१२६)

मिस्तर बाबा पद्मनजी 'व्यभिचारनिषेध' या ग्रंथात लिहितात की : यहुदी लोक व्यभिचारी स्त्रीपुरुषांस धोंड्यांनी ठार मारीत. व्यभिचारी माणसास ठार मारणारास कसलीही शिक्षा होत नसे. सिक्युलस राजाने तर या अपराधासाठी मुलाचे डोळे काढले होते. इतर युरोपीय देशांत अवयवच्छेद, मस्तकच्छेद, जिवंत जाळणे, अशा शिक्षा होत. व्यभिचारी स्त्रीस मात्र सक्तीच्या एकांतवासाची शिक्षा होई. महंमदी धर्मानुसार तिलाही फटके मारीत. प्राचीन काळी या कर्माचा अतिशय द्वेष वाटत असे, व वीट येत असे. जारकर्माच्या अपराधास देहांतशिक्षा कडक वाटली, तरी सध्यापेक्षा जास्त कडक शिक्षा द्यावयास हवी.

३४५७ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२६)

प्रवास केल्यामुळे नाना देशांच्या रीति, विद्या, कला, कायदे, यांचे ज्ञान होते. त्यांपैकी चांगल्या रीती आपल्या देशात सुरू करण्यास प्रोत्साहन मिळते. हा अमोलिक फायदा होय. महान् विद्वान, सुंदर वनस्पती, यांची माहिती होते.

३४५८ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२७)

इंग्लंड, फ्रान्स व रशिया लढाईची तयारी करीत आहेत.

३४५९ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२७)

मार्चमध्ये मुंबईत १५९८ मृत्यु झाले. त्यांपैकी ३७९ पटकीचा वाखा व देवी या रोगांनी मेले.

३४६० (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२७)

गायकवाडाचा कारभारी तांबेकर पुण्यात राहणार आहे.

३४६१ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२७)

पनवेलजवळ गुळसुंद गावात गंगा निघाली, असे सांगतात.

३४६२ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२७)

कलेक्टरकचेरीत उमेदवारांचे वय २५ केले आहे.

३४६३ (१३ : ८. १५ एप्रेल ५४, १२७)

आग्रा ते कलकत्ता इलेक्ट्रिक टेलिग्राफ सुरू झाले.

३४६४ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२७)

इंदूरच्या महामंडलेश्वराजवळ लोखंडाची खाण सापडली.

३४६५ (१३ : ८, १५ एप्रेल ५४, १२८)

तुकोजीराव होळकरांस पुत्रलाभ झाला. बायजाबाईसाहेब रत्नखचित पाळणा तयार करीत आहेत, अशी बातमी वृत्तपत्रांनी छापली. पण त्या रुप्याचा पाळणा करीत आहेत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३४६६** (१३ : ९, १ मे ५४, १२९–१३०)
रेव. डाक्तर स्टीवन्सन : हे साहेब १८२४ मध्ये भारतात आले. एत्तद्देशीय लोकांचे कल्याण व्हावे, म्हणून त्यांनी सतत प्रयत्न केले. त्यांनी सामवेदाचे भाषांतर केले. त्यांच्या नावे जनरल असेंब्ली शाळेत स्कालरशिप सुरू होईल. ते आता स्वदेशास जात आहेत.

**३४६६ अ** (इंग : १२९)

**३४६७** (१३ : ९, १ मे ५४, १३०–१३१)
ज्ञानप्रसारक सभेच्या मुलींच्या शाळेत बक्षिस-समारंभ झाला. वार्षिक रपोटात म्हटले आहे की, अशा आठ शाळा चालू असून त्यांत ५९८ मुली शिकतात. परोपकारी लोक खुषीने मदत करतात. तरी नेटिव लोक विशेष आवेशी नसल्यामुळे मर्यादित प्रगती होते. पार्शी मुलींचे प्रमाण जास्त असून पार्शी लोक आर्थिक मदत करतात.

**३४६७ अ** (इंग : १३०)

**३४६८** (१३ : ९, १ मे ५४, १३१–१३२)
लार्ड डलहौसी यांनी गंगा नदीचा काही प्रवाह बळवून पाणी आणले. तो समारंभ पाहाण्यास वीस हजार लोक उपस्थित होते. प्रतिकूल प्रजांची स्वस्थता, वसुलाची बढती, जयसमारंभ व तह, लोखंडी रस्त्याचे जाळीदार काम, विजेचे यंत्र, विद्याभ्यासाच्या योजना, वगैरे अनेक उपयुक्त कामे डलहौसी यांनी केली. कोट्यवधी रुपये खर्च करून प्रगती साधली.

**३४६८ अ** (इंग : १३१)

**३४६९** (१३ : ९, १ मे ५४, १३३–१३५)

भोळे हिंदु पाडव्यास वर्षफळ ऐकतात. पण शिकलेले लोक ज्योतिषशास्त्र हे ढोंग समजतात. या वर्षाचे सुधारकांच्या दृष्टिकोनातून भविष्य असे आहे की : पश्चिम भारतात विद्यावृद्धी होईल. ज्ञानप्रसारक मंडळ्या निघतील. लोखंडी रस्ता वाढल्यामुळे व्यापार वाढेल. दारूदुकानाने, दरिद्र व दुःख वाढेल. आळशी लोकांचे अगदी दिवाळे निघेल. आमचे भूदेव अभिमान सोडणार नाहीत रक्तपाताने शेकडो स्त्रिया विधवा होऊन बालके पोरकी होतील. तरी जे ईश्वराचे भय धरून चालतील, त्यांना सुख होईल. नीतीने वागणारे व सर्वकाळ उद्योग करणारे अशा लोकांना बरे दिवस येतील. निर्जीव पदार्थांवर विश्वास ठेवणारांना यश येणार नाही मंत्रशकुनावर विश्वासणारांना अपयश येईल. (धूमकेतूवरून)

**३४६९ अ** (इंम : १३२–१३३)

**३४७०** (१३ : ९, १ मे ५४, १३७–१३८)

शाळेत धर्माचे ज्ञानही दिले पाहिजे. मनुष्यमात्रास धर्म आवश्यक असतो. सरकारच्या हातून ही गोष्ट होणे कठीण दिसते. धर्म सोडून नुसती विद्या शिकविणे यात कमीपणा व दोषही आहे. बैबलाचा शोध घेण्याची ज्याची इच्छा असेल त्यास ते शास्त्र शिकू द्यावे विद्वान लोक नास्तिक असतात, असा अनुभव होतो. परंतु खोटा धर्म शिकवू नये. खऱ्या धर्माला तुच्छ मानणे, हे मोठे अज्ञान आहे. ईश्वराचे भय बाळगून सद्धर्माचा शोध करावा.

**३४७० अ** (इंम : १३५–१३७)

**३४७१** (१३ : ९, १ मे ५४, १३९–१४२)

महादेवशास्त्री कोल्हटकरांच्या नगरच्या सभेचे वर्णन करताना 'एक श्रोता' लिहितो की : त्यांचे असे मत आहे की, होळीच्या सणात काही पुण्य नाही. होळी न करण्यात काही पाप नाही. एका राक्षसीच्या मृत्यूचे स्मरण म्हणून हा बीभत्स अमंगळ सण सुरू झाला. काही शिष्ट लोकांनी पाडलेला तो शास्त्राधार आहे. सदसद्विचारशक्ती वापरून त्याची कुत्सित कर्मे सोडून द्यावीत. इंग्लिश लोक जर या देशात आले नसते, तर आमची अज्ञानदशा कायमच राहिली असती. हे परदेशस्थ परोपकारी लोक देशस्थ लोकांना सुधारण्याचा नेहमी प्रयत्न करतात. शास्त्रीबावा वेदशास्त्रसंपन्न असून अर्वाचीन विद्येतही प्रवीण आहेत. त्यांचा या भ्रष्ट कर्मांना फार विरोध आहे. असे विद्वान व सुज्ञ लोकच समाजास उपयोगी ठरतात.

**३४७१ अ** (इंम : १३८–१३९)

**३४७२** (१३ : ९, १ मे ५४, १४२)

पदार्थज्ञान ही चमत्कारिक व उपयोगी विद्या आहे. पर्वत वगैरे व्हावयास बहुत वर्षे लागली असावी. पृथ्वी हा अग्निमय गोल होता. काही काळाने तो थंड झाला. नंतर जनावरे व झाडे उत्पन्न झाली. पृथ्वीचे पोटात साहा कोश खणल्यानंतर माती, मुरुम व दगड, असे अनुक्रमे थर सापडतात. पृथ्वीवर ३ लक्ष किडे, पाषाणांच्या २५० जाती, दिसतात. धातूदेखील रसापासून उत्पन्न झाले असावेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**३४७३** (१३ : ९, १ मे ५४, १४२)

साताराचे माजी सदर अमीन माधवराव गोविंद यांना १२०० रु. लाच घेतल्यावरून एक वर्ष कैद व १० हजार रुपये दंड झाला. अपिलात शिक्षा कायम झाली. पण दंड रु. २४०० रु. झाला.

**३४७४** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

सुरतेस वाणी जातीच्या एका मृतभर्तृकेने एका विधुराबरोबर गुप्तपणे विवाह लावला. बनिया लोकांत खळबळ माजली आहे. (धूमकेतूवरून)

**३४७५** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

इंडियन लेजिस्लेटिव्ह कौन्सिल : या कौन्सिलवर मुंबई व मद्रास यांचा प्रत्येकी एक कामदार नेमावा, असे ठरल्यामुळे मि. मालेट व डॅनियल यांची नेमणूक झाली. (धूमकेतूवरून)

**३४७६** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

पनवेलजवळ एका ठिकाणी गाईने जमिनीत शिंग खुपसले. तेथून झरा ऊर्फ गंगा वाहू लागली. शेकडो भोळे लोक तेथे स्नान करतात.

**३४७७** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

पटवर्धनांच्या कन्येचा विवाह इचलकरंजीच्या घोरपड्यांशी झाला. दुर्दैवाने तिचा पती वारला. पैशापरी पैसा जाऊन मुलीस अवघ्या ७ व्या वर्षी वैधव्याच्या घोर अंधकारात पडावे लागले. तिचा पुन्हा विवाह न करणे, हा केवढा क्रूरपणा आहे! रु. २३००० हुंडा दिलेला होता.

**३४७८** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

कोलापुरकर महाराजांनी मुंबईच्या प्रसिद्ध स्थळांना भेट दिली.

**३४७९** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

तुकोजीराव होळकरांचा अल्पवयीन पुत्र मृत्यु पावला.

**३४८०** (१३ : ९ १ मे ५४, १४३)

कापावरच्या धर्मार्थ दवाखान्याचा फायदा १०,००० लोकांनी घेतला.

**३४८१** (१३ : ९, १ मे ५४, १४३)

नाशकात पटकीची साथ सुरू झाली.

**३४८२** (१३ : ९ १ मे ५४, १४३)

महाराजा दिलीपसिंगाचे कलकत्त्यात थाटाने स्वागत झाले.

**३४८३** (१३ : ९, १ मे ५४, १४४)

रघुनाथ रामचंद्र यांची धारवाडहून पुण्यास बदली झाली.

**३४८४** (१३ : ९, १ मे ४५, १४४)

बळवंतराव वामनरावशास्त्रीस मद्यपानावरून अपांक्त ठेवले होते. त्यांची पुनः चौकशी होणार.

**३४८५** (१३ : ९, १ मे४५, १४४)

जमाबंदीच्या रकमेत घालमेल केल्याबद्दल कारकून व शेकदार यांना ठेप झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १०, मुंबई, १५ मे १८५४

**३४८६** (१३ : १०, १५ मे ५४, १४५)

अमेरिकन मिशन इन्स्तिटुशन या शाळेत यंदापासून इंग्रजी शिकण्याची खास व्यवस्था होणार. शिकवणाऱ्यांच्या ३ जागा आहेत. गरजूंनी अर्ज करावे.

**३४८६ अ** (इंम : १४५)

**३४८७** (१३ : १०, १५ मे ५४, १४५)

मि. ग्लासगो सन १८४१ पासून राजकोटमध्ये मिशनरी होते. मध्यंतरी ते विलायतेस जाऊन परत आले.

**३४८७ अ** (इंम : १४५)

**३४८८** (१३ : १०, १५ मे ५४, १४५)

शेलडनसाहेब कलकत्यात आले असून कराची मिशनात राहातील. रोजर्ससाहेबही स्वदेशाहून येत आहेत.

**३४८८ अ** (इंम : १४५)

**३४८९** (१३ : १०, १५ मे ५४, १४६)

इंग्लंड फ्रान्स व अमेरिका या देशांत सोन्याची नाणी ३५ कोटी रुपयांची, तर तांब्याची १० कोटी आणि रुप्याची २० कोटी रुपयांची नाणी टाकसाळीमध्ये पाडण्यात आली.

**३४८९ अ** (इंम : १४६)

**३४९०** (१३ : १०, १५ मे ५४, १४७–१४९)

गुजराथेत दारू निषिद्ध आहे. पण अफूचे व्यसन मात्र जबरदस्त आहे. अफू खाण्यात प्रतिष्ठा मानतात. काही जण कुसुंबा ही द्रवरूप अफूही पितात. अफूची चट वाढली की, शरीर शुष्क होत जाते. अफूच्या धुंदीमुळे धर्मसंबंधी विचार दूर पडतो. पण हे लोक अफू वाटण्यात भूषण समजतात. काही लोक तर लेकरास अफू चारतात. त्याने बालके मरतात. मुंबईतही हे व्यसन फार वाढत आहे. तरी वृत्तपत्रांनी या व्यसनाविरुद्ध प्रचार करावा.

**३४९० अ** (इंम : १४६–१४७)

**३४९१** (१३ : १०, १५ मे ५४, १५०–१५१)

या महाराजांचा (गुजराथचे महाराज.) थाट अगदी पोपप्रमाणे असतो. अज्ञानामुळे गुजराथी लोक त्यांचे दासानुदास झाले. आंधळ्या भक्तीमुळे नीतीची व शुचिर्भूतपणाचीही मर्यादा ते ओलांडतात. आर्जवी, तमासगीर, तबलजी, असले हलकट पुरुष गुरूभोवती वावरतात. कलावंतिणीचा नाच, गंजिफा, सोंगट्या, यांत महाराजाचा काळ जातो. महाराजांच्या पूजेचा खर्चही २५ रुपये इथपासून हजारापर्यंत असतो.

**३४९१ अ** (इंम : १४९–१५०)

**३४९२** (१३ : १०, १५ मे ५४, १५२–१५४)

मनुष्य हा एक जातीचा पशूच आहे. शरीरसौंदर्य व पराक्रम या दोनच कारणांनी तो सर्व प्राण्यांत श्रेष्ठ ठरतो, तरी खरे महत्त्व आत्म्याच्या योगाने आले. त्याच्या विचारशक्तीने त्यास ऐश्वर्य व राज्य मिळाले. शिद्दी व इंदियन लोकांमध्ये विचारशक्ती नसल्यामुळे ते रानटी राहिले. विचाराने अन्नवस्त्राप्रमाणेच ज्ञान, विद्या, नीती लाभतात व मनःकल्पित भय दूर होते. विचार करून जुन्या चाली दूर केल्या पाहिजेत. ऋषींनी एकांतात विचाररूप अन्न सिद्ध केले. ब्राह्मण उपाध्ये 'दछना' मिळविण्यासाठी आम्हांस वेडे करून वृथाचारात गुंग ठेवतात. सध्या विचारामध्ये फार शिथिलता दिसते. म्हणून सदसद्‌विचार करावा. (धूमकेतूवरून भाषांतर)

**३४९२ अ** (इंम : १५१–१५२)

**३४९३** (१३ : १०, १५ मे ५४, १५४–१५५)

महमदी व खिस्ती यांचा धर्मसंवाद : एक महमदी अनुयायी बिशपाचे प्रवचन ऐकण्यास रोज येत असे. साहेबलोक दारू पितात. मग त्यांना धार्मिक कसे मानावे, असा प्रश्न त्याने विचारला. तेव्हा धर्मोपदेशकाने सांगितले की, पवित्र शास्त्रात दारू पिणे हे पाप समजले जाते. सगळेच काही पीत नाहीत. आता तो गृहस्थ मनापासून प्रवचन ऐकतो.

**३४९४** (१३ : १०, १५ मे ५४, १५५–१५६)

सामाजिक सुधारणेत सुरत इतके पुढे गेले व मुंबई शहर मात्र मागे पडले, ही गोष्ट आश्चर्यकारक आहे. सुशिक्षित, शहाण्या व परोपकारी सद्गृहस्थांनी सभा स्थापन करावी. विधवांना दुःस्थितीत ठेवणे, हे नरकसाधन आहे. क्लार्कसनसाहेबाने गुलामांचा व्यापार बंद करण्यासाठी अवर्णनीय हालांना तोंड दिले. अनेक जातीत पूर्वी पुनर्विवाहाची चाल होती. पण रूढीमुळे ती बंद झाली. विलंब न लावता असे धैर्य दाखवावे. (वर्तमानदीपिकावरून)

**३४९५** (१३ : १०, १५ मे ५४, १५४)

कोल्हापूरचे प्रधान दाजीसाहेब यांनी पेनसन घेतली. आता इंग्रज सरकारने केवळ देवळे बांधणारास प्रधान नेमू नये. सर्व मुलांना विद्याधन कसे प्राप्त होईल, हे प्रधानाने पाहिले पाहिजे. मुलींसही शिक्षण दिले पाहिजे. (ओरिएंटलवरून)

**३४९६** (१३ : १०, १५ मे ५४, १५४)

बोरीबंदर ते कल्याण प्रथमच आगीची गाडी गेली, तेव्हा गवरनर लार्ड एल्फिन्स्तन उपस्थित होते. लोक आता या गाडीचा उपयोग करतात. (धूमकेतूवरून)

३४९७ (१३ : १०, १५ मे ५४, १५४)

बडोद्यामधील धामधूम अद्याप समाप्त झाली नाही. बडोद्यातील कामदारांना यंत्राविषयी भय वाटते. यंत्राचा काही उपयोग नाही, असे समजणारे कारभारी राज्याची व्यवस्था कशी ठेवणार ? भाऊराव तांबेकर पुन्हा येण्याची काहीही शक्यता नाही.

३४९८ (१३ : १०, १५ मे ५४, १५४)

मुंबई ते इंदूर इलेक्ट्रिक टेलिग्राफ बसविला आहे. राजर हामिलटन यांनी गवरनरांशी प्रथम संभाषण केले.

३४९९ (१३ : १०, १५ मे ५४, १५७-१५८)

इंग्लंडचे व रशियाचे युद्ध होणार. यासाठी इंग्रज-फ्रेंचांनी एक लाखावर फौज जमविली.

३५०० (१३ : १०, १५ मे ५४, १५७-१५८)

चिनी सागरावर रशियाची तीन जहाजे हिंडत असून ती गडबड करण्याचा संभव आहे.

३५०१ (१३ : १०, १५ मे ५४, १५८)

कल्याणला पटकीचा वाखा सुरू झाला. भोळसट लोकांनी देवाची भक्ती चालविली आहे. देवळाच्या दरवाजास कोरीव खांब बसविले. असल्या उपायांनी रोग कसा जाईल ?

३५०२ (१३ : १०, १५ मे ५४, १५८-१५९)

एका ब्राह्मण पतिपत्नीवर दत्तक घेण्यासाठी आणलेल्या मुलास जहर देऊन मारण्याचा आरोप आला होता. परंतु कोर्टाने त्यांस निर्दोषी ठरविले. असे असताना कृष्णंभट नावाच्या ब्राह्मणाने मुद्दाम सभा भरवून साक्षी घेतल्या व त्यांच्यावर बहिष्कार टाकण्याचा निर्णय घेतला. हा नसता उद्योग त्यांनी कां केला, ते समजत नाही.

३५०३ (१३ : १०, १५ मे ५४, १५९)

अमेरिकन मिशनने मुंबईत अनेक शाळा काढल्या. आता त्यांनी आणखी एक इंग्रजी शाळा काढण्याचे ठरविले आहे. तेथे इंग्रजीचेच खास शिक्षण मिळेल. या शाळेने उमरखाडी–माजगाव भागामधील लोकांचा फार फायदा होईल.

३५०४ (१३ : १०, १५ मे ५४, १५९–१६०)

कंपनी सरकारची नवी सनद ३० एप्रिलपासून सुरू झाली. त्यानुसार लेजिस्लेटिव्ह् कौन्सिल कलकत्त्यासच भरेल.

३५०५ (१३ : १०, १५ मे ५४, १५९–१६०)

२४ मे ला राणीच्या वाढदिवशी भोजनसमारंभ होतील.

३५०६ (१३ : १०, १५ मे ५४, १५९–१६०)

मुंबईत गेल्या महिन्यात ७२७ लोक पटकीने मेले.

३५०७ (१३ : १०, १५ मे ५४, १५९–१६०)

अनेक जिल्ह्यातून सडका पक्क्या करण्याचे काम चालू असून दर मैलास २०० रु. खर्च येतो.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

**ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक ११, मुंबई, १ ज्यून १८५४**

---

३५०८ (१३ : ११, १ ज्यून ५४, १६१)

'प्राचीन करार' बैबल सोसायटीने छापला. ९४२ पृष्ठे असून फक्त एक रुपया किंमत आहे.

**३५०८ अ** (इंम : १६१)

**३५०९** (१३ : ११, १ जून ५४, १६२)
क्लार्कसनसाहेब १८३९ मध्ये भारतात आले. सुरतेत व महीकाठ्यात त्यांनी धर्माचे काम केले. त्यांनी गुजराथी व्याकरण लिहिले असून पुनर्जन्माविषयी निबंध लिहिला. 'सत्य व असत्याची कसोटी' हे संवादरूप आहे. 'जगाचा तारणारा' हे इंग्रजी पुस्तकही रचिले. 'हिंदू गुरू व ख्रिस्ती उपदेशक' हे पुस्तक तरुण विद्वानांसाठी लिहिले.

**३५०९ अ** (इंम : १६१–१६२)

**३५१०** (१३ : ११, १ जून ५४, १६३)
पुण्यातील चंडोल ओढणारांची टोळी त्यांच्या यंत्रासह पकडली गेली. दारूच्या जोडीला ही दुष्ट चालही सध्या वाढत आहे. नीच लोकच असा कैफीपणा करतात.

**३५१० अ** (इंम : १६२)

**३५११** (१३ : ११, १ जून ५४, १६३–१६४)
पुण्यातील जती लोकांनी नवे देऊळ बांधले. त्यात पारसनाथाची मूर्ती बसविणार आहेत. देवळास १४ हजार खर्च आला. आता मोठ्या जेवणावळी होणार आहेत. पेशवाईत जतीच्या देवळांना परवानगी नव्हती.

**३५११ अ** (इंम : १६३)

**३६१२** (१३ : ११, १ ज्यून ५४, १६४–१६५)

मुंबई सिविल खात्यातील चाकर मिस्र प्रेस हा कर्ज बाजारी होता. ऑडिटर असताना त्याने एक लाख ८० हजारांचे कर्ज केलेले होते. म्हणून त्यास निलंबित करण्यात आले. असले लबाड लोक आपल्या चाकरीवर बट्टा आणतात. त्यांना कायद्याप्रमाणे शिक्षा व्हावी.

**३६१३** (१३ : ११, १ ज्यून ५४, १६५–१६६)

डाक्तर ओसानेशी यांचा दावा असा आहे की : त्यांच्या टेलिग्राफ कारखान्यात जेवढा पगार मिळतो, तेवढा पृथ्वीवर कोठेही मिळत नाही. आळशी व अविश्वासू लोकांनी मात्र जास्त पगाराची आशा करू नये. प्रामाणिक व निपुण कामगारांस चांगले वेतन मिळते. ईश्वराचे भय बाळगून काम केले, तरच लोकांचे कल्याण होईल. अनीती व अविश्वासूपणा हा आमच्या जीवनातील फार मोठा अडथळा आहे. आळसी, हट्टी, अज्ञानी नेटिवांमुळे विलायती कारागीर आणावे लागतात.

**३६१३ अ** (इंम : १६५)

**३६१४** (१३ : ११, १ ज्यून ५४, १६६–१६७)

'शुद्धतेची आवड बाळगणारा' लिहितो की : नेटिवांच्या चाली भ्रष्ट आणि बेवकूब आहेत. गुजराथी लोक लग्नामध्ये अफाट खर्च तर करतातच, पण लग्न लागल्यानंतर सर्व नातलग स्त्रिया एकत्र जमून अभद्र गाणी गातात. त्यांत अनेक अमंगळ उल्लेख निर्लज्जपणे केले जातात. छिनाल व कलावंतीण हे शब्द राजरोस वापरतात. मुले व परगावचे नागरिक यांचीही तमा बाळगीत नाहीत. बुद्धिवर्धक सभा ही गाणी बंद करण्याचा प्रयत्न करीत आहे. पण अद्याप त्यांस यश आले नाही.

**३६१४ अ** (इंम : १६६)

**३६१५** (१३ : ११, १ जून ५४, १६७–१६८)

इस्रायलींच्या सभेस डाक्तर विल्सन अध्यक्ष होते. प्रथम प्रार्थनागीत झाले. या देशात इस्रायलीवर कोणताही जुलूम नाही, हे सभेने मान्य केले. मिशनरी लोक फार मेहनत घेतात म्हणून त्यांचे आभार मानण्यात आले. विद्या व नीती यांचा लाभ यहुदींनाही होत आहे. ६६ रुपये वर्गणीही जमली.

**३६१६** (१३ : ११, १ जून ५४, १६८–१७०)

यरूशलेमाचा पाडाव झाल्यावर पहिल्या शतकात इस्रायली लोक भारतात आले. शनिवारच्या शाब्बाथामुळे त्यांना 'शनिवार तेली' हे नाव पडले. आपण होऊन त्यांनी परधर्मीयांच्या चाली स्वीकारल्या. शास्त्राबद्दल ते फार अज्ञानी होते. परंतु इंग्लिश अंमलात बैबलाची मराठी भाषांतरे झाली व त्यांस खरा धर्म समजला. धर्मशाळा, पाठशाळा, दवाखाने, या कामांसाठी १ जून १८५३ रोजी इस्रायली मंडळ सुरू झाले. सभेस आता मोठ्या देणग्याही मिळत आहेत. खोट्या समजुती आणि अज्ञान यांच्याविरुद्ध आम्हांस झगडा करावा लागेल.

**३६१७** (१३ : ११, १ जून ५४, १७०–१७१)

'समेट करू इच्छिणारा' लिहितो की : सुज्ञांना बोध करण्याची पाळी यावी, ही दुःखाची गोष्ट आहे. सुधारकांनी निंदा, गंभीर कोट्या, यांमध्ये वेळ दवडू नये. भांडखोरपणा व क्षुद्रबुद्धी सोडावी. वर्तमानपत्रातून अयोग्य विचार किंवा शिव्यागाळी नसाव्यात. वल्गना व अविचारीपणा नसावा. वैराची भावना सोडून परस्परांना साहाय्य करावे. शहाण्यास इशारत व मूर्खास टोचणी पुरेशी असते.

३६१८ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७१-१७३)

'अमूक खिस्ती' लिहितात की : भगवान भक्तांनाच मोक्ष देतो, असे तुकारामबुवा म्हणतात. मग अभक्तांचे तारण कसे व्हावे ? ज्याने पापच केले नाही, असा एकही माणूस नाही. देवांनी सामान्य माणसांकरिता काय केले, याचे उत्तर कोणीच देत नाही. देवांच्या चरित्रांत अमंगल गोष्टी बऱ्याच आहेत. येशू मात्र स्वतः पवित्र असून कष्टकऱ्यांचा तारणहार आहे.

३६१९ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७३)

लोहार चाळीत नवे वाचनालय सुरू झाले. मुंबई शिक्षण मंडळाने त्यास ७८ पुस्तके व १० नकाशे दिल्हे. सुज्ञ व परोपकारी गृहस्थांही आणखी मदत करावी.

३६२० (१३ : ११, १ ज्यून ५४, १७३)

काही दिवसांपूर्वी एका अंत्यजाने वस्त्राने गळफास घेऊन आत्महत्या केली.

३६२१ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७३)

नगरात यंदा पर्जन्य कमी असल्यामुळे साऱ्यामध्ये ७१०० रुपये सूट देण्यात आली.

३६२२ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७३)

नगरात मद्यपान प्रतिबंधक सभा स्थापन झाली. दारू या दुष्ट राक्षसीचा समूळ निःपात करणे आवश्यक आहे.

**३८२३** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७३–१७४)
ग्वाल्हेरचे महाराज दिल्ली पहाण्यास गेले, तेव्हा त्यांना सन्मानाने वागविण्यात आले. राजे लोकांनी सर्वत्र फिरून देश पाहिला पाहिजे. विद्याप्रसाराचे संप्रदाय राज्यात सुरू केले पाहिजेत.

**३८२४** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७४)
जयपूरच्या यात्रेत गर्दीत चेंगरून ६६ माणसे मरण पावली. यात्रेच्या वेळी पाणी दूषित होते. नाना तऱ्हेचे रोग सुरू होतात. सरकारने पटकीचा बंदोबस्त करावा.

**३८२५** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७४)
कलकत्ता ते पेशावर हा १४२३ मैलांचा रस्ता सरकार बांधणार आहे. त्यासाठी दीड कोटी खर्च येईल. डागडुजीस दरवर्षास ५ लाख लागतील. मुंबई ते आग्रा, मुंबई ते कलकत्ता, या रस्त्यांस ७५ लाख खर्च होतील.

**३८२६** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७४)
सर अर्स्किन पेरीस कोर्ट आफ डायरेक्टरचा सभासद नेमला नाही.

**३८२७** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७४)
इंग्रज-फ्रेंचांनी १६० रशियन पकडले. ४ लाख ८० हजार किंमतीची जहाजेही ताब्यात घेतली.

**३८२८** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७५–१७६)
मिशनची नवी इंग्रजी शाळा सुरू झाली.

**३८२९** (१३ : ११, १ ज्यून ५४, १७५–१७६)
माभळेश्वरास गारांचा पाऊस झाला.

३८३० (१३ : ११, १ ज्यून ५४, १७५–१७६)

मुंबईंत पाऊस कमी पडला व पटकीचा बाखा सुरू झाला.

३८३१ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७५–१७६)

शिक्षण मंडळीने जाहीर केले आहे की, खाजगी फीवर शाळा चालविणारांस शाळा सुरू करता येतील.

३८३२ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७५–१७६)

नागोठण्यास महामारीची साथ आली.

३८३३ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७५–१७६)

नगरास शंकराचार्य येणार असून सर्व विधवांचे क्षौर करण्याचे ब्रह्मवृंदाने ठरविले आहे.

३८३४ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७६)

मुंबईच्या स्माल कॉज कोर्टात ५०० रुपयांपर्यंतचेच दावे चालू शकतात. ही मर्यादा एक हजार करावी, अशी अर्जी गेली आहे.

३८३५ (१३ : ११, १ ज्यून ५४, १७६)

इलेक्ट्रिक टेलिग्राफचे यंत्र मुंबईपासून कलकत्त्यापर्यंत तयार झाले. आणि तारीख १९ मे रोजी कलकत्त्याहून गवरनर यांणी मुंबईचे लार्ड एल्फिनस्तनसाहेब यांस त्यांचे सवालाचा जबाब पाठविला.
(ज्ञानप्रकाशवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३५३६** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १७७)

मिरजापुरला मिशनने देऊळ बांधले असून मुसलमानी भाषेत उपदेश चालतो. देवळासाठी ७ हजार खर्च आला. उपदेश ऐकण्यास १७ लोक येतात. शाळा व छापखाना चालू आहे.

**३५३६ अ** (इंम : १७७)

**३५३७** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १७८)

हार्बिंजर पत्राचा संपादक फार उत्साही असून पुनर्विवाह व स्त्रीविद्याभ्यास यांबाबत आग्रही आहे. काही तरुण पुनर्विवाहास तयार आहेत, अशी बातमी आहे.

**३५३७ अ** (इंम : १७७)

**३५३८** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १७८)

बडोद्याचा दिवाण भाऊ तांबेकर याने लाच स्वीकारणे थांबविले नाही. त्याच्या उद्योगातून इंग्रज सरकारशी बडोद्याचे संबंध बिघडले. म्हणून भाऊ तांब्यास बडतर्फ केले. (जाहीरनामा)

**३५३८ अ** (इंम : १७८)

**३६३९** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १७९)

अमेरिकेत २३४ मोठी विद्यालये असून १६५१ गुरू आहेत. दुय्यम शाळा ६०३२. त्यांत विद्यार्थी दोन लक्ष ६१ हजार आहेत. एकूण ४० लाख मुले शिकतात. दरसाल ३॥ कोटी शिक्षणावर खर्च होतात. लोकांनी स्वतः खर्च करून ३८ हजार देवळे बांधली.

**३६३९ अ** (इंम : १७८)

**३६४०** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १७९)

अमेरिकन विद्वान हेन्रीने असा हिशेब केला की, एक बळकट माणूस दररोज आठ तास याप्रमाणे २० वर्षे जी शक्ती खर्चितो, तीच शक्ती ५ खंडी कोळशाच्या वाफेमध्ये आहे.

**३६४० अ** (इंम : १७९)

**३६४१** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १७९)

सरकारने असा ठराव केला की : ज्यांचा पोषाक हिंदूंप्रमाणे आहे, त्यांनी साहेबास भेटताना जोडे काढावेत. इतरांनी आपापल्या रीतीनुसार वागावे. (फ्रेंड ऑफ इंडिया पत्रावरून)

**३६४१ अ** (इंम : १७९)

३५४२ (१३ : १२, १५ ज्यून ५४, १८०-१८२)

प्राचीन भारतीय अज्ञानसागरात निमग्न होते. ज्योतिष आणि वैद्यक या दोनच व्यवहारी विद्या होत्या. ज्योतिषांनी ढोंग करून गरीब जनतेस नाडले. वेदांतमीमांसा म्हणजे तर शुष्क पांडित्य होय. मीमांसेत मंत्रासच देवता मानल्यामुळे ते नास्तिक मत ठरते. षड्दर्शनांत विरोध व विसंगती आहे. एकच शास्त्र नसल्यामुळे एकच ब्रह्मघोळ झाला. इंग्रजी अंमलात मात्र देशाची चर्याच पालटून गेली. पाद्रीलोकांनी पुढे सरसावून मुलामुलींसाठी शाळा काढल्या. सरकारी शाळा नंतर निघाल्या. वृत्तपत्रेही निघाली. पुस्तकखाने सुरू झाले. आता शिकलेल्या लोकांनी हे ज्ञान इतरांना शिकवावे, अशी अपेक्षा आहे. सुशिक्षितांचा धर्मावरचा विश्वास अगदी उडाला. त्यांस ऐहिक वैभवाचे आकर्षण वाटते. पण आपल्या द्रव्याचा ठराविक अंश त्यांनी धर्मकार्य व शिक्षण यांकडे नियमित द्यावयास हवा. (धूमकेतूवरून)

३५४२ अ (इंम : १७९-१८०)

३५४३ (१३ : १२, १५ ज्यून ५४, १८४-१८५)

सन १८०२ मध्ये झाशीच्या सुभेदाराने इंग्रजांचा पक्ष धरला होता. १८०४ त शिवराम भाऊ झाशीकर इंग्रजांच्या कृपेने गादीवर आला. गतवर्षी हा संस्थानिक वारला. त्याने एक दत्तक घेतला होता. सरकारने दत्तकास परवानगी दिलेली नाही. पूर्वीदेखील दत्तकास बादशहाची परवानगी लागत असे. शिवाय लोकही मागणी करीत आहेत की, झाशी संस्थान खालसा करावे. सर्व भरतखंडभर एक कायदा, एक नेम, एक बंदोबस्त असावा, हेच योग्य आहे.

३५४३ अ (इंम : १८२-१८४)

**३५४४** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १८५–१८९)
मुलगी शिकली, तर तिच्या (भावी) नवऱ्याचे आयुष्य कमी होते, अशी नेटिवांची समजूत आहे. शिवाय स्वैराचाराची भीती आहेच. मनुस्मृतीने स्त्रीला सामाजिक अधिकार नाकारला. स्त्री जात्याच पापी आहे, असे मनूला वाटे. मिशनऱ्यांनी १८२४ मध्ये प्रथम मुलींची शाळा घातली. दोन वर्षांत ९ शाळा चालू लागल्या. २०४ मुली होत्या. आता मुलींचे शिक्षण व्यवस्थित चालू आहे. शिवणे, विणणे, गाणे, हे विषयही शिकविले जातात. साहेब व मडमा उत्साहाने शिकवितात. स्वतः खर्च करतात. विद्येवाचून स्त्रियांची काही सुधारणा होणार नाही. सुशिक्षित मुली या चांगल्या आया होतात. मिशनेरी फार प्रीतीने व आर्जवाने शिकवतात. ख्रिस्ती शास्त्राने स्त्री-पुरुषांना समान मानले.

**३५४५** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १८९–१९०)
आडिसा बंदरास इंग्रज व फ्रेंच सैन्यांनी वेढा घातला असून सात आगबोटींनी नाकेबंदी केली आहे. रशियनांची १३ जहाजे पकडली. तुर्कांनी कालफाट जिंकून रशियास मागे हटविले. (वर्तमानदिपिकावरून)

**३५४६** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १९१–१९२)
मुंबईच्या पाणीपुरवठ्याकरिता साष्टीहून नळ टाकण्याची योजना आहे.

**३५४७** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १९१–१९२)
यंदा सर्वत्र वाघ्याचा उपद्रव फार आहे.

**३५४८** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १९१–१९२)
युरोपीय लढाईसाठी एक हजार हिंदी सैनिक पाठविले जातील.

**३५४९** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १९१–१९२)
सभ्य वस्तीत वेश्यांना राहण्यास जागा दिली, म्हणून घरमालकास दंड झाला.

**३५५०** (१३ : १२, १५ ज्यून ५४, १९१–१९२)

कल्याण ते बोरघाट लोखंडी रस्ता तयार होत आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १३, मुंबई, १ ज्युलई १८५४

**३५५१** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९३)

इंग्लंडमधील धर्मप्रसार मंडळ्यांनी ३४ लाखांच्या देणग्या मिळविल्या. शिवाय शास्त्राच्या प्रसारासाठी २२ लाख जमले.

**३५५१ अ** (इंम : १९३)

**३५५२** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९३)

रत्नागिरीहून जगन्मित्र हे पत्र जून महिन्यापासून सुरू झाले. या मासिक पत्रिकेस सर्वांनी आश्रय द्यावा.

**३५५२ अ** (इंम : १९३)

**३५५३** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९४)

अमेरिकेत इंडियाना संस्थानामधील एक माणूस अतिमद्यपानाने मरण पावला, तेव्हा गावातील स्त्रियांनी दुकानाभोवती निदर्शने करून दुकानदारास धंदा बंद करणे भाग पाडले. दारू गटारात ओतून दिली.

**३५५३ अ** (इंम : १९३–१९४)

**३५५४** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९४–१९५)

भाडा गावी चारण जातीच्या एका विधवेने पतीच्या प्रेताबरोबर स्वतःस गाडून घेतले. शापाच्या भीतीने इतर लोकांनी तिला विरोध केला नाही. तिच्या नातेवाईकांना कायद्यानुसार दंड करण्यात आला.

**३५५४ अ** (इंम : १९४)

**३५५५** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९५)

रत्नागिरी जिल्ह्यात एका कामदाराने देवळात जाऊन नंदीवर पाय देऊन त्याचा अपमान केला. अशी वागणूक निषेधार्ह आहे. लोकांना बोध करून त्यांस मूर्तिपूजेपासून परावृत्त करणे आवश्यक आहे, पण असे चुकीचे वर्तन करू नये.

**३५५५ अ** (इंम : १९५)

**३५५६** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९६)

एका सरकारी चाकराने सरकारात अर्ज करून व्यभिचारी बायकोपासून घटस्फोट मागितला आहे. सरकारने याविषयी कायदा करणे फार आवश्यक आहे.

**३५५६ अ** (इंम : १९५–१९६)

**३५५७** (१३ : १३, १ ज्युलई ५४, १९९–२००)

सन १८१९ मध्ये अमेरिकन मिशनरी प्रथम सांदविच बेटामध्ये गेले. सांदविच प्रजा अज्ञान, जुलूम व व्यसने यांच्या अंधारात बुडालेली दिसली. ३५ वर्षांत त्यांच्यात फार सुधारणा झाली. आता तेथे फक्त ख्रिस्ती धर्मच चालतो. आता तेथील सांदविची उपदेशक तयार करून त्यांच्याकडे मिशनाचे काम सोपविले आहे.

३८८७अ (इंम : १९६-१९९)

३८८८ (१३ : १३, १ ज्युलई ५४, २००)

इंग्रजांच्या लढाऊ गलबतांनी बाल्टिक समुद्रातील काही बंदरे जिंकली. शेकडो सैनिकांना कैद करून रशियन गलबते ताब्यात घेतली. रशियन बंदरांची अगदी नाकेबंदी झाली.

३८८९ (१३ : १३, १ ज्युलई, ५४, २००)

'उत्तराची मार्गप्रतीक्षा करणारा' लिहितो की : तोंडातोंडी वादविवाद करण्यापेक्षा पत्रोपत्री वाद करून तो प्रसिद्ध करावा, असे नगरच्या नागरिकांनी ठरविले. त्याप्रमाणे ख्रिस्ती धर्मसमर्थकांनी आपले पहिले पत्र पाठविले, पण त्यास कित्येक महिन्यांत उत्तर आले नाही.

३८९० (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०१-२०२)

ख्रिस्ती धर्म ईश्वराने लावून दिल्हा. ईश्वराने सृष्टीच्या रूपाने आपणाला प्रगट केले. ज्ञानाचा अभिमान सोडून लेकराच्या निर्मळ बुद्धीने विचार केला पाहिजे. ईश्वराची प्रार्थना करून सुमार्ग शोधावा. याला आपल्या मनाचीच साक्ष पाहावी. १) ईश्वर एक की अनेक ? २) आत्मा अमर आहे काय ? ३) मरणानंतर जीवन आहे का ? हे तीन मूलभूत प्रश्न आहेत. आस्थाने व खरेपणाने ईश्वराची भक्ती करावयास हवी. पापाची क्षमा व तारणोपाय यांसाठी शास्त्राचीच मदत घ्यावी. सृष्टीची उत्पत्ती व मानवी जीवनाचा प्रारंभ या दोन नैमित्तिक गोष्टी ईश्वराने केल्या. पुढे नित्य कसे वागावे, हे समजण्यासाठी देवाने शास्त्र दिल्हे.

३८९१ (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०३)

राजश्री ढमढेरे, भिडे, चिपळूणकर हे सर्व श्री. जोती गोविंदराव फुले यांची शाळा पाहण्यास गेले. सुलांची प्रगती पाहून त्यांना संतोष वाटला. थोर लोक दीनदुबळ्यांचा समाचार घेतात, ही आनंदाची गोष्ट आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

**३८६२** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०३)

'बावाची कीर्ती ऐकणारा' लिहितो की : एक ढोंगी बावा आणि चामुंडा वगैरे बाया स्त्रियांना भोंदण्यासाठी आला आहे. बावाच्या कथेस विधवा व सधवा स्त्रिया गर्दी करतात. बावाबद्दल लोकांना किन्तु उत्पन्न झाला. तो लवकरच गाशा गुंडाळणार, असे दिसते.

**३८६३** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०३–२०४)

मतिलाल हा शूद्र गृहस्थ रैटरचे काम करी. तो अतिद्रव्यवान् सावकार होता. त्याने अनेक संस्थांना सढळ हाताने मदत केली, तरी त्याच्या पुत्रादिकांना एक कोटीपेक्षा जास्त रक्कम राहिली. त्याची मुलेही शाळा वगैरेंस मदत देतात. श्राद्धपक्षास खर्च करीत नाहीत.

**३८६४** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०४)

बंगाल्यातील ४२ मैल रेलूरोड तयार झाला. आणखी ४० मैल होणार आहे. दिल्लीपर्यंत हा रस्ता होईल. त्याचे सामान २०० गलबतांतून विलायतहून येणार आहे.

**३८६५** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०४)

जयपुराजवळ देवीची यात्रा भरली, तेव्हा गर्दीत दम कोंडून ६६ माणसे मृत्यु पावली. कित्येक मृतप्राय लोकांना ओढून काढावे लागले.

**३८६६** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०४)

पाण्याची अतिशय टंचाई असतानाही पुण्याच्या ब्राह्मणांनी महार नोकरांना पाणी नेण्यास बंदी केली. जातिभेदामुळे अज्ञान वाढले. विद्या जाऊन लोक पशुतुल्य झाले. मूर्ख अवस्थेत त्यांना सुख वाटते. ते नरकाचे द्वारपाल होऊन बसले.

**३६६७** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०४–२०५)

सत्यशोधकचा पहिला अंक पाहिल्यावर लक्षात येते की, त्यातील बराचसा मजकूर केवळ द्वेषप्रेरित आहे. तरी त्याने नावाप्रमाणे लिहावे.

**३६६८** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०५)

माथिरान मुंबईपासून सुमारे २१ कोसांवर आहे. या डोंगराची उंची १८०० फूट आहे. हवा थंड निरोगी व सुखकारक असते. साहेबलोकांचे ७-८ बंगले झाले असून गोऱ्या शिपायांच्या बराकी होणार आहेत. डाक, शाळा, वाचनालय व दवाखानाही होणार. नेरळ मार्गे लोखंडी रस्ताही तयार होईल.

**३६६९** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०५–२०६)

कोलाराडो व तिच्या उपनद्या यांच्या काठांनी प्रवास केला तर प्राचीन अमेरिकन शहरांचे अवशेष दिसतात. मिसरसारखा एक पिरामिडही आढळला. त्यास आठ फुटी दगडांचा भक्कम आधार आहे. काही उत्पाताने ही इमारत कोसळून पडली असावी. ती निदान १०४ फूट उंच असावी. (धूमकेतूवरून)

**३६७०** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०६–२०७)

हिमालयातून उगम पावणाऱ्या नद्यांचे पाणी दर सेकंदास २४ हजार घनफूट असून ते शिंपणास उपयोगी पडेल. त्यातून ६५४ एकर जमिनीची शिंपण होईल. आता यमुनेस दोन पाट काढले. त्यांची लांबी ५८० मैल आहे. गंगेचा पाट ८१० मैल व रावीचा ४५० मैल होईल. यास १२ कोटी रुपये पडतील. मद्रासेत कावेरी, गोदावरी व कृष्णा यांस कालवे काढता येतील. त्यास १४ कोटी हवेत.

**३६७१** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०७)

अमृतसरच्या इंग्रजी शाळेची परीक्षा झाली. ज्ञान ही शक्ती आहे आणि ती नम्रतेने प्रामाणिकपणाने मिळविली पाहिजे.

**३६७२** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०७)

घोडनदी मिशनच्या श्रीमती पार्वतीबाई प्रदीर्घ आजाराने मृत्यु पावल्या. येशूवर त्यांचा फार भरवसा होता.

**३६७३** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०८)

ठाकुरद्वारच्या बाबाने ५०० रुपयांस लोकांना लुबाडले.

**३६७४** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०८)

गुजराथचे सावकार कापड विणण्याचे कारखाने काढणार. नगरासही पाण्यावर किंवा वाफेवर अशी गिरणी निघणार.

**३६७५** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०८)

दादाभाई नौरोजीस एल्फिन्स्टन शाळेत गणिताचे प्रोफेसर नेमले.

**३६७६** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०८)

कापसाचे प्रेसिंग करण्यासाठी कुलाबा कंपनी विलायती यंत्रे मागविणार.

**३६७७** (१३ : १३, १ ज्युलई ५४, २०८)

ब्रह्मी राजा इंग्रजांशी युद्ध करण्याच्या विचारात आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १४, मुंबई, १५ ज्युलई १८५४

---

**३६७८** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २०९)

मिशन खात्याचे ट्रुफसाहेब अनेक भाषांत निपुण असून सिंदमधील भाषांचे व्याकरण व कोश तयार करणार आहेत.

**३५७८ अ** (इंम : २०९)

**३५७९** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २०९)

फ्री चर्च इन्स्तिटुशन या शाळेची नवी इमारत तयार झाली. तीत ८०० विद्यार्थ्यांची सोय होईल. यास ५० हजार खर्च आला. कल्याणच्या इंग्रजी शाळेत १५० विद्यार्थ्यांची सोय होईल.

**३५७९ अ** (इंम : २०९)

**३५८०** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २१०–२१२)

(जातिभेद :) या निबंधात दलपतराम दया श्रीमाळी म्हणतात : मानवात पुरुष व स्त्री एवढेच दोन भेद आहेत. वेदांत जातिभेद नाही. कर्मावरून वर्ण तयार झाले. राजाचे पुत्र ब्राह्मण झाल्याबद्दल उल्लेख भागवतामध्ये आहे. म्हणजेच वर्ण बदलता येतो. जाती काही ईश्वरस्थापित नाहीत. जातीमुळे प्रजेचा एक भाग कायमचा हलकेपणा पावला व त्यास दुःख भोगावे लागते. (बक्षिसप्राप्तनिबंध)

**३५८० अ** (इंम : २१०)

**३५८१** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २१३–२१४)

ताडी, दारू, वैन व बीर यांची शेकडो दुकाने मद्रासमध्ये आहेत. सेलर लोकच छाकटे होतात. सरकारास ५॥ लक्ष उत्पन्न आहे. अशाने लोक लवकर नाश पावतील. सरकारने रयतेचे रक्तरूप द्रव्य खाऊ नये. लोकांची कर्जबाजारी दशा अगदी पाहावत नाही. दारूचे कलाल सरकारच्या नावावर लोकांना लुटीत आहेत.

**३५८१ अ** (इंम : २१२–२१३)

**३५८२** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २१४)

हिंदु हार्बिंजरने लिहिले आहे की : साहेबलोक टोपी काढतात, त्याप्रमाणे नेटिव्ह जोडा काढतात. शिवाय कित्येक साहेबांना हिंदूने जोडे काढून प्रवेश केल्याशिवाय आपणांस मान दिला, हे खरेच वाटत नाही. तात्पर्य, ही केवळ अदप आहे. घरात मात्र अशुद्ध चामड्याने घर विटाळू नये, म्हणून दाराशी जोडे काढतात.

**३५८२ अ** (इंम : २१४)

**३५८३** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २१४)

संस्कृत श्लोकांचा अर्थ देऊन लेखक म्हणतो की : जसा देव, तसाच भक्त असतो. कृष्णाच्या चरित्रावरून पाहा. शिष्यास वाटते की, गंगा हे पुण्यदायक तीर्थ आहे. गुरू सांगतात, हृदयशुद्धता हे सर्वांत मोठे तीर्थक्षेत्र होय. त्याने सर्व पाप जाईल.

**३५८४** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २१५–२१९)

अहमदनगर येथे शंकराचार्यांचे येणे :

'एक नगरवासी' पत्रात लिहितो की : डौलदार पालखी, हत्तीघोडे यांसह श्रीमान् शंकराचार्य नगरास आले. त्यांनी एक हजाराची देणगी मागितली. ब्राह्मणांच्या प्रमुखांनी काही खटले सांगितले. एका विधवा स्त्रीस अपत्य झाले होते. चौकशीनंतर स्वामींनी तिच्या बापास १९ रु. दंड सांगितला. विधवेस क्षौर-प्रायश्चित सांगितले. हा शुद्ध जुलूम आहे. चार सकेशा विधवांनी मात्र वपनास विरुद्ध जाऊन सरकारची मदत घेण्याची धमकी दिली. केस काढल्यामुळे दुर्गुण कमी होतात का, हा खरा प्रश्न आहे. धर्म हा विधवांचाच काळ आहे ! चांभारणीशी संबंध ठेवणाऱ्या भिगारच्या गृहस्थाचाही पैशानेच निवाडा झाला आहे. स्वामीची नजर केवळ पैशावर दिसते आहे.

३५८५ ( १३ : १४, १५ ज्युलई ५४, २१९–२२० )

कित्येक मुलांमुलींना मित्र-मैत्रिणी असतात. पण काहीजण एकलकोंडे असतात. दाक्तर दादरीझची मुलगी कोमळ, प्रेमळ, सौम्य आणि अतिप्रिय होती. नवव्यावर्षी तिचा मृत्यु झाला. तिच्या मैत्रिणी तिजवर प्रीत करीत. आपण सर्वांवर प्रीत केली, तरच लोक प्रीतीने वागतात. प्रीतिरूप व्हा, मग लोक तुम्हांस धारजिणे होतील.

३५८५ अ (इंम : २१९)

३५८६ (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२०–२२१)

'माळ्याचा मका आणि कोल्ह्यांचे भांडण' : हिंदू लोक कारणावाचून वर्दळीवर येतात. भाडेकरू आपापसात भांडून शिवीगाळ करतात. कचेरीच्या छत्र्या स्वतःच्याच असल्याप्रमाणे शिपाई वापरतात. सरकारी साहित्य वापरणारे कारकूनही कब्जा करीत असतात. वस्तू दुसऱ्याची असते आणि भांडणारेही तिसरेच असतात. म्हणून वरील म्हण पडली असावी.

३५८७ (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२१)

मुलांस कोणती शिक्षा लावावी, याविषयी नियम निश्चित करता येणार नाहीत. शरीरशिक्षा करण्यापेक्षा सुबोधाने काम भागवावे. मुलांची बौद्धिक कुवत, शारीर शक्ती, आईबापांची स्थिती, यांचाही विचार करावा. गरीब स्वभावाच्या मुलांना द्वाड, दुर्गुणी, आळशी मुलांच्या रांगेत घालू नये. छडीने मारणे तर वाईटच आहे. (धूमकेतूवरून)

**३५८८** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२१)

एक इंग्रज साहेब बाजारात खरेदीस गेला असता हुरमसजी पालनजी यांच्या दुकानात गेला. तेथे २५०० रुपयांच्या नोटा चुकून विसरला व दुसरीकडे गेला. रुपयांची आठवण झाल्यावर तो धावतच बाजारात आला, तेव्हा या पारशाने त्यास बोलावून सर्व रक्कम परत केली. केवढा हा प्रामाणिकपणा! (ज्ञानप्रकाशवरून)

**३५८९** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२१–२२२)

एकदा माणूस जुगार खेळू लागला की, त्याच्याजवळची लक्ष्मी त्याच्या घरातून पलायन करते. जुगाराच्या अपराधास माजिस्त्रेताने जास्तीत जास्त शिक्षा करावयास हवी. स्वतःचा पैसा गमावून जिवास तळमळ लावून घेतात. यापलिकडे जुगारात अर्थ नाही. शंभर बुडतात, एखाद्याचा फायदा होतो. एखाद्यास ठेप झाली की, तेवढ्यापुरते जुगाराचे आखाडे बंद पडतात. तेव्हा पोलीस कमिशनरांनी यात लक्ष घालावे. (वर्तमानदिपिकावरून)

**३५९०** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२२)

ब्राह्मणाशिवाय इतर जातीस नमस्कार करू नये आणि त्यांच्या घरी जेवावयास जाऊ नये, असे ब्रह्मवृंदानी ठरविले आहे. पुढील सभेत त्यावर शिक्कमोर्तब होईल. (ज्ञानप्रकाशवरून)

**३५९१** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२२)

दक्षिणेच्या पैशामधून नवीन ग्रंथरचनेस उत्तेजन मिळावे, याकरिता १८५१ मध्ये दक्षिणाप्रैझ कमिटी सुरू झाली. आता ग्रंथ शुद्ध करण्यासाठी 'रिवायझर' नेमला आहे. पण १८५२ ची बक्षिसे अद्याप दिलेली नाहीत. कमिटीचे काम थिल्लरपणे चालले आहे. अशाने कमिटी नावाचीच राहून थोडके लोकांसच उपयोग होईल.

**३६९२** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२३)

जून महिन्यात मुंबईत २०५२ माणसे मेली. त्यांपैकी ७८४ पटकीने मेली. पटकीचे प्रमाण फार वाढत आहे.

**३६९३** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२३)

१५-७-'५४ पर्यंत मुंबईत ४० इंच पाऊस पडला. कोकणातही उत्तम वृष्टी झाली. पण देशावर अजिबात पाऊस नाही. लोक हवालदील झाले.

**३६९४** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२३)

शेट मंगळदास नथुभाई यांनी स्टूडण्टस् लिटररी सोसायटीस वाणी मुलींच्या शाळेसाठी जागा देऊन साळीना २०० रुपयांची देणगी देण्याचे ठरविले. हा खरा द्रव्याचा सदुपयोग होय.

**३६९५** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२३)

दोस्तांनी ग्रीस देश जिंकला. ग्रीसच्या बादशहाने तहाच्या अटी मान्य केल्या. रशियन हद्दीत धान्याचे भाव वाढत आहेत. तुर्की सरकारने जुन्या प्रधानास काढून महंमद पाच्छा यास नेमले.

**३६९६** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२३)

सर रोद्रिक मर्चिसन यांचे अनुमान असे आहे की : तुर्कस्थान आणि इस्तंबूल यांच्यामध्ये २००० मैल लांब व हजार मैल रुंद असा महासागर असावा. प्राण्यांच्या सांगाड्यावरून ते सिद्ध झाले.

**३६९७** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२४)

महिमास जुगाऱ्यांच्या कलागतीत एकजण ठार झाला.

**३६९८** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२४)

फ्रेंच पदार्थसंग्रहाकरिता नेपाळमधील वस्तू पाठविणार आहेत.

**३५९९** (१३ : १४, १५ ज्युलई ५४, २२४)

ईस्ट इंडिया कंपनीचा ५२-५३ मधील वसूल २ अब्ज ११ कोटी ९६ लाख, तर खर्च २ अब्ज ५५ लाख आहे. कंपनीस ४ अब्जांचे कर्ज आहे. त्यावर २२ कोटी ७९ लाखाचे व्याज भरावे लागते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १५, मुंबई, १ आगस्त १८५४

---

**३६००** (१३ : १५, १ आगस्त ५४, २२६)

पुणे कॉलेजच्या बक्षिस-समारंभ गवरनर एल्फिन्स्तनसाहेब यांचे अध्यक्षतेखाली झाला. इंग्रजी, मराठी, संस्कृतबरोबरच भाषांतराचेही वर्ग चालतात. मुख्य गुरू फार मेहनती आहेत. जातीचा विचार न करता संस्कृत शिकविले जाते. ४७९ विद्यार्थी आहेत.

**३६०० अ** (इंम : २२५–२२६)

**३६०१** (१३ : १५, १ आगस्त ५४, २२८–२२९)

भवानी विश्वनाथ शेणवी यांनी केलेल्या बर्थोल्डच्या भाषांतरात हसविण्याजोग्या पुष्कळ गोष्टी आहेत. पण वाचणारा विवेकी नसेल, तर त्याची मात्र बुद्धी बिघडेल. बर्थल्ड म्हणतो की : राजेलोकांजवळ सुख नसते. राजा हा प्रकाश देणारा सूर्य आहे. परंतु हांजी हांजी करणारे लोक या सूर्यास ग्रहण लावतात. वाटाण्याच्या दाण्यामध्ये जसा फरक नसतो, तसा राजा व माणूस यांत काही फरक नाही. पण राजदरबारात प्रामाणिकपणा व सालसपणा यांना कांही किंमत नसते.
(पृ. २११) किंमत १२ आणे.

**३६०१ अ** (इंम : २२७–२२८)

**३६०२** (१३ : १५, १ आगस्त ५४, २२९–२३०)

(अफिणीचा व्यापार : गुजराती) इंग्रजी लेखांवरून या पुस्तकातील लेख गुजरातीत भाषांतरीत केले आहेत. कंपनी सरकार अफिणीस उत्तेजन देते. युरोपियनही त्यात भागीदार आहेत, ही दुःखाची गोष्ट आहे. अफूच्या कैफाने दरवर्षी तीन लक्ष चिनी लोक मरण पावतात. खऱ्या खिस्ती माणसाला व्यसनाचा तिटकाराच वाटतो.

**३६०२ अ** (इंम : २२९)

**३६०३** (१३ : १५, १ आगस्त ५४, २३२–२३४)

युरोपियन लढाईत इंग्रजांना विजय मिळावा, म्हणून मुंबईत सर्व धर्मांच्या लोकांनी उपवास व प्रार्थना केल्या. ठाकुरद्वारात कीर्तन झाले. खिस्तो देवळात ब्राह्मणांनीही उपस्थित राहून प्रार्थनेत भाग घेतला. युहदी देवळातही प्रार्थना झाली.

**३६०३ अ** (इंम : २३०–२३२)

**३६०४** (१३ : १५, १ आगस्त ५४, २३४–२३५)

कातड्याने घर अशुद्ध होते, हे नेटिवांना मान्य आहे, आणि साहेबास मान देण्यासाठी जोडा काढावा, हेही योग्य आहे. घरात जोडा घालून गेले, तर तो बुध्या केलेला अपमान समजतात.

**३६०४ अ** (इंम : २३४)

३६०५ (१३ : १५, १ आगस्त ५४, २३५–२३७)

पेशवे काळातील अनागोंदी व जुलूम इंग्रजांनी बंद केला, पण दारूकडे मात्र ते दुर्लक्ष करतात. या दुष्ट राक्षसाचा जबरदस्त अंमल सगळीकडे चालू आहे. कलालाच्या दुकानाशी छाकट्यांचा गराडा असतो. दारूबाजास डाग दिला, तरी तो व्यसन सोडीत नाही. सद्गुणांची पायरी चढावयाची असेल, तर दुर्गुणाचा रस्ता भजिबात वर्जावा. आमचे विलायती सरकार वर्तमानपत्रांच्या ओरड्याकडे लक्ष देत नाही. कारण ते तोट्याचे कलम होय. दारूबंदी केली, तर अनेक रोग बंद केल्याबद्दल श्रेय मिळेल (वर्तमानदीपिकावरून)

३६०६ (१३ : १५, १ आगस्त ५४, २३८–२३९)

बेळगावच्या पुस्तकालयाची फारच अव्यवस्था आहे. सब्स्क्रैबर फार कमी आहेत. बडे लोक वृत्तपत्रे घरी नेतात. त्यांचे पुनरागमनच होत नाही. एका दप्तरदाराने २५ रु. वर्गणी बुडविली. फिर्याद केल्यावर ही वर्गणी वसूल झाली. लैब्ररीस जोडून छापखाना आहे. त्याचे उत्पन्न भलतेच लोक खातात. अनंगरंगसारखे पुस्तक छापून पैसा करतात ! सरकारने लक्ष द्यावे.

३६०७ (१३ : १५, १ आगस्त ५४, २३९)

शिलिस्त्रियाभोवतालचा तळ सोडून रशियन सैन्य डान्यूब नदीकडे वळले. तुर्कस्थान व आस्त्रिया यांचा मैत्रीकरार झाला. ग्रीसमध्ये मात्र शांतता आहे.

३६०८ (१३ : १५, १ आगस्त ५४, २३९–२४०)

राजश्री जगन्नाथ शंकरशेट यांच्या पत्नी वारल्या.

३६०९ (१३ : १५, १ आगस्त ५४, २३९–२४०)

पुणे, सातारा ते मद्रास विजेचे तारयंत्र चालू झाले.

**३६१०** (१३ : १५, १ आगस्त ५४, २३९–२४०)

चीन देशात ३० कोटी लोक राहातात. पण तेथे एकच सरकारी वर्तमानपत्र आहे!

**३६११** (१३ : १५, १ आगस्त ५४, २३९–२४०)

कलकत्यात प्रथम आगीची गाडी धावू लागली.

**३६१२** (१३ : १५, १ आगस्त ५४, २३९–२४०)

सिंध प्रांतात निळीच्या लागवडीस सवलत दिल्यामुळे निळीचे उत्पन्न वाढत आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १६, मुंबई, १५ आगस्त १८५४

---

**३६१३** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४१–२४२)

बाबेलोन, मिसर, इराण व ग्रीस, रोम व भारत, या देशांत प्राचीन काळापासून सर्पाची पूजा होते. सर्व नाग हे सर्व प्राण्यांत नीच आहेत. त्यांस नुसते पाहिले, तरी वैरभाव उत्पन्न होतो. गारोडी केवळ पोट भरण्यासाठी त्यांचा उपयोग करतात. पौलस म्हणतो की : जे जनावरांना देव म्हणतात, ते ईश्वरास सोडून गेले ! खऱ्या ईश्वरावर ज्याचा भरवसा आहे, तो सर्पाला पुजणार नाही. (सचित्र)

**३६१४** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४३)

भरतखंडामधील विद्यावृद्धीसाठी प्रत्येक इलाख्यावर विद्यावृद्धीचा मुख्य कामदार नेमला जाईल. लंडन युनिव्हर्सिटीप्रमाणे एकेक विद्यालयगणही स्थापन होईल. सरकारी, खाजगी व मिशनरी शाळांची निःपक्षपातीपणाने परीक्षा करून त्यांस मदत दिली जाईल. खाजगी शाळाही त्यांच्या इच्छेप्रमाणे आवडेल ते धर्मपुस्तक शिकवू शकतील.

**३६१४ अ** (इंम : २४२)

**३६१५** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४३)
ज्ञानप्रकाशच्या संपादकाकडे ५०० परोपकारी नागरिकांनी दारूचा अनर्थ थांबविण्यासाठी अर्ज पाठविले आहेत. जिल्ह्याजिल्ह्यातून असे हजारो अर्ज आले पाहिजेत. (ज्ञानप्रकाशवरून)

**३६१५ अ** (इंम : २४३)

**३६१६** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४४)
पुण्याच्या शाळेत वार्षिक परीक्षेस मेजर क्यांडी अध्यक्षस्थानी होते. मुलांचा अभ्यास समाधानकारक आहे. गुरू वजीर बेग फार मेहनती आहेत. मुलांनी धीटपणाने उत्तरे दिली. ७०० विद्यार्थी असून त्यांत ब्राह्मणांप्रमाणेच नीचजातीयही आहेत.

**३६१६ अ** (इंम : २४३–२४४)

**३६१७** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४५)
ज्ञानोदयपत्रात साहेबलोकांना मिस्तर, एस्कोयर, अशी उपपदे छापतात. पण नेटिवांच्या नावासमोर काहीच आदरदर्शक उपपद नसते. अशी टीका धूमकेतूने केली. पण नेटिवांच्या नावांत राव, जी, बा, शेट, शेटजी, अशी पदे असताना मिस्तर लिहिले ही केवळ द्विरुक्ती आहे. म्हणून फक्त नाव असेल, तर मिस्तर वगैरे छापले जाते.

**३६१७ अ** (इंम : २४४)

**३६१८** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४५)

दक्षिणा प्रैज कमिटीने १७९० रुपयांची बक्षिसे जाहीर केली, त्यांची नांवे :

| | | बक्षिस रुपये |
|---|---|---|
| १) | हरीशास्त्री मराठे | २०० |
| १) | भाऊशास्त्री थेऊरकर | २०० |
| १) | रावजी लेले | २०० |
| १) | बाबा पद्मणजी | २०० |
| १) | विष्णुशास्त्री पंडित | १५० |
| १) | लक्ष्मण हळबे | १५० |
| १) | भाऊशास्त्री पाईटकर | १५० |
| १) | दाजीबा नगरकर | १२५ |
| १) | बाबा जोशी चौळकर | १२५ |
| १) | वि णु परशुराम रानडे | १०० |
| १) | चिंतामणशास्त्री गोखले | ८० |
| १) | तात्याशास्त्री पोळ | ५० |
| १) | पांडोबा दिवेकर | ५० |
| १) | गंगाधरशास्त्री | ३० |
| १) | गणेश जनार्दन गोखले | २० |

(ज्ञानप्रकाशवरून)

**३६१९** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४५–२४६)

लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण : या म्हणीचा कित्ता सर्वांनी घ्यावा, कारण लोकांना 'कांदा खाऊ नका' म्हणून प्रवचन देणारा पुराणिक स्वतः कांदा खातो. मुलास नीतीचा उपदेश करणारा बाप स्वतः व्यभिचार करतो. पंतोजी विद्यार्थ्यांना सांगतो की, कैफी पदार्थपासून दूर राहा, पण स्वतः मात्र त्याप्रमाणे चालत नाही. सासू सुनांना सांगते, वडील माणसांचा मान राखा, आणि स्वतः नवऱ्याचा अपमान करते!

**३६२०** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४६–२४७)

गुरू म्हणतात की, जे जे मुखाबाहेर जाते, ते माणसाला भ्रष्ट करीत असते. शिष्य म्हणतो, शाप आणि अपशब्द यांनी माणसाचे मन अशुद्ध होते नसेल काय? गुरू सांगतात तसे होते. म्हणून शुद्ध व सत्य बोलावे. (संस्कृत-मराठी)

**३६२१** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४६–२४७)

शिष्य म्हणतो : असंख्य देवांतून नक्की कोण माझे साहाय्य करील? पापाने माझे मन खिन्न व भयभीत झाले आहे. तीर्थ हिंडूनही पाप मात्र गेलेले नाही. गुरू सांगतात : देव एकच आहे. तो अनादि, स्वयंभू, लोकरक्षक आहे. चक्षुरादि बाहेरील इंद्रियांस तो अदृश्य आहे. त्याचाच आश्रय घ्या, म्हणजे मनोरथ पूर्ण होतात. खऱ्या मनाने ईश्वराचे दास बना. त्याची क्षमा मागा. (संस्कृत–मराठी)

**३६२२** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २४८–२५२)

संस्कृत व्याकरण :

दशमगणाचे धातू व व्याकरण.

**३६२३** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५३–२५४)

सर हेन्री डेवीने सन १८४७ त पोट्यासिअमचा शोध लावला. हा धातू तेजस्वी शुभ्रवर्ण आहे. याची चमक फार असते. ३२ अंशावर तो ठिसूळ स्फटिकरूप बनतो. १५० अंश उष्णतेवर वितळतो. हा धातू पाण्यावर टाकला, तर आपोआप पेटतो. याची ज्वाला जांभळी व सुंदर दिसते. त्यास नेहमी नखतेलात घालून ठेवतात.

**३६२४** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५४–२५६)

वेदांबद्दल सर्वांच्याच मनात मोठा भ्रम होता. भुसाचे लाडू खाणारा व न खाणारा या दोघांनाही पश्चाताप होतो. वेदांची संस्कृत भाषा साधारण विद्वानांस समजत नाही. प्रो. उइल्सनने ऋग्वेदाचे भाषांतर छापले. अग्नी, वायू, इंद्र, वरुण, अश्विनीकुमार, यांची त्यात स्तुती आहे. मग हा बिनहसिलाचा विषय ब्राह्मणांनी एवढे दिवस गुप्त का ठेवला? एका मंत्राने ब्राह्मणाचा पोर द्विज होतो, त्यास गायत्री मंत्र म्हणतात. मौंज हा त्याचा दुसरा जन्म असतो. हाही मंत्र गुप्त का राखावा, ते कळत नाही, असे मत आपल्या पत्रात 'एक शोधक'ने व्यक्त केले आहे.

**३६२५** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५६)

कुराणातील गोष्टींच्या विरुद्ध असणारांचा एक गट बेळगावात तयार झाला असून जुन्या धर्मनिष्ठांशी त्यांचा वाद होत आहे. हा तंटा मिटविण्यासाठी एक कमिटी नेमली. तिने निर्णय दिला की, दोन्ही पक्षांनी शास्त्राप्रमाणे वागावे.

**३६२६** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५६–२५७)

कोकणात व नगराकडे ब्राह्मणांत मुली विकण्याची चाल दिसते. २-३०० रुपये घेतल्यावाचून ते मुलीचे लग्नच करीत नाहीत! या मुलींच्या गळ्यात चिठ्ठ्या असतात व त्यांवरच त्यांची किंमत लिहिलेली असते! ८० वर्षांचा एखादा 'गाईचा बाप' ती किंमत देऊन त्यांच्याशी विवाह करतो. समंजस लोक जर बापाला दोन गोष्टी सांगू लागले, तर तो म्हणतो, हा माझा व्यापार आहे! सरकारने जशी सतीची व बालहत्येची चाल मोडली, तशी हीसुद्धा चाल कायद्याने मोडावी. मुलींचे बापच त्यांचे डोळ्यांदेखत अकल्याण करीत आहेत.

**३६२७** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५७)

नारळीपोर्णिमेस हिंदू लोक समुद्र शांत करण्यासाठी अनेक नारळ फेकतात. दक्षिणी वारे थांबले की, समुद्र आपोआप शांत होतो. त्यासाठी नारळ-सुपारीची गरज नाही. ही चाल खोटी, निष्फळ व परमेश्वरास त्रास आणणारी आहे. निर्जीव पाण्याची भक्ती करून ईश्वर कसा प्रसन्न होईल? अविनाशी भक्तीचे फूल देवाला अर्पण करा. त्यातच शहाणपण व मनुष्यपण आहे. (सणाविषयी निबंध)

**३६२८** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५८)

जार्ज नावाचा मुलगा डोंगराजवळ ओरडला, तेव्हा तसाच आवाज त्यास परत ऐकू आला. 'रे मुर्खा' म्हणावे, तर तेच पुन्हा ऐकू येते. जार्जला वाटले की, डोंगरात कोणी दांडगा लपून बसलेला आहे. तेव्हा त्याच्या आईने त्यास प्रतिध्वनीची गोष्ट समजावून सांगितली. आणि उपदेश केला की, चांगले शब्द बोला, चांगलेच ऐकू येईल.

**३६२८ अ** (इंम : २५७–२५८)

**३६२९** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५८)

रत्नागिरीत शाळा, दवाखाने, लायब्ररी, छापखाना, वगैरे सर्व झाले, पण दारूचे व्यसनही वाढत आहे. तिगस्तां ३६०० रुपयांना दारूचा मक्ता गेला. यंदा ४०५५ ला गेला. सरकारने मक्ते देणेच बंद करावे. दिवावातीने शोधले, तरी दारूबाज सापडू नये, असे झाले पाहिजे.

**३६३०** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५८–२५९)

एल्फिन्स्तनचे माजी मुख्य गुरू ग्रीन यांचा काही रोगाने मृत्यू झाला. ते धर्मार्थ इंग्लिश शाळेचेही शिक्षक होते.

**३६३१** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९)

स्पेन व ग्रीस येथे बंड झाले आहे.

**३६३२** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९)

पातशाह अब्बासचा मृत्यु झाला. सैयद पातशाह झाला.

**३६३३** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९)

दोस्तांच्या आरमाराने रशियनांचे चाळीस लक्षांचे लढाऊ सामान जाळले. टर्की–रूशियन लढ्यात पाच हजार रूशियन मरण पावले. अस्त्रेयी फौजाही रूशियावर चाल करणार.

**३६३४** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९–२६०)

खाजगी रीतीने मीठ करणारांवर बंगालमध्ये जकात बसणार आहे.

**३६३५** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९–२६०)

महिसुरात सरदार लोकांनी मिशनरीकडे १६४७ रु. वर्गणी देऊन शाळा सुरू करण्यास सांगितले.

**३६३६** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९–२६०)

यंदा अफूचे उत्पन्न ५८ हजार पेट्यांइतके होईल.

**३६३७** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९–२६०)

चीनमध्ये नांकिन शहराजवळ दगडी कोळशाच्या खाणी सापडल्या.

**३६३८** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९–२६०)

कालिफोर्नियात ३ कोटी ८० लक्षांचे सोने सापडले.

**३६३९** (१३ : १६, १५ आगस्त ५४, २५९–२६०)

जगात ८० लाख हबशी लोक दासपणात आहेत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १७, मुंबई, १ सप्टेंबर १८५४

---

**३६४०** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २६१)

'ख्रिस्ती भक्तांच्या कथा': पुस्तकमंडळीने छापलेल्या या गोष्टी भाषांतरित असून ख्रिस्ती भक्तांना फार आवडतील. 'संभू आणि गरीब सेरा' यात समाविष्ट आहे. पृ. २४८, किं. २ आणे.
(बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी)

**३६४० अ** (इंम : २६१)

**३६४१** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २६१–२६२)

'मराठी रत्नमाला': पुस्तक मंडळीने छापलेल्या 'रत्नमाले'त बाराखडी, शुभवर्तमान, सचोटी, मूर्तीचा उच्छेद, वगैरे गोष्टी आहेत.
किं. ३ आणे फक्त. (बॉंबे ट्रॅक्ट ॲंड बुक सोसायटी)

**३६४१ अ** (इंम : २६१)

**३६४२** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २६२)

ख्रिस्ती शास्त्रातील एक विभाग 'नीतीने पुस्तक' नावाचे प्रसिद्ध झाला.
पृ. १२१, किं. एक आणा.

**३६४३** (१३ : १७, १ सप्तेंबर ५४, २६३)

१८५१-५२ या वर्षांत जमा २७ कोटी ८१ लाख झाली, तर खर्च २४ कोटी ५९ लाख झाला. पंजाबात लढाईमुळे जमेहून खर्च जास्त झाला. लार्ड डलहौसी यांच्या ६ वर्षांच्या कारकीर्दीत अनेक सुधारणा झाल्या. सुधारीत राष्ट्रात इंग्लंड-अमेरिकेच्या खालोखाल म्हणजे तिसरी परिगणना भारताची होते.

२॥ कोटी रुपये देवळे व सरदार यांच्यावर खर्च होतो.

**३६४३ अ** (इस : २६२)

**३६४४** (१३ : १७, १ सप्तेंबर ५४, २६३-२६६)

पोट्याश जळ.ले की, निर्जल पांढरा पोटॅश शिल्लक राहातो. हैड्रेट पॉटॅशमधून चुनकळी तयार होते. ॲसिडच्या योगाने तांबडा लिटमस निळा होतो. वनस्पती जळाली, तर पोटॅश कार्बोनेट शिल्लक राहातो. वनस्पतींच्या कोमल अशा भागात पोटॅशचे क्षार असतात. (चालू.)

**३६४५** (१३ : १७, १ सप्तेंबर ५४, २६६)

अंथरूण पाहून पाय पसरावे :

लोक नेहमी अविचाराने खर्च करतात. वावगा खर्च झाल्यावर सावकार मारवाड्याकडून सवा पटीच्या व्याजाने कर्ज आणून जिवाला तात लावितात. लग्नसमारंभांत केवळ प्रतिष्ठेसाठी हजारो रुपयांचा खर्च होतो. सणासाठी योग्य तेवढाच खर्च करा. 'ऋणनिषेधक बोध' वाचा.

**३६४६** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २६६–२६८)

'एक शोधक' आपल्या पत्रात म्हणतो की : भिक्षुकांच्या लोभीपणामुळे हा देश कांचनहीन झाला. भिक्षुकीच्या धंद्यात प्रतिष्ठा नाही. लक्ष्मणशास्त्री हळबे यांच्या कवितेत या ढोंगावर कठोर प्रहार केला आहे. वेदविक्रय करून तंबाकूची विडी ओढणारे भिक्षुक दारोदार हिंडत असतात. रामदासस्वामींच्या दासबोधामध्ये भिक्षेला मुख्य दीक्षा म्हटले आहे. त्यातून भटांचा धंदा चालण्यास सबळ कारण मिळाले आहे. (हिंदुस्थानास दारिद्र्य कां प्राप्त झाले, या निबंधातून – निबंध ज्ञानप्रसारकमध्ये प्रसिद्ध झाला होता)

**३६४७** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २६८–२७०)

'मिशनातील एक' पत्रात म्हणतो की : श्रावणीमध्ये पंचगव्य प्राशन करून जानवे बदलण्याचे महत्कार्य असते. छोटा यज्ञ, तर्पण, यज्ञोपवीत-धारण, वगैरे कार्यक्रम होतो. पण हे खरे प्रायश्चित नाही. येशू ख्रिस्ताने जर तुम्हांस अंगीकारले, तर प्रायश्चित सहज मिळेल. अज्ञानाचा अंधकार जाऊन ज्ञानाचा उदय झाला पाहिजे.

**३६४८** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७०–२७१)

'लोकांचे हित पहाणारा' लिहितो की : मरीचा उपद्रव झाल्यामुळे एका मांगणीने केळीच्या खांबाचे मंडपात बसून देवीचे वारे बोलावले. शेंदूर, लिंबाच्या डहाळ्या, फुले, असा थाट करून एक हेल्या व चार बकरी समोर ठेवली. मांगणीस पातळे व चोळी देऊन देवीचा कोप शांत केला! मरीदेवीने खाजगीत कबूल केले की, वारे वगैरे सर्व खोटे असून हा पोटाचा धंदा आहे! वडलोपार्जित खोट्या समजुतीमधून लोकांची सुटका करणे अगत्याचे ठरते.

३६४९ (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७१–२७३)

एक शुभचिंतक हिंदू लिहितो की : कोणा एका विधवेने आपले अर्भक मारून रस्त्यावर टाकले. अशी हिंसा म्हणजे अघोर व अविचाराचे काम समजावे लागेल. विधवांचे पुनर्विवाह न होण्यानेच असल्या व्यभिचारास उत्तेजन मिळते. या भयंकर राक्षसांपासून समाजाची सुटका कधी होईल कोणास ठाऊक! सरकारने बालहत्या बंद केली. पण ही गुप्त बालहत्या थांबवली पाहिजे. व्यभिचाररूप राक्षसाचा शिरच्छेद केला पाहिजे. टेंपरान्स सोसायटीप्रमाणे एखादी व्यभिचारनिषेध सभा सुरू करा.

३६५० (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७३–२७४)

आमचे लोक अज्ञानमूलक चालींना चिकटून आहेत. पश्चिम द्वीपस्थ विद्यांचे वारे भरून त्यांची शिडारूप शरीरे हवा भरून चालविली पाहिजेत. तरुण लोक रिफार्मरचा डौल आणतात. .. पण गैरचालींना अनुमोदन देतात. बेळगावात ज्ञानाची साधने पुष्कळ असूनही ज्ञानाची स्थिती खेदकारक आहे. शिक्षित लोक चाकरीतच निमग्न आहेत. फावल्या वेळात बैठे खेळ खेळणे किंवा व्यसनांतच मग्न होणे, असा त्यांचा क्रम दिसतो. लाच खाऊन गोरगरिबांना लुबाडतात. अन्यायाबद्दल त्यांना तिरस्कारही वाटत नाही. अमूल्य आयुष्याचा हा अपव्यय आहे. सद्गुणांची वृद्धी व्हावयास हवी.

३६५१ (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७४–२७५)

विद्या व लोककल्याण यांवर कोणी खर्च करीत नाही. दुष्कर्मी गुंडांस पैसे देणे किंवा जुगार खेळणे, यास आम्ही पैसे उधळणे म्हणतो. यांपैकी कित्येक भिकेस लागले. दागिन्यांचे करंडेच्या करंडे वेश्यांच्या अंगावर ओतले गेले. स्वतःची स्त्री असतांना व्यभिचार करणे, हे कर्म ईश्वराकडे रुजू नाही. नीतीसही विरुद्ध आहे. पैक्यापरी पैका जाऊन शरीराची खराबी होते, प्रतिष्ठेची हानी होते. क्षणिक सुखाने पुण्याईची मातीमाती होते. या स्त्रिया म्हणजे देखत दरवडेखोर होत. कुंटिणींचा जामीन घेतला पाहिजे.

**३६५२** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७४–२७५)

गुहागर येथे मोत्यांचा पाऊस पडला, असे लोक सांगतात. पण बहुधा ही पतंगाची अंडी असावीत. तंबाखूच्या पानावर लाल किडे पडले की, लोकांना वाटते रक्ताचा पाऊस पडला असावा! एकंदरीत सारेच अज्ञानमूलक आहे.

**३६५३** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७५)

जुलै महिन्यात मुंबईत १६८५ माणसे मृत्यु पावली.

**३६५४** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७५)

मिस्तर मखबा यांचा मृत्यु झाला. नेटिव व युरोपियन लोकांमध्ये त्यांना फार मान होता. कित्येक इंग्रजी पुस्तकांचे त्यांनी तर्जुमे केले होते. ते सुप्रीम कोर्टात इंटरप्रीटर व ट्रान्सलेटर होते. शिक्षणमंडळाचेही ते सभासद होते. सरकारने त्यांचा गौरव केला होता.

**३६५५** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७६)

स्पेनमधील बंडखोर दिवसानदिवस प्रबळ होत आहेत.

**३६५६** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७६)

अमेरिकेत माकेसाहेब ९० खंडोचे तारू तयार करीत असून ते जपानच्या बादशहास नजर केले जाईल.

**३६५७** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७६)

नाना फडणिसाची विधवा स्त्री मरण पावली. तिची जहागीर सरकारकडे आली.

**३६५८** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७६)

चिनी बंडखोरांनी फूशाम शहर जिंकले. सावकार लोक पळून गेले.

**३६५९** (१३ : १७, १ सप्टेंबर ५४, २७६)

मजकूर जर छापण्याजोगा नसेल व लेखकाचे नाव नसेल, तर पत्रे छापली जात नाहीत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक १८, मुंबई, १५ सप्टेंबर १८५४

**३६६०** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २७७)

समुद्रात वादळ झाले की, गलबते खडकावर आदळून फुटतात. यंदा दर महिन्यास १०० या प्रमाणे ४०० अमेरिकन जहाजे फुटली. तरीही ते चिकाटी न सोडता दुप्पट जहाजे करून समुद्रात सोडतात. (सचित्र)

**३६६१** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २७८–२८०)

१-१०-५४ पासून डाकेचे नवे दर सुरू झाले. कोष्टक छापले आहे.

**३६६१ अ** (इंग : २७८)

**३६६२** (१३ : १८, १५ सप्तेंबर ५४, २८२–२८५)

बाबा पद्मनजी आपल्या निवेदनात म्हणतात की : पश्चिमद्वीपस्थ ज्ञानसूर्यांच्या तीव्र किरणांपुढे अज्ञानरूप बर्फ वितळत आहे. विद्येने मने सुधारत आहेत. परमहंसमंडळीने गुप्त साहस करून अज्ञान खणून काढले. धर्मविरहित विद्या व ज्ञान नीतीस व आचरणास बाधक आहे. निःपक्षपातीपणाने विचार झाला पाहिजे. मीही मूर्तिपूजक होतो. रूढीमुळे पोथ्या वाचीत होतो. पुढे विचार करू लागल्यावर शकुनमुहुर्तातील ढोंग लक्षात आले. इंग्रजी पुस्तकांच्या वाचनाने माझी दृष्टी विशाल बनली. नास्तिकांची पुस्तकेही वाचली. खिस्ती धर्माच्या सत्यतेबद्दल खात्री झाली. पण धर्म पालटल्यामुळे देशप्रीती कमी झाली नाही. डोंगरावर पडलेल्या अग्नीप्रमाणे माझ्या मनातील प्रकाश वाढत राहणार आहे (वर्तमानदीपिका, ज्ञानप्रकाश, यांचे अभिप्राय)

**३६६२अ** (इंम : २८०–२८२)

**३६६३** (१३ : १८, १५ सप्तेंबर ५४, २८६)

रे. टेलर यांजकडून बाबांनी खिस्ती धर्माची दीक्षा घेतली. ते स्वर्गपंथाच्या दिशेस आले. पूर्वीही ते लेखक म्हणून प्रख्यात होतेच. हिंदू आचारधर्म बाह्यतः खोटा वाटल्यामुळे ते खिस्ती झाले. पण बाळारामाप्रमाणे दररोज नवा धर्म न घेवोत, अशी आमची प्रार्थना आहे. हे कासार गृहस्थ बेळगावचे असून त्यांनी पत्नीचेही मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण यश आले नाही. त्यांनी राजीखुषीने व अक्कलहुषारीने धर्म बदलला आहे.

**३६६४** (१३ : १८, १५ सप्तेंबर ५४, २८७–२८८)

गणपतीचे सणापासून फार हानी आहे. कारण मूर्ती करण्यात लोक आषाढापासून दररोज २–२ तास घालवितात. द्रव्यहानी, सद्गुणहानी, सदाचाराचीही हानी होते. मोठी आरास करून कीर्तन, गवयाचे गाणे तर होतेच, परंतु अमंगळ व नीच असे कसबिणींचे नाचही चालतात. हे तर नरकाचे साधन होय. या दिवसात जुगारही जोरात चालतो. देवतेची प्रतिष्ठापना करून नंतर विसर्जन करणे, ही तर अजब चालरीत आहे! ऋण काढून असे सण करण्यापेक्षा पवित्र शास्त्र वाचावे.
(सणाविषयी निबंधातून)

**३६६५** (१३ : १८, १५ सप्तेंबर ५४, २८८–२८९)

वक्रतुंड महाराजांची स्वारी जाते, तेव्हा पालखी-मेण्यासह मिरवणूक निघते. टप्प्याटप्प्यावर लोक नाचत असतात. कित्येकजण हातात दारूचे शिसे घेऊन उघडपणे दारू पितात व नाचत राहतात.

**३६६६** (१३ : १८, १५ सप्तेंबर ५४, २८९–२९१)

पोटॅश उकळला, तर त्यातून कार्बोनेट वेगळा होतो. हा पराकाष्ठेचा उदकशोषक असतो. याच्या शीत द्रवातून क्यार्बोनिक ॲसिड ग्यासचा प्रवाह नेला, तर तो ग्यास शोषला जातो. त्याचे स्फटिक फार सुंदर असतात. शुष्क आणि उष्ण जमिनीपासून नैट्रेट ऑफ पोट्याश तयार करता येतो. यातून फ्रान्समध्ये खंडोगणती सोरा तयार करतात. तो खाटखट शीतल लागतो. तोफेच्या दारूमध्ये त्याचा उपयोग होतो. त्यातील उष्णतेने आवाज होतो. (चालू...)

**३६६७** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २८९-२९१)

एका बाईच्या अंगात देवी आली होती. भोळ्याभाबड्या स्त्रिया तिच्याकडे अवसर पाहात होत्या. एवढ्यात एका मुलीच्या हातातली वस्तू हरवली व ते रडू लागले. बाकीच्या स्त्रिया शोध करू लागल्या. आपले सोंग विसरून ही देवीही वस्तूचा शोध घेऊ लागली. तेव्हा लोक हसले.

**३६६८** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २९२)

जहाजबांधणीतील लोखंडाचा खर्च वाढत आहे.

**३६६९** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २९२)

मुंबईत यंदा ५९ इंच पाऊस पडला.

**३६७०** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २९२)

प्रो. ग्रीन यांना पारशी पंचाइतीने प्रोफेसर नेमले आहे. पगार ७०० द. म. ठरविला.

**३६७१** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २९२)

देशावर यंदा सरासरी ६ च इंच पाऊस पडला. पण मृग ते मघा काही ठिकाणी २५ इंच पाऊस झाल्यामुळे धान्याचे भाव उतरले.

**३६७२** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २९२)

मुंबई मद्रास आणि कलकत्ता येथील कोर्टांची फी गैरवाजवी असल्यामुळे ती फी कमी करण्याविषयी १८३९ सह्यांचा अर्ज गेलेला आहे.

**३६७३** (१३ : १८, १५ सप्टेंबर ५४, २९२)

ऑगस्टमध्ये मुंबईत १३५२ माणसे मेली, त्यांपैकी ६४ पटकीने गेली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३६७४** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९३)

सुतेरा किंवा कोळी हा प्राणी केवळ मत्सर खाऊन जगतो. तो कोठेही आपले जाळे तयार करतो. त्यावर दहिवर पडले, तर ते फार सुंदर दिसते. काही देशांतले कोळी विषयुक्त असल्यामुळे प्राणघातक ठरतात. कोळ्याला आठ डोळे, तसेच भयंकर आकडे असतात. कोळी आपल्या शेपटीतून सूत काढून जाळे विणतो. क्यूबा देशाचे कोळी जाळ्यास दारे करून भक्ष्यास आत घेतात व दार बंद करतात.

**३६७५** (१३ : १९, २ ऑक्टोबर ५४, २९४)

रे. आर. डब्ल्यु. ह्यूम : हे साहेब नुकतेच विलायतेस गेले. १५ वर्षे मुंबई मिशनमध्ये त्यांनी धर्मोपदेशकाचे व शाळांच्या परीक्षांचे काम केले. गेली १० वर्षे ते ज्ञानोदयाचे कर्ते होते. त्यांनी हेही काम सुंदर चालवले. पुस्तकमंडळीचे ते चिटणीस होते. तसेच टेंपरान्स सोसायटीचेही कार्य त्यांनी केले. त्यांची प्रकृती लवकर चांगली व्हावी, ही प्रार्थना आहे.

**३६७५ अ** (इंम : २९४)

**३६७६** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९४–२९५)

पुणे पाठशाळेतील जागा सोडून फ्रेजर साहेबांनी पारसी बीनोवोलेंत सोसायटीत प्रोफेसरचे काम पतकरले.

**३६७६ अ** (इंम : २९४)

**३६७७** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९५–२९६)

नाटपेड पत्रांना आता दुप्पट हसील पडणार आहे. डाकवाल्यांनीच नाटपेड टपाल स्वीकारू नये. उत्तराकरिता पुरेशा हसिलाचे स्टांप पाठवावेत. मात्र वजनावर हशील अवलंबून आहे आणि वजनाची सोय प्रत्येकाकडे होणे कठीण असते. त्यामुळे गैरसोय होणार आहे. एकाच लखोट्यात अनेकांच्या नावांची पत्रे पाठविण्यास मनाई आहे.

**३६७७ अ** (इंम : २९४)

**३६७८** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९६–२९७)

देवाचे भजन करण्याची गीते : बालटैनसाहेबाच्या पुस्तकाची ही सुधारित आवृत्ती आहे. पूर्वीपेक्षा दुप्पट गाणी आहेत. ३३६ गाणी असून किंमत ४ आणे आहे. (हिमस् फार डिव्हाईनस् वर्शीप)

**३६७८ अ** (इंम : २९६)

**३६७९** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९७)

ध सेव्यर अव ध वर्ल्ड (म्हणजे जगत्त्राता) :

रे. क्लार्कसनच्या या पुस्तकात हिंदु व खिस्ती धर्मोपदेशकाचा संवाद आहे. याची भाषा या देशाच्या रीतीस अनुकूल असल्यामुळे ते भाषांतरास सुलभ पडेल.

३६८० (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९७–२९८)

शिष्य विचारतो की : सत्य काय व असत्य कोणते, ते मला सांगा. कारण भरतखंडात मूर्तिपूजा आहे. इतरत्र नाही. गुरू म्हणतो की, पक्षपात सोडून विचार करा. अदृश्य देवाची भक्ती करता येत नाही. म्हणून चित्रे व मूर्ती तयार करणारे लोक अज्ञान मोहित आहेत. नक्षत्रांना देव मानणारे भ्रांत बुद्धीचे आहेत. खरे म्हणजे नुसत्या स्मरणातच पुण्य आहे. पाषाणाची भक्ती करू नये. (संस्कृतकाव्य)

३६८१ (१३ : १९, २ आक्टोबर ५४, २९८–३००)

"मिशनातील एक" लिहितो की : भाद्रपदात पितृपक्ष असतो. तिथीप्रमाणे श्राद्धपक्ष करतात. दर्भ, जानवी, जव, यांना महत्त्व असते. पितृस्थानी ब्राह्मण जेवण्यास बसतात! यजमानाने सव्यापसव्य करून दहा वेळा गायत्रीमंत्राचा जप करावयाचा असतो. भाताच्या पिंडास हळदकुंकू वाहून पूजा करतात. विडादक्षिणा दिल्यावर तर्पण पूर्ण होते. मेलेल्या नातेवाईकांस देवामार्फत अन्न पुरवण्याकरिता एवढा उद्योग करतात! शूद्रांना मात्र श्राद्ध विधीचा अधिकार नाही. ते फक्त कावळ्यास पिंड देतात. ब्राह्मणांनी स्वतःच्या सोयीची शास्त्रे बनवून लोकांना दासपणात ठेवलेले आहे. कारण कावळ्यास खाऊ घातल्यामुळे स्वर्गस्थ पितरांना अन्न मिळते, हे मतच मुळी भ्रामक होय.

**३६८२** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३००–३०३)

'नगरवासी' लिहितो की : श्रीमंतांचा गणपतीही भारी किंमतीचा असतो. आरास केल्यावर लोक देवाच्या शरीरावर टीका करतात, हे तर फार अयोग्य आहे. पूजा, दुर्वा वाहतात. मोदकाचा नैवेद्य झाल्यावर गणेशचतुर्थीस आरती करतात. पार्वतीच्या अंगच्या मळीने गणपतीचे शरीर तयार झाले! गणपती उंदरावरून पडल्यावर चंद्र हसला, म्हणून चंद्रास शाप मिळाला. गणेशचतुर्थीस चंद्रदर्शन मना झाले! जो चंद्र पाहील, त्याच्यावर चोरीचा आळ येतो. चुकून पाहिला, तर म्हणे दुसऱ्याच्या घरावर दगड फेकावा! सारेच अज्ञान आहे!! लोकांनी भ्रामक कथा ऐकू नयेत. जो देव स्वतःचे रक्षण करू शकत नाही, तो मानवांचे काय रक्षण करणार?

**३६८३** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०३–३०४)

सल्फेट ऑफ पोट्याश उकळत्या पाण्यात विरघळतो. याची चव कडू असते. तो ॲसिडचे गुण दाखवीत नाही. बायसल्फेट ऑफ पोट्याश याचे स्फटिकीभवन होऊ शकते. चव आंबट असते. पाण्याने त्याचे घटक वेगळे होतात. क्लोरेट ऑफ पोट्याश धातू क्लोरीनच्या साहाय्याने तयार करतात.

**३६८४** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०४–३०५)

अश्विन मासात नवी पिके येतात. लोक आनंदात असतात. हिंदुस्थानचे राजे विजयादशमीच्या मुहूर्तावर मोहिमा सुरू करीत. पण घटस्थापनेच्या दहा दिवसांत शाक्तपंथी लोकांची चंगळ असते! दसऱ्याची शस्त्रपूजा व घोड्याची पूजा, हा तर ईश्वराचा धडधडीत अपमान आहे. निर्जीव वस्तू व प्राणी हे देव होऊ शकत नाहीत. दसऱ्याला देवीसमोर टोणग्याचा बळी देतात, हे ईश्वरास संतापविणारे आणि मानवास नीचत्व आणणारे कर्म होय.

३६८५ (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०५)

'लोकहितवादी' लिहितात : गरुडपुराणात पिंडदानास फार महत्त्व आहे. एकेका मृत व्यक्तीसाठी ४-४ पिंड द्यावे लागतात. तसे न करावे, तर त्या गृहस्थास भूतयोनी प्राप्त होते. मनुष्य मेल्यानंतर त्याचा देह अंगुष्ठमात्र बनतो! याची भूक शमविण्यास पिंड देतात. आपल्या कर्मानुसार ८४ लक्ष योनींत प्राणी हिंडतो. पुण्यवानास यक्षगंधर्व, अप्सरा यांची स्थिती मिळते. पण पापी मानवास मलिणजन्म मिळतो. ज्यांना कोणतीच गती मिळत नाही, ते भूतयोनीत तडफडत राहातात. अकाल मृत्यु जर असेल, तर माणूस भूत होण्याची शक्यता जास्त असते ! भुते बहुधा स्मशानात किंवा एखाद्या झाडावर रहातात. ऐहिक आकांक्षा अपुऱ्या राहिल्यामुळे ते जिवंत माणसांना बाधा करतात. भुताखेतांबद्दल हजारो गप्पा ऐकू येतात.

३६८६ (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०७–३०८)

पाश्चिमात्य लोक स्वागतासाठी हस्तांदोलन करतात. भारतीय परंपरेनुसार नमस्कार सांगितला आहे. वयाने व मानाने लहान असणारांच्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद देतात. श्रीकृष्णाने द्वारकेत प्रवेश केला, तेव्हा प्रत्येकास पात्रतेप्रमाणे मान दिला. इंग्रजलोक स्त्रियांना फार मान देतात. प्राचीन ऋषी स्त्रियांना फार मान देत. म्हणून स्त्रियांना समाजात प्रतिष्ठा असावी.

३६८७ (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०८)

'जगन्मित्र' लिहितो की : गुहागर गावी दहीकाल्याचा गोंधळ पाहिला. मारामारी, शिवीगाळ, बुटाने मारणे, वगैरे शिमग्याप्रमाणे चालले होते. देवाच्या नावावर असे बीभत्स प्रकार करू नयेत.

३६८८ (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०८)

दोस्तांच्या सैन्यात पटकीचा उपद्रव सुरू झाला.

**३६८९** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०८)

स्पॅनिश राणीचा कोडतात इनसाफ होणार.

**३६९०** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०८)

यरूशलेम शहर स्वतंत्रच राहणार.

**३६९१** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०८)

अतिवृष्टीने नीरा नदीचा पूल वाहून गेला. तो पुनः दगडी बांधावा म्हणून ७७ हजार १७२ रु. मंजूर झाले.

**३६९२** (१३ : १९, २ आक्टोबर ५४, ३०८)

अतिशूद्रांची शाळा : श्री. जो. गोविंदराव फुल्यांनी सरकारकडे अर्ज केला की, शूद्रशाळेच्या इमारतीस मदत करावी. दक्षिणा फंडामधून या इमारतीसाठी ५ हजार रु. दिले जातील.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक २०, मुंबई, १६ आक्टोबर १८५४

---

**३६९३** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३०९)

ओरीक्स हे आफ्रिका खंडातील हरणाचे नाव होय. ते भगव्या रंगाचे असून त्याची उंची ३॥ फूट आहे. त्याच्या विशिष्ट चालीमुळे त्याला एकच शिंग आहे, असा भास होतो. ते स्वतःचे अंग चाटते. या सवयीतून त्याच्या ठिकाणी बेजहर नावाचे विष तयार होते. म्हणून त्याचे मांस विषारी बनते. (सचित्र)

**३६९४** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१०–३१२)

नव्या दराप्रमाणे वृत्तपत्राचे डाकहसील कमीत कमी दोन आणे आहे! बाकीचे दर वजनावर अवलंबून आहेत.

**३६९४ अ** (इंम : ३१०)

**३६९५** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१२)

फ्री चर्च मिशन येथे क्लार्कसाहेब उपदेशक झाले. पूर्वी त्यांनी आग्रा मिशनमध्ये सुंदर कार्य केले.

**३६९५ अ** (इंम : ३१२)

**३६९६** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१३)

मिस्तर नारायण शेषाद्रीस फ्री चर्चमध्ये रेवरंड म्हणजे उपदेशक म्हणून पदवी देण्यात आली.

**३६९६ अ** (इंम : ३१३)

**३६९७** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१३)

फ्रेजरसाहेब मुंबईस गेल्यामुळे पुणे पाठशाळेत प्रो. विल्यम ड्रेपर यांची नेमणूक झाली.

**३६९७ अ** (इंम : ३१३)

**३६९८** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१३)

रे. जे. टेलर यांनी संस्कृत भाषेचे व्याकरण छापले. पृष्ठे २१ व किंमत २ आणे आहे. बहुतेक नियमित विषय त्यात आहेत.

**३६९८ अ** (इंम : ३१३)

**३६९९** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१४)

रेडी रेकनर : मि. हेनरी यांनी मेहनतीने हे पगाराचे कोष्टक तयार केले. २ आण्यांपासून ५ हाजर पगारापर्यंतचे दर दिवसाचे वेतन त्यात पाहावयास मिळेल. रुपये व डॉलर यांचे तुलनात्मक आकडेही आहेत. (अमेरिकन मिशन प्रेस)

**३६९९ अ** (इंम : ३१३)

**३७००** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१४)

मुंबईतील सदर फौजदारी अदालतीत फैसल झालेले मुकद्दमे : मिस्तर जेम्स मॉरिस यांनी हे फौजदारी मुकद्दम्यांचे पुस्तक रचिले. अशा पुस्तकाचे मराठी भाषांतर होण्याची गरज आहे.

**३७०० अ** (इंम : ३१४)

**३७०१** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१४–३१५)

शिष्य विचारतो की : नेटिव हिंदूंत इतके भेद आहेत. आकाशातील असंख्यात तारेच जणू काही ! तर माझा जातीविषयीचा संशय दूर करावा. गुरू उत्तर देतात की : प्रथम ईश्वराने फक्त १–१ स्त्री-पुरुष निर्माण केले. त्यापासून मानवजात वाढली. म्हणून सर्व लोक एकमेकांचे भाऊच आहेत. कर्मानुसार वर्णभेद झाले. जो प्रेमाने ईश्वरास भजतो, तोच उंचवर्णी समजावा. (संस्कृत श्लोक)

**३७०२** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३१५–३१७)

सातारचे नाझर आपल्या पत्रात लिहितात की : अतिवृष्टीमुळे सातारा जिल्हा धुऊन निघाला. कांदे व वेल खाऊन जगण्याची वेळ आली. लोक परागंदा झाले. जनावरे मेली. कमिशनरांच्या आज्ञेने अन्नछत्र सुरू केले. सरकारने त्यास भरपूर मदत केली. तीनशे माणसांना राहण्यास जागा दिली व नियमित अन्न दिले. आतापर्यंत २६५६ रुपये खर्च झाला. तरी दयाळू श्रीमंतांनी मदत पाठवावी.

**३७०२ अ** (इंम : ३१७–३१८)

**३७०३** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३२०–३२१)

भारतीय विद्वानांनी अनेक ग्रंथ लिहिले. पण नाना प्रकारच्या विषयांवर पत्रे लिहून पाठविली नाहीत. पत्रव्यवहाराची विद्या हिंदूंना अवगत नव्हती. युरोपतात प्लीनो वगैरेंच्या पत्रावरून तत्कालीन परिस्थितीचे गुणदोष समजतात. विद्वानांनी आपल्या स्नेहितांना व आपल्या आप्तांना लिहिलेली पत्रे प्रसिद्ध करण्याची चाल आहे. या पत्रांतून त्या काळच्या समाजस्थितीचा बोध होतो आणि अनेक घटनांचे प्रत्यक्ष वर्णन वाचावयास मिळते. असे 'वास्तविक हशील पाहणारा' लिहितो.

**३७०४** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३२०–३२१)

विजया दशमीचा उत्साह : 'मिशनातील एक' पत्रात म्हणतो की : घटस्थापनेपूर्वी रंगरंगोटी करतात. ओल्या काळ्या मातीत मडके ठेवून दररोज एक माळ बांधतात. हे मडके म्हणजे रेणुका देवीचे प्रतीक होय. दसऱ्याच्या दिवशी गावाबाहेर जाऊन शमीच्या पेंढीची पूजा करतात. शमीसच त्या दिवशी सोने म्हणतात. घरी आल्यावर ओवाळतात. शुभवर्तिकांनी लोक जमा करून त्यांना सांगितले की : आपट्याच्या पानास सोने म्हणणे अयोग्य आहे. पाषाणास किंवा धातूस मूर्ती म्हटले असता, त्यात देव येणार नाही. देश जर सुधारावयाचा असेल, तर हा अज्ञानरूप अंधकार दूर करणे गरजेचे आहे.

**३७०५** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३२१–३२२)

'एक ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : असि. जड्ज लाकेटसाहेब यांचे व्याख्यान झाले. ते म्हणाले की, आळस आणि धरसोड हे दोन दुर्गुण नेटिवांच्या अपकर्षास कारण आहेत. खऱ्या कल्याणाचा शोध करण्यात त्यांनी आळस केला. इग्रजलोक नेहमी स्वतंत्र बुद्धीने चालतात. दुसऱ्यास संतोषविण्याकरिता ते काहीही करणार नाहीत. एकलकोंडेपणाने स्वार्थ साधणे, हा मात्र इंग्रजांचा दोष आहे.

**३७०६** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३२२–३२४)

क्ल.रेट ऑफ पोटॅश उकळत्या पाण्यात द्रवतो. तो शीघ्र ज्वलनशील असून जोराने आवाज करतो. गंधकाशी त्याचे मिश्रण करून सुरुंगाची किंवा शोभेची दारू करता येते. त्यातून आगकाड्या तयार होतात. मानोसल्फुरेट हा स्फटिकरूप दालचिनीसारखा पदार्थ असतो.

**३७०७** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३२४)

सर अर्स्किन पेरी यांनी आपल्या भाषणात मुलांच्या अंगावर दागिने घालण्याच्या पद्धतीवर टीका केली. या खोडीमुळे लहान बालकांचे खून होतात. छाकटे व जुगारी यांना ईश्वराचे तिळमात्र भय नसते. दुसऱ्याच्या कष्टाच्या पैशावर, दागिन्यावर ते दरोडा घालून मुलांचेही प्राण घेतात. हे लोभी व दुष्टलोक पैशासच देव मानतात. समयी ते आईबापांचाही जीव घेण्यास कमी करणार नाहीत. वाळकेश्वरी एका बालिकेचा खून होऊन ८० रुपयांचे दागिने गेले.

**३७०८** (१३ : २०, १६ आक्टोबर ५४, ३२४)

सप्टेंबर महिन्यात मुंबईत ११७७ जणांचे मृत्यु झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३७०९** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३१५–३२५)

नू नामक जनावराचे वर्णन (सचित्र) :

दक्षिण आफ्रिकेत नू हा प्राणी सापडतो. शिंगे असल्यामुळे यास शृंग म्हणता येईल. हा घोड्यासारखा दिसतो. पण खुरे, हंबरणे, यांमुळे याचे साम्य गाईच्या गोताशी जुळेल. तो शांत व चंचल प्राणी असून कळप करून राहातो. पाय हरणाप्रमाणे बारीक. रंग पिवळत असतो. तो इतका चपळ आहे की, त्यास जिवंत पकडणे कठीण असते.

**३७१०** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३२६)

ज्ञानदीप : गुजराती मासिक. सुरत प्रेस मधून प्रसिद्ध होणार. पृ. १६, वार्षिक वर्गणी १ रुपया.

**३७१० अ** (इंग : ३२६, गुज. ३२६)

**३७११** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३२६–३२७)

शिष्य विचारतो की : ईश्वराने अवतार कां घेतला ? निष्पाप ईश्वर पापी लोकांमध्ये कां राहिला ? त्याने नरदेह धरला, हे खरे वाटत नाही. यावर गुरू सांगतात की : सर्व मनुष्ये भयंकर पापसमुद्रात बुडाली होती. आपल्या सामर्थ्याने त्यांस तारणारा कोणीही नव्हता. तेव्हा कृपाळू परमेश्वर स्वर्गाहून आला. तो जगाचा तारक झाला. लोककल्याणासाठी पृथ्वीवर अवतरला. (संस्कृत–मराठी)

**३७१२** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३२७–३२९)

'जगाचे बोलणे सोसून घेणारा' पत्रात म्हणतो की : धर्म बदलला, म्हणजे लोक म्हणतात की, याला हिंदू धर्माचे तत्त्व समजले नाही. पण प्राकृत ग्रंथांवरून खरा हिंदु धर्म समजत नाही. संस्कृत आल्याशिवाय ते कळतच नाही. प्राकृत ग्रंथ बघावे, तर त्या भुलथापा वाटतात. संस्कृत शिकण्यास ब्राह्मणेतरांना प्रतिबंध का असावा, हे तर कळतच नाही. स्नान-संध्या, गंध, जानवे, या कर्मकांडातच त्यांचा धर्म सामावला आहे. एवढे केल्यावर जुगार, वेश्यागमनाची पापे जरी केली, तरी त्यांस बाधा नाही! स्वतःला ब्रम्हाचा अंश समजून वागावे, एवढेच ते सांगतात. ब्राम्हणाच्या पदस्पर्शाने कोणतेही पाप नाहीसे होते ! यातून पापाचीच सवय लागते. यातून अमर आत्म्याचा मात्र नाश होतो. खऱ्या देवावर भरवसा ठेवण्यापेक्षा विशिष्ट कर्मातच माणसे मग्न होतात.

**३७१२ अ** (इम : ३२९–३३०)

**३७१३** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३०–३३२)

'मिशनातील एक' लिहितो की : नगरास दहा दिवस ताबुताची गर्दी चालते. मुसलमान लोक चमत्कारिक सोंगे काढतात. रेवड्या वाटून उद जाळीत असतात. हिंदू लोकही फकीर होतात. फकीरी मागतात. हेच हिंदू आपल्या धर्मामधील अस्पृश्यांना स्पर्श करण्यासही तयार नसतात. खिचडीचा प्रसाद मुजावरास देऊन त्याने दिलेले अन्न खातात! असले भ्रष्ट आचरण ते करतात. कारण त्यांच्या डोळ्यांवर अज्ञानाचे पटल गच्च बसले आहे. बारा इमामास नवस केल्यामुळे पुत्रप्राप्ती होते, असाही समज आहे. नेटिवांत वेड्या समजुती फार आहेत. मनुष्यकल्पित देवावरच त्यांचा भरवसा फार असतो.

**३७१४** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३२–३३३)

'तुमचा मित्र' पत्रात म्हणतो की : भिंगारात दहा हजारांची पालखीची यात्रा भरली. चंडिका व गणपती ही जागृत दैवते आहेत. चंडिका हीच रेणुका असून वडलांच्या आज्ञेवरून परशुरामाने तिचे शिर उडविले होते. पालखीमध्ये केवळ उशा असून लोक त्यांच्या पाया पडतात. तुळजापुरात तर पुजारी लोक दारूचा नैवेद्य दाखवून दारू पितात! ही लक्षणे सर्वसमर्थ ईश्वराची नाहीत! धातुकाष्ठपाषाणाच्या मूर्ती करणे, हे मुळातच अज्ञान आहे.

**३७१५** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३३–३३४)

गंधक आणि पोटॅश यांचे मिश्रण ४८२° फॉरनहीटवर उकळते. मग त्यात सल्फेट सापडतो. या पद्धतीनेच क्लोराइड तयार करतात.

**३७१६** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३४–३३७)

हजारो सह्यांचे अर्ज जाऊनही दारूची दुकाने बंद होत नाहीत, असे 'कल्याणेच्छू' म्हणतो. कारण सरकारला आपल्या वसुलाईत खाच नकोच असते. दारूच्या मक्तेदारांना नुकसानभरपाई द्यावी लागेल. किंवा दुर्व्यसनी प्रजा दुसऱ्या राज्यात जाईल. रंकापासून रावापर्यंत तिचे अनेक भक्त आहेत. कंपनीसरकारास ४८ कोटी कर्ज आहे. ते फडशा करण्यास दारूचा पैसा हवा आहे! तरीही सरकारने सगळे कलालखाने काढून टाकावे. फक्त उत्तम प्रतीच्या दारूचेच परवाने द्यावेत. राज्य सोडणारास राजद्रोही ठरवावे. दारूमुळे द्रव्य जाऊन अब्रूही जाते. बहुतेक दारूचे मक्तेदार पारशीच आहेत. त्यांचे उत्पन्न टिकविण्यासाठी सरकार दारूवर बंदी घालण्यास कचरत आहे. इंग्रज सरकारने शहरातून क्वारनटीन सुरू करून चांगली दारू स्वतः विकावी, म्हणजे लोकांतील दुष्टाई व बिघाड कमी होतील.

**३७१६ अ** (इंग : ३३७–३३८)

**३७१७** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३८–३३९)

पहिलो सहा वर्षे मूल मायापाशात बद्ध असते. शाळेत घातल्यावर पंतोजीस लोक ताकीद करतात की, यास मारू नका. लाडावलेले मूल अभ्यास करीत नाही. पंतोजी गुरगुडी ओढणाऱ्या शेटजीजवळ बाता मारतो की, बाळ्या फार बुद्धिमान आहे! पाटीपूजेचे पैसे मात्र यथास्थित वसूल करतो. सात वर्षे अभ्यास केला, तरी मुलास अक्षरओळखसुद्धा झालेली नसते. (धूमकेतूवरून)

**३७१८** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३९–३४०)

रशियाची २० हजार फौज वाख्याने मेली !

**३७१९** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३९–३४०)

दोस्तांची सेना सेबास्तोपल शहरावर हल्ला करणार आहे.

**३७२०** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३९–३४०)

स्पेनची पदच्युत राणी इंग्लंडमध्ये आश्रय घेणार.

**३७२१** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३३९–३४०)

सिसिलीचा राजा रशियाचा गंधकाचा पुरवठा बंद करणार.

**३७२२** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३४०)

पंजाबातील जवसाचा वस्त्रनिर्मितीस चांगला उपयोग होतो.

**३७२३** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३४०)

महीसूर प्रांतात अमेरिकन कापसाची लागवड सुरू झाली.

**३७२४** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३४०)

रेल्वे कंपनीने इंजिनियरिंगच्या शिक्षणासाठी अप्रेंटिस पद्धत सुरू केली.

**३७२५** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३४०)

सिदेनहॅमच्या पदार्थसंग्रहालयास दर सप्ताहात ५० हजार लोक जातात.

**३७२६** (१३ : २१, १ नोव्हेंबर ५४, ३४०)

यंदा मुंबईत ७७ इंच पाऊस झाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक २२, मुंबई, १५ नोव्हेंबर १८५४

**३७२७** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४१-३४३)

भूमीतून अग्नी बाहेर पडणे, यास ज्वालामुखी म्हणतात. याचा आकार सुळक्यासारखा असतो. ते बहुधा पर्वतावर असतात. एटना व वेसुव्यस हे भयानक ज्वालामुखी आहेत. कित्येक गावे त्यांच्या लाव्हारसाने जळून नष्ट झाली. मेक्सिकोत जोरूलो पर्वताजवळ नेहमी धरणीकंप होई. तेथे भूमित खड्डे पडून लाव्हारस वाहू लागला. त्याने अतोनात नुकसान केले. वेसुव्यस पर्वतावर तर खडकसुद्धा फुटतात. भयंकर आवाज होऊन अग्निरस वहातो. दगड व रेती यांची धूळ पसरते. (सचित्र) (सृष्टीतील चमत्कार)

**३७२८** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४३)

मंगरसाहेब विलायतेहून परत आले. ते गावोगाव फिरून उपदेशकाचे काम करतील.

**३७२८ अ** (इंम : ३४३)

**३७२९** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४३–३४४)

महाराष्ट्र व तामील देशांत मिशनांची वाढ व्हावी, यासाठी रेवरेंड अंडर्सन यांचे डेप्युटेशन आले आहे. मि. हरी रामचंद्र आणि रामकृष्ण विनायक मोडक यांची परीक्षा घेऊन त्यांस उपदेशकाची पदवी देणार आहेत.

**३७२९ अ** (इंम : ३४३)

**३७३०** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४४)

नामदार क्लारन्स यांचा जन्म १७९९ त झाला. सन १८१४ मध्ये ते फौजेत चाकरीस लागले. गेली दोन वर्षे ते मुंबई इलाख्याचे सेनापती होते. फौजेच्या बंदोबस्तासाठी त्यांनी फार मेहनत घेतली. त्यांचे शव मोठ्या बंदोबस्तासाठी विलायतेस पाठविले जाईल.

**३७३० अ** (इंम : ३४४)

**३७३१** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४४–३४५)

गुरू सांगतात की : देवपुत्र येशू देवाबरोबर होता. देवाने दया करून आपला एकुलता पुत्र पृथ्वीवर पाठविला. तो दंडासाठी नसून तारणाकरिता होय. मनुष्यावतार धरून त्याने तारणासाठी उपाय सांगितला. तो मेला, तरीही मृत्यूच्या बंधनातून सुटून पुनः उठला. त्याचा आश्रय केला, तर नक्की तारण होईल. (संस्कृत-मराठी)

**३७३२** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४५–३४६)

'दसकी लकडी एकका बोजा' : एखाद्या बोवाचे अनेक शिष्य असतात. स्वतःची तुंबडी जर भरली नाही, तर गुरू शिष्यांवर रागावतात मठातून निघून जाण्याचा बहाणा करतात. मग शिष्यांनी भिक्षा मागून आणण्याचे कबूल केल्यावर त्यांचा राग शांत होतो. दहा जणांनी थोडेथोडे मागून आणले, तरी बोवाचे भागते. पण याच शिष्यांनी गुरूची भरती करण्यापेक्षा जर शाळा काढली, तर ज्ञानदानाचे कार्य व्यवस्थित चालेल. सगळा देश सुशिक्षित होईल. मात्र दारूचे व्यसन कमी झाले पाहिजे. शिमग्याच्या विरूप माकडचेष्टाही बंद झाल्या पाहिजेत.

**३७३३** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३४६–३४९)

खिस्ती धर्म आणि हिंदू धर्म यांतील भेद :

खिस्ती धर्मात एकच देव, तर हिंदूत ३३ कोटी देव आहेत. हिंदूंचा परमेश्वर मायाधीन व मंत्राधीन आहे. त्यास आकार देऊन देवळात बसवितात. निर्गुण व निर्जीव पदार्थांना देवत्व दिले आहे. खिस्ती धर्माचा देव स्वतंत्र, सगुण व सर्वांना सांभाळणारा आहे. तो पापाचा द्वेष करतो. पाप्यास शासन करतो. हिंदूचे देव स्वतःच पाप करतात! पुराणाच्या कालखंडात ते देव राक्षसांचेही सेवक बनले! शैव, गाणपत्य आणि वैष्णव लोकांत मारामारी चालते. खिस्ती धर्मात एकच देव असल्यामुळे असला गोंधळ होत नाही. हिंदूंचे देव आपसात भांडतात. खिस्त्यांचा देव सर्वज्ञ व सर्वाधिकारी आहे. हिंदूंच्या देवांनाही शापाची बाधा होते. खिस्ती देवाचा प्रकार तसा नाही. हिंदूंचे देव ४ महिने झोप घेतात. खिस्त्यांचा देव सतत जागा असतो. खिस्ती धर्माचा जगभर प्रसार होतो. हिंदू धर्म देशाबाहेर कोणालाही माहीत नाही. आकाश व पृथ्वी आमच्या देवाने निर्माण केली, म्हणून तुम्ही देवाविरहित राहणार आहात.

३७३४ (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५०–३५१)

आत्मारामपंत आणि मृत्यूचा शिपायी यांचा संवाद :

आत्मारामपंत श्रीमंत आहे. त्याच्या ऐहिक वैभवात कसलीही उणीवच नाही. म्हणून तो गर्व वाहातो. आपल्या हिंमतीने मिळविलेल्या द्रव्याचा पंत उपभोग घेतात. एकदा त्यांच्या स्वप्नात एक विकराळ पुरुष आला. सुळक्याप्रमाणे दात व नांगीसारखे त्याचे पुच्छ पाहून पंत विस्मित झाले. तो मृत्यूचा शिपाई होता. पंतांच्या गावात त्याची नेहमी ये-जा चालू असूनही पंत त्यास ओळखत नव्हते. (पुढे चालू होईल.)

३७३५ (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५१–३५२)

अल्कलीचे धातू पोट्यासिअम : पोट्यासिअम क्लोराइड साधारण मिठासारखे असून स्फटिकरूपात मिळते. आयोडाइडचे स्फटिकही दुधासारखे पांढरे आणि अपारदर्शक असतात. ब्रोमाइड हे पाण्यात विद्राव्य असते. क्लोराइड पिवळ्या रंगाचे असते. (चालू.)

३७३६ (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५३–३५५)

सैतान एकदा फिरत फिरत उत्तर दिशेकडील थंड प्रदेशामध्ये गेला. हा प्रदेश निसर्गसौंदर्याने नटलेला होता. लोक अतिशय ज्ञानी व सभ्य होते. सैतानास भय वाटले की, हे देवदूताप्रमाणे शहाणे होतील व मग आपले क्षेत्रच कमी होईल. म्हणून त्याने मद्यपान करविण्याची युक्ती योजली. पण मद्यपानाचा प्रयोग असफल झाला! म्हणून त्याने जातिभेद निर्माण केला. तरीही त्याचे कोणी ऐकेना. मग सैतानाने निरनिराळ्या आकाराच्या देवाच्या मूर्ती घडविल्या. तरीही तो प्रदेश आदर्शच राहिला. मग त्याने स्त्रीपुरुषांत भेद करून स्त्रियांना शिकवू नये, असा विचार पसरविला. शेवटी त्याचा उद्देश सफल झाला! हा देश आता गोऱ्या लोकांच्या ताब्यात आहे! खिस्ती लोकांनी स्त्रियांना विद्याभ्यासात सामील केल्यापासून देश सुधारत आहे!

**३७३६ अ** (इंम : ३५२–३५३)

**३७३७** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५५–३५६)
अमेरिकेत रियोजनेरो शहरात इलेक्ट्रिक टेलिग्राफ सुरू झाला. रशियात मास्कोपासून ओडेसापर्यंत ही तार लावीत आहेत. अमेरिकेने समुद्रातून अशा तारा नेण्याचा निश्चय केला आहे.

**३७३८** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५५–३५६)
कल्फार्णियातील एका महावृक्षाची किंमत दहा हजार रुपये ठरली.

**३७३९** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५५–३५६)
सांदविच मिशनतर्फे जपानमध्ये मिशनरी जाणार.

**३७४०** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५६)
डी. ओ. आलनसाहेब समक्ष येऊ शकत नाहीत. त्यांनी विलायतेहून दोन तजविरा काढून पाठविल्या.

**३७४१** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५६)
कापडगिरणीचे मुंबईत १५ लक्ष रुपयांचे शेअर्स विकले गेले.

**३७४२** (१३ : २२, १५ नोव्हेंबर ५४, ३५६)
मुंबईत मोठे वादळ होण्याचा धोका एका शास्त्र्याने वर्तविला आहे. पण बावाच्या वचनावर कोणी विश्वास ठेवू नये.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक २३, मुंबई, १ डिसेंबर १८५४

**३७४३** (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३५७–३५८)

वाघळास पक्ष असतात. पायाची कातडी रुंदट असते. ते कीटक खातात. पण मोठी वाघुळे फळांचाही फार नाश करतात. हे नेहमी अंधारात फिरतात. अडचणीच्या जागेतही हा पक्षी सुलभतेने हिंडतो. थंडीचे दिवसांमध्ये सहा महिने तो एकाजागी राहातो. (सचित्र)

**३७४४** (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३५८–३५९)

येशू म्हणाला की 'तारणाची धोपट वाट म्हणजे मीच होय. माझी मेंढरे मला ओळखून मजकडे येतात. ईश्वरानेच मला भक्तांचा मेंढका बनविले. तुमच्या आजोबाला तुमच्याकडे पाहण्यास वेळ नाही. मी आकाशातून आलो असून मीच जीवनाची भाकर आहे. मी निर्मल द्राक्षवेल, तर तुम्ही त्याच्या खांद्या आहात. माझा आनंद तुम्ही आहात. तुमचे जीवन पूर्ण व्हावे, यातच माझा आनंद आहे. धर्माचे मर्म मलाच समजले आहे.' आपल्या सहा शिष्यांशी तो समजूत घालून बोलला. 'तुमच्या पापनिवारणासाठी मी देवाची विनवणी करीन,' असे आश्वासन देवपुत्राने दिले. (वृत्तबद्ध रचना) (पुढे चालू)

**३७४५** (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३७०–३६२)

आत्मारामपंत आणि मृत्यूचा शिपायी :

मृत्यूचा शिपाई पंतास नेमण्यासाठी आला. आपली दौलत ही आपलीच, असे आत्माराम समजत होता. चैनबाजीच्या व खाण्यापिण्याच्या दिवसांतच मृत्युदेव समोर दिसल्यामुळे तो घाबरला. काळ जवळ आला, तरी कीर्ती व सुख यांचा मोह काही सुटेना. मृत्यूने पंताची मोट बांधून अज्ञात व अंधाऱ्या प्रदेशात त्याला नेले, तेव्हा मात्र तो भयभीत झाला. भेकडपणाने मरणे, हे दुसरे मरणच आहे, याची जाणीव देऊन मृत्यूने पंतास सुवार्तिकाला भेटण्याचा सल्ला दिला. आपला तारणारा जिवंत आहे. तो शांतिकारक फळ देईल, असे समाधान पंतास मिळाले. परमेश्वराच्या पुत्राने आकाशात एक अविनाशी स्थळ राखून ठेवले आहे. खिस्त मेलेल्यातून उठला. त्याच्यावर विश्वास ठेवला, तर आपण आत्म्यानेही जिवंत राहू. (चालू )

**३७४६** (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३६३–३६४)

'एक नगरवासी' लिहितो की : दिवाळी जवळ आल्यामुळे घरे व दुकाने यांची सफाई चालली आहे. दिवाळी चार दिवस चालते. प्रत्येक दिवसाबद्दल पुराणामध्ये एकेक कथा आहे. प्रतिपदेच्या दिवशी ब्राह्मण गुरूस पैसा देतात. सरस्वतीपूजन करून भविष्यवाचन होते. जुगार हे जणू काही पवित्र कर्म समजून जुगार खेळतात. बळीराजाच्या हकीगतीने हिंदूंना वेडे केले आहे. बिचाऱ्यांचा पाडाव होऊन रूढीच्या बंधनांनी ते बांधले गेले. त्यापेक्षा खऱ्या गरीब व अपंग लोकांना मदत करावी. त्यातच इहपरलोकी कल्याण आहे.

**३७४७** (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३६४–३६५)

डेवीसाहेबाने हा धातू (सोडियम) शोधून काढला. हा रुप्यासारखा पांढरा असून पोट्यासिअमशी साम्य करतो. ९७२ अंश उष्णतेवर तो पेट घेतो. उन्हातही पेटतो. यापासून कळीचा चुना तयार होतो. साबणाच्या कारखान्यात घनस्वरूप हैड्रेटचा उपयोग होतो.

**३७४८** (१३ : २३, १ दिसेंबर ५४, ३६७–३७०)

मि. ह्यूबर हे मिशनरी मुंबईहून बोटीने कालिकोटास जाण्याकरिता निघाले, अचानक आकाशात गडगडाट होऊन विजा चमकल्या. सागरावरती मोठे तुफान झाले. तारू हालत होते. झिंगल्यासारखा माणसांचा झोक जात होता. लोक रडत होते. पण साहेबास विश्वास वाटत होता की, प्रभू आपला नाश होऊ देणार नाही. सागराच्या लाटांनी बोटीचे तुकडे होण्याची वेळ आली. तीन तास वाऱ्यावादळात सर्वजण बसून होते. पण सकाळी बोट किनाऱ्यास लागली. प्रभूने मोठे संकट निवारले. या संकटाने १४-१५ दिवस मनःस्थिती अत्यंत वाईट राहिली. पण धार्मिकास ईश्वर वाचवतो, हे यावरून सिद्ध झाले.

**३७४८ अ** (इंम : ३६५–३६७)

**३७४९** (१३ : २३, १ दिसेंबर ५४, ३७०–३७२)

वे. नीळकंठशास्त्री यांनी लिहिलेले पत्र : इंग्लंड हा देश भव्य आणि परम मनोहर बागच आहे ! आपल्या देशबंधूना हा सुंदर देश पाहण्यास मिळाला नाही, म्हणून ते दुर्दैवी आहेत ! कंपनीसरकारचे डायरेक्टर्स शास्त्रीबुवाशी फार प्रेमाने बोलले. या छोट्या पत्राने ब्रिटिशांबद्दलचे नेटिवांचे गैरसमज दूर होतील, असे वाटते.

**३७४९ अ** (इंम : ३७०)

**३७५०** (१३ : २३, १ दिसेंबर ५४, ३७२)

सेबास्टोपलवर दोस्त राष्ट्रे दर दिवसात ७५ हजार तोफगोळे टाकतात.

**३७५१** (१३ : २३, १ दिसेंबर ५४, ३७२)

जान फ्रांकलिन समुद्रमार्गाने नवीन देशाचा शोध घेण्यास गेला असता बेपत्ता झाला.

३७८२ (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३७२)
कच्छच्या राजाने सतीबंदीचा कायदा केला.

३७८३ (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३७२)
बाबूगोविंदचंद दत्त या नेटिवास अकौंटंटच्या असिस्टंटची ८०० रु. पगाराची जागा मिळाली. नेटिवास ही जागा प्रथमच मिळते आहे.

३७८४ (१३ : २३, १ डिसेंबर ५४, ३७२)
चक्रवर्ती हा बंगाली गृहस्थ डाक्तरीची सनद घेण्याकरिता इंग्लंडमध्ये गेला आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १३, अंक २४, मुंबई, १५ डिसेंबर १८५४

३७८५ (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३७३)
मुंबईतील वादळाने सर्वजण घाबरले. लोक दचकले. कौले उडाली. कित्येक घरे जमीनदोस्त झाली. घरांच्या खिडक्यांची तावदाने फुटली. समुद्रामध्येही अनेक गलबते फुटली. काही समुद्रात बुडाली. कित्येक खडकावर जोराने आपटून फुटली. मालाचे फार नुकसान झाले. गरीबगुरीब फार नाडले गेले. वृद्ध लोक म्हणतात की, हे वादळ अश्रुतपूर्व आहे. (सचित्र)

३७८६ (१३ : २४, १५, डिसेंबर ५४, ३७३–३७४)
आपले बोलणे व आचरण खरेपणाचे असावे. खोट्याची बाजू कधीही घेऊ नये. जो खरेपणाने वागतो, त्याला काळाची बाधा होणार नाही. सत्याचा रतीब लावला, तरच परमेश्वर भेटेल.

३७८७ (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३७४–३७६)

आत्मारामपंत आणि मृत्यूचा शिपाई :

परमेश्वराने आपल्या पुत्राविषयी साक्ष दिली. पापी माणसाला मोक्ष देण्याचे आश्वासन दिले. चैनबाजी व विषयभोगाचे पाप त्याच्या कृपेमुळेच नष्ट होतील. जे पश्चाताप करतात, ते धन्य होत. मरणाची नांगी पाप आहे. पापच नाहीसे झाले, म्हणजे मरणाची भीती वाटणे नको. मरणकाळी धैर्य ठेवून जर पश्चाताप केला, तर तारण होते, म्हणून लोकांनी आपल्या शेवटल्या परिणामाचा नीट विचार करावा. (चालू . . )

३७८८ (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३७६–३७८)

मुंबईतील वादळाने जे नुकसान केले, ते अभूतपूर्व होते. लोक या प्रसंगाचे रंगवून वर्णन करतात. पण बुद्धिमंत, धर्माचरणी, ईश्वरभीरु माणसांनी खोल विचार केला पाहिजे. म्हणून एक 'पांथस्थ' आपल्या पत्रात लिहितो की : ईश्वराने मानवास सुबुद्धी दिली आहे. तिचा उपयोग करून सुमार्ग शोधावा. सर्वांचा नियंता ईश्वर आहे. जगामधील प्रत्येक घटना त्याच्या प्रेरणांनी घडते. कल्पित देवांची भक्ती करून लोक उन्मत्त झाल्यामुळेच आपले गर्वहरण करण्याकरिता त्याने वादळ पाठविले. चोरी, लबाडी, जुलुम-जाचणूक करणारांना तो ईशारा देतो की, सावधपणाने वागा व पापाचा मार्ग सोडा. जो ईश्वर शिक्षा करतो, तोच प्रीतीही करू शकतो. मालमत्तेस महत्त्व देणारांनी जगाचा नश्वरपणा ओळखावा. सुनीतीने वागावे.

३७८९ (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३७८–३८०)

'एक वाचणारा' पत्रात लिहितो की, दरवर्षी तुळशीची पूजा करून तिचे बाळकृष्णाशी लग्न लावतात. कृष्णावतारातील राधा तुळसरूपाने जगात आली. तिच्याशी विवाहाचा वर तिला दिला होता, अशी कल्पितकथा पुराणात सापडते. मानवी लग्नाप्रमाणे अंतरपाट धरून लग्न लावतात. या देशात हवदाचे आणि झाडांचे लग्न लावण्याची एक पोरकट चाल आहे! ही पुराणे धर्मगुरूंनीच आपल्या आर्थिक फायद्यासाठी लिहिली असावीत, यात शंका नाही. विवेकबुद्धी वापरून पाहा, म्हणजे यातील खोटेपणा लक्षात येईल.

३७९० (१३ २४, १५ डिसेंबर ५४, ३८०–३८३)

महाराजा धुलीप लिहितात की : नाना प्रकारचे देश व लोक पाहून मानवाची बुद्धी विशाल होते. सहनता वाढते. व्यावहारिक सुख हे परिणामी दुःखदायक असते. इंग्लिश लोक जगात प्रवास करून प्रत्यक्ष ज्ञान मिळवितात. प्राचीन काळचे लोक प्रवास करीत नसत, म्हणून त्यांचे ज्ञान कोते राहिले. लंकेचा समुद्र व मिसर देशामधील पिरामिड आम्ही पाहिले. लंडन शहर तर उत्कृष्ट व अवर्णनीय आहे. एकही घर बेडौल किंवा ओबडधोबड नाही. चांगल्या वस्तूंची ती जणू खाणच आहे. आमच्या स्वदेशी लोकांनी यांच्यापासून उद्योग शिकून आयुष्याचे सार्थक करावे. ईश्वराने काही शिकविण्याकरिता आमची इंग्रजांशी गाठ घालून दिली.

**३७६१** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८३)

'एक ब्राह्मणी विधवा' गवरनरना लिहिलेल्या पत्रात म्हणते की :
तीन महिने झाले, मी वैधव्यदशा भोगीत आहे. मला यांचा जुलुम असह्य झाला आहे. केशवपनाची क्रूर चाल माझ्यावरही आली, पण मी धैर्याने नाकारली. वाणी व ब्राह्मण विधवांत पुनर्विवाहास परवानगी नसल्यामुळे अनाचार माजला आहे. पण पुनर्विवाहाची चाल पाडण्यास मी तयार आहे. माझे स्वाभाविक सौंदर्यही हिसकावून घेण्याचा प्रयत्न झाला, तर मी अजूनही विरोध करीन. सरकारने केशवपनाविरूद्ध कायदा करावा.

**३७६२** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८४–३८६)

हिंदू पालक मुलांस चांगले गुण लावण्याविषयी काहीच श्रम घेत नाहीत. अज्ञानामुळे मुले हट्टी, क्रूर व दांडगट होतात. मुलाने लवकर जेवावे, याकरिता दुसऱ्याच्या घरी जेवणास निमंत्रण आहे, असे खोटेच सांगतात. त्यांस भुताखेताची भीती दाखवितात. मुलांदेखत भिकाऱ्यांस अपशब्द बोलतात. लाडापोटी शाळेत जाऊ देत नाहीत. पंतोजीच्या भयाने मुलगा वाळेल, अशी त्यांना धास्ती वाटते. दंगामस्ती, हट्ट, मारामारी, यांचेच शिक्षण मुलांना मिळते. यास्तव त्यांच्या कोमल अंतष्करणावर चांगले संस्कार करावेत. बऱ्यावाईटाची नीट जाणीव द्यावी.

**३७६३** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८६)

खुर्साबाद येथे पितळेवर, शिशावर, रुप्यावर लिहिलेले धातुलेख सापडले.

**३७६४** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८६)

सांडविच बेट अमेरिकेस जोडले जाणार.

**३७६५** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८६)

पारिस शहरात दररोज साडेसात लाख आगकाड्या तयार होतात.

**३७६६** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८६)

८ डिसेंबर १८५४ या दिवशी सकाळी मुंबईस धरणीकंप झाला. घरे हादरली.

**३७६७** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८७–३८८)

अफीण व दारू याच्या दुष्परिणामावर चांगली पुस्तके रचणारांना ५ रु. ते ३० रु. पर्यंत बक्षिसे मिळतील. भाषांतर चालेल; मात्र मूळ ग्रंथाचे नाव कळवावेच. हे ग्रंथ मिस्तर रीव, क्यांडी अगर मिचलसाहेबाकडे पाठवावे.

**३७६७ अ** (इंम : ३८७)

**३७६८** (१३ : २४, १५ डिसेंबर ५४, ३८८)

नोवेंबर महिन्यात मुंबईत ११०५ माणसे मेली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३७६९** (१४ १, १० जानेवारी ५५, १–२)

मेल्स्ट्रीम (भोवरा) :

नदीचे किंवा समुद्राचे पाणी टेकडीचा किंवा खडकाचा अडथळा अगर वाऱ्याचा प्रवाह यांमुळे प्रतिबंध पावून वर्तुळाकार फिरतो. त्यास भोवरा म्हणतात. इटलीजवळ मसीना सामुद्रधुनीजवळ वारा मंद असताना पाणी १०० फुटावर वाहाते. पण तुफानी वारा सुटला, तर गलबते भोवऱ्यात सापडून फुटतात. वाऱ्यांचा आवाज राक्षसी वाटतो. नार्वे देशात मेल्स्ट्रीम हा भोवरा आहे. भरतीच्यावेळी तेथे मोठाले देवमासे हिंडतात. आर्कनी बेटात अनेक लहानसहान भोवरे आहेत. एकेक भोवरा पाण्यातून ९० फूटापर्यंत जाऊन पोहोचतो. नदीचे पाणी पुलावर चढले, तरी असे भोवरे तयार होतात. (सचित्र)

**३७७०** (१४ : १, १० जानेवारी ५५, ३)

संपादकीय : ज्ञानोदयाविषयी :

पुष्कळ वर्षांपासून या पत्राचे कर्ते ह्यूमसाहेब होते. प्रकृती बिघडल्यामुळे ते अमेरिकेस गेले. सध्याचे संपादक न्यूनाधिक राहू नये म्हणून झटत आहेत. अलीकडेस नवनवी वर्तमानपत्रे निघत आहेत. त्यांचे कर्ते सभ्य व निष्पक्षपाती असल्यामुळे ते मित्रासारखे वाटतात. निंदादूषित व गैरसाळ पत्रे बंद पडली, हे ज्ञानोदयाच्या सुशिक्षिततेचे फळ आहे. एकाच गावात चारदोन ग्राहक असतील, तर त्यांनी नावे कळवावी. स्वतंत्र बंगीमध्ये तिकिटे लावून ज्ञानोदय पाठवू.

**३७७० अ** (इंम : २–३)

**३७७१** (१४ : १, १० जानेवारी ५५, ४)

रे. ज्यार्ज क्यांडी आणि सी. इसन्बर्ग येथे येऊन पोहोचले. हे साहेब कुटुंबासुद्धा या देशात येऊन काम चालवीत आहेत.

**३७७१ अ** (इंम : ४)

**३७७२** (१४ : १, १० जानेवारी ५५, ४)

(१८५५) यंदाचे पंचांग स्वतंत्र न छापता ज्ञानोदयाच्या अंकातच छापले आहे. ज्यांना हवे असेल, त्यांना तेवढी पृष्ठे १ आण्यास मिळतील.

**३७७३** (१४ : १, १० जानेवारी ५५, ४)

सन १८५५ यावर्षी भरतखंडामध्ये एकही सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण दिसणार नाही.

**३७७४** (१४ : १, १० जानेवारी ५५, ४)

अमूक पगाराने एका दिवसाचे काय झाले याचे कोष्टक. सदरहू जंत्री छापली आहे.

**३७७५** (१४ : १, १० जानेवारी ५५, ५)

मुंबई कचेरीच्या वर्षभराच्या सुट्ट्यांची यादी दिली आहे.

**३७७६** (१४ : १, १० जानेवारी ५५, १२–१८)

जानेवारी ते डिसेंबर १८५५ चे पंचांग छापले आहे. पाने १२.

**३७७७** (१४ : १, १० जानेवारी ५५, १८)

देवलोकाच्या खाली भुवनपती देव राहातात. त्याच्याखाली नरकलोकाचे जीव राहातात. मृत्युलोकात ५ प्रकारचे तेजस्वी देव राहातात. हे मंत्राने वश्य झाले, तर पृथ्वीवर येतात. पण कोणास त्रास देत नाहीत. पुण्यवान माणसास अशा प्रकारचे देवत्व येते. पण पापी नरास मात्र त्यांच्यात जाता येत नाही. सांप्रतच्या भूतपिशाच वगैरे योनींतच ते वावरतात. माणसापेक्षा त्यास काही विशिष्ट सामर्थ्यही असते, असे 'लोकहितवादी' पत्रात म्हणतात. (जगन्मित्रवरून)

**३७७८** (१४ : १, १० जानेवारी ५५, १८–१९)

धलंपसिंग महाराजांचे पत्र :

इंग्रज लोकांना गर्व नाही. त्यांच्या बाह्यात्कारी रीती नीट आहेत. आमच्या देशात कोणी थोडासा हुद्दा पावला की, गर्वाने फुगून जातो. मित्रासी लबाड वागून ते अपमान पावतात. इंग्रज मात्र जेवढी विद्या किंवा अधिकार अधिक असेल, तेवढा अधिक नम्रतेने वागतो. तो मनोभावाने व शुद्ध प्रीतीने राहातो. आमचेही लोक विद्येचा लाभ पावले, तर गैरसमज जाऊन बुद्धिमान होतील. राणीसाहेबांचे पती आल्बर्ट हेही मजशी फार प्रीतीने वागले. इंग्रज लोक हेच आपले खरे मित्र आहेत. आपला दुराग्रह सोडून मतलब साधणे, हाच स्नेहाचा पाया आहे.

**३७७९** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

क्रिमियाची व रशियाची लढाई चालू आहे.

**३७८०** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

तुर्की समुद्रात वादळ होऊन इंग्लिशांची तारवे बुडाली. एक कोटीचे नुकसान झाले.

**३७८१** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

अमेरिकेतील बार्णमसाहेबाने स्वतःविषयी खबर लिहिली. तिचे हक्क दीड लक्ष रुपयांना विकले गेले. कारण ग्रंथकर्ता नामांकित आहे.

**३७८२** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

जंबू खंडच्या राजा हसन याने स्वतः बनविलेल्या बलूनमधून प्रवास केला.

**३७८३** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

कलकत्यातील पाठशाळेसाठी आठ लक्ष रुपये खर्च होणार.

**३७८४** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

भीमा नावाच्या स्त्रीने एका मुलीचा खून केल्यामुळे तिला फाशी झाली. या देशात स्त्रीला फाशीची शिक्षा प्रथमच होत आहे.

**३७८५** (१४ : १, १० जानेवारी ५५, २०)

गेल्या महिन्यात मुंबईत ११८० लोक मृत्यू पावले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक २, मुंबई, २० जानेवारी १८५५

**३७८६** (१४ : २, २० जानेवारी ५५, २१–२२)

झाडांच्या पानांविषयी :

पानाचा पृष्ठभाग व तलभाग यांची त्वचा सोलून काढली, तर शुद्ध शिरांचा पंजर आढळतो. या शिरांच्या साहाय्याने झाडांच्या सर्व अवयवांना जीवनरस मिळतो. झाडांना कार्बन वायूचा फार उपयोग होतो. पुष्पकलिका तर फलन्यायेंकरून पानांच्याच बनतात. पान हेच वृक्षांचे पोषण करते. म्हणून पानास बीज म्हणण्यास बाधा नाही. (सचित्र)

**३७८७** (१४ : २, २० जानेवारी ५५, २२)

डाक्तर अंडरसन व टामसनसाहेब यांचे देप्पुटेशन अडीच महिने मुंबईस राहिले. स्वधर्मवृद्धीविषयीच्या अधिक उण्या व्यवस्था पाहून त्यांनी वाटाघाटी केल्या. आता ते मद्रासकडे गेले आहेत.

**३७८७ अ** (इंम : २२)

**३७८८** (१४ : २, २० जानेवारी ५५, २२)

रे. विलियम वूडसाहेबांनी महाराष्ट्रात सात वर्षे मेहनतीने काम केले. मुंबई व सातारा मिशनात ते होते. आता ते स्वदेशी जात आहेत.

**३७८८ अ** (इंम : २२)

**३७८९** (१४ : २, २० जानेवारी ५५, २३–२४)

शुभवर्तमानप्रसारकमंडळी :

या मंडळीचा दोन वर्षांचा रपोट मिळाला. हे मिशन तीन वर्षे काम करीत आहे. दर शनिवारी खिस्ती लोक एकत्र जमून अहवाल घेतात. परदेशातून येणाऱ्या मदतीबरोबर आपणही काही मदत करावी, अशी भावना लोकांत वाढत आहे. खिस्ती धर्म वाढत असून त्याचा उत्तरोत्तर अधिक फैलाव होत आहे. सणाच्या दिवसांमध्ये मौजमजा मारून अनहित करण्यापेक्षा देवाचे काम करावे, असे त्यांना वाटते. महार लोकांकरिता एक शाळा सुरू केली. मंग्यांची शाळा सुरू होणार आहे. आम्ही देवाचे निवडलेले लोक आहोत, असा निश्चय करून ते कार्य करतात.

**३७८९ अ** (इंम : २२–२३)

**३७९०** (१४ : २, २० जानेवारी ५५, २५-२६)

गोविंदाचा बाप त्यास म्हणतो की : ज्यांचा बाप मद्यपी आहे, त्या लेकरांची कापडे मलीन असतात. फाटक्या वस्त्रांनी पडक्या घरात त्यांना वावरावे लागते. असले आईबाप मुलांसही दारू पिण्याची सवय लावतात आणि घराचा नाश करतात. गोविंदाने पाहिले होते की, दारूबाज मनुष्य धुंदीत कुत्र्यासारखा रांगतो, राक्षसाप्रमाणे मारामारी करतो. बाप म्हणाला की, पगाराच्या दिवशी छाकटे लोक पैशावरून मारामारी करतात. या शहरात निदान ८०० तरी पिणारे आहेत. पिण्याशिवाय आपला काही पराक्रम दिसणार नाही, अशी खोटी कल्पना लोकांत दिसते. म्हणून दारूपासून दूर राहावे. सुबुद्धीने वागावे.

**३७९१** (१४ : २, २० जानेवारी ५५, २६–२८)

'मिशनातील एक' लिहितो की : अरणगावच्या बोवाजी साधूची दिंडी निघाली होती. सात दिवस भजन केल्यानंतर कर्कश वाद्यांच्या आवाजात मिरवणूक निघाली. पालखीत देवांच्या मूर्ती होत्या. लोक भजन म्हणताना वेड्यासारखे उड्या मारीत होते. हा वेडेपणाच नव्हे, तर दांभिकपणाही आहे. बोवाजीच्या समाधीला लोक नवस करतात. काहींना पुत्रप्राप्तीही झाली, असेही सांगण्यात येते.

तात्पर्य : असेही भक्ती नसून खोटेपणा होय.

**३७९२** (१४ : २, २० जानेवारी ५५, २८–२९)

'ज्ञानोदय पाहणारा' लिहितो की : आषाढी-एकादशी जवळ आल्यानंतर माणसांचे थवे उतारशाळेत येतात. तुम्हांस देव भेटतो का ? तो तुमच्याशी बोलतो का ? असे प्रश्न विचारल्यावर ते ठराविक उत्तरे देतात. मूर्तीत देव नाही. ही पूजा म्हणजे एक ठकबाजी आहे. असे त्यांना समजावून सांगितले. कृष्णाच्या स्वैरपणामुळे रुक्मिणी दिंडिरवनात येऊन राहिली. तिच्या शोधार्थ हा पांडुरंगरूपाने पंढरपुरामध्ये आला. शुक्राचार्याने मनुष्यवध केला, म्हणून तो डोंगर झाला ! हे सर्व त्यांना समजावून सांगून त्यांना पवित्र शास्त्राची पुस्तके वाचावयास दिल्ही.

**३७९३** (१४ : २, २० जानेवारी ५५, २९–३०)

बेळगावात मद्यपानाचे व्यसन वाढत आहे. छाकटे लोक पिऊन रस्त्यामध्ये धुमाळी करतात. बुद्धिवंत मनुष्यप्राण्याची ही दयनीय अवस्था पाहून मन कळवळते. सुरादेवीच्या या भक्तांमध्ये सर्व जातींचे व व्यवसायाचे लोक असतात. त्यांची मुखदुर्गंधी हवा बिघडवते. बोलू जावे, तर भपकाऱ्याने डोके दुखते. प्याल्यानंतर एकतर ते गटारात शयन करतात किंवा घरी जाऊन बायकापोरांस मारझोड करतात. कष्टाचा पैका धुळीत जातो. दारूबाजाची स्त्री तर पती असून विधवा झालेली असते. छाकटे लोकांचे अपराधही वाढत आहेत. धुंदीत ते कोणाचाही प्राणघात करतील.

३७९४ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३०–३१)

डाक्तर डालट्नने सोडियमच्या घनत्वाचे कोष्टक तयार केलेले आहे. मिठापासून कार्बोनेट ऑफ सोडा खंडोगणती तयार करता येतो. त्याचा साबणात उपयोग करता येतो. मिठाच्या विघटनाने सल्फेट ऑफ सोडा तयार होतो. ब्रिटिश अल्कली तर स्फटिकासारखा दिसतो.

३७९५ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३०–३३)

मांडवी खात्यात गलबतावर माल लवकर चढविण्यासाठी बोटीचे कामदार लाच खातात. पोलीसखात्यात कैदेतून सुटका होण्यासाठी शपथ घेवविणारे भट, पोलीस, हे सर्वजण मिळून पैसे खातात. जमाबंदी करताना मामलेदार, कारकून, यांची तर नेहमीच पोळी पिकते. लांडगे व कुत्रे यांनी मेंढ्यांचा 'इनसाफ' करावा, अशी सगळीकडे स्थिती आहे! इंजनेर लोक तर नोकरांच्या पगारातही वाटा मागतात. रविवारी एकत्र बसून झालेल्या कामाची वाढवून मापे देतात व हजारो रुपये खातात. मोजणी खात्यातले कारकून तर राजेच होऊन बसले आहेत. त्यांची सगळी कामे अगदी फुकट होतात: हजामतसुद्धा!

३७९६ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३३–३४)

'एक प्रवासी मित्र' लिहितो की: रत्नागिरी तालुक्यात सोमेश्वर या गावी पाषाणाचा नंदी फुलला आहे! हे संकट पाहून भिक्षुकांची अरिष्टशांतीकरिता धावपळ चालली आहे. यज्ञ आणि ब्राह्मणभोजन करण्याची त्यांची मनीषा दिसते. परंतु यासाठी लौकिकाग्नी व ज्ञानाग्नी यांची गरज आहे, गार्हपत्य नको! उद्योगरूपी यज्ञाची कास धरावी. या भिक्षुकांनी रसायनशास्त्राचा अभ्यास केला, तर पाषाणरूप नंदीचा रंग बदलण्याचे कारण त्यांच्या सहज लक्षात येईल. म्हणून विचार करा, उद्योग करा.

३७९७ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३४)

काही उपयोगी कामे करण्यासाठी ईश्वराने आपणांस आयुष्य दिलेले आहे. ते काम केले नाही, तरी काळ शीघ्रगतीने धावतच राहणार. आपण आळस केला, म्हणून काळ बसून राहणार नाही. म्हणून काही सत्कर्म करावे. वाईट कर्मे आपला काळ हरण करतात. आपले आयुष्य दिवसानुदिवस उणे होत असते. काळ हा नौकेप्रमाणे आहे की, जी कधीही नांगरली जात नाही. किनाऱ्यास लागल्यावर बंदीखान्यात पडण्याची वेळ येईल, म्हणून दुष्कर्मांपासून दूर राहावे. दुर्गुण हा उधळ्या मनुष्याप्रमाणे आहे. उधळा माणूस वंशपरंपरेचे वतन विकतो. सद्‌गुणी माणूस ते टिकवून धरतो.
(ज्ञानप्रसारकवरून)

३७९८ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३५)

ईश्वरास तृणाचीही काळजी आहे. पृथ्वीस त्याने तृणाचे वस्त्र नेसवले आहे. सर्व प्राणी धान्यावर उदरनिर्वाह चालवितात. हे धान्य एका तृणापासूनच तयार होते. तृणामध्ये संरक्षण करून घेण्याची अजब शक्ती असते. भूमीवर पसरणे, तसेच सर्वत्र रुजणे, हा त्याचा गुण लक्षणीय आहे. त्याची पाती कापली की, त्याची मुळे वाढत राहातात. जो जो तुडवावे, तो तो ते मजबूत होत राहाते. वसंतऋतूत जिवंत होऊन ते हिरवेगार होते. कित्येक तृणांचा तर बीजाशिवाय विस्तार होतो.
(ज्ञानप्रसारकवरून)

३७९९ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३५)

तपकिरीचे अट्टल व्यसनी लोक ४–४ पळे तपकीर ओढण्याच्या उद्योगात घालवितात. या हिशेबाने दर दहा दिवसांतून एक दिवस तपकीर ओढण्यात खर्ची पडतो! चाळीस वर्षांत चार वर्षे फुकट जातात.
(ज्ञानप्रसारकवरून)

३८०० (१४ : २, २० जानेवारी ५५, ३५)
इंग्रजलोक निर्लोभी बुद्धीने आमच्याशी स्नेह करितात. हिंदुस्थानातील अमीर लोकांनी या स्नेहाची जाणीव ठेवावी.

३८०१ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
कुरुंदवाडच्या राजपुत्राचा अर्धांगवायूने मृत्यू झाला.

३८०२ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
फाटकी कापडे व केळीचे तंतू यांपासून इंग्लंडमध्ये कागद तयार करतात.

३८०३ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
सुरत ते अमदाबाद लोखंडी रस्ता होणार.

३८०४ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
त्रिवांद्रममध्ये पदार्थशाळा स्थापन झाली.

३८०५ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
पत्याळचा राजा फारसैथसाहेबासह इंग्लंडला जाणार.

३८०६ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
कलकत्याच्या सदर अदालतीत ४५४ दावे तुंबल्यामुळे दोन नवे जड्ज नेमले जातील.

३८०७ (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)
अजिगड प्रांतात चांभारांनी कातडे मिळविण्यासाठी अनेक गुरे विषप्रयोगाने मारली, असा संशय आहे.

**३८०८** (१४ : २, २० जानेवारी ५५, ३६)

युद्धात मेलेल्या सैनिकांच्या कुटुंबासाठी कलकत्यात ५० हजाराचा निधी जमला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी १८५५

---

**३८०९** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३७)

वानर हा खोडसाळ प्राण्यामध्ये अग्रगण्य आहे. अफ्रिकेतील वानरांस शेपूट नसते. पण सुतेरा नावाचा वानर आपले शेपूट झाडाच्या फांदीस लटकावून लोंबकळत राहातो. एखाद्या प्रचंड वृक्षावर ४०–४० वानर राहातात. गंमतीची गोष्ट म्हणजे एखादा नाला किंवा नदी उतरून जाताना हे सर्व वानर आपल्या शेपट्या एकमेकात गुंतवून साखळी तयार करतात, आणि मोठ्या युक्तीने नदी ओलांडून जातात! अमेरिकेत रानटी लोक वानरांचे मांस खातात. (सचित्र)

**३८१०** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३८)

मिस्तर श्वार्च आपल्या कुटुंबीयांसह विलायतेहून आले. मिस्तर दाजी पांडुरंग यांचेबरोबर ते जुन्नर मिशनात काम करतील.

**३८१० अ** (इंम : ३७–३८)

**३८११** (१४ : ३, १ फेब्रुवारी '५५, ३८–३९)

ज्ञानदर्शन :

हे त्रैमासिक पुस्तक नुकतेच सुरू झाले. (ज्ञानदर्शन-त्रैमासिक पु. १, अंक १०, १०० पृष्ठांचे, गणपत कृष्णाजीच्या छापखान्यात छापले. किं. १ रुपया दर अंकास.) विद्यावृद्धीस झटणाऱ्या मंडळींनी परभाषेतील ग्रंथांचे तर्जुमे करण्यासाठी हा उपक्रम सुरू केला. आपला हेतू स्पष्ट करताना कर्ते म्हणतात की, मराठीत पश्चिम देशांतील विद्येच्या विषयावर फारसे ग्रंथ नाहीत. इतिहास, रसायन, गणित, व्यवहार, या विषयांवर पश्चिमेच्या महापंडितांनी केलेल्या ग्रंथांचा सारांश, तसेच काहींची भाषांतरे करून स्वदेशीय लोकांपुढे हजर केली जातील.

**३८११ अ** (इंम : ३८)

**३८१२** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

ज्ञानसागर :

तावी साच्याचे शिला छापावर, आठवड्यांत तीन वेळा निघते. वार्षिक आगाऊ किंमत १० रु. व महिन्यास १ रु. छापणारा रघुनाथ त्र्यंबक जोशी. मु. मुंबई.

**३८१३** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

ज्ञानप्रकाश :

प्रति आठवड्यास निघते, फुलस्केप १२ पृष्ठे, शिलाछाप, वार्षिक किंमत १० रु. महिन्यास १ रु. छापणारा कृष्णाजी त्र्यंबक रानडे.

**३८१४** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

जगन्मित्र :

फुलस्केप अष्टपत्री साच्याचे, शिला छापावर दर आठवड्यास निघते. वार्षिक किंमत आगाऊ दिल्यास ५ रु. मागाहून दिल्यास ६ रुपये. छापणारा सखाराम मोरेश्वर जोशी, ठिकाण रत्नागिरी.

**३८१५** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

प्रभाकर :

एक तावी साचाचे, शिळा छापावर, आठवड्यास निघते. वार्षिक वर्गणी १२ रु., छापणारा गोविंद पांडुरंग जोशी, ठिकाण : मुंबई.

**३८१६** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

वर्तमानदीपिका :

राईल फोलिओ, म्हणजे मोठ्या तावाच्या साच्याने शिळा छापावर आठवड्यास छापले जाते. वार्षिक किंमत आगाऊ दिल्यास ५ रु. मागाहून ६ रुपये, महिन्यास ८ आणे. छापणारा : कान्होबा गणपत. ठि., मुंबई.

**३८१७** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

धूमकेतू :

मोठ्या तावी साच्याचे, शिळा छापावर, आठवड्यास निघते, वार्षिक किंमत ४ रु. छापणारा : गोविंद पांडुरंग जोशी, ठिकाण-मुंबई.

**३८१८** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

वर्तमानसंग्रह :

आठ पेजी, फुलिस्केप साच्याने, शिळा छापावर दर आठवड्यास निघते. वार्षिक किंमत ४॥ रु. महिन्यास ६ आणे, ठिकाण : कोल्हापूर.

**३८१९** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

ज्ञानोदय :

सोळापेजी अष्टपत्री, इंग्लिश व मराठी मिश्रित असे ठसे छापावर महिन्यात दोन वेळा दिसते. मालक अमेरिकन मिशन मंडळी, छापणारा टॉमस-ग्रॉम, ठिकाण : मुंबई, वार्षिक किंमत एतद्देशीय लोकांस रु. १॥ साहेबलोकांस ४ रु. या पत्राचे वार्षिक पुस्तक एकच चांगले बांधीव घेतले, तर किंमत २॥ रु.

**३८२०** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

ज्ञानप्रसारक :

अष्टपत्री साचा, ३२ पृष्ठांचे. ठसे छापावर, दर महिन्यास एल्फिनस्तन शाळेतील ज्ञानप्रसारक मंडळीकडून छापले जाते. दर अंकास किंमत ४ आणे, मुंबई.

**३८२१** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

ज्ञानदर्शन :

अष्टपत्री साच्याचे, १०० पृष्ठांचे, ठसे छापावर, तीन महिन्यांनी छापते. वार्षिक वर्गणी आगाऊ दिल्यास रु. ४, छापणारा गणपत कृष्णाजी, ठि. मुंबई.

**३८२२** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

चंद्रिका :

अष्टपत्रीसाचा, ३२ पृष्ठांचे, शिळा छापावर दर महिन्यास निघते, नियमित घेणारास दर प्रतीची ४ आणे, फुटकळ घेणारांस ६ आणे, छापविणारी सन्मार्गदर्शक मंडळी, ठि. मुंबई.

**३८२३** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ३९–४०)

ज्ञानवर्धक :

फुलिस्केप कागद अष्टपत्री साचाचे. सन १८५५ फेब्रुवारीच्या १ तारीखेपासून आठवड्यास निघणार. वार्षिक किंमत ६ रुपये ठरविली आहे.

**३८२३ अ** (इंग्र : ३९)

**३८२४** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४०–४४)

येशु ख्रिस्त माहात्म्य : अध्याय ४ : उपदेशपद्धती. ईश्वर तुम्हांला आपला पवित्र आत्मा देईल, असा उपदेश येशूने केला. आपण अब्राहामाची संतान आहोत, म्हणून पातकांचे दास होऊ नका. मी जे ओझे तुम्हांला देत आहे, ते सोईचे व हलके आहे. तुम्ही सत्यतेने वागा, म्हणजे ईश्वर तुम्हांस निवडून घेईल. तुम्ही लहानग्या, दरिद्री, रोगी लोकांना जी मदत कराल, ती ईश्वरापर्यन्त पोहोचेल. श्रीमंताना सुखाचा फार सोस असतो. पण देवाने दिलेले धन गरीबांना देणे, हे पुण्याचे काम आहे. स्वतः नवेनवे पोशाक घालणे बरे नव्हे. त्यापेक्षा भिकाऱ्यास अन्न द्यावे. त्याची भाजलेली जीभ थंड करावी.

३८२५ (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४५-४६)

नेटिवांची मने अज्ञानांधकारात गोते खात असतात. अशिक्षितपणामुळे त्यांच्या ठायी विचार अजिबात नसतो. कोणी चालीरीतीवर टीका करू लागला, तर त्याच्यावर शिव्यांची पुष्पवृष्टी करतात. विद्येने माणसाला भूषण व कीर्ती प्राप्त होते. सुधारलेल्या माणसांचे जीवन रानटी माणसापेक्षा केव्हाही चांगले असते. ब्रिटिश लोक यंत्रविद्येमुळे सुधारले आहेत. मानकरी जातींनीच शिक्षण घ्यावे, असाही एक प्रबळ विचार या देशात आढळतो. सगळ्यांनाच विद्येची आवश्यकता आहे, असे त्यांस वाटत नाही. वास्तविक पाहाता विद्या हे अमोल्य रत्न आहे. पूर्वी पढिकपणा फक्त ब्राह्मणांतच असे. कित्येकांना संस्कृत ही भाषा ठाऊकसुद्धा नव्हती. इंग्रज आल्यावर सर्वांनाच विद्येची द्वारे खुली झाली. रसायनशास्त्राचे ज्ञान झाल्यावर निसर्गाची ५५ मूलतत्त्वे आहेत, हे त्यांस पटले. पूर्वी ते ५ च महातत्त्वे मानीत असत. रसायनशास्त्र म्हणजे जादू आहे, असे लोकांना वाटत असे.

३८२६ (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४६-४८)

सल्फेट ऑफ सोड्याचे रूपांतर ज्वलनशील द्रव्याच्या सहाय्याने सल्फ्युरेट ऑफ सोडियममध्ये होऊ शकते. कार्बोनेट ऑफ सोडियमचे स्फटिक शुष्क हवेमध्ये पाझरतात. यास अल्कलीची रुची असते. यातूनच बायकार्बोनेटही तयार करता येईल. तो विद्रावणाने तयार करता येतो. त्यास उष्णता लावली, तर तो न्यूट्रल कार्बोनेटही बनतो.

**३८२७** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४८–४९)

असीरगड येथे मादक पदार्थांच्या मक्त्यांचे लिलाव झाले. यंदा हा लिलाव अगदी कमी रकमेस झाला. लोकांना वाटले की, व्यसनाचे प्रमाण कमी झाले. पण खरा प्रकार असा की, मक्ता घेणारांनी लाच देऊन भाव उतरविले होते. इंग्लिश राज्यात चोरी, खून, वगैरे घातकी प्रकारांचा बंदोबस्त होतो, पण दारूचा मात्र होत नाही. दारूचे उत्पन्न म्हणजे कलालाच्या मार्फत वसूल होणारा एक करच होय. मात्र हा कर स्वखुशीचा असल्यामुळे कोणी तक्रारही करणार नाही.

**३८२८** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९)

तपकिरीच्या व्यसनाने केवळ वेळेचाच नव्हे, तर द्रव्याचाही नाश होतो. हा वेळ अधिक सत्कारणी लावता येईल.

**३८२९** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९)

विजेच्या यंत्राने बातमी धाडण्याकरिता सरकारने दर कायम केले आहेत. ४०० मैलपर्यंत १६ शब्दांस १ रुपया पडेल. निरोप धाडणारास उत्तर पाहिजे असले, तर उत्तरासाठी पैसे भरावेत.

**३८३०** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९)

युरोपातील लढाईस मदत करण्याकरिता जर्मनांची खास तुकडी लंडनमध्ये शिक्षण घेत आहे. यहुदी लोकही स्वखर्चाने पलटणी उभारीत आहेत. नामदार राणीच्या खास पलटणी भारतातूनही क्रिमियाकडे रवाना होतील.

**३८३१** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

व्यभिचारातून मारामारी होऊन झालेल्या खुनाने सहाजण मरण पावले.

**३८३२** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

गवरनर जनरल व ब्रम्हदेशचा वकील यांच्या वाटाघाटी फिसकटल्या.

**३८३३** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

विलायतेत वैद्यकी शिकणाऱ्या बाबू मुकुंद यास पत्याळाचे महाराज द.म १५० रु. देणार.

**३८३४** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

तिकीट न लावता डाक पाठविल्याबद्दल पुण्यांत फिर्याद दाखल झाली.

**३८३५** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

त्रावणकोरमध्ये मुलीच्या वंशजांना वारसाहक्क देण्याची चाल आहे.

**३८३६** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

पंजाबातून १ लाखाचा जवस विलायतेस रवाना झाला.

**३८३७** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

सर अर्स्किन पेरी यांच्या नावाने एक लाखाचा स्मारक निधी जमला आहे.

**३८३८** (१४ : ३, १ फेब्रुवारी ५५, ४९–५२)

बृहस्पती आणि मंगळ यांच्या गमनमार्गात आणखी दोन लहान ग्रह सापडले. आता ग्रहांची संख्या ३३ झाली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३८३९** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ५३)

मोरपीस (सचित्र) : हे पीस रमणीय व आश्चर्यकारक करामतीचा मासला आहे. त्यात बारीक नकशी असते. हिरवे निळे व सोनेरी रंग तकतकीत वाटतात. वरच्या बाजूस एक डोळा असून त्याभोवती वर्तुळे असतात. या पिसाच्या पाकळ्या जर अस्ताव्यस्त केल्या तर पुन्हा जुळवायला भारी श्रम पडतील. प्राचीन काळच्या लेखकांनीही त्याची मातबरी वर्णन केली आहे पक्ष्याच्या शरीरातील एक द्रव पदार्थ सुकून ठिपके तयार होतात.

**३८४०** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ५३)

नवा करार : हे पुस्तक नगर मिशनातील प्रतीप्रमाणे आठ पृष्ठांच्या मेजरात छापले आहे.

**३८४१** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ५४–५६)

मोकळ्या मैदानात गेल्यावर आकाशाचे निरनिराळे रंग पाहून मनोरंजन होते. आकाशाभासरणी नदीचा शुभ्रवर्णही सुंदर दिसतो. चंद्र आपल्या कांतीसह वर्तमान नक्षत्रात गमन करीत असतो. ब्रह्मांडात असे अनेक आकाशाचे प्रदेश असण्याची शक्यता आहे. ईश्वराच्या अपार सृष्टीपुढे आपण क्षुल्लक आहोत. दुर्बिणीतून पाहिले की, हजारो तारे दिसतात. याखेरीज हजारो तारे असतील. या सर्वांचा बंदोबस्त करण्यामध्ये ईश्वराचा वेळ जात असेल. मग माझ्याकडे तो कोठून लक्ष देणार ? पण तो ईश्वर विश्वव्यापक व सर्वज्ञ आहे. तो प्रत्येकाच्या सन्निध असतो. सृष्टीरूप देवळाला व्यापून उरणारा ईश्वर सर्वांना ओळखतो. आत्मा कोट्यावधी वर्षे धावला, तरी हे ब्रह्मांड ओलांडणे त्यास अशक्य आहे. ईश्वर आपला सांभाळ करीत असतो. त्यास अंतःकरणपूर्वक आणि नम्रतेने मानले पाहिजे.

**३८४२** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ५६–५९)

'नम्रसेवक' आपल्या पत्रात लिहितो की : उंच जातीचे लोक समाजात अलिप्तपणे राहातात. शिक्षणामुळे सुधारणा होऊन ते आता निदान अभिवादन करू लागले. ज्ञानामुळे लोक सुविचारी बनले. तरीही आपल्या रानटी आणि कल्पित धर्माविषयी खोटा अभिमान कायमच आहे. इंग्रजही पूर्वी लाकडी मूर्तीस भजत असत, पण पुढे त्यातली व्यर्थता त्यांच्या ध्यानात आली. स्त्रियांना विद्या न देणे, हे या देशाच्या वेड्या चालीरीतीचे आणखी एक लक्षण आहे. मिशनऱ्यांच्या शाळेमुळे अतिशूद्रांना शिक्षण मिळू लागले. ज्ञानाच्या योगाने जातींचा द्वेष कमी होत चालला. तरीही खेड्यांतली प्रजा मंत्रतंत्रावर विश्वास ठेवते. पाश्चिमात्य देशही पूर्वी कंदमुळे खाऊन वनचराप्रमाणे राहात. पण आता तेच सर्वांमध्ये जास्त सुधारलेले समजाते लागतील. व्यापार व विद्यासाधन यांचे फायदे या शतकात लोकांना समजत आहेत. ज्ञानोदयाच्या द्वारे लोकसुधारणा होत आहे.

**३८४३** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ५९–६१)

जोतीबा माळी यांच्या शाळेतील एका मांग मुलीने निबंधात म्हटले आहे की : आमची जात पशूपेक्षा नीच मानली जाते. लाडूखाऊ ब्राह्मणांनी वेदाला स्वतःची मत्ता बनविले. ईश्वराचा खरा धर्म कोणता, ते आम्हांला कळले पाहिजे. ईश्वराने निर्माण केलेले पाणी सर्वांना मिळते. मग देवनिर्मित वेद कां मिळू नयेत ? आम्हांला मात्र तेल व शेंदूर पाजून आमचा निर्वंश करण्याचा कट चालू आहे. आम्हांला गाढवाइतकी सुद्धा किंमत नाही. लिहिण्याची बंदी तर आहेच. पण सावलीचाही स्पर्श केलेला चालत नाही. पंडितांनी आपले अप्पलपोटे पांडित्य जरा गुंडाळून ठेवावे. घरावर छप्पर नसते, आजारीपणात औषध नसते, अशी आमची दयनीय स्थिती आहे. (पुणे एथील मांगमहारांच्या शाळेतील मुलीने लिहिलेला निबंध) (पुढे चालू . . .)

**३८४४** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६१–६३)

'मकर संक्रांतीविषयी' : 'मिशनातील एक' पत्रात म्हणतो की : संक्रांत आली की, ब्राह्मण लोक एका कागदावर तिचे चित्र काढतात. त्यावरून भविष्य सांगतात. संक्रांती देवतेने धारण केलेल्या वस्तू महाग होतात. तिच्याबरोबर असणारी जनावरे मरतात. असले हे भविष्य आहे! स्त्रिया पर्वकाळात ५ मडकी घेऊन ब्राह्मणांकडे जातात. तो मंत्र म्हणून पूजा सांगतो. नंतर त्याचा 'आवा' लुटतात. सायंकाळी लोक एकमेकांना तीळगूळ देतात. तीळगूळ घ्या, गोड बोला, वगैरे म्हणतात. तरीही यांच्यातली भांडणे काही कमी होत नाहीत. असल्या सणांनी ईश्वर काही पापांची क्षमा करणार नाही. मडकी म्हणजे ईश्वर नव्हे!

**३८४५** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६३)

रथसप्तमीविषयी अज्ञानपण : 'मिशनातील एक' लिहितो की : रथसप्तमीस लोक घरामध्ये सूर्याच्या रथाचे चित्र काढून त्याची पूजा करतात. ब्राह्मणास विडादक्षिणा देतात. विड्याच्या जवळ अग्नीवर एक बोळके ठेवून त्यात दूध ठेवतात व ते उतू जाऊ देतात! काही गोड पदार्थ करून मेहूण जेवू घालतात. हा सारा सूर्यदेवतेचा सन्मान आहे. पण सूर्य ही केवळ उजेड पाडणारी जोत ईश्वरनिर्मित आहे. तो प्रत्यक्ष परमेश्वर नाही. सबब असल्या खोट्या समजुती व वेड्या चाली सोडून द्याव्यात.

**३८४६** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६३)

एका मुलीस कोणी विचारले की, देव कोठे आहे, हे जर तू सांगशील, तर तुला एक नारिंग देईन. तिने उत्तर दिल्हे की, जेथे देव नाही, असे ठिकाण मला दाखवाल, तर मी तुम्हांस दोन नारिंगे देईन!

३८४७ (१४:४, १५ फेब्रुवारी ५५, ६४)

काही देण्याचा प्रसंग आला की, लोक नाराज होतात. धर्माचा अभ्यास, लोकरिवाज, द्रव्याची विपुलता, श्रमावाचून प्राप्ती, वगैरे गोष्टींनी कर्णत्व येते. आपले सर्वस्व खर्च करणारे उदाराधी लोकहो अनेक होऊन गेले. लोभ आणि उदारत्व हे जणू दोन ध्रुव आहेत. परंतु लोभाकडेच मोठा समाज जमतो. निर्दोष लोभ आणि योग्य उदारत्व हे आदर्श गुण आहेत. सरकारने रयतेकडून मिळालेले द्रव्य तिच्या संरक्षणाकरिता खर्च केले पाहिजे. या कारणाने काही देशांत राज्यक्रांती झाली. अमेरिकन संस्थाने विलायत सरकारापासून स्वतंत्र झाली.

३८४८ (१४:४, १५ फेब्रुवारी ५५, ६४–६५)

मुंबई व कलकत्ता या दोन शहरांत युनिव्हर्सिटी म्हणजे मोठ्या शाळा स्थापण्याचे सरकारने ठरविले आहे. तेथे कायदाही शिकविला जाईल. म्हणजे विद्यार्थी व्यवहारज्ञानी होतील.

३८४९ (१४:४, १५ फेब्रुवारी ५५, ६५–६६)

धूमकेतू लिहितो की : 'पाद्री लोकांमुळे राज्यात जुलूम चालतो. हे कुउपदेश करणारे पाद्री या देशात आले नाहीत, तरीही सरकारचे काहीही नुकसान होणार नाही. ते मोह पाडून लोकांना आपल्या शाळेत नेतात. म्हणून हिंदू शाळा स्थापिल्या पाहिजेत.' सर आर्स्किन पेरी यांनी यावर लिहिले आहे की : 'हे सर्व अज्ञान होय. पाद्री लोक आल्यामुळे नेटिवांचा फायदाच होतो. शिमग्याच्या कुत्सित सणाविषयी सतत बोलून पाद्र्यांनीच तो सण कमी केला. पाद्री परत गेले, तर आपणांस फार वाईट वाटेल. शाळेमध्ये धर्म शिकवावा, असेच आमचे मत आहे.'

३८५० (१४:४, १५ फेब्रुवारी ५५, ६६–६७)

रशियन सरकारने तहाची इच्छा व्यक्त केली आहे.

३८५१ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६६–६७)

युरोपीय लढाईत भाग घेण्याची अमेरिकेची इच्छा नाही.

३८५२ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६६–६७)

अमेरिकेत १७ हजार मैल लोखंडी रस्ता आहे.

३८५३ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६६–६७)

चिनी बंडखोरांनी तार्तरांकडून शांगहाई शहर जिंकले.

३८५४ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६७)

चौकाजवळ पेंडाल्स येथे पतिपत्नीचा अमानुषरीत्या खून झाला.
(कोल्हापूर)

३८५५ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६७)

पत्याळचा राजा व गलबताचे मालक यांचा तंटा ५० हजार रुपयांवर मिटला.

३८५६ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६७)

मिनिस्तर आफ पब्लिक इस्ट्रक्षन :

या जागेवर शिक्षणाधिकारी म्हणून मि. गार्डन यंग यांची नेमणूक झाली. त्यांस २००० पगार मिळेल. काही दिवाणी कामदारांची उमेद होती की, आपण ही जागा मिळवावी. पण तसे झाले नाही.

३८५७ (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६७–६८)

नामदार राणीचे पार्लमेंटातील भाषण विद्युत्यंत्राने संपूर्ण युरोपांत व भरतखंडात समजल्यामुळे त्याच दिवशी वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाले.
हा केवळ यंत्राचा प्रभाव होय.

**३८५८** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६८)

मुंबई टापूमध्ये जानेवारीत १४४५ माणसे मृत्यु पावली. म्हणजे सरासरी दररोज ४७ जणांचा मृत्यु झाला.

**३८५९** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६८)

पत्रे पाठविणारांनी पत्रावर आपली सही केलीच पाहिजे. सही नसेल, तर ती पत्रे गाबाळ ग्रंथात टाकली जातात.

**३८६०** (१४ : ४, १५ फेब्रुवारी ५५, ६८)

श्रीमती देवकी लक्ष्मण यांनी नागपाड्यावरील घर मिस्तर फारव्यॉंक यास विकत देण्याचे ठरविले आहे, तरी तेथे कोणाचा काही वारसाहक्क असेल, तर त्याने तसे कळवावे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक ५, मुंबई, १ मार्च १८५५

---

**३८६१** (१४ : ५, १ मार्च ५५, ६९–७०)

समुद्रावरील जहाजे दुरून उलटी दिसतात! अगर झाडे व खांब यांच्या आकृती मोठ्या वाटतात. कोरड्या जागी पाण्याचा भास होतो. यास मृगजल म्हणतात. वाऱ्यामध्ये उजेडाची किरणे शिरल्यावर ती लवचिक बनतात, वाकलेलीही दिसतात. पातळ व जाड वारा एकत्र झाला, तर वस्तू भिंगाप्रमाणे चकाकते. सूर्यकिरणांचे कमीअधिक परावर्तन झाले की, अनेक चित्रविचित्र आकृतींचा भास होतो.

**३८६२** (१४ : ५, १ मार्च ५५, ७०)

केप ऑफ गुड् होपच्या मार्गावर (रे. आर्. डब्ल्यू.) ह्यूम साहेबांचा मृत्यु झाला. ते आकाशलोकी निरंतर सुख भोगतील, यात संशय नाही.

**३८६२ अ** (इंम : ७०)

**३८६३** (१४ : ५, १ मार्च ५५, ७०–७१)
रेवरंड डाक्तर पूर यांचा शिलोनमध्ये मृत्यु झाला. त्यांनी चाळीस वर्षे मिशनचे कार्य केले. ते तत्पर व मेहनती होते.

**३८६३ अ** (इंम : ७०)

**३८६४** (१४ : ५, १ मार्च ५५, ७१)
डैम्लर साहेब मुंबईस आले असून आर्बी भाषेचा अभ्यास करतील. आरब लोकांस बोध करतील.

**३८६४ अ** (इंम : ७१)

**३८६५** (१४ : ५, १ मार्च ५५, ७२–७३)
मुंबई टेम्परान्स युनियन : यंदा ७४ नवीन असामी मंडळीत आले. इतर देशांत मद्यपान बंद व्हावे, म्हणून फार प्रयत्न होतो. सोल्जर लोकांसही दारूविषयी अटकाव केला पाहिजे. रेल्वे, टपाल, विद्यावृद्धी, याप्रमाणेच मद्यपानबंदी तावडतोब व्हावी. व्यसनात बुडालेल्या नीच जातीच्या लोकांना फुटकळ सभा व साधा उपदेश, याद्वारे दारूच्या परिणामांची जाणीव द्यावी.

**३८६५ अ** (इंम : ७१–७२)

**३८६६** (१४ : ५, १ मार्च ५५, ७३)
देवाचे भजन करण्याची गीते : ही गीते चालीसुद्धा छापली आहेत. अशा १४५ चाली असून इंग्लिश पुस्तकांवरून निवडल्या आहेत. छपाई सुंदर आहे. बारापेजी साच्याचे, ३३६ पृष्ठांचे, अमेरिकन मिशन प्रकाशन.

**३८६६ अ** (इंम : ७३)

**३८६७** (१४ : ५, १ मार्च ५५, ७४-७५)

भूगोल–खगोल : रा. महादेवशास्त्री पुराणिक यांनी इंग्रजी पुस्तकावरून भाषांतर करून हे पुस्तक लिहिले. मेजर क्यांडी यांनी शुद्ध करून छापले. केवळ विद्यार्थ्यांनाच नव्हे, तर सर्वांनाच ते उपयोगी आहे. मूळ ग्रंथ सलेवनसाहेबांचा आहे. पृष्ठे २७०.

**३८६७ अ** (इंम : ७३–७४)

**३८६८** (१४ : ५, १ मार्च ५५, ७५–७६)

मुक्ता मांगीण लिहिते की : घरात उंदीर मारणाऱ्या शूर उंचजातीयांनी मांगमहारांवर स्वाऱ्या घातल्या. पेशवाईत असला जुलुम राजरोस चालत होता. एखाद्या महाराजवळ पांघरूण असले, तरी त्याजवर चोरीचा आरोप येई. लहानशा अपराधाबद्दल शिरच्छेद होई. इंग्रज बहादुराच्या राज्यात मात्र हा अन्याय बंद झाला. आमच्या महान दुःखातून आम्हांला वर काढण्यासाठी आमचे प्रिय बांधव सतत मेहनत घेत आहेत. इंग्रज सरकार या शाळांना मदत करते. तरी नीचजातीय लोकांनी आता ज्ञानी व्हावे. कुकल्पना काढून टाकाव्यात. रोमांच येण्याजोगे वाईट कर्म करू नका. (हा भाग त्या मुलीने स्वहस्ताने लिहिल्याप्रमाणे : ऱ्हस्वदीर्घसुद्धा अक्षरशः आहे. त्यांत काहींच बदल केला नाही. मजकूराची कलमे मात्र नवी आहेत व पुनरुक्तीमुळे कोठे मजकूर गाळला आहे.)

**३८६९** (१४ : ५, १ मार्च ५५, ७६–७८)

अज्ञानशत्रूच्या अंमलाखाली आमच्या रयतेची अगदी दुर्दशा होऊन गेली. हिंदूंच्या कुटुंबाचे वर्णन संसार व नीती या दोन दृष्टींनी करता येईल. पैकी संसार सुधारण्याचा विचार त्यांच्या मनात येत नाही. ते ठकबाज नोकरावर गैरवाजवी विश्वास ठेवतात. त्यामुळे मालकाचे सामान नोकरच वापरतात. चाकर बेबंद वागतो. मालक घरी नसला की, तो तमाखू ओढतो. अशा बेदाद नोकरामुळे मालकांचे नुकसानच होते. केरकचरा, खरकटे, माशा-चिलटे, यांचे साम्राज्य घरामध्ये आढळते. घरधन्याचे या पसाऱ्याकडे लक्षच नसते.

**३८७०** (१४ : ५, १ मार्च ५५, ७८–८०)

दुष्टांच्या वस्तीत अनेक क्रूर कर्मे होतात. त्यांतून निरपराध लोकांना दुःख भोगावे लागते. एका मुलाने मूर्तिपूजेचा कंटाळा आला, असे नातेवाईकांना सांगितले, म्हणून नातलगांनी त्यास एक वर्षभर बंदीशाळेप्रमाणे घरात कोंडून ठेवले. त्याची इस्टेट वगैरे हिसकावून घेण्यासाठी त्याच्याकडून जबरदस्तीने सह्या मागत आहेत. दोरीने बांधून ठेवून त्यास काठीने मारतात. इंग्रजांच्या न्यायी व दयाळू राज्यात सोयऱ्यांकडून एका माणसावरती असा जुलुम व्हावा काय ? त्या तरुणास नवा प्रकाश सापडला आहे. परंतु ईश्वराकडे जाण्याचा मार्ग रोखला गेला आहे. जे काही सोसावे लागेल, ते निमूटपणे सहन करण्याची ताकत येशूने आम्हांस दिली आहे. (धुमकेतूवरून)

**३८७१** (१४ : ५, १ मार्च ५५, ८०–८१)

आंबे घाटाजवळच मारलेश्वर देव आहे. संक्रांतीस त्याची जत्रा भरते. त्यावेळी तेथील रस्ता शेणाने सारविण्याची प्रथा आहे. एका पाषाणमय गुहेत ४०–५० माणसे बसण्याइतकी विस्तीर्ण जागा आहे. मलकार्जुन व मारलेश्वर हे देव आहेत. साखरप्याची गिरिजा व मारलेश्वर यांचा विवाहोत्सव तेथे दरवर्षी साजरा होतो. धारातीर्थावर स्नाने करून लोक देवदर्शन घेतात. मारले गाव जवळच असल्यामुळे देवाचे नाव मारलेश्वर पडले.

**३८७२** (१४ : ५, १ मार्च ५५, ८१–८३)

आपल्या देशातील विद्वानांनी आपले बुद्धिवैभव पारलौकिक कल्याणासाठी खर्च केले. युरोपियनांनी ऐहिकाकडेही तेवढेच लक्ष पुरविले. पूर्वी लोकांचा भर वेदपठनावर असे. आता त्याकडे कोणाचे लक्ष नाही. आधी पोटोबा, मग विठोबा; या म्हणीप्रमाणे जो-तो उदरनिर्वाहाच्या उद्योगात मग्न आहे. या देशाची सुधारणा होण्याचा उत्तममार्ग म्हणजे विद्यावृद्धी होय. मुलांना परगावी शिक्षणास पाठवणे, त्यांच्या जिवावर येते. ममता एवढी की, विद्या झाली नाही तरी चालेल! असल्या लाडाने मुलांचे अकल्याण होते. मुले अडाणी राहून क्षुभ बनतात व त्यांना क्लेशात दिवस काढावे लागतात. विलायतेत मूल पाच वर्षांचे झाले की, त्यास शाळेत पाठवितात. कारण खोट्या ममतेने मुलाचे नुकसान होते. (ज्ञानप्रसारकवरून)

**३८७३** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३)

मादक पदार्थांनी मनुष्य बेसावध होतो. यास कैफ म्हणतात. कैफाने आपले फार अनहित होते. बहुतेक सर्व देशांत कैफी असतातच. कैफाने मनुष्याची बुद्धी आणि स्मृती नष्ट होते. हृदयक्रिया बंद पडणे, मस्तकात वायू भरणे, काळीज करपणे, उन्मत्त वायू होणे, असले गंभीर परिणाम कैफी लोकांना भोगावे लागतात. कैफ करून ते कोणासही शिवीगाळ करतात, कुटुंबीयांना मारतात. त्यांचा वित्तविषय कोणी काढून नेला, तरी त्यांना समजत नाही. (विद्योपक्रमाचा ग्रंथ)

**३८७४** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

होळीच्या गैरप्रकारांना मुंबईच्या माजिस्त्रेताने बंदी घातली आहे.

**३८७५** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

टपालातून हुंडी पाठविली, तर त्याबद्दल पावती घेणे बंधनकारक आहे.

**३८७६** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

कलकत्ता ते बडवान लोखंडी रस्ता झाला.

**३८७७** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

दगलबाजीमुळे एका वकिलाची सनद रद्द झाली.

**३८७८** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

क्यांबेल या कर्जबाजारी अधिकाऱ्यास सावकारी तुरुंगात बसावे लागले.

**३८७९** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

धोम येथे रक्ताचा पाऊस पडला, अशी अफवा उठल्यामुळे शांती करण्यात आली.

**३८८०** (१४ : ५, १ मार्च ५५, ८३–८४)

होळीच्या दिवसांत सरकार उत्तम बंदोबस्त ठेवणार आहे.

**३८८१** (१४ : ५, १ मार्च ५५, ८४)

वकिलीच्या परीक्षेसाठी जे उमेदवार आहेत, त्यांनी १९ मार्च रोजी सदर अदालतीमध्ये परीक्षेस हजर राहावे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३८८२** (१४ : ६, १५ मार्च ५५, ८५–८६)

पुस्तके व निबंध करणारी मंडळी : या मंडळीने गेल्यावर्षी ६१,६०० पुस्तके व निबंध छापले. त्यापैकी ५४२०० खपले. मंडळाकडे ६ हजार रुपये जमा आहेत. शिवाय पुस्तकालय बांधण्याकरिता ११ हजार रुपये जमले.

**३८८२ अ** (इंम : ८५)

**३८८३** (१४ : ६, १५ मार्च ५५, ८६)

ऐरिश मिशनचे मोरसाहेब विलायतेहून आले. ते गोधो येथे कार्य करतील.

**३८८३ अ** (इंम : ८६)

**३८८४** (१४ : ६, १५ मार्च ५५, ८६)

चर्च आव् इंग्लंडकडून आर्डिनेशन म्हणजे वडील व सेवक नेमण्याचा संस्कार झाला. ग्रीन व डेविडसन् हे वडील नेमले गेले, तर मोदूसुदन सील आणि आपाजी बापूजी हे सेवक नेमले गेले.

**३८८४ अ** (इंम : ८६)

**३८८५** (१४ : ६, १५ मार्च ५५, ८७)

मॅडम टेलर हिचा वयाच्या ५९ व्या वर्षी मृत्यु झाला. ती बहुत लोकांमध्ये मान्य व प्रिय होती. उपकारिक कामात तत्पर असे.

३८८६ (१४ : ६, १५ मार्च ५५, ८७)

दोन वर्षांपूर्वी इंग्रजांनी पेगू प्रांत जिंकला तेव्हापासून रणगुण शहरात ८०० जणांनी बाप्तिस्मा घेतला. इतर प्रांतांतही १५०० जण ख्रिस्ती झाले. पूर्वी फक्त ८ ख्रिस्ती होते. आता ६ मंडळ्या कार्य करतात.

३८८६ अ (इंग : ८७)

३८८७ (१४ : ६, १५ मार्च ५५, ८७)

मथुरा मिशनात गेल्या वर्षी ख्रिस्तानुसारी ५०० माणसे आली. मंडळीत १३५ लोक मिळाले. अगोदर कोणत्याही वर्षात इतके लोक मिळाले नव्हते.

३८८७ अ (इंग : ८७)

३८८८ (१४ : ६, १५ मार्च ५५, ८८)

१८५३-५४ या वर्षात अपघाताने मेलेले बालगर्भ निदान २४२ असावेत, असा अंदाज आहे. १८४८ ते ५३ या सहा वर्षांत ४६८७ देवीने, १३५६० जरीमरीने, तर ८२,८३५ इतर रोगांनी मेले. साधारणतः मार्च महिन्यात जास्त मृत्यु होतात.

३८८८ अ (इंग : ८७-८८)

३८८९ (१४ : ६, १५ मार्च ५५, ८८–९१)

ब्राह्मण लोक भरतखंडात येण्यापूर्वी मांग–महार हे बलिष्ट लोक असावेत. आर्यांच्या विजयानंतर त्यांना गिरिकंदरात राहाते लागले. या शूद्रांना ताबेदारीचे फार मोठे दुःख भोगावे लागते. त्यांना ज्ञानाचा अधिकार नाही. ते पशूपेक्षाही नीच समजले जातात. सावली पडली, तरी ठार मारीत. घरास आग लागली, तरी पाणी मिळत नसे. सीमेच्या खटल्यात त्यांचा बळी देत असत. ही स्थिती पेशवाई काळातीलच आहे. पण इंग्रजांनी शाळा उघडून त्यांस चांगले दिवस दाखवले. त्यांचा भाग्यसूर्य उदयाप्रत पावण्याची वेळ आली. त्यांनी येशूच्या पायापाशी बसून देवाच्या गोष्टी शिकाव्या.

३८९० (१४ : ६, १५ मार्च ५५, ९१–९२)

'ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : जोतीरावांच्या शाळेपासून मोठेच फळ उत्पन्न झाले. महार-मांगांना कसलेही धर्मपुस्तक नाही, याची त्यांना जाणीव झाली आहे. तरी त्यांनी बैबल वाचावे. हे शास्त्र सर्व जातींना व लोकांना उपयोगी पडणारे आहे. ते अज्ञानी माणसाला ज्ञानी व दुर्गुणी माणसाला सद्‌गुणी बनवील. जे येशूकडे जातात, त्यांना तो कधीही घालवणार नाही. शास्त्रहीन व देवहीन राहू नका.

३८९१ (१४ : ६, १५ मार्च ५५, ९२–९५)

'मद्यपान द्वेष्टा' लिहितो की : दारू नावाचा चोर भरतखंडात प्रबळ झालेला आहे. देवीउपासक तर राजरोसपणे दारू पितात. धर्मामध्ये असले ढोंग किंवा पाप नसावे. ब्राह्मणही दारू पितात हे लज्जास्पद आहे. वाचाळ शब्द, अभद्र भाषण, वेडेवाकडे चालणे, देहभान नसणे, ही लक्षणे दारूबाजात दिसतात. दारूरूपी विषाने द्रव्य, अब्रू व प्राण, यांचा नाश होतो. दारूबाजांचे मृत्यु हे खूनच आहेत आणि त्याचे पातक इंग्रजसरकारवर येते. आता विद्यारूपी शस्त्र घेऊन या चोराचा शिरच्छेद केला पाहिजे. दारूबाजास कधीही सुविद्या किंवा सुकीर्ती मिळणार नाही. संपत्ती जाऊन विपत्ती मात्र येईल. म्हणून विचाररूपी नौकेत बसून अज्ञानसागरातून तरून गेले पाहिजे. ईश्वराच्या कृपेने तुमचे कल्याण होईल.

३८९२ (१४ : ६, १५ मार्च ५५, ९५–९६)

'मिशनरी शाळेत विद्याभ्यास करणारा' लिहितो की : नेटिव वृत्तपत्रकार मिशनरी लोकांना अपशब्द बोलून त्यांची टवाळी करतात. ज्ञानरूप चक्षूंनी पाहिले, तर त्यामधील फोलपणा दिसून येतो. मिशनरी एवढ्या लांबच्या देशातून येऊन आपला धर्म सांगतात. ईश्वरदत्त शास्त्र समजावून देतात. इच्छा असेल, तरच धर्म स्वीकारा, असे म्हणतात. त्यांच्या येथे येण्याने त्यांस काहीही फायदा नाही. पहिले मशिनरी हाल आणि नाट यांना तर अतिशय त्रास झाला. पाठलाग झाला, तरी ते ईश्वराचे काम करीतच राहातात. त्यांनी उपकारिकपणा करून अनेक शाळा घातल्या. सरकारी शाळेपेक्षा त्यांच्या शाळेत जास्त विद्यार्थी शिकतात. कृतघ्न लोक मात्र त्यांची निंदा करतात

३८९३ (१४ : ६, १५ मार्च ५५, ९६)

मनुष्याला नीट दिसतो असा एकच मार्ग आहे. परंतु त्याचा परिणाम मरणाचा मार्ग असा आहे.

३८९४ (१४ : ६, १५ मार्च ५५, ९६–९७)

गांवोगावी उपदेश करीत फिरणाऱ्यांचा वृत्तांत :

ईश्वराच्या कृपेने आंधळे दृष्टी पावतात आणि पांगळे चालतात. गावोगावी हिंडणे, हे येशूचे आवडते काम होते. संपूर्ण पृथ्वीत जा, असा त्याचा संदेश आहे. ज्यांना विशेषत्वाने निवडले आहे, त्यांनी विश्रांती न घेता हिंडले पाहिजे. शुभवर्तमानाचे पोषण केले पाहिजे. रे. नारायण शेषाद्री यांचेबरोबर हिंडून उपदेशकाच्या कामाचा अनुभव घेतला. तो ईश्वर पुण्यवानास अधिक पुण्यवान बनवितो. पापसमुद्रात पडलेल्या आत्म्यांना वर काढण्याचे श्रेय त्याचेच आहे.

३८९५ (१४ : ६, १५ मार्च ५५, ९७–९८)

'एक सभासद' लिहितो की : 'बुद्धिवर्धकसभा' या सभेत पुनर्विवाहाविषयी निबंध वाचण्यात आला. विधवांना मरणापर्यंत दासपणात राहावे लागते. व्याभिचारास उत्तेजन मिळते, म्हणून पुनर्विवाहाची रीत चालू होणे आवश्यक आहे. याकरिता वर्गणी गोळा करून निधी जमवावा. सुधारणेचे धैर्य दाखविणाऱ्या स्त्रीस हजार रुपये बक्षीस द्यावे.

३८९६ (१४ : ६, १५ मार्च ५५, ९८–१००)

पदार्थांची पारख करण्यासाठी अल्कलीचे प्रमाण शोधावे लागते. याकरिता अल्कलीमापकाचा उपयोग करतात. काही उदाहरणे घेऊन ही कृती सांगितली आहे.

३८९७ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

रे. निस्बिट यांचे मार्शल मडमेशी लग्न झाले.

३८९८ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

अहमदनगर येथे कृष्णराव बरव्यांचा मुलगा बाबाजी मृत्यु पावला.

३८९९ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

रामकृष्ण विनायकांचा मुलगा बळवंत आणि हरी रामचंद्रची मुलगी मारियम, यांचा मृत्यु झाला.

३९०० (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

नगरजवळ शिंगव्यास ४, तर वडाळ्यास ७ माणसांचा बाप्तिस्मा झाला.

३९०१ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

जानेवारी व फेब्रुवारी १९५५ मध्ये १२२३ माणसे जन्मास आली.

३९०२ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

होळीची रजा देऊ नये, असे सुप्रीम कोर्टाच्या कामदारांचे मत आहे.

३९०३ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

पारशी मंडळाने गरीबांच्या मदतीसाठी ९७ हजार रुपये जमविले.

३९०४ (१४ : ६, १५ मार्च ५५, १००)

कापाजवळ पेटलेल्या होळीत पडून सात वर्षांचा मुलगा मरण पावला. नवरा होळीच्या बैठकीत व तमाशात मग्न होतो व आपणाकडे दुर्लक्ष करतो, म्हणून एक स्त्री अफू खाऊन मेली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक ७, मुंबई, २ एप्रिल १८५५

**३९०५** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०१)

उंदीर जमीन उकरतात, वस्त्रे फाडतात. शेतामध्ये राहणारे उंदीर जमिनीमध्ये बिळे करतात. धान्याच्या हंगामात त्यांची फार वाढ होते. उदी रंगाचे हे उंदीर धान्य खाऊन फस्त करतात (सचित्र).

**३९०६** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०२–१०३)

'अंमल करणे वाईट' या विषयावर ज्ञानोदयाने निबंध मागविले होते. एकूण २९ निबंध आले. त्यांपैकी—

(१) शिवराम सखाराम, चाकण येथील पंतोजी.

(२) काशीनाथ थत्ते, पुणे विद्यालयातील विद्यार्थी.

(३) गोविंद नारायणजी, फ्रीचर्च इन्स्तिट्युशन, मुंबई.

(४) विष्णु गणेश, एलफिन्स्तन विद्यालयातील विद्यार्थी, मुंबई.

(५) गंगाधरशास्त्री सहस्त्रबुद्धे पंडित, पुणे.

यांनी निबंध उत्तम रीतीने लिहिलेले आहेत. ते छापण्याविषयी तजवीज लवकर होईल. ता. ९ वी मार्च १८५५.

**३९०६ अ** (इंग : १०२)

**३९०७** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०३)

बाबू प्रसन्न कुमार ठाकूर याने लेजिस्लेटिव्ह कौन्सिलात एके मनुष्याने अनेक बायका करू नयेत, म्हणून कायद्याचा नमुना सादर केला आहे. बगाड, होळी व मद्यपान, यांविरुद्धही कायदा होणे आवश्यक आहे.

**३९०७ अ** (इंग : १०३)

**३९०८** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०३)

'मनःकृत्य गणित : ' हे गणित अमेरिकन मिशनने भाषांतर करून छापले. पृ. १५८, दुसरी आवृत्ती. या देशात हिशेब मुखपाठ करण्याची चाल आहे. पण त्याने गणिताचा नीट उलगडा होत नाही. तरुण विद्यार्थ्यांना हे नवे पुस्तक फार उपयुक्त ठरेल.

**३९०८ अ** (इंम : १०३)

**३९०९** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०३–१०४)

कृष्णशास्त्री भाटवडेकरांनी 'रेल्वे इकानामी' वरून भाषांतरित केले आहे. (लोखंडी रस्त्याचे संक्षिप्त वर्णन, हे पुस्तक.) या देशातील यांत्रिक सुधारणा ही ईश्वराची कृपाच होय. देशाची संपत्ती, शोभा व सुखोपभोग वाढविण्याचे द्वार म्हणजे लोखंडी रस्ता होय, यात शंका नाही. विश्रांतिस्थळांचे वर्णन व अपघाताची कारणेही या पुस्तकात दिली आहेत. [पृ. ६२, ८ पेजांच्या मेजरात (सचित्र)].

**३९०९ अ** (इंम : १०३)

**३९१०** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०४–१०७)

येशू म्हणतो की : (येशू ख्रिस्तमहात्म्य–अध्याय ४–५, उपदेशपद्धती) 'संतांना स्वर्गामध्ये निर्मळ सुख मिळते. जे पुण्यवान आहेत, ते मेलेल्यांतून उठतील. तारक येशू एकदा येरूशलेमात गेला. बीज जमिनीत रुजते व झाडाच्या रूपाने वाढते. वल्हांडण सण जवळ आल्याबर त्याने नदी ओलांडली. तो आकाशात शांतता व उंच लोकांमध्ये गौरव पावला. मनामध्ये दुराचार असताना पवित्रपणाचे ढोंग करणाऱ्यांचा त्याला तिरस्कार वाटे. पुरोहितांची ठकविद्या येशूने निष्फळ करून दाखविली. येशू ख्रिस्त हा प्रतापी गुरू होय.' (पुढे चालू)

**३९११** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १०८–११०)

खोट्या देवास सोडून खऱ्या ईश्वरास शरण जा, असा प्रत्येक गावी उपदेश केला. आजाऱ्यांना औषधे दिल्ही. गंडेदोरे, मांत्रिक यांच्या नादी लागू नका म्हणून बजावले. जगाचा तारणारा आमच्याकरिता प्रायश्चित करून मरण पावला. साधू, बैरागी, पापी आहेत. एक आंधळा दुसऱ्या आंधळ्याला काय वाट दाखविणार ? धर्मपुस्तके विकीत असतांना एकाने शिवीगाळ केली, तेव्हा गावकामदाराकडे तक्रार नोंदविली. काही लोक खोटी शपथ घेऊन आमच्याविरुद्ध खोट्या तक्रारी नोंदवितात. परंतु ईश्वर आम्हांला तारून वर नेणारा आहे. जो निष्कपट आहे, तोच नीतीमान् असतो. बिगाऱ्याच्या ओझ्याप्रमाणे दुष्टांच्या मनावर पापाचे ओझे आहे. (उपदेश करीत फिरणाऱ्यांचा वृत्तांत)

**३९१२** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११०–१११)

'ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : उसने घेतलेल्या वस्तूवर आमचे लोक स्वकीय वस्तुप्रमाणे हक्क चालवितात. एकाकडून वाचण्यास आणलेली पुस्तके दुसऱ्यास देऊन टाकतात. ग्रंथ परत येतो, तेव्हा त्यास डाग पडलेले असतात. उसने म्हणजे बक्षीस नव्हे, याची जाणीव ठेवावी. तसेच, कित्येकांना पत्रे चोरून वाचण्याची सवय असते. बंद लखोटा फोडण्याची आदत फार वाईट आहे. ही चाल अनुचित व हानिकारक होय. किंबहुना दिवसा केलेली चोरी आहे.

**३९१३** (१४ : ७, २ एप्रिल ५५, १११–११२)

'सत्यशोध हिंदू' लिहितो की : जुन्नर मुक्कामी लोकांनी २५ हात रुंद व ४ हात लांब, अशी मोठी होळी पेटविली. सदू शिवराम वैद्य यांच्या घरात ठिणगी जाऊन पडली. २, ३ बैल पेटून मेले. इतर बैलांना कसेबसे वाचवले. होलिका आकाबाईचा हा प्रताप मोठा कठीण आहे. तरी हिंदूंना विनंती की, त्यांनी अनर्थोत्पादक गोष्टीस ईश्वरी समजू नये. त्यापासून दुःखच फार आहे. वाईट गोष्टीचा समागम सोडावा.

**३९१४** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११२)

घानोरी गावात महाराचे एक थडगे होते. त्यावरील दगडाला शेंदूर फासून कोणीतरी देवी बनविले. दरवर्षी पाच हजारांवर यात्रा भरते ! एका बाजूला नारळाचा ढीग, तर दुसरीकडे बकरी मारून झालेले रक्ताचे थारोळे असते. शाहीरांची गाणी, बगाड, अंगात येणे, असे सारे प्रकार यात्रेत घडतात. नांगरलेले थडगे जेव्हा जगदंबा बनते, तेव्हा असेच होणार.

**३९१५** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११३)

कापाचे मैदानावर दोन सोल्जर दारू पिऊन बेफाम झाले. त्यांस वस्त्राची शुद्ध नाही. पाणी भरणाऱ्या गरीब बापड्या स्त्रियांना इंग्रजीत बेफामपणाने शिव्या देत होते. इंग्रज सरकारच्या राजनीतीस लांछन आणणारे दारूचे भक्त व गुत्ते केव्हा जाणार ? अनेक वेळा सुज्ञ लोकांनी कलमबंदी अर्जी केल्या. ज्यामधून पैसा मिळतो, त्या गोष्टीबद्दल मनुष्याचे ज्ञान बहिरे होते. अशी दुष्ट व लोभी राजवट सध्या चालू आहे. इंग्रज या देशात आल्यापासूनच हा कलंकही आला.

**३९१६** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११३-११४)

मिशन शाळेमध्ये दारूचा अनर्थ थांबविण्यासाठी 'बांध अब होप नामक मंडळी' हे मंडळ सुरू झाले. पुरते अन्न मिळत नसताना लोक दारू पितात. हा अनर्थ थांबविण्यास काय करावे, यावर भाषणे होतात. गल्लीकुचीतून दारूचे पिठे असून सर्व जातीचे गरीब कामगार दारू पितात. चोरी, मारामारी, पैसे सांडणे, बायकामुलांना मारझोड, हे दारूचे दुष्परिणाम आहेत. दारूचा समूळ नाश करण्यासाठी भगीरथ प्रयत्न हवे आहेत. दारूबाजांना दारूचे दुष्परिणाम समजावून सांगणे आवश्यक आहे.

**३९१७** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११४-११६)

दिल्ली प्रदेशात यंदा शास्त्राचा वृक्ष चांगला रुजला आणि मान्नाचे पीक मोठे आले.

**३९१८** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११४–११६)

एल्फिन्स्तन विद्यालयाची वार्षिक परीक्षा नामदार एल्फिन्सनच्या अध्यक्षतेखाली झाली.

**३९१९** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११४–११६)

पत्नीचा खून करणाऱ्या टाम या युरोपियन दारूबाजास फाशीची शिक्षा झाली.

**३९२०** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११४–११६)

हुबळीजवळ एका डाकवाल्याचा खून झाला.

**३९२१** (१४ : ७, २ एप्रिल ५५, ११४–११६)

एक कैफी गोसावी लष्करी सैनिकाकडून मारला गेला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक ८, मुंबई, १६ एप्रिल १८५५

**३९२२** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, ११७)

सचंचु पशु (सचित्र) : चार पाय व चोच अशा या प्राण्याचे पाय बदकाप्रमाणे असतात. तो चिखलामध्ये किंवा पाण्यामध्ये भक्ष्याचा शोध घेतो. तो आस्त्रिलियात सापडला, तेव्हा त्याचे कातडे इंग्लंडमध्ये आणले. वाघूळ जसे जनावर असून पक्ष्याप्रमाणे उडते, तसाच हा प्राणी होय.

**३९२३** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, ११८)

रेवरंड जान स्काडर आणि जान अंडरसन या दोघांचाही मृत्यु झाला. स्काडर यांना उपदेश देण्याची फार हौस होती. त्यांनी पुष्कळ लोकांना सुधारले. अंडरसनसाहेबही फार मेहनती होते.

**३९२३ अ** (इंम : ११८)

**३९२४** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, ११८)

फ्रीचर्च मिशनच्या शाळेकरिता नवे घर तयार झाले आहे. मोठ्या समारंभाने ते उघडले. या सुंदर, मोठ्या घरात मुले आनंदाने विद्याभ्यास करतील.

**३९२४ अ** (इंम : ११८)

**३९२५** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, ११९)

नामदार एल्फिन्स्टन यांच्या अध्यक्षतेखाली वैद्य-पाठशाळेचा वार्षिक समारंभ झाला. मुंबईतून लवकरच एखादा आसामी बंगाल्यातील चकरवत्तीप्रमाणे आपली वाव्हा करून घेण्यास पुढे सरसावेल, अशी आशा त्यांनी प्रगट केली. गवरनरांनी अब्रूपत्रे व बक्षिसे वाटली.

**३९२६** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, ११९)

विद्यार्थ्यास स्वस्थता आणि पुस्तके हवी असतात. भिकाऱ्याला अन्न हवे असते. दारूबाजाला दारू, तर सर्वसाधारण माणसाला संपत्ती, अब्रू आणि सुख यांची आशा असते. खिस्ती माणसाला मात्र आपण खिस्तास सापडावे, खिस्तासारिखे व्हावे आणि खिस्ताबरोबर सतत असावे, एवढीच काय ती इच्छा असते.

**३९२७** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, ११९–१२२)

एका मातेला फार वाईट वाटते. कारण तिचा मुलगा ख्रिस्ती झाला. धर्मांतरापूर्वीही तो अतिशय सज्जन, एकमार्गी, संकोची व नीतिमान् होता. ख्रिस्ती बुकात त्याने वाचले की, पाषाणदेवाची पूजा करू नका. पूर्वी तो उपाध्येबुवांना फार मानीत असे. नागपंचमीसारखे सणही नियमाने पाळीत असे. पुढे तो एकांतात राहून आपले दुःख येशूला सांगू लागला. मातेचे हे निवेदन ऐकल्यावर शेजारी आश्वासन देतो की, धर्मांतरानंतरही तो आईचे ऐकेल, सज्जनपणा सोडणार नाही.

**३९२८** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १२३–१२४)

महाबळेश्वरच्या डोंगरात नदीचा उगम असल्यामुळे त्याला तीर्थक्षेत्राचे स्वरूप आले. भोळेभाबडे लोक श्रावणात अनेक व्रते करतात. पाप गेल्याच्या आनंदात ब्राह्मणास दक्षिणा देतात. महाबळेश्वरची फ्री चर्च शाळा मात्र चांगली चालते. पापाचा तिटकारा वाटेल, असे अभंग गुरुजी शिकवितात. महाबळेश्वरचे निसर्गसौंदर्य म्हणजे ईश्वराची अद्‌भुत करणी आहे. गावोगावी येशूची वचने सांगून धर्मचर्चा केली. ग्रेवस मडम तेथे चांगले काम करीत आहे (पुढे चालू...)

**३९२९** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १२५–१२६)

संवच्छर प्रतिपदेविषयी : 'मिशनातील एक' लिहितो की : कृष्णाच्या द्वारकाविजयाचे स्मरण म्हणून गुढीचा पाडवा साजरा करतात. अभ्यंगस्नान, पंचांगपूजा, वर्षफळ ऐकणे, या औपचारिक गोष्टींना फार महत्त्व आले आहे. गुढी उभारून ब्राह्मणास तांबूल दक्षिणा देतात. निंब व गूळ खातात, कारण त्याने रोगनिवारण होते, अशी नेटिवांची समजूत आहे. लोकांनी लुटाऱ्यांवर आणि आपमतलबी लोकांवर विश्वास ठेवू नये. विवेकबुद्धीने विचार करून खऱ्या देवास शरण जावे.

३९३० (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १२६-१२८)

देवाच्या भयापेक्षा माणसांचे भय फार असते. गणेशपंत स्वतः सुशिक्षित होता. त्याने सगुणीस चांगले शिक्षण दिल्हे. पण हिंदूंत लहानपणी लग्न करण्याची चाल आहे. सगुणीस वाटले की, असे अचानक खाचेत टाकावयाचे होते, तर एवढे शिकविले तरी कशास ? बापासही वाटते की, जरा प्रौढ वयात लग्न करावे. परंतु जनरीतीपुढे त्याचे काही चालत नाही. सासऱ्याच्या घरी लहान मुलांचीही आज्ञा पाळावी लागते, म्हणून सगुणी दुःखी झाली. आपला पक्ष सत्यतेचा आहे, तरी आपण स्वतंत्र पायंडा पाडावा, असे ती वडलांना सांगते. (पुढे चालू होईल)

३९३१ (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १२८-१२९)

'एक वाचक हिंदू' पत्रात विचारतो की : प्रसन्न कुवा ठाकरांचे विवाहविषयक बिल हिंदू धर्मावर आघात करणारे नाही काय ? तरी जनमान्य असा एकच कायदा करावा. संतान होत नसेल, तर दुसऱ्या विवाहास परवानगी असावी. लढाईत पती मरण पावला, तर स्त्रीला दुसरा विवाह करण्याची मुभा असावी.

३९३२ (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १२९-१३०)

गवर्मेंटच्या ग्याजेटात उमेदवारांच्या पात्रतेच्या अटी जाहीर केल्या आहेत. इंग्रजी-मराठीत प्रावीण्य, चांगले अक्षर, इतिहासाचे व गणिताचे ज्ञान, या आवश्यक अटी आहेत.

**३९३३** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३०)

'दुःख सोसणारा हिंदू' लिहितो की : मोठे पगारदारसुद्धा होळीच्या घाणेरड्या खेळात मग्न होतात. एकाने तर माझी काकळूत न ऐकता माझ्या कपड्यावर धूळ, गुलाल व राख उडविला. माझा जीव घाबरा झाला, तरी त्यांनी रानटीपणा चालविला. मी बेशुद्ध झालो, तेव्हा एका स्नेह्याने प्रयत्न करून मला शुद्धीवर आणले. अजूनही या देशात ज्ञानाचे प्रकाशकिरण नांदत नाहीत. या झोटिंगपादशाहीवर कडक नियंत्रण घातले पाहिजे.

**३९३४** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३०–१३१)

पेशावरजवळच्या कोहाट छावणीवर पाचशे अफ्रिडी लोकांनी हल्ला केला. चोरवाटेने येऊन बंदुका पळविल्या. तुफानी दगडफेक केली. हत्यारबंद बंडवाल्यांनी प्रतिकारास न जुमानता २० हजार रुपये लुटले. बरेच सामान जाळले.

**३९३५** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१)

नगरचा म्हैपती ख्रिस्ती मरण पावला, ही बातमी खोटी ठरली.

**३९३६** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१)

अजम सकोबा योसेफ एस्त्रायल या परोपकारिक गृहस्थाचे निधन झाले. दाक्तर विल्सनकडे त्यांनी १८ वर्षे चाकरी केली. अनेकांना उपदेश करून त्यांनी सद्‌गुणाच्या मार्गास लावले.

**३९३७** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१–१३२)

रूस देशाचा बादशहा मरण पावला.

**३९३८** (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१–१३२)

शाळाखात्याच्या डरेक्टरने मराठी शाळांची तपशीलवार माहिती मागविली.

३९३९ (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१–१३२)

अलीगडला धरणीकंप झाला.

३९४० (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१–१३२)

सर जमशेटजी यांनी ५० लाख रुपये पब्लीक लोन फंडासाठी रवाना केले.

३९४१ (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३१–१३२)

राजे धुलीपसिंग यांना १ लक्ष २० हजारांची नेमणूक मिळाली.

३९४२ (१४ : ८, १६ एप्रिल ५५, १३२)

भायखळ्या दावणीजवळ दुमजली घर विकणे आहे. मिशन छापखान्यात चौकशी करावी.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक ९, मुंबई, २ मे १८५५

३९४३ (१४ : ९, २ मे ५५, १३४)

आपा चव्हाण : या कोल्हापुरी भामट्याने चोऱ्या सोडून हलवायाचा व्यवसाय सुरू केला. पण त्याच्या सोबत्यांनी त्याला पुन्हा चोरीच्या धंद्यात ओढले. नुकतीच त्यास सवा वर्षाची ठेप झाली. डाक्तर वेल्डर यांनी त्याचा मनःपालट घडविला. खिस्ती धर्मात पापाची खंडणी येशूने भरल्यामुळे तारणाचा मार्ग आहे, अशी त्याची खात्री पटली. आता त्यास ईश्वराचे भयही वाटते आहे.

३९४३ अ (इंम : १३३–१३४)

३९४४ (१४ : ९, २ मे ५५, १३५–१३७)

येशू ख्रिस्ताच्या धर्माचे एकछत्री राज्य सुरू झाले. पण त्याचा शिष्य एस्कारयेनोस यहुदा वैऱ्याला सामील झाला. ३० रुपयांसाठी त्याने येशूस संकटात टाकले. येशूने त्याचे कपट ओळखले. यहुदाबरोबरच्या सैनिकांनी येशूवर वार केला. पण सुदैवाने येशू वाचला. मदांधाचा नाश करण्यासाठी पृथ्वीवर आलेला येशू शांतच राहिला. रोमी न्यायाधीश पिलातसासमोर येशूवरील आरोपांची चौकशी सुरू झाली. येशूने चमत्कार घडवून एका सैनिकाचा तुटलेला कान नेटका करून दिला. देवळामधील याजक पुजाऱ्यांचा संतोष राखण्याकरिता पिलातसाने येशूला ठार मारण्याचा आदेश दिला. याजकांनी आग्रह धरला की, येशूस खांबी खिळून मारावे. मदांध यहुदी येशूला मारण्याची तयारी करू लागले.

३९४५ (१४ : ९, २ मे ५५, १३८–१४०)

ख्रिस्ती शास्त्र ईश्वरप्रणित आहे, याविषयीचे प्रमाण त्या शास्त्रातच आढळते. येशू शुद्ध, निष्पाप व निष्कपटी होता. ईश्वराने तारणासाठी त्यास पृथ्वीवर पाठविले. संपत्ती व मोठेपणा शोधणारी माणसे लबाड असतात. त्याने आपले बारा शिष्य गरीब लोकांतून निवडले. पुजाऱ्यांच्या दुराचरणाचा निषेध सुरू केला. जुन्या प्रार्थनापद्धती मोडून काढल्या. आकाशाचे राज्य पुण्यवान् लोकांकरिता आहे, असे आश्वासन दिल्हे. देवाच्या १० आज्ञा पाळणाराचे तारण होते. येशूचे ११ शिष्य मरणापर्यंत त्याच्याबरोबर राहिले. मृत्युनंतर तीन दिवसांनी कबरेतून उठून तो आकाशात गेला. येशूच्या विरुद्ध एकाही माणसाने साक्ष दिली नाही. असे विचार 'ख्रिस्ती शास्त्र ईश्वरी दत्त मानणारा'ने प्रगट केले आहेत.

३९४६ (१४ : ९, २ मे ५५, १४०–१४३)

'एक ख्रिस्तदास' पत्रात म्हणतो की : सूर्यग्रहण हा नैसर्गिक प्रकार असताना लोक त्यास ईश्वरी चमत्कार म्हणतात. जे खगोलशास्त्र जाणतात, ते असल्या खोट्या कल्पनांत रमत नाहीत. पावित्र्य आणि शुद्धता फक्त या धर्मातच आहेत. कोणत्याही धर्मात माणसाचे मन शुद्ध करण्याची शक्ती असेल, तरच तो खरा धर्म समजावा. निंदणाचे काटे सर्वच समाजात असतात. तसे काही नामधारी ख्रिस्तीसुद्धा आहेत. आपल्या आत्म्याचे दान दुसऱ्याला देण्याची शक्ती फारच थोड्या लोकांमध्ये असते. निंदा व पाठलाग यांस तोंड देऊन फारच थोडे टिकून राहातात. हिंदू देवतांच्या नावांवर पापाच्या अनेक कथा आहेत. कामवासनेतून स्वर्गास जाऊ इच्छिणाऱ्या धर्मास हे कसे पटवून द्यावे ? येशू मात्र निष्कलंक, निष्पाप व पवित्र आहे.

३९४७ (१४ : ९, २ मे ५५, १४३–१४५)

या जगाचे मूळ चित्‌जडात्मक असा एकच पदार्थ होय, असे न्यायवादी समजतात. पण झाडापासून दुसरे झाड होत नाही. कुंभाराचा अंश कधीही मडक्यात येणार नाही. उत्पन्नकर्ता व उत्पादित पदार्थ एकच आहेत, असे यांचे शास्त्र मानते. मग न्याय व अन्याय, चोर आणि साव एकच ठरतील. गौरवी आणि वैभवी ईश्वराशी एकरूपता ठेवणे, हेच अज्ञानाचे लक्षण होय. कारण आणि कार्य भिन्नच असतात. या जगातले अधिकारी पापाचे योग्य शासन देऊ शकत नाहीत. अनीतिमान लोकच जास्त चैनीने जगतात. सत्कृत्याचा आनंद व दुष्कृत्याचा खेद मानवास होतो. म्हणजेच मन विभागलेले आहे. येशूच्या वचनाप्रमाणे परलोकी प्रत्येकाच्या कर्माप्रमाणे न्याय होईल. असे विचार 'एक विद्याभ्यास करणारा'ने व्यक्त केले आहेत.

**३९४८** (१४ : ९, २ मे ५५, १४५–१४७)

करंजे खेड्यात 'त्रिभुवनाची गोष्ट' वरून उपदेश केला. सातारा मिशनाचे कार्य उत्तम चालते. 'गुरू करण्याविषयीचा विचार'च्या कीर्तनास बायकासुद्धा आल्या होत्या. नेटिव्हांची भजनपद्धती नुसतीच कंठाळी आहे. बुद्धिमान मनुष्यास ती आवडणार नाही ओरडून पुण्य मिळत नाही. सतत जप करणारा भ्रमिष्ट मात्र वाटतो. भक्तीमध्ये शिस्त व शांतता हवी. (पुढे चालू होईल)

**३९४९** (१४ : ९, २ मे ५५, १४७–१४८)

एका रेल्वेतील नोकराने दारू पिऊन अधिकाऱ्यास शिव्या दिल्या, म्हणून त्यास चाकरीवरून बडतर्फ केले आहे. नोकरी जाऊन त्याची अप्रतिष्ठा झाली. लोकहो, सांभाळा, ही दारू नामक राक्षसी भरतखंड हे आपले माहेरघर करू पाहात आहे. हिचा समूळ नाश करण्याचा प्रयत्न करा. लाडावलेली मुलगी आईबापाच्या कीर्तीस बट्टा लावते, त्याप्रमाणे दारू तुमच्या अब्रूस डाग लावील.

**३९५०** (१४ : ९, २ मे ५५, १४८)

दगरू संकरू हा माणूस अतिमद्यपानाने मरण पावला. तो अगदी निरोगी होता, परंतु दारूने त्याचे मरण जवळ आणले. नाहीतर तो आपले कुटुंबात सुखाने राहिला असता.

**३९५१** (१४ : ९, २ मे ५५, १४८)

रशियन व दोस्त फौजांची निकराची लढाई होऊन रशियन सैन्य पळून गेले.

**३९५२** (१४ : ९, २ मे ५५, १४८)

१८५४ मध्ये विलायतेत १० कोटी ६१ लक्ष रत्तल लोकर आयात झाली.

३९६३ (१४ : ९, २ मे ५५, १४८)

उरण व पनवेली येथे सरकारने नवीन दवाखाने सुरू केले.

३९६४ (१४ : ९, २ मे ५५, १४८)

जुगार खेळल्यावरून ११ इसमांना २५ रु. दंड व ३ महिने ठेप झाली.

३९६५ (१४ : ९, २ मे ५५, १४८)

सरकारी नोकर लोकांना मोफत औषधोपचार मिळणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक १०, मुंबई, १५ मे १८५५

३९६६ (१४ : १०, १५ मे ५५, १४९)

रे. फ्यारब्यॉंकसाहेब कलकत्तामार्गे विलायतेस गेले.

३९६७ (१४ : १०, १५ मे ५५, १४९)

रे. मंगर व मिचल महाबळेश्वरास गेले असून देविदसणसाहेब अंजेरी किल्ल्यावर गेले आहेत.

३९६७ अ (इंग : १४९)

३९६८ (१४ : १०, १५ मे ५५, १५०)

इस्राएल लोकांची परोपकारी मंडळी : इस्रायली मंडळीजवळ फार पैका देणगीरूपाने गोळा होताना दिसतो. गरिबांकरिता साचविलेल्या रकमेची झाडाझडती वरचेवर व्हावयास हवी. देणग्या देणारांनीसुद्धा पैक्याचा व्यय कसा झाला, याची नीट चौकशी केली पाहिजे.

**३९५८ अ** (इंम : १४९)

**३९५९** (१४ : १०, १५ मे ५५, १५०)

लेकरांची पहिली पोथी : ठस्यांनी छापलेली ही पोथी सुंदर असून अक्षरांची काहीही गिचमिड होत नाही. यात चित्रेही आहेत. (बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी २८ वी आवृत्ती १८५५, किंमत अर्धा आणा.)

**३९५९ अ** (इंम : १५०)

**३९६०** (१४ : १०, १५ मे ५५, १५१–१५२)

इस्राएल लोकांची परोपकारी मंडळी : या मंडळीच्या फंडाची सतत वृद्धी होत आहे. याबद्दल सभेमध्ये संतोष व्यक्त करण्यात आला. गरीब बंधूवर प्रीत व दया, हे मंडळाचे उद्देश आहेत. सभेत ७९ रुपयांच्या देणग्या जमा झाल्या.

**३९६० अ** (इंम : १५१)

**३९६१** (१४ : १०, १५ मे ५५, १५२–१५३)

सरकारच्या पलटणीतील यहूदी या 'परोपकारी' मंडळीस मदत करतात. मुंबईकर मंडळीही उत्सुक आहेत. पण कोकणातून विशेष मदत नाही. गव्हरनरसाहेबापासून तर सामान्य माणसापर्यंत अनेकांनी मदत दिली. अर्थातच गरिबांच्या समुदायाचे पोषण करण्याचे सामर्थ्य मंडळीत आले नाही. दात्यांना मनाचे ठायी आल्हाद, ईश्वराकडून आशीर्वाद, गरिबांकडून दुवा, याप्रमाणे इहपरलोकी श्रेय प्राप्त होईल.

**३९६१ अ** (इंम : १५२)

३९६२ (१४ : १०, १५ मे ५५, १५३–१५५)

काशीनाथ या १४ वर्षे वयाच्या मुलाचा अंघोळीमध्ये दीक्षाविधी झाला. रे. निजबिट यांनी प्रार्थना म्हटली. आकाशाचे राज्य लहान बालकांचे आहे, म्हणून बालकांस वर्जू नका, असे येशू सांगतो. रे. नारायण शेषाद्रींनी काशीनाथची परीक्षा घेतली. हा सोनार जातीचा मुलगा. यास बाप नाही. तो एकांतात ख्रिस्ताची प्रार्थना करीत असे, तेव्हा शाळासोबती त्यास सतावीत. ईश्वरानेच त्याला धैर्य देऊन मंडळीत मिळवून घेतले.

३९६३ (१४ : १०, १५ मे ५५, १५५–१५७)

घाट उतरताना असे दिसले की, पलटणीचे शिपाई गरीब गाडीवाल्यांना त्रास देतात. कोणावरही बलात्कार करू नका, असे येशूचे वचन आहे. नीरा नदीचा मोडका पूल पाहून मिर्झाच्या स्वप्नाची आठवण झाली. तारणारा असेल, तरच तारण होते. जेजुरीमध्ये वाघ्यामुरळ्यांनी पैसे मागितले. पण त्यांना ख्रिस्ती धर्माची पुस्तके दिली. ईश्वर मंदक्रोध व बहुप्रसाद असल्यामुळेच तो मोडक्यातोडक्या घरांची गावे कायम ठेवतो. इतर धर्मीयांनाही शांतपणे जगू देतो.

३९६४ (१४ : १०, १५ मे ५५, १५७–१५८)

'एक वाटसरू' लिहितो की : सोमवती अमावास्या असल्यामुळे करा नदीवर अनेक लोक अंघोळीसाठी जमले. मुरळ्याही नाचत होत्या. कोणीतरी म्हणाले की, त्या खंडोबाच्या बायका आहेत. प्रश्न एवढाच की, एका देवाला इतक्या बायका कशा काय. खंडोबा वाणी असून त्याची पहिली पत्नी म्हाळसा होती. पण धनगराची लेक बाणाई पाहून तो वेडा झाला. म्हणून त्यास वेडा खंडोबा म्हणतात. देवळाच्या आवारात अनेकांच्या अंगात येते. पण अशा देवतांच्या पाया पडू नये.

३९६५ (१४ : १०, १५ मे ५५, १५८)

'मिशनातील एक' पत्रात लिहितो की : वैशाख शुद्ध तृतीयेस कुंभाराच्या घरून एक मोठे व एक लहान अशी मडकी आणतात. ब्राह्मण मंत्र सांगून बापाचे श्राद्धकर्म पूर्ण करतात. हे कुंभश्राद्ध पितरांना स्वर्गात पाणी पोचविते, अशी वेडी समजूत आहे. अज्ञानी लोकांकडून भिक्षुक मंडळी फार उपटाउपट करतात. आपला नातेवाईक परगावी असला आणि आपण एक आंबा भिक्षुकास खाऊ घातला, तर तो नातलगास पोचतो काय? नाही. श्राद्ध म्हणजे असलाच वेडेपणा आहे.

३९६६ (१४ : १०, १५ मे ५५, १५९–१६०)

'मंडळीतील एक' पत्रात म्हणतो की : मंडळ स्थापन होऊन एक वर्ष झाले. ४० सभासद आहेत. 'बाह्य व अंतर्यामीचा शुचिर्भूतपणा' याविषयावर एक संवाद झाला. तसेच कैफी पदार्थ व तंबाखू यांपासून अलिप्त राहणेबाबत सर्वांना लेखी करार करून दिल्हा. ५० जणांनी सह्या केल्या. सुधारणा बरीच होत आहे. न्यून दूर करण्याचा प्रयत्न होत आहे. ('नगरातील सुधारलेली मंडळी')

३९६७ (१४ : १०, १५ मे ५५, १६०)

नाशकात एक तास गारांचा पाऊस झाला. गावाचे फार नुकसान झाले. आंबे आणि ऊसाचे पीक यांना हानी पोहोचली.

३९६८ (१४ : १०, १५ मे ५५, १६०–१६१)

कोल्हापूरकर राजांच्या पत्नी खाशीबाई नाशकास आल्या. त्यांनी मोठा दानधर्म केला. नुसत्या जेवणावळीत १६०० रुपये खर्च केला. बुंदीचे लाडू व दक्षिणाही ब्राह्मणांस दिली. असल्या धर्मकृत्याने पुण्य वाढत नाही, अहंकार मात्र वाढत राहातो. मात्थी अध्याय ६ मध्ये म्हटले आहे की, उजव्या हाताचे दान डाव्या हातास कळता कामा नये. हेच जेवण अनाथ व गरीब लोकांना दिले असते, तर त्यांनी आशीर्वाद दिला असता. तरी खऱ्या शास्त्रावर विश्वास ठेवून पक्केपणी विचार करून पाहा.

३९६९ (१४ : १०, १५ मे ५५, १६१-१६२)

रस्त्यावर जुगार खेळून सरकारास जरी ठकविले, तरी परमेश्वरापुढे तुमचा अपराध लपणार नाही. आपल्या वाडवडिलांच्या कीर्तीवर तुम्ही ओंजळभर पाणी ओतीत आहात. काहीतरी नेत्र उघडा. एका व्यसनात जितके लागे, तेवढ्याने दोघांचे पोट भागे, ही म्हण ध्यानात ठेवा. धर्मासारखा महान् राजा जुगाराने सर्वस्वास मुकला. जुगारामुळे कित्येक धुळीस मिळाले. जुगाराने तुम्हीही चतुर्भुज व्हाल. असे विचार 'जुगाऱ्यांचा द्वेषी' याने प्रगट केले आहेत.

३९७० (१४ : १०, १५ मे ५५, १६२-१६३)

लढाईने सर्वप्रकारे अनहित होते, यात अन्देशा नाही. लक्षावधी मनुष्यांचा संहार, व्यापाराला धोका, हे सारे युद्धाने होते. राष्ट्रास आपल्या संग्रहातून गुजारा करावा लागतो. कोट्यावधी रुपयांचे कर्ज होते. आबादी व सौख्य कमी होते. रयतेवरती नवीन कर बसतात. युद्धात मरणाऱ्या सैनिकांच्या कुटुंबावर विपत्ती येतात.

३९७१ (१४ : १०, १५ मे ५५, १६३)

आमच्यात असी चाल आहे की, लग्नमुंज प्रसंगात दुसऱ्याच्या घरून दागिने आणावेत व डौल मिरवावा. अशाने आपण श्रीमंत होतो काय ? जरकरिता एखादा दागिना चोरीस गेला, तर दुःखास पारावार राहात नाही. मग कुटुंबाचे संरक्षण होणे कठीण असते.

३९७२ (१४ : १०, १५ मे ५५, १६३)

बेळगावच्या एका व्यापाऱ्याने २५ तोळे सोन्याचे दागिने मुलाच्या अंगावर घालून त्यास शाळेत पाठविले. शाळेच्या पंतोजीस दागिन्यांचा मोह पडून त्याने मुलास ठार मारून पेटीत ठेवले. पोलीस-चौकशी चालू आहे.

**३९७३** (१४:१०, १५ मे ५५, १६३–१६४)
उतकमंदपर्यंत विद्युत्यंत्राची सोय झाली.

**३९७४** (१४ : १०, १५ मे ५५, १६३–१६४)
विलायतच्या सरकारने युद्धासाठी १ वर्षात ३७ कोटी रुपये खर्च केले.

**३९७५** (१४ : १०, १५ मे ५५, १६३–१६४)
गेल्या रविवारी १९ माणसे देवीने, तर १४ वाख्याने मेली.

**३९७६** (१४ : १०, १५ मे ५५, १६४)
सुरतेत एका वाणी स्त्रीने तसेच श्रावक स्त्रीने पुनर्विवाह केला. श्रावक स्त्रीने तर कुळंब्याबरोबर विवाह केला. नातेवाईकांनी चोरीचा आळ आणून त्रास दिला, पण काही उपयोग झाला नाही.

**३९७७** (१४ : १०, १५ मे ५५, १६४)
मुंबईत एप्रिल महिन्यात १७४० मृत्यु झाले. पैकी ५८८ साथीच्या रोगाने मेले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक ११, मुंबई, १ जून १८५५

**३९७८** (१४ : ११, १ जून ५५, १६५–१६६)
अमेरिकेत १० संस्थानांनी मद्यपानास बंदी केली. एखाद्यावर खटला भरल्यानंतर ज्याने त्यास दारू विकली, त्या कलालासही शिक्षा होते. दारूपायी स्त्रियांचा खून होण्याच्या घटना भारतात वाढत आहेत. जोपर्यंत दारूची दुकाने आहेत, तोपर्यंत दारू पिण्याचा मोह लोकांना होणारच. दारूपायी रोज कर्जे होतात. तरी सुज्ञांनी सरकारकडे अर्जी पाठवून दारूबंदीची मागणी करावी.

**३९७८ अ** (इंम : १६५)

**३९७९** (१४ : ११, १ जून ५५, १६८)

ग्रीस देशाचा राजा हेरोंदोतस यास 'इतिहासाचा बाप' म्हणतात. तो सनपूर्व ४८० मध्ये ह्यात होता. पक्क्या विटांवर लिहिलेले १० हजार लेख सापडलेले आहेत. त्यावरून इतिहासाचा धागा जुळतो. प्राचीन करारातील गोष्टीशी हा इतिहास जुळतो. यावरून ख्रिस्ती शास्त्र लिहिणारांना ईश्वराची प्रेरणा होती, हे सिद्ध झाले आहे.

**३९७९ अ** (इंम : १६६-१६८)

**३९८०** (१४ : ११, १ जून ५५, १७०)

एक मिशनरी आफ्रिकेत भटकत असताना एके गावी मुक्कामास राहिला. पण गावकरी असे निष्ठुर होते की, त्यास पाणीही देईनात. त्याचवेळी एक मोळीवाली त्यास भेटली व तिने त्याला अन्नपाणी दिल्हे. ती म्हणाली, तुमच्याप्रमाणेच मीही येशूवर प्रीत करित्ये. तिचा सद्‍भाव जीवट राहिला. कारण ती नेहमी ख्रिस्ती शास्त्र जवळ बाळगते. ती म्हणाली, 'याच झऱ्यातून मी पाणी पिते व याच तेलाने माझा दिवा जळतो.'

**३९८० अ** (इंम : १६९-१७०)

३९८१ (१४ : ११, १ जून ५५, १७१–१७४)

आपल्या लहान्या मुलीने आपल्यासारख्या बावदूक माणसास शहाणपण शिकवावे, हे पाहून गणेशपंतास आश्चर्य वाटले. त्यांचा मनःकल्पित सिद्धांत म्हणजे वाळवंटावरील घर आहे, हे सगुणीने ओळखले. सगुणी म्हणाली की, सोनापूरची आगही आपण पाहू शकत नाही, तर नरकाची आग किती भयंकर असेल ? दाविद जेव्हा खोल पाण्यात बुडाला, तेव्हा देवानेच त्याचे साहाय्य केले. पवित्र तेवढेच तुम्ही घ्या. म्हणजे प्रभू येशू तुमचा निश्चित स्वीकार करील. आकाशाचे राज्य निष्पाप कोकरासच मिळते. म्हणून ईश्वरदत्त शास्त्राच्या गोटात आपण जेवढे लवकर जाऊ, तेवढे चांगले होय. आपण विश्वासात स्थिर राहिलो, तरच ईश्वर धैर्य देईल.

३९८२ (१४ : ११, १ जून ५५, १७४–१७७)

'खिस्ती शास्त्रास ईश्वरदत्त मानणारा' लिहितो की : देवत्रयक आहे. बाप, पुत्र व आत्मा या तिघांपैकी पुत्राने पृथ्वीवर अवतार घेतला. मरणानंतर तीन दिवसांनी आपण मेलेल्यातून उठणार, असे त्याने भविष्य केले. ते खरे झाले. शिष्यांनी त्याचे प्रेत चोरून नेले, असाही लोकांना वहीम आला. पण तसे काही नाही. येशू स्वर्गात गेला. येशूने पाऊलसास दर्शन देऊन धर्माचा प्रसार करण्याची आज्ञा दिली. छडीमार व धोंडमार सोशीला. पाऊलस देशोदेशी हिंडला. ईश्वर काही सर्वांच्या पापाची क्षमा करणार नाही. त्या पवित्र व न्यायी देवास आजच शरण गेले पाहिजे.

३९८३ (१४ : ११, १ जून ५५, १७७)

पुण्यास लोक आले की, देवळादेवळातून हिंडतात. पुराणकथा ऐकत राहातात. पण कल्पित देवांच्या भक्तीने खऱ्या परमेश्वराची अवकृपा होऊन मनुष्यामध्ये नीचपण मात्र येते. पुणे कॉलेज हे भव्य विद्यालय फार छान आहे. विद्यार्थ्यांत मात्र इंग्लिश रीतीभातींचा प्रसार अद्याप झालेला नाही. ब्राह्मण गुरूंना वाटते की, विद्येचे खरे भांडार काय तें आपल्या जवळच आहे. विद्यार्थ्यांची प्रवृत्ती शुद्ध चैनीकडे आहे. खाण्यापिण्यातच ते समय नष्ट करतात. मुलींच्या शाळेत जास्त शिस्त दिसून आली. खऱ्या देवाच्या तेजोमय व पवित्र मंदिरामध्ये या सर्वांचा प्रवेश होईल, तेव्हा मी त्यास भाग्य समजेन.

३९८४ (१४ : ११, १ जून ५५, १७८–१७९)

सालमजकुरी काही शूद्र लोकांनी जोशीबुवाला विचारले की, यंदा पाऊस कसा काय आहे ? जोशी म्हणाले 'बाबांनो, पाऊस तुम्हांस रडवील!' लोकांना वाटले यंदा फार पाऊस पडेल. सुक्या दुष्काळापेक्षा ओला दुष्काळ बरा ! पण त्यावर्षी कोरडा दुष्काळ पडला. जोशी म्हणाला, माझे भविष्य खरे झाले. पावसाने तुम्हांस रडविले.

३९८५ (१४ : ११, १ जून ५५, १७९)

व्यापारात जसे काही दलाल असतात, तसे लग्नकार्य ठरविणारे ही सौदागर मध्यस्थ असतात. मुलींची विक्री करावी, अशा तऱ्हेने ते सौदे जमवीत राहातात. या व्यवहारात काही चतुर स्त्रियाही नफा मिळवीत आहेत. मुलीच्या कुळाची स्तुती करून त्या म्हणतात, 'ही काळी असली, तरी लग्नानंतर हळकुंडासारखी पिवळी दिसेल. पैशाचा बानवा करू नका.' कारण त्यांची दृष्टी दलालीवर असते. (ज्ञानप्रकाशवरून)

३९८६ (१४ : ११, १ जून ५५, १८०)

फ्रेंच व रशियन सैन्याची निकराची लढाई झाली. क्रीमियास वेढा घालण्याची तयारी चालू आहे.

**३९८७** (१४ : ११, १ जून ५५, १८०)
वाफेच्या यंत्रांनी मुंबईतील चिखल काढून टाकण्यासाठी ५१६५.रु. मंजूर झाले.

**३९८८** (१४ : ११, १ जून ५५, १८०)
भीमा व सीना नद्यांवर पूल बांधण्याची योजना तयार होत आहे.

**३९८९** (१४ : ११, १ जून ५५, १८०)
ग्रंथकारास सरकारी आश्रय हवा असेल, तर पब्लीक इन्स्ट्रक्शनचे डरेक्टर यांचेकडे अर्ज करावा लागेल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक १२, मुंबई, १५ जून १८५५

**३९९०** (१४ : १२, १५ जून ५५, १८०)
अमेरिकन डेप्युटेशनचे मेंबर आंडरसन व टामसनसाहेब लकेहून मद्रासेस सुखरूप पोहोचले.

**३९९० अ** (इंम : १८१)

**३९९१** (१४ : १२, १५ जून ५५, १८३–१८६)

लंकेतील ब्याटिकोटा या ठिकाणी विद्यार्थ्यांची सभा भरून प्रार्थना झाली. या प्रसंगी रे. क्यारोल म्हणाले की, उपकारकर्ते व उपकारग्राही एकत्र येताहेत, ही एक चांगली गोष्ट आहे. पृथ्वीच्या अंत्य सीमा दृढता, विश्वास आणि येशूचे भागीपण, याप्रत पावल्या आहेत. हे लोखंडाचे युग असले, तरी धर्माच्या परिसाने त्याचे सोने करता येईल. ख्रिस्ताने जी सुधारणा केली, ती जिवंत पाण्याच्या व रुंदावत जाणाऱ्या नदीसारखी असते. खऱ्या जीवनाचे पवित्र पाणी देशोदेशी पसरत आहे. हिंदू लोकांची भ्रांतिष्ट मने यातून शुद्ध होतील. लवकरच वेद छापले जातील व धर्मगुरूंच्या राक्षसी कबजातून लोकांची सुटका होईल. सुधारणारूप नदीचे पाणी मृत समुद्रात न सोडता लोकांना अज्ञानाच्या जंगलातून वाट दाखविण्यासाठी वापरावे.

**३९९१ अ** (इंग : १८०–१८२)

**३९९२** (१४ : १२, १५ जून ५५, १८६–१८७)

रालिन्सन म्हणतात की : इटांच्या लेखावरून असे दिसते की, इसवी सनाच्या ९ व्या शतकापासून तो बाबेल शहराचा विध्वंस होईपर्यंतचा इतिहास जुळविता येईल. दमासेक, निनवे आणि बेलशाज्जार राजांच्या कारकीर्दी त्यात नोंदविल्या आहेत. बहुतेक राज्यकारभार राजपुत्र चालवीत असत.

**३९९३** (१४ : १२, १५ जून ५५, १८७–१८९)

राजश्री जोतीराव फुले प्रकृतीच्या अस्वास्थ्याने शाळेत काम करू शकत नाहीत. आता त्यांचे परमस्नेही मेहनतीने शाळा सांभाळतात. २०-९-१८५३ रोजी फुल्यांनी 'महार-मांग लोकांचा विद्याभ्यास वाढविणारी सभा' स्थापन केली. लोक आस्थापूर्वक दरमहा देणग्या देतात. या शाळेस शिक्षक मिळविण्यात फार अडचण पडते. कारण ब्राह्मणांस हे काम आवडत नाही. लष्करामध्येही स्वतंत्र शाळा सुरू केली आहे. पर्वती विभागात आणखी शाळा सुरू करावयाची आहे. मोरो विठ्ठल वाळवेकर, चिटनवीस.

**३९९३ अ** (इंम : १८७)

**३९९४** (१४ : १२, १५ जून ५५, १८९–१९१)

पिलातसाला येशूची दया आली. परंतु यहुदी लोक येशूवर जणू सूड उगवीत होते. सुळी द्यावयाचा वधस्तंभदेखील येशूनेच वाहून न्यावा, असे ते म्हणाले. येशू जात असताना स्त्रिया मोठमोठ्याने रडू लागल्या. अतिशय क्रूर रीतीने जीझसचा वध होणार होता. देवपुत्रास शिपायांनी वधस्तंभावर खिळिले, तेव्हा जमलेल्या लोकांच्या डोळ्यांत अश्रू आले. भर दुपारी पृथ्वीवर अंधार पसरला. भूमिकंप झाला. देवळाचे छत कोसळू लागले. योसेफ नावाच्या सेवकाने येशूचा देह खांबावरून उतरविला. तो देह प्रेतपेवात नीट पुरला आणि कबरेवर मोहोर केली.

**३९९५** (१४ : १२, १५ जून ५५, १९२–१९४)

'एक ख्रिस्ती' लिहितो की : मिशनरी खरा धर्म प्रगट करीत असताना त्यांचे आभार मानणे सोडून नेटिव त्यांची निंदा करतात. मिशनरी विद्वान व सद्‌गुणी आहेत. दुःख सोसून त्यांनी जगभर धर्माचा प्रसार केला. त्यांस पगार मिळतो, हे जरी खरे असले, तरी तेवढ्याने ते मतलबी ठरत नाहीत. ते आपले घरदार सोडून इकडे अडचणी सोसून राहातात. त्यांची निंदा करणे, हा केवळ अविचारीपणाच नाही काय? ज्यांस पापाची आवड आहे, त्यांना नरकदंडच भोगावा लागतो.

**३९९६** (१४ : १२, १५ जून ५५, १९४–१९६)

पूना कॉलेजात सर्व वृत्तपत्रे घेतात, पण ज्ञानोदय मात्र घेत नाहीत. त्यातील धार्मिक विचार त्यांना आवडत नाहीत. नावल्सच्या कल्पित कथांचा मात्र फार मोठा भरणा आहे. वजीर बेगचे पर्शन स्कूल, फ्री चर्चचे फीमेल बोर्डिंग, चर्च, महार-मांग लोकांची शाळा, ज्यो. फुले यांची शाळा, यांचे कार्य उत्तम चालते.

**३९९७** (१४ : १२, १५ जून ५५, १९६)

मि. ग्रेहाम यांस सुरत व भडोच येथे चौकसनीस नेमलेले आहे. इतर चौकसनीस पुढीलप्रमाणे : मथुरादासजी अहमदाबाद येथे, ब्रेकर धारवाडला, महादेव गोविंदशास्त्री पुणे, सोलापूर व सातारा येथे, रा. सा. रामचंद्र दीनानाथ रत्नागिरीस, भास्कर दामोदर नाशिकला व नगरला, विश्वनाथ नारायण यास अलीबागेस व ठाण्यास, भोगीलाल प्राणवल्लभदास यांना काठेवाडास. मिस्तर रीड यांना कायद्याचे रीडर नेमले आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**३९९८** (१४ : १३, २ जुलाई ५५, १९८–२०१)

रेवरंड अंडरसन म्हणाले : तुम्हांस भेटण्याकरिता आम्ही पृथ्वीचा अर्धा गोल आक्रमण केला. भरतखंडात मिशनाचे फार कार्य चालते. महार लोक बुद्धीने कुणबी व शेतकरी यांप्रमाणे आहेत. आमचे कार्य ब्राह्मण व महार या दोन जातींतच फार चालते. मधुरा मिशनचे लोक फार आतिथ्यशील आहेत. जे अविद्य आणि हलके आहेत, त्यांच्यात सुधारणा करणे, हे आमचे ध्येय होय. खिस्ती शाळेत उत्कृष्ट विद्याभ्यास मिळतो. लंकेमधील धर्मप्रसाराचे काम समाधानकारक आहे. खिस्ताचे धन्य शुभवर्तमान सर्वत्र पसरते आहे.

**३९९८ अ** (इंम : १९७–१९८)

**३९९९** (१४ : १३, २ जुलाई ५५, २०२–२०३)

ब्रह्मदेशात एका मिशनारी मडमेकडे एक बारा वर्षांचा मुलगा आला. तो चर्येवरूनच रानटी दिसत होता. हा मळकट व धांदऱ्या मुलगा येशू खिस्ताचा शोध घेण्यासाठी आला. यापूर्वी चोरी, लबाडी, वगैरे अनेक पापे त्याने केली होती. एकदा एक बोधक त्यास भेटला व त्याने तारणाचा उपदेश केला. म्हणून तो धावत मिशनात आला. मडमेने त्याची परीक्षा घेऊन त्यास ठेवून घेतले. त्यास शिकविले. पुढे मडमही वारली. हा मुलगाही मृत्युपर्यंत येशूवर विश्वसून होता. देवदूताप्रमाणे त्याने आजारी माणसांना येशूकडे नेले. त्याचे स्वतःचे तारण झाले, यात तर संशयच नाही.

**३९९९ अ** (इंम : २०१–२०२)

**४०००** (१४ : १३, २ जुलाई ५५, २०३–२०७)

सगुणी आपली सखी सुलक्षणा हिच्याकडे गेली. त्यांच्या संवादांतून जीवनविषयक तत्त्वे मिळतात. एखाद्याने अनेक बायका केल्या, तर सन्मत आणि सद्‌विचार यांवरती पाणी सोडावे लागेल. आकाशातील जड ग्रहावरून आपले भविष्य पाहणे, हा वेडेपणा होय. जप आणि दान करणे, हे तर खुळचटपणाचे लक्षण आहे. मुहूर्तमार्तंडासारखी पुस्तके खोटी आहेत. पोटार्थी ब्राह्मण हे सुधारणुकेचे शत्रू आहेत. विवाह-समारंभातले कर्मकांड अयोग्य व फालतू आहे. लोकहितवादीची १०० पत्रे फुकट गेली. म्हणून विवेकाचे बळ मिळवावे. ल्यूथराप्रमाणे सुधारक हवे आहेत.

**४००१** (१४ : १३, २ जुलाई ५५, २०७–२०९)

'सातारा मिशनातील एक' म्हणतो की : माहुली गावी दसऱ्यास पर्वकाळ असतो. स्नान करणाऱ्या लोकांना मंत्रसंकल्प सांगणाऱ्या व दक्षिणा गोळा करणाऱ्या ब्राह्मणांची धांदल उडते. स्नानानंतर लोक कृष्णेचे पाणी देवाच्या मूर्तींवर ओततात. प्रश्न एवढाच आहे की, अशा उपायांनी खरे प्रायश्चित मिळेल काय? तीर्थात स्नान केल्यामुळे स्वभाव पालटत नाही. मनसंकल्पाची पापे तीर्थांचा बापसुद्धा घालवू शकणार नाही, असे संत तुकारामाने म्हटले आहे. हा देश फारच अंधारात आहे.

**४००२** (१४ : १३, २ जुलाई ५५, २०९)

वासुदेवशास्त्री धुपकर रेवरंड शेषाद्रीकडे गेले होते. पण हिंदुशास्त्राची त्यांस नीट माहिती नाही. एका प्रकारे तेच बरे आहे. कारण कऱ्हाडे ब्राह्मणांचा कुळधर्म म्हणजे देवीस प्रसन्न करण्यासाठी अन्नात विष घालून माणसांचा घात करणे होय. तैलंगी ब्राह्मणांना कराड्यांची फार भीती वाटते. ते फणसात विष घालून माणसांना मारतात, अशी समजूत आहे. काही ब्राह्मणांत तर जेष्ठ पुत्र व सून यांचाही बळी देत असत. आता फक्त नारळ फोडण्याची चाल आहे.

**४००३** (१४ : १३, २ जुलाई ५५, २०९–२११)

पुणे सोडल्यावर उपदेशकमंडळी एका डोंगरापाशी आली. तेथील प्रतिध्वनीवरून खिस्ताची आठवण झाली. खिस्ताचा शब्द प्रतिध्वनीप्रमाणे आमच्या मनात आहे. खिस्तरूप डोंगर चढण्यास वाट अरुंद आहे. पण तीच तारणाची वाट आहे. कारल्याच्या डोंगरावर आळशी बैरागी व गुरव जागोजाग दिसतात. खंडाळ्यास इंग्रजांचे लष्कर आहे.

**४००४** (१४ : १३, २ जुलाई ५५, २११–२१२)

रशियाच्या राजधानीत एक भव्य घंटा आहे. ही घंटा १७३७ साली बनविली. तिचे वजन २४० खंडी आहे. जगातील लोकोत्तर आश्चर्यांमध्ये तिची गणना करावी लागेल.

**४००५** (१४ : १३, २ जुलाई ५५, २१२)

शाळाखात्याचे डरेक्टर मि. अर्स्किन यांनी परदेशी शाळेस भेट दिली. ५६३ मुले हजर होती. सर जमशेटजी यांनी विद्याधनाचे हे छत्रच घातले आहे. शिक्षक उत्तम शिकवितात. मुलेही हुशार आहेत.

**४००६** (१४ : १३, २ जुलाई ५५, २१२)

पुना कॉलेजचा रपोट प्रसिद्ध झाला. त्या अहवालात गंमतीदार चमत्कार आहे. प्रो. फ्रेझरने ज्या वर्गाची स्तुती केली, त्या वर्गाची प्रो. ड्रेपराने निंदा केली आहे. ज्याची फ्रेझर निंदा करतो, त्याची ड्रेपर स्तुती करतो. हा काय प्रकार आहे ? दोघा प्राध्यापकांच्या वैमनस्यात विद्यार्थ्यांचा नाश होणार आहे.

**४००७** (१४ : १३, २ जुलाई ५५, २१२)

सिबास्टोपलच्या लढाईत दीड हजार फ्रेंच सैनिक मरण पावले. अनेक रशियन आगबोटींचा नाश झाला.

**४००८** (१४ : १३, २ जुलाई ५५, २१२)

कलाशास्त्रातील अत्युच्च पदवीचा अभ्यासखर्डा तयार होत आहे. नेटिवांना इंग्रजी व संस्कृत, तर इंडो-ब्रिटनांना लाटीन व इंग्लिश भाषांत प्रावीण्य मिळवता येईल.

**४००९** (१४ : १३, २ जुलाई ५५, २१२)

रे. आपाजी बापूजी यांचा विवाह रे. हरी रामचंद्रांची मुलगी चिमणाबाई हिजबरोबर झाला. (अहमदनगर येथे)

**४०१०** (१४ : १३, २ जुलाई ५५, २१२)

(खिस्ताचा एक उपदेशक) लाखीराम बोवा याचा मृत्यु झाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक १४, मुंबई, १६ जुलाई १८५५

**४०११** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २१५–२२०)

लाखीराम हा आमचा साह्यकारी होता. १४ दिवस त्याच्या देहास फार यातना होत होत्या. मी बापाकडे जातो, असे तो शांतपणे म्हणे. मृत्युनंतरही तो शांत झोपल्याप्रमाणे दिसला. धर्मांतरापूर्वी तो कबीरपंथी गुरू होता. खिस्ती झाल्यामुळे त्याची इस्टेट गेली. तो तापट व अभिमानी होता. परंतु ईश्वराची प्रार्थना करून लगेच क्षमा मागत असे. गावोगाव हिंडून तो खिस्ताचा उपदेश सर्व लोकांना सांगे. तीर्थक्षेत्रे हिंडून त्याच्या मनास शांती मिळाली नाही. व्रते आणि देहदंड यांबद्दल त्याच्या मनात तिरस्कार निर्माण झाला. पापाच्या क्षमेसाठी त्याने धर्म बदलला. मृत्यूनंतर तो आकाशाच्या समुदायामध्ये मिळाला.

**४०११ अ** (इंम : २१३–२१५)

४०१२ (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२१–२२४)

अंबलबनसाहेब आपल्या भाषणात म्हणाले : ३५ वर्षांपूर्वी लंकेची शाळा सुरू झाली. उंच जातीचे लोक इतरांना विहिरीवर पाणीही भरू देत नसत. आता मात्र ही स्थिती पालटली. अनेक लोक स्वतः बायबल शिकतात. ग्रहपीडेच्या मूर्ख समजुती दूर झाल्या. लोकांची मानसिक सुधारणा झाली. शेत मोठे आहे, बी पेरणारा हवा आहे. मद्यवर्जक सभेचे कामही समाधानकारक आहे.

४०१२अ (इंम : २२०–२२१)

४०१३ (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२४)

अहो भावांनो, तुम्ही चांगले करताना थकू नका.

४०१४ (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२४–२२६)

महाबळेश्वर ते पनवेलीपर्यंत दारिद्र्याने पिडलेले लोक फार दिसतात. सावकाराच्या कर्जात ते बुडाले आहेत. ऋणाग्नी त्यांच्या घराचा नाश करतो. सावकार जप्ती आणून गुलाम करतो. म्हणून मिशनाने पेढ्या घालून व्याजावर पैसे देण्याची सोय केली पाहिजे. सगळे लोक खुशीने पवित्र शास्त्र ऐकतात. हिंदू लोकांचा देशदुर्गुण असा आहे की, त्यांच्या तोंडात सतत शिव्या असतात. अवाच्या शब्द तोंडातून घालविण्याची शक्ती फक्त ख्रिस्ती धर्मातच आहे. अल्पविश्वासू लोक उपदेश ऐकतात पण विसरतात. ज्यांचे मन सुपीक जमिनीप्रमाणे आहे, त्यांना मात्र हे अमोल्य धन हवेहवेसे वाटते.

४०१५ (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६)

एका छोटेखानी मनुष्याने अखत्यारवाल्यांचे भय न बाळगता आपला दावा सुप्रीम कोर्टात नेला. सरकारी फैसला त्याच्या तर्फेने लागला. न्यायात कोणाचीही भीडमुरवत ठेवू नये. बुडवे आणि हुरडफुंके मित्र निघून जातात, पण छकड मात्र दुसऱ्यालाच सोसावी लागते.

**४०१६** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६–२२८)
प्रोफेसर पेरी यांची एल्फिन्स्तन शाळेत व्याख्याने होणार.

**४०१७** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६–२२८)
फ्रान्समध्ये कागद रंगविण्यासाठी फळांचा अर्क वापरतात.

**४०१८** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६–२२८)
बंगालपेक्षा मुंबईच्या रेल्वे कंपनीस ३००० रुपये जास्त कमाई झाली.

**४०१९** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६–२२८)
माहीम ते बांद्रा नवीन रस्ता तयार झाला.

**४०२०** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६–२२८)
लंकेचे वर्तमान पाच मिनिटांत हिंदुस्थान सरकारास कळवता येते.
कारण विजेची यंत्रे वापरतात.

**४०२१** (१४ : १४, १६ जुलाई ५५, २२६–२२८)
मुंबईत एप्रिलमध्ये १७४० व मे मध्ये १८७९ माणसे मेली,
पैकी १३८४ रोगाने मेली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४०२२** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २२९–२३०)
शिकविलेला वानर (सचित्र) : ब्राझीलमधील वानरे लवकर माणसाळतात. वानर इजारसुद्धा शिवतो. चिम्पान्झी वानर दोन पायांवर चालतो. जमीन झाडतो. विशिष्ट वेळी घड्याळ पाहून कॉफी आणून देतो. पाहुण्यांना खोलीही दाखवितो.

**४०२३** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३१)
'नित्यसारसंग्रह' हे पूर्वीच्या ज्ञानसंग्रहाचे नवे रूप आहे. दैनिक, वार्षिक वर्गणी आगाऊ रु. १० /– वर्ष अखेर रु. १२ /–

**४०२४** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३१)
'हिंदू हितेच्छू' (साप्ताहिक) : हे सुधारणेच्या कामी उपयोगी पडेल, असे वाटते. वार्षिक आगाऊ रु. ३, वर्षअखेर रु. साडेतीन.

**४०२५** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३१)
'बोधामृत' (साप्ताहिक) साताऱ्यास निघते. विद्येचा मोठा लाभ ते देईल. आगाऊ वार्षिक वर्गणी रु. ५/– वर्षअखेरीस रु.६/–

**४०२६** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३१)
'मुंबई परहेजगार' हे (साप्ताहिक) गुजराथीपत्र मद्यपानविरोधी आहे. वार्षिक आगाऊ पावणेतीन रुपये वर्गणी, वर्षअखेर तीन रुपये.

**४०२६ अ** (इंग्र : २३१)

**४०२७** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३३–२३६)

मि. मर्वीन म्हणाले की : विद्येच्या योगाने लोकांचे डोळे उघडत आहेत. विद्या शिकल्यामुळे दारिद्य येते, अशीही अडाणी लोकांची समजूत आहे. लक्ष्मी ही सरस्वतीची सासू असल्यामुळे लोक सरस्वतीस दुय्यम स्थान देतात. ब्याटिकाटा शाळेत शिकून तयार झालेले लोक समाजात उच्च ठिकाणावर कामे करतात. मिशनरी लोकांच्या सहवासाने आपल्या जुनाट चालीरीती साफ गेल्या, हाही मोठाच फायदा आहे. व्यापार आणि धन वाढले आणि मुख्य फायदा म्हणजे आत्म्याचा उद्धार झाला. हा फायदा कोणत्याही मोलाने विकत घेता येणार नाही.

**४०२७अ** (इंम : २३१–२३३)

**४०२८** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३६–२३९)

आपण तिसऱ्या दिवशी मेलेल्यातून उठू, असे भविष्य येशूने सांगितले होते. शुक्रवारी येशूचा वध झाला. रविवारी स्त्रीमंडळ त्याच्या थडग्याकडे चालू लागले. तेव्हा भूकंप झाला. दिव्य दूत प्रगट झाले. अनेकांना असे दिसले की, तारक येशू आकाशात गेला. येशूने भाकर वाटली आणि तो अदृश्य झाला. 'भूतांचा संशय धरू नका,' असे बजावून आपल्या अंगावरच्या खिळ्यांच्या खुणाही दाखविल्या. त्यावेळचे साक्षीदार सांगतात की, आपल्या शिष्यांना भेटून ४० दिवस तो धर्मतत्त्वे सांगत होता.

**४०२९** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २३९-२४२)

नाटक पहाण्याने पैसा पाण्यात जातो व जागरणाने शरीरास अपकारसुद्धा होतो. दुष्ट नरकापासून लोकांचे अनहित होते. लुटारू नाटककार तरुणांची हानी करीत आहेत. नाटक म्हणजे लबाड, लुच्चे व सोदे लोकांची टोळी असते. नाचतमाशे, लावण्या ऐकणे, सुपारी खाणे, विडी ओढणे, असे दुर्गुण त्यांच्याजवळ भरपूर असतात. भाऊ दाजींनीच या तमाशाला प्रथम आश्रय दिला. त्यातून दांडगाई, इष्कबाजी, टवाळी, उद्धटपणा, वगैरे अवगुण निर्माण होतात, भाऊस मात्र वाटले होते की, आपण इंद्रभुवनातच रमलो आहोत. वर्तमानपत्रे तर त्यांच्या जाहिरातीसुद्धा छापीत नाहीत. नाटककारास अब्रू नाही. ते उघडपणाने दरोडेखोरी करतात. अनेक तरुण नाटकांनी बिघडले व दुर्व्यसनाच्या चक्रात सापडले. नाटकघरात जाण्यापेक्षा वाचनालयात जावे. (संवाद) (धूमकेतूवरून)

**४०३०** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २४२-२४३)

डाक्तर स्टनलांग यांना आगबोटीने येत असताना भूकंपाचा अनुभव मिळाला. पलंगावरील लोक धक्का बसून जागे झाले. आकाश स्वच्छ होते. गलबत मात्र बेफाम हलत होते.

**४०३१** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २४३-२४४)

तेहरान येथे दोस्तांच्या फौजा एकत्र होऊन सिबा स्टोपलचा वेढा पक्का करीत आहेत. रशियनांचे ६ हजार सैनिक मेले. शिवाय पटकीचा वाखा सुरू झाल्यामुळे ते हैराण झाले आहेत. लाकूड घेऊन जाणाऱ्या रशियन जहाजासही दोस्तांनी बुडविले.

**४०३२** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २४४)

मे ५५ मध्ये मुंबईत १८०३ तर जूनमध्ये १३०८ मृत्यु झाले.

**४०३३** (१४ : १५, १ ऑगस्ट ५५, २४४)

२७ जुलै रोजी रे. आर्. नेसबिट जरीमरीच्या वाख्याने मृत्यु पावले. त्यांचे वय ५२ वर्षांचे होते. ते फ्री चर्चचे काम करीत.

**४०३३ अ** (इंम : २४४)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक १६, मुंबई, १५ ऑगस्ट १८५५**

**४०३४** (१४ : १६, १५ ऑगस्ट ५५, २४५–२५१)

रे. राबर्ट नेसबीटसाहेबाविषयी :

या साहेबांच्या मृत्यूने एक अमूल्य रत्न गेले. १८२७ मध्ये ते या देशात आले. पहिली १० वर्षे कोकणात काम केल्यावर गेली २० वर्षे ते फ्री चर्चचे गुरू म्हणून होते. त्यांची विद्या बहुमान्य होती. अंतःकरण विशाल होते. शिकविण्याची हतोटी सर्वोत्कृष्ट होती. गहन विषय ते सोपा करून समजावीत. शास्त्राचा अर्थ सांगण्याचे परिज्ञान अनुपमेय होते. पुष्टीकारक ज्ञानान्नाचे खाजे त्यांनी विद्यार्थ्यांस दिले. ते उद्योगी, तत्पर व एकाग्र वृत्तीचे होते. त्यांचे मराठी उच्चार ब्राह्मणासारखे असत. मराठीतही त्यांनी पुस्तके लिहिली. ते सर्वांचे आवडते होते. लोकांचे इहपरलोकी कल्याण व्हावे, यासाठी ते श्रम करीत. नेटिवांशी ते फार प्रेमाने वागत. आकाशातले न कोमणारे वतन त्यास प्राप्त झाले. त्यांची कीर्ती गावी, कित्ता घ्यावा.

**४०३४ अ** (इंम : २४५)

**४०३५** (१४ : १६, १५ ऑगस्ट ५५, २५२–२५४)

डाक्तर ऐरा गुल्ड म्हणाले की : विद्यार्थ्यांनी चांगल्या खिस्ती आचरणाचा कित्ता दाखवावा. विधर्मी आचरण करून खिस्तास कलंक आणू नका. विद्या केली, तरी शेतीची कामे करण्यास लाजू नका. मिशनऱ्यांनी आम्हांस मार्ग दाखविला आहे. आता सुधारणुकीसाठी लागणारे श्रम आणि पैसा यांची तजवीज आम्हीच केली पाहिजे. जे पेरले आहे, ते वादविण्यास झटावे. कृतज्ञता ठेवा. मानसिक भ्रष्टाचारास थारा देऊ नका.

**४०३५ अ** (इंग्र : २५१–२५२)

**४०३६** (१४ : १६, १५ ऑगस्ट ५५, २५५–२५८)

'विश्वासणारा' लिहितो की : जुन्या पिढीत शोधकपणाची फार कमताई होती. वाचलेल्या ग्रंथाबद्दल ते विचार करीत नसत. पूर्वी संस्कृतात ग्रंथ करीत. पण प्राकृतच्या उदयानंतर संस्कृत भाषा दुर्ज्ञेय होत गेली. सुज्ञानाच्या शोधापेक्षा लोकांनी विषयसुखाची गोडी धरली. बऱ्यापेक्षा वाइटाचे ग्रहण आपण लौकर करतो. अज्ञान व भ्रष्टपणा वाढल्यानंतर ईश्वरकृपेने इंग्रजी राज्य व मिशनरी लोक इकडे आले. त्यांनी ऐहिक विद्या आम्हांस दिल्या. हिंदूंच्या व्यावहारिक व पारमार्थिक ज्ञानामध्ये बहुत अपूर्णता व चुका आहेत. शोधक बुद्धी असेल, तर इंग्रजांप्रमाणे सुधारणूक होईल. त्यांचे ज्ञान हे भविष्यज्ञान नसून परिश्रम व अनुभव यांतून मिळालेले परिपूर्ण ज्ञान आहे. खिस्ती शास्त्र तर ईश्वरदत्त असून बाकीची शास्त्रे मनुष्यदत्त आहेत. मूर्तिपूजक लोकांचे शास्त्रकर्ते शतगुणित अज्ञानी होते.

**४०३७** (१४ : १६, १५ ऑगस्ट ५५, २५९-२६०)

अंमली पदार्थांच्या सेवनास अंमल करणे असे नांव आहे. अशा मादक द्रव्यांनी बुद्धी व स्मृती नष्ट होते. कैफ करणे, हे मूर्खपण व अज्ञानी असते. कैफी माणूस इतरांना विनापराध शिवीगाळ व मारझोड करतो. आपली अब्रू विसरून तो वागतो. जवळ असेल नसेल ते देऊन हा माणूस दारूचा घोट घेतो. सरकारने अनेक वाईट चाली बंद केल्या. पण या उपद्रवास मात्र उत्तेजन दिले. ठक लोकांप्रमाणे कलालांचाही बंदोबस्त करावा.

**४०३८** (१४ : १६, १५ ऑगस्ट ५५, २६०)

बंगाल कौन्सिलात अभद्र पुस्तकांवर बंदी घालण्याबाबत चर्चा झाली. तसेच, रस्त्यावरही कोणी अभद्र शिवीगाळ केली, तर त्याला शिक्षा व्हावी. ती ३ महिने कैद व १०० रुपये दंड एवढी असावी. असे सर्वांचे मत पडले. म्हणून लोकांनी असे प्रकार पोलिसांकडे नोंदवावेत.

**४०३९** (१४ : १६, १५ ऑगस्ट ५५, २६०)

मुंबईतील रेल्वेचे उत्पन्न :

गेल्या ज्यानुएरी महिन्यापासून गेल्या जुलईच्या पंधराव्रे तारिखेपर्यंत ग्रेट इंडिया पेनिनसला रेल्वेचे एकंदर उत्पन्न रु. ८९३२५–२ आणे–१ पै झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४०४०** (१४ : १७, १ सप्टेंबर ५५, २६१–२६२)

पूर्वी लांडग्यांची संख्या मोठी असे. ते एवढे धीट होते की, गावामध्ये मुसंडी मारून गुरू पळवून नेत असत. काही अगदी सोप्या युक्तीने त्याजपासून सुटका करून घेता येते. सिंहाबद्दलही असेच घडते की, लांडगा किंवा सिंह याजकडे रोखून पाहिले, तर ते आपोआप उठून चालू लागतात. धीटपणाने नजरेसी नजर लावा आणि पाहा, ते निघून जातात.

**४०४१** (१४ : १७, १ सप्टेंबर ५५, २६४–२६८)

मिस्तर थामसन म्हणाले की : जुन्या लेखामध्ये लंकेस टाप्रिबेण असे नाव दिल्हे आहे. लंका बेट हे सागरातील एक रत्न आहे. मिशनरी लोक काही द्रव्य आणि कीर्ती मिळविण्यासाठी येथे आले नाहीत. तसा आरोप कोणीही केला, तर त्यांच्या डोळ्यांत अश्रू येतात. पण त्यांनी जे धन मिळविले, ते अत्यंत अमोल असे आत्मिक धन आहे. अनेकांना शिकविले, खिस्ती धर्म दिला, कित्येकांना मंडळीची गोडी लावली. येशू हा राजांचा राजा, त्याच्याशी ओळख करून दिली. खिस्ती धर्माचे शेत हिमालयापर्यंत विस्तीर्ण आहे.

**४०४१ अ** (इंग्र : २६२–२६४)

**४०४२** (१४ : १७, १ सप्टेंबर ५५, २६८–२७२)

ज्ञानप्रकाशकर्त्यांने असे मत व्यक्त केले की : बैबलात लबाड्या तर आहेतच, पण ज्ञानही संकोचित आहे. यावर आम्ही म्हणतो की, युरोपियन नास्तिकही कबूल करतात की, पवित्र शास्त्र हे सन्माननीय पुस्तक आहे. श्रद्धेचा वृक्ष मोडला की काटेरी झाडे रुजतात. नास्तिकांनी सांगितलेले दोष अप्रामाणिकपणाचे आहेत. डीइस्त म्हणजे नास्तिक म्हणतात की, शास्त्र ईश्वरदत्त नाही. जगास कोणी बुद्धिवंत कर्ता आहे, हे मत त्यांना अनिश्चयात्म व अनुपयोगी वाटते. ईश्वराच्या न्यायावर त्यांचा विश्वास नाही. सगळे सद्‌गुण त्यांना निरुपयोगी व अपकारक वाटतात. अशी माहिती 'एक खिस्ती' याने आपल्या पत्रामध्ये दिली आहे.

**४०४२अ** (इंम : २७२–२७४)

**४०४३** (१४ : १७, १ सप्टेंबर ५५, २७४–२७५)

निजुबिट साहेबाच्या स्मरणार्थ सभा : या सभेस मुंबईतील अनेक प्रतिष्ठित नागरिक हजर होते. रे. निजुबिट् साहेबांच्या स्मरणार्थ विद्यावेतन द्यावे, यासाठी एक समिती नेमण्यात आली.

**४०४४** (१४ : १७, १ सप्टेंबर ५५, २७५–२७६)

मुलास वाटते की : आपण द्रव्यवान व्हावे, कारण मातबर लोकांस सर्वत्र मान असतो. श्रीमंतांच्या मुलांनी अभ्यास केला नाही, तरी त्यांस शाळेत रागावत नाहीत. आई सांगते की, पैक्याविषयी खोटे विचार बाळगू नयेत. संपत्ती अचानक नष्ट होऊ शकते. लोखंडाच्या पेटीतील द्रव्यापेक्षा अंतःकरणामधील द्रव्य जास्त मोलाचे आहे. नीतीने वाग, म्हणजे आत्म्याचा अमोल्य अलंकार मिळेल. विद्येच्या उजेडाने ईश्वरास ओळखावे.

४०४५ (१४ : १७, १ सप्टेंबर ५५, २७६)

वेसुवियस या ज्वालामुखीचा स्फोट झाला आहे. मोठा आवाज होऊन विस्तवाचे निखारे व मोठाले धोंडे बाहेर पडत आहेत. भोवताली धरणीकंप होऊन सर्वत्र नासाडी होते आहे. (धूमकेतूवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक १८, मुंबई, १५ सप्टेंबर १८५५

४०४६ (१४ : १८, १५ सप्टेंबर ५५, २७८)

सद्धर्मदीपिका : हे पाक्षिक ख्रिस्ती धर्माशी स्पर्धा करण्याकरिता निघाले आहे. परंतु देवाची भक्ती करावी, वगैरे उपदेश करीत असतांना इतर मासिकाबद्दल त्याने हलकट शब्द वापरले असून त्याची चालचालणूक पोक्त नाही. पूर्वी विचारलहरीस उद्देशून ज्ञानोदयाने ५ महिने मजकूर लिहिला. इतरांस जंबुकाची उपमा देणारी दीपिका स्वतः मात्र सिंहानुरूप नाही. ग्राम्यपणा, अमर्याद भाषणे, दुःशब्दांची फौज, हीच त्याची सामग्री दिसते. आम्ही प्रमाण देण्यास तयार आहोत. पण दुसऱ्याचे प्रमाण दंड आम्ही मान्य करणार नाही.

४०४६ अ (इंम : २७७–२७८)

**४०४७** (१४ : १८, १५ सप्टेंबर ५५, २८०–२८४)

नगरच्या सभेत रे. बालान्टाइन म्हणाले की : सुशिक्षित माणसे देशविषयक कर्तव्यांनी बांधलेली आहेत. त्यांना विद्याभ्यासाच्या सोयी व अनुकूलता मिळाली. सरकारचे प्रयत्न कल्याणसाधक आहेत. सदरहू परोपकारामुळे एतद्देशीय लोक इंग्रजांचे इतके ऋणी होताहेत की, त्यांचे उतराई होणे अशक्य आहे. तरुणांनी आपले ज्ञान सतत वाढवावे. मोठ्या पगाराची चाकरी हे ध्येय असू नये. विषयसुखात मग्न होऊ नये. सुज्ञान हेच धन आणि प्रियकर वस्तू होय. तुमचे ज्ञान म्हणजे ज्ञानप्राप्तीचा आरंभसुद्धा नाही. कारण ज्ञान अफाट आहे. स्वतःमध्ये निश्चयात्मक शक्ती निर्माण व्हावयास हवी आहे. कोलंबसाने आपले निर्धारित ध्येय गाठले, तेव्हा कोठल्याही अडचणींची पर्वा केली नाही. त्याने दुर्गम व अकळीत सागरही ओलांडले. म्हणून निर्धाराचे बळ ओळखावे. आपली मते तपासून पहावीत व योग्य तेच मत धरावे.

**४०४७अ** (इंम : २७९–२८०)

**४०४८** (१४ : १८, १५ सप्टेंबर ५५, २८५–२८७)

विचारलहरीने आरोप केला की : खिस्ती लोकांना स्वतःचे धर्मपुस्तक नव्हते. इकडून तिकडून मजकूर घेऊन त्यांनी बनावट ग्रंथ केले. पण हे आरोप खोटे आहेत. तिसऱ्या शतकातही नवा करार व मात्थीचे शुभवर्तमान होते. ही पुस्तके इसवी सनाच्या पहिल्या शतकातच लिहिली गेली, यात शंका नाही. पालिकार्प याने तर येशूला पहाणाऱ्या लोकांच्या साक्षी स्वतः नोंदविल्या. कित्येक मूर्तिपूजक लेखकांनीसुद्धा त्यावर कधी शंका काढली नाही. उलट पुराणातील कथांच्या खरेपणाचा काहीसुद्धा थांग लागत नाही. केवळ वाडवडलांचा धर्म म्हणून हिंदू धर्म पाळला जातो.

**४०४८अ** (इंम : २८४–२८५)

४०४९ (१४ : १८, १५ सप्टेंबर ५५, २८७–२९१)

ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या बोलण्यावर दौलतराव रागावतो. तेव्हा गोविंदराव सांगतो : 'धर्म म्हणजे शास्त्राच्या योगाने ईश्वराची इच्छा समजावून घेणे होय. ख्रिती देवभोळे नाहीत किंवा मिशनेरी पोटार्थी नाहीत. अज्ञानी बालकाप्रमाणे वाटेल त्यावर विश्वास टाकू नये. बैबल शास्त्र प्रामाणिक व निष्पक्षपाती आहे. माहीतगार माणसांना विचारून खात्री करून घ्या. येशू अपराध्याप्रमाणे मारला गेला, त्याचे इतर धर्मीय लोक भांडवल करतात. पण ख्रिस्ती धर्मच देवापासून आहे, ही गोष्ट विसरता येणार नाही. आपले व्यंग कोणी दाखविले की, रागावू नये. आयुष्य फार थोडे असते, म्हणून मृत्यु येण्यापूर्वी खरे मन स्वीकारावे.

४०५० (१४ : १८, १५ सप्टेंबर ५५, २९१–२९२)

'एक गरीब मित्र' पत्रात म्हणतो की : नाशिकजवळ एका गुहेमध्ये धर्मराज, भैरोबा व भवानी यांच्या मूर्ती आहेत. श्रावणातल्या सोमवारी तेथे ५-६ हजारांची यात्रा भरते. लोक शिवराईचे तेल घेऊन धर्मराज्याच्या मूर्तीवर ओततात. इतर देवांच्याही पाया पडतात. तेथला पुजारी त्यांस थोडी राख देतो. ती कपाळास लावतात. थोडी राख घरीही नेतात. अशा अघटित चाली आहेत. यात्रेमध्ये शुभवर्तमान वाचून काही धर्मतत्त्वे सांगितली. पण ब्राह्मण पुजारी रागावले. पण अशा देवतांना पुजणे फार गैरशिस्त आहे.

**४०९१** (१४ : १८, १५ सप्टेंबर ५५, २९२)

'ढोंगद्वेष्टा वाटसरू' लिहितो की : रत्नागिरीजवळ कर्लेगावी ढोलताशे वाजत होते. काही बायका व पुरुष यांच्या अंगात आले होते. ते अंग घुसळीत होते. आजारीपण व इतर बाबी यासंबंधी लोक प्रश्न विचारतात. काहींना कोंबडी कापण्याचाही सल्ला दिला जातो. भूतपिशाचांना संतुष्ट करण्याचा कार्यक्रम नेहमी चालत राहातो. आपण तांदूळ टाकून कोणालाही नाचवू शकतो, असे बढाईचे उद्‌गार हे लोक काढतात. पण तसा प्रसंग येत नाही. म्हणून असल्या मुसळदेवतांना भिऊ नका. त्यांना मार द्या. लोकांस अज्ञानाच्या अंधारातून बाहेर काढा.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक १९, मुंबई, १ ऑक्टोबर १८५५

**४०९२** (१४ : १८, १ ऑक्टोबर ५५, २९४–२९६)

दीपिकेच्या दुसऱ्या अंकामध्ये मिशनेऱ्यांची निंदा आहे. आम्ही आमचा धर्म खरा मानतो. पण त्याचा आग्रह धरीत नाही. दीपिकेचा कर्ता धुळीवरती सारवण घालतो आहे. मनुष्याचे मन पापी आहे, हे सर्व धर्मांनाच कबूल आहे. सैतानास दंड नाही. पण त्याला अडवले की, तो पळून जातो. मिशनेऱ्यांना ढोंगी समजणे चूक आहे. ब्रह्मदेवाचे एक लक्ष वर्षांचे तप एकाच दुराचरणाने गमावले गेले. पाप ईश्वरास दिसते. तो सर्वज्ञानी आहे.

**४०९२अ** (इंम : २९३–२९४)

**४०६३** (१४ : १९, १ ऑक्टोबर ५५, २९८–३०२)

बालंटैनसाहेबाचे व्याख्यान :

तरुणांनी सुप्रकाशित बुद्धीच्या ठरावाप्रमाणे वागावे. अज्ञान आणि भ्रम टाकून दिला की, सुज्ञान आणि सुधारणा मिळेल. या देशात अनेक अघोर आणि क्रूर चालीरीती आढळतात. स्त्रियांशी लोकांची वर्तणूक अत्यंत दुष्टाईची असते. होळीचा सण बीभत्स आहे. ग्रहणाबद्दल अज्ञान आणि व्यर्थ कांक्षा फार आढळतात. सुधारणा करण्याकरिता मोठे मानसिक धैर्य हवे आहे. प्युरिटन लोकांनी जगभर छळणूक सहन केली. त्यांच्या मानसिक धैर्याचे सर्वत्र फार कौतुक केले जात आहे. सदसद्‌विवेकास पटेल, तेच आचरण्याची त्यांची कृती त्यांना सतत उपयोगी पडली. आठवा हेन्री व पाचवा चार्ल्स त्यांच्यापुढे नमले. हस व लॅटिमूर यांनी मरण पत्करले. असे धैर्य तुम्ही मनाशी धारण करा.

**४०६३ अ** (इंम : २९६–२९८)

**४०६४** (१४ : १९, १ ऑक्टोबर ५५, ३०२–३०५)

वासुदेव पांडुरंग यांचा बाप्तिस्मा :

९ सप्तंबर १८५५ रोजी वासुदेवपंताचा बाप्तिस्मा झाला. येशू ख्रिस्ताने चमत्कार घडवले, यास साक्षी व प्रमाण आहे. हे चमत्कार इंद्रियगोचर होते. हजारोंनी ते प्रसिद्ध ठिकाणी पाहिले. त्यांच्या स्मरणार्थ काही चालीही सुरू झाल्या, त्या आजतागायत चालू आहेत. हे चमत्कार म्हणजे जादूटोणा नव्हता. जे विश्वासात राहातात, त्यांना गौरवाचा अविनाशी मुगुट मिळतो.

४०६५ (१४ : १९, १ ऑक्टोबर ५५, ३०५–३०६)

राजश्री वासुदेव पांडुरंग म्हणतात : गेली १५ वर्षे मी विचार केला, तेव्हा खिस्ती धर्माची सत्यता मला पटली. हिंदुधर्माची तत्त्वे विचाराशी विरुद्ध आहेत. पापपुण्याबद्दल तर त्यात केवळ बडबडच आहे. म्हणून व्रत-पूजा-दानाचा त्याग केला. ब्रह्म समाजाजवळ ईश्वरी शास्त्र नाही. बायबलातील नीती सर्वोत्कृष्ट अशीच आहे. येशूने लोकांचा जामीनदंड सोसला व तोच खरा तारणारा आहे.

४०६६ (१४ : १९, १ ऑक्टोबर ५५, ३०७)

'नाशिककर' पत्रात लिहितो की : महारवाड्यात जाऊन मी उपदेश केला. लाखीरामाबाबतचा ज्ञानोदयातील मजकूर वाचून दाखविला. कबीरपंथी लोकांस फार वाईट वाटले. बोवाप्रमाणेच आपणही येशू खिस्ताच्या ध्वजाखाली यावे, असे त्यांस वाटते.

४०६७ (१४ : १९, १ ऑक्टोबर ५५, ३०७–३०८)

फिजी बेटाचा राजा तांकोब याने खिस्ती धर्म स्वीकारला. हे फार मोठे आश्चर्य आहे. कारण तो मूर्तिपूजक, रानटी, नरभक्षक होता. माणसे मारून खाई. नरमांस शिजवीत शुभवर्तमान ऐके. खिस्ती झाल्यावर हे प्रकार बंद करावे लागतील, म्हणून तो धर्म बदलण्यास तयार नव्हता. त्याचा मित्र वराणीही क्रूर होता. त्याचाही मनःपालट झाला. पापपुरीतल्या लोकांचे मन बदलले.

४०६८ (१४ : १९, १ ऑक्टोबर ५५, ३०८)

'हिंदू लोकहितेच्छू' लिहितो की : कोल्हापूरात पाऊस अगदी कमी आहे. भट व उपाध्ये यांनी अनुष्ठानांचा सपाटा लावला आहे. बैरागी गोसाव्यांना खैरात वाटली जाते. एका गोसाव्याने ठामपणे सांगितले की, १०० रुपये द्या, मी पाऊस पाडतो. पैसे देऊनही पाऊस पडत नाही!

**४०५८ अ** (इंम : ३०८)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक २०, मुंबई, १५ ऑक्टोबर १८५५

**४०५९** (१४ : २०, १५ ऑक्टोबर ५५, ३११–३१८)

विद्याभ्यास केलेल्या तरुणांनी पूर्ण सदाचारी असावे. खगोलवेत्तासुद्धा अभक्तिमान असेल, तर तो वेडा समजावा. ज्ञानाने माणूस नम्र, ममताळू परोपकारी झाला पाहिजे. कुवासना कमी व्हाव्यात. आपल्या जीवनाचे जहाज सुखविषयक भोवऱ्यात अडकू देऊ नका. दुराचरणास वश्य होऊ नका. स्त्रियांचा सन्मान करा. मोठ्या माणसांचे मोठेपण त्यांच्या आईवर अवलंबून असते. परमेश्वराचा बोध आणि साहाय्य यांचे अगत्य बाळगावे.

**४०५९ अ** (इंम : ३०९–३११)

**४०६०** (१४ : २०, १५ ऑक्टोबर ५५, ३१८–३२१)

एक 'ख्रिस्ती' लिहितो की : न्यूमन आणि कारलाइल यांची पुस्तके वाचून लोक ख्रिस्ती धर्मावर टीका करतात. या डीइस्तांच्या मताप्रमाणे जर चाललो, तर गोंधळ व उत्पात होतील. हे नास्तिक लोक सगळी धर्मपुस्तके बुडवण्याला निघालेत. जगातले दुःख ईश्वर नाहीसे करू शकत नाही, असे ते म्हणतात. मग ते स्वतः तरी पाप व दुःख नाहीसे करू शकतील काय ? सर्व जगच ईश्वर आहे, असे ते सांगतात. हे लोक आत्मिक अन्नावाचून जगास उपाशी मारतील, पुण्यरूप वस्त्रावचून उघडे पाडतील. ख्रिस्तविरोधकांनी आपण कोणते सिद्धांत मांडतो, ते एकदा तरी सांगावे म्हणजे वाद करणे सोपे होईल.

**४०६१** (१४ : २०, १५ ऑक्टोबर ५५, ३२१-३२४)

'खिस्तदास' लिहितो की : विवेकाच्या साहाय्याने सुखाचा शोध करावा. खिस्ती धर्म स्वीकारल्यामुळे नातेवाईकांपासून आपण अलग होतो, पण अशाश्वत जगातून तारणाकडे जातो, हा खरा लाभ आहे. ज्ञान आणि बळ यांचा भरवसा सोडून देऊन खरी भक्ती केली पाहिजे. ईश्वर सर्वसमर्थ असून तोच आमचे बरे करणार आहे. जर त्याचा आश्रय केला, तर तो तुम्हांस ढालीप्रमाणे होईल. राजा व लोक प्रतिकूल असतानाही ईश्वराने दानिएलाचे संरक्षण केले. परलोकाचे जीवन दिल्हे. ईश्वरभक्तरूपी अनेक नातलगही मिळवून दिले. तो मन शुद्ध करतो.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक २१, मुंबई, ६ नवेंम्बर १८५५

**४०६२** (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३२६-३२७)

सद्धर्मदीपिका-

आपण ज्या धर्मात जन्मलो, तोच खरा, असे दीपिकाकर्त्यास वाटते आहे. मोशाचा मरणवृत्तांत मोशाने लिहिला नाही, तर तो यहोशवाच्या अध्यायाचा प्रारंभ आहे. म्हणून क्षुल्लक शंका काढू नयेत. नास्तिकांच्या शंकाना उत्तरे देण्यासाठी सतत नवी पुस्तके प्रकाशित होत आहेत. आस्थापूर्वक शोध करा. आपली मिथ्या मते सोडून द्या.

**४०६२ अ** (इंम : ३२५-३२६)

**४०६३** (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३२८–३२९)

देवाने सर्वांना शाप दिल्हा, असे मोशा सांगतो, तो वृत्तलेखकच रानटी व ढोंगी आहे, असे टीकाकार म्हणतात. पण तसे नाही. पापी माणसांनी भूमीस शापित केले. दिवोदासाच्या निर्मळ पुण्यामुळे देवांनाही मत्सर वाटे, हे हिंदूंना ठाऊक आहे. देव, आत्मा व पुत्र या त्रयकांपैकी एकजण भूमीवर आला, असे म्हणणेही योग्यच आहे. कारण देवच मनुष्यप्रतिम झाला. येशूस देवपुत्र म्हटल्यामुळे त्याचा अनादिपणा नाहीसा होत नाही.

**४०६३ अ** (इंम : ३२७–३२८)

**४०६४** (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३३१–३३३)

स्त्रिया स्वभावतःच पापी आहेत, असे हिंदू मत रे. उइल्सन यांनी स्पष्ट केले. अतिकामेच्छा, निर्दयत्व, खोटा स्वभाव, यांनी त्यांचे आत्मे पापी झाले, असे हिंदूमत आहे. त्यांनी वेद वाचू नयेत, हा विचार हलका आणि तुच्छ आहे. त्यांना स्वातंत्र्यही देऊ नये आणि त्यांचा विवाह लहानपणीच करावा, असे शास्त्र म्हणते. नवऱ्याची सेवा, एवढा एकच धर्म त्यांना विहित केला आहे. विधवांबद्दल तर अतिशय क्रूर व रानटी कल्पना आहेत. एकंदरीत स्त्रीजातीस हलके आणि निरुपयोगी मानले आहे. (ज्ञानदीपिकेवरून)

**४०६४ अ** (इंम : ३२९–३३१)

४०६५ (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३३३–३३५)

देशबंधूंना साहाय्य करून सौख्याचा मार्ग शोधणे, हा खरा धर्म आहे. अज्ञानजन्य संकटांतून लोकांना सोडविले पाहिजे. यांच्यातील देवविषयक अज्ञानामुळे ते अनेक देवतांना नवस करतात. त्यातून मूर्तिपूजेचे बंड माजले. धर्माबद्दलही त्यांच्यात अज्ञान आहे. गोमुखीत हात घालून जप केल्यामुळे ईश्वर पावत नसतो. जातिविषयक भेदांनी हा समाज ग्रासला आहे. धंद्यातून झालेल्या भेदांनाच जातींचे स्वरूप आले. म्हणून लेखन, वक्तृत्व, यांचा उपयोग करून या देशाची प्रगती साधावी.
(अहमदनगर येथील सरकारी इंग्लिश शाळागृहामध्ये झालेले भाषण.)

४०६६ (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३३५-३३७)

पुनर्विवाहाविषयी निबंध :

आपल्या मातृकेस कलंकातून निर्मुक्त करण्यासाठी प्रयत्न केला पाहिजे. आपली जन्मभूमिका परम दुःखी होऊन करुण स्वर काढीत आहे. सती व बालहत्या यांप्रमाणेच स्त्रीवरील अन्याय हाही समाजावर कलंक आहे. विधवांच्या लाजिरवाण्या स्थितीतून व्यभिचार व भ्रूणहत्यादि निर्घृण कर्मे होतात. आपण शुभकार्यात अडचण असून अडगळ आहोत, असे वाटून कित्येक जणी आत्महत्या करतात. बापड्यांना दुःसह दुःख भोगावे लागते. व्यभिचारांनी दुर्गुणांची साठवण वाढते. अनेक बेकायदा गर्भपात होतात. अर्भकांची हत्या टाळण्यासाठी धैर्य धरून पुनर्विवाहास मोकळीक द्यावी.
(अहमदनगर येथील शाळागृहात झालेले भाषण)

**४०६७** (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३३७–३४०)

'एक खिस्ती' पत्रात म्हणतो की : पत्रिकाकर्ता नेहमीच खिस्ती धर्माची निंदा करतो. 'लाथाळ मारल' यास कोणत्या फिलासाफीच्या प्रोफेसराने शिकविले कोणास ठाऊक! 'शिव्या देऊ नयेत' म्हणत तो शिव्या देतो. शंका घेणे हे नास्तिकाचे काम आहे, एवढाच त्याचा विचार योग्य आहे! पृथ्वी निर्माण झाली, त्यास ६ हजार वर्षे झाली आहेत. मोशाच्या काळात प्राणिबळी संमत होता. ईश्वर निराकार असला, तरी सावयव होऊन माणसाला भेटू शकतो. प्रभुभोजनास लॉर्ड सपर म्हणतात.
तेव्हा, दीपिकाकर्त्याने निर्मूळ भाषणे करू नयेत.

**४०६८** (१४ : २१, ६ नोव्हेंबर ५५, ३४०)

अमेरिकन मिशनच्या देवळात दररोज धर्मविषयक भाषणे होतात.
भाषणानंतर श्रोत्यांच्या प्रश्नांची चर्चा होते.

**४०६९** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३४१)

रॉबर्ट मनी शाळा :

या शाळेचो पायाभरणी १ नोवेंबर ५५ रोजी झाली.
आर्चडिकनसाहेबांनी प्रार्थना म्हटली.

**४०६९ अ** (इंम : ३४१)

**४०७०** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३४२–३४३)

काही लोकांना उथळ गोष्टी समजण्यासाठीही मोठी मारकूट पडते. एखाद्या ओवीत आत्म्यांचा वेगवेगळा उल्लेख आला, म्हणजे अनेक आत्मे आहेत, असे ते म्हणतात. पण आत्मा एकच आहे. त्याचे गुण मात्र बहुविध आहेत. येशू हा इतर उत्पत्तिमान् प्राण्यांप्रमाणेच होता. पवित्र आत्मा त्याच्यावर उतरला. येशूला सगळ्या ईश्वरी प्रेरणा मिळाल्या.

४०७० अ (इंम : ३४१–३४२)

४०७१ (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३४३–३४५)
या देशातील लग्नाची रीत केवळ पशुतुल्य आहे. आईबाप अज्ञानी मुलांची लग्ने करून देतात. प्रौढावस्थेत विवाह झाला, तर एकमेकांचा स्वभाव ओळखण्याची संधी मिळते. या देशात अडाणीपणा फार आहे. विद्या म्हणजे केवळ लिहिणे वाचणे, अशी कल्पना दिसते. कित्येक कन्यांच्या गळ्यांतल्या पट्ट्यांवर त्यांची किंमत लिहून सावकाराघरी ठेवतात. असल्या विक्रीने मुलीस अत्यंत दुःख भोग वे लागते. यास गुलामांचा व्यापारच म्हटले पाहिजे. गाय विकणे, हे पाप समजणारेच असे करतात. पुरुष मात्र अनेक बायका करतात. त्यातून कुटुंबातील कलहाला उत्तेजन मात्र मिळते. ज्या जातीत पुनर्विवाह मान्य आहे, त्या जातीत बालविवाह फारसा अनिष्ट ठरत नाही. लग्नकार्यात कसबिणीचा नाच, ही तर अनीतिमान प्रथा आहे. लग्नामध्ये अफाट खर्च करून लोक कर्जबाजारी होतात.

४०७२ (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३४५–३४९)
गोविंदराव दौलतीस सांगतात की : मोशेसुद्धा ईश्वराने पाठविलेला माणूस होता. त्याने केलेले चमत्कार खरे आहेत. त्यास साक्षीदार व प्रमाणेसुद्धा आहेत. त्यांच्या स्मरणार्थ बांधलेल्या इमारती व सण वगैरेही आहेत. मोशाने अनुयायांना तांबड्या समुद्राच्या पलीकडे नेले व ४० वर्षे आकाशातून पडलेला मान्ना सर्वांनी खाल्ला, यास प्रमाण आहे. मोशेकालीन वस्तूही राखून ठेवल्या आहेत.

**४०७३** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३४९–३५१)

'एक वाचणारा' लिहितो की : (अ)विचारलहरी तर सती गेली! सद्धर्मदीपिका दिवटी घेऊन रात्रीची हिंडते! सतीच्या वस्त्रावरून ती कोणासही ओळखता येते! विचारलहरीची ही ज्येष्ठ कन्या कुजट पीठ व आंबलेले ताक देऊन वाचकांची निराशा करते. ब्राम्हणाच्या घरचे उष्टेही शूद्रास देऊ नये, असा नियम असल्यामुळे तो कोणालाही अन्न देऊ शकणार नाही. आता एकाच प्रश्नाचे तिने उत्तर द्यावे. एवढा उंचनीच भाव ज्या धर्मात आहे, तो धर्म सर्वांचे तारण कसे करू शकेल?

**४०७४** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३५१–३५४)

'एक मद्यपानद्वेष्टा' लिहितो की : द्राक्षरस सर्पासारखा डसतो आणि फुरशाप्रमाणे झोंबतो. म्हणून तो डोळ्यांनी पाहू नये, असे शास्त्रात वचन आहे. स्पार्टन लोक चाकरांस दारू पाजीत व त्यांच्या माकडचेष्टा मुलांना मुद्दाम दाखवून सांगत की, दारू पिऊ नये! पण सध्या स्वस्त भावात अल्पमेहनतीने ही विषतुल्य वस्तू मिळते. त्यातून दौलतीचा नाश होतो. दारूने रुधिराभिसरण बिघडते. मुखसुद्धा निस्तेज होते. आक्सिजनचा नाश होऊन अनेक रक्तविकार सुरू होतात. दर १५०० मृत्यूंपैकी ९०० दारूमुळे होतात. परिमित मद्यपान उपयुक्त आहे, हा गैरसमज आहे. दारूने शारीरिक बळ कमी होते. बालकांस वैन, वीर देणे अत्यंत घातक असते. छाकट्या स्त्रियांची मुलेही छाकटी होतात.

**४०७५** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३५४–३५५)

'एक शांतवन करणारा' लिहितो की : मिशनेरी हिंदूंना बाटवितात, म्हणून हे संपादक निंदारूपी रुदन करून नेत्राश्रूंनी आपली पत्रे भिजवितात. पण तेच लोक आपल्या धर्मास मान्य असलेल्या चाली सोडण्याचा उपदेश करतात. म्हणजे ते ढोंगी आहेत! पुनर्विवाह, जातिनिर्मूलन, समुद्रपर्यटन, यांचा प्रचार करून ते धर्मास कलंक लावतात. ख्रिस्ती जनांची मात्र कृती व रीती दोन्ही सुधारकपणाची आहेत. सुधारलेल्या हिंदूंचे वर्तन मात्र दुटप्पी दिसते. ते त्रिशंकूप्रमाणे लोंबकळतात.

**४०७६** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३५५–३५६)

'ख्रिस्तपदाश्रित नम्र सेवक' लिहितो की : दसोर ब्राह्मणाला विवाहाच्या जेवणवळीत स्त्रिया अतिशय घाणेरडे अपशब्द बोलतात. पुरुषही गुडगुडीस विचित्र पोषाख लेववून व्याह्याकडच्या स्त्रियांस उद्देशून घाणेरडे शब्द उच्चारतात. वाजंत्री लावून नाच चालतो. ही सर्वच लोकरीत घृणास्पद आहे.

**४०७७** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३५६)

एक माणूस दारूने झिंगून रस्त्याने जात होता. रस्त्यावरच्या आंब्याच्या झाडास त्याने आज्ञा केली की, 'बाजूला हो'! आणि जोरजोराने झाडास धक्के देत असता तो स्वतःच लांब जाऊन पडला. काही वेळाने तो झाडाला म्हणाला, 'आता कसा बऱ्या बोलाने दूर गेलास.' तरी लोकांनी दारू पिऊन वेडेपणा करू नये.

**४०७८** (१४ : २२, १७ नोव्हेंबर ५५, ३५६)

एका विधवेने पत्र लिहून पुनर्लग्नाची तयारी दर्शविली आहे. दोन्ही बाजू अनुकूल असल्या, तर काडीमात्र उशीर करू नये.

४०७९ (१४ : २४, १७ नोव्हेंबर ५५, ३५६)

मराठी भाषेत 'पवित्र शास्त्र' विक्रीस तयार आहे. किं. २॥ रुपये आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक २३, मुंबई, ४ डिसेंबर १८५५

४०८० (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३५७–३५९)

आपल्या गावाजवळ सोन्याची खाण आहे, हे गावकऱ्यांना ठाऊक नसते. एखाद्या सोनेपारख्याने ती दाखविल्यावर हजारो लोक सोने मिळवतात. त्याप्रमाणे खरेपणाचे अमोल्य रत्न आपल्याजवळच आहे, असे धर्मगुरू गर्जून सांगत असतात. सत्यदेवाची नित्यशः प्रार्थना करीत असा. खरेपणाविषयी खंबीर व्हा. आपले जुनाट मत सोडावे लागले, तरी अभिमानास ईषन्मात्र क्षत झाल्याबद्दल क्षती बाळगू नका. प्रत्येक मताचा पडताळा घेऊन खरे तेवढेच माना. डोळ्यात कवळ असले, तर सगळेच पिवळे दिसते. म्हणून सत्य काय ते निःपक्षपातीपणाने शोधा.

४०८० अ (इंम : ३५९)

४०८१ (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६०–३६१)

त्राक्त व बुक सोसाइटीची नवीन पुस्तके :

आळंदीची यात्रा : ज्ञानोबाविषयी माहिती असून शास्त्री व ब्राह्मण यांचा संवाद आहे.

४०८२ (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६०–३६१)

खंडोबाची गोष्ट : मोडी व बाळबोध दोन्ही लिपींत छापिले आहे.

**४०८३** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६०–३६१)

आत्मारामपंत आणि मृत्यूचा शिपायी : खरेपणाने मनोभावनेचा पालट कसा होतो, हे या पुस्तकावरून कळते.

**४०८४** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६०–३६१)

हिंदुशास्त्रातील पदार्थविज्ञान : हिंदू पदार्थविज्ञानाच्या चुक्या दाखवून ख्रिस्ती शास्त्राशी त्याची तुलना केली आहे.

**४०८५** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६०–३६१)

लहान जेन : ख्रिस्तावर भरवसा ठेवणारांचे मरण किती शांत असते, ते यात वाचावे.

**४०८६** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६०–३६१)

विद्याभ्यास केलेल्या तरुणांस व्याख्यान : रेवरेंड बाल्न्टाईनसाहेबांचे व्याख्यान छापले आहे.

**४०८६ अ** (इंम : ३६०)

**४०८७** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६२–३६४)

परमेश्वर निराकार असला, तरी त्याने देहधारण करण्याने काही बाधा येत नाही. उणेअधिक काही होत नाही. अशा घटनांनी ख्रिस्ती शास्त्रास कोणतीही विसंगती येत नाही. एकाच्या अपराधाने सर्वांवर दंड येतो, तसे एकाच्या पुण्यावरून सर्व माणसांना न्यायी ठरविता येते. चिनी दरोडेखोर तयपिंग्वान याने ८ कोटी अपराध्यांची फौज तयार केली. पाप हे समजुतदार माणसेच करतात, बालके करीत नाहीत; तरी कोणाच्या तारणाविषयी निराश होण्याचे कारण नाही. देवाने पाप निर्माण केले, असे बोलणे, म्हणजे शास्त्रवचन नसून दुर्भाषण होय.

**४०८७अ** (इम : ३६१–३६२)

**४०८८** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६४–३६६)

सद्धर्मदीपिका म्हणते की : अंधेरनगरीत टका सेर भाजी मिळते. परंतु तिथला राजा इतका मूर्ख आहे की, एखाद्या माणसाच्या अपराधासाठी दुसऱ्या निष्पाप माणसास सुळावर चढवतो. हे उदाहरण देऊन येशूच्या वधस्तंभारोहणावर टीका केली आहे. परंतु आम्हांस हे उदाहरणच अप्रयोजक आणि गैरलागू वाटते. पापी माणसाला स्वतःची योग्यता नसते. म्हणून तारकाकडे जाणे, एवढाच मार्ग उरतो. लाकूड जाळले की, त्याचे पृथक्करण होते. या उदाहरणाने आत्मा काही मिश्र पदार्थ ठरत नाही! त्रयकातले तिन्ही घटक स्वयंपूर्ण आहेत. आपण 'जीवत देव' असे वर्णन करतो. पण देव मरत नसतो, हे आपणा सर्वांनाच ठाऊक आहे.

**४०८८अ** (इम : ३६४)

**४०८९** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६६–३६९)

मद्यपानद्वेष्टा लिहितो की : दारूने मन, शक्ती व बुद्धी, ही सर्व निर्बळ होतात. बुद्धीच्या जोरावर आपण इतर जनावरांपेक्षा श्रेष्ठ बनलो. या अमूल्य देणगीचा आपण नीट उपयोग करून घ्यावा. दारूने बुद्धिविभ्रम होतो. शरीराची शुद्धही राहात नाही. शहाणपण गुंग होऊन जाते. मस्तकशूलाचे बीजारोपण होते. दर ३०० वेड्या माणसांपैकी १४५ दारू पिण्याने वेड लागलेले असतात. दारूने मनुष्य घातकी आणि क्रूर होतो. शांत स्वभावाची माणसेही हे विषतुल्य पाणी गळ्याखाली उतरल्यावर बेअब्रूची आणि उग्रप्रकृतीची बनतात. दारू हेच बहुतेक अपराधांचे मूळ आहे. कित्येक मजूर आपल्या मिळकतीचा १/३ भाग दारूपायी घालवितात. हाच पैका गरीब लोकांना अन्न, वस्त्र देण्याकरिता वापरता येईल. दारूबाज लोक स्वतःच्या हाताने स्वतःचा व कुटुंबाचा सर्वनाश घडवीत असतात.

**४०९०** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३६९–३७०)

'मिशनातील एक' लिहितो की : अनंत चतुर्दशीच्या दिवशी हिंदू लोक एका रेशमी दोऱ्यास देवता समजून त्याची पूजा करतात. ब्राह्मणभोजन करून तो अनंत दंडामध्ये बांधतात. एका संताने म्हटले आहे, देव रेशमाचा केला, तोही तुटोनिया गेला! निर्जीव वस्तूमध्ये देव नसतो. तरी खऱ्या ईश्वराची भक्ती करण्यासाठी मिशनात येऊन शुभवर्तमान वाचा.

**४०९१** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७०)

एका माणसाने भामट्याच्या भयास्तव धर्मशाळेमधील मित्राजवळ शंभर रुपये ठेवले. पण नंतर मित्र उलटला. पैसे घेतले, हे नाकारू लागला. वकिलाने त्यास युक्ती सांगितली. त्यानुसार त्याने साक्षीदारादेखत आणखी १०० रु. दिले. दुसऱ्या दिवशी सर्व पैसे परत मिळाले. कारण खोटपणा टिकत नसतो.

**४०९२** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७०–३७१)

विहिरीच्या काठावर लेकरू खेळत होते. ते मूल पडू लागले, तेव्हा एका मांजराने त्यास वाचविले. आपले शेपूट मांजराने पुढे केले. त्यास धरून मूल लोंबकळत राहिले. पंजाच्या खुणा लाटेवर उमटल्या होत्या.

**४०९३** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७१)

युपेटोरियाजवळच्या रशियन फौजेचा दोस्तांच्या फौजांनी पराभव केला. किनबर्न किल्ला जिंकून १४०२ सैनिक पकडले. दोन किल्ल्यांभोवतालचा वेढा बळकट केला आहे. रशियन सैनिकांची अवस्था कठीण आहे. रशियाच्या बादशहास याची जाणीव झाली आहे.

**४०९४** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७१–३७२)

नेपाळचा राजा जंगबहादूर याने तिबेटवर स्वारी केली.

**४०९५** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७१–३७२)

नागपूरचा वकील मेजर उल्सी यास राणी सरकारने मान्यता नाकारली.

**४०९६** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७१–३७२)

केरळच्या गरीब लोकांना मदत मिळावी, म्हणून मेजर क्यांडीने सरकारकडे अर्ज केला.

**४०९७** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७१–३७२)

जनरल अनसन यास भारताचा कमांडर इन् चीफ नेमला आहे.

**४०९८** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७१–३७२)

राजापूरचा मामलतदार निर्दोष सुटला.

**४०९९** (१४ : २३, ४ डिसेंबर ५५, ३७२)

ज्ञानाचे मूळ असणारे हिंदूंचे शास्त्र फक्त ब्राह्मणाजवळच असते. या ज्ञानाबद्दल जो संशय धरितो, त्यास ते नास्तिक आणि शापग्रस्त समजतात. तरीही हे शास्त्र अपूर्ण आहे व पूर्ण करण्यास मानवी परिश्रमांची गरज आहे. हा धर्म सुधारण्यास कोणी धैर्यवान व उदार मनाचा पुढारी आला आहे काय ? नाही. खोटा अभिमान मात्र सर्वत्र दिसतो. वेद, वेदांगे, उपांगे, व तंत्र, असे या ज्ञानाचे चार विभाग आहेत. तंत्रामध्ये गुप्त व अपवित्र कर्मे आढळतात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४१००** (१४ : २४, १७ दिसेंबर ५५, ३७४–३७४)

ख्रिस्त आकाशात गेला, तेव्हा आकाशातील मेघांनी त्यास झाकून टाकले. दहा दिवसांनंतर शिष्यांवर पवित्र आत्मा उतरला. ईश्वराने येशूची तारक म्हणून नेमणूक केली. प्रेषित मंडळी देशोदेशी हिंडू लागली. अनंत देव माणसाने निर्माण केलेल्या देवळात राहात नाही, याची सर्वांना जाणीव दिली. एका मोठ्या दिवशी आपल्या बऱ्यावाईट कर्मांची चौकशी होणार आहे, असेही ते सर्वांना सांगत. नव्या धर्माचा उदय झालेला पाहून राजे लोकांना फार भीती वाटली. ते येशूच्या शिष्यांना धाक दाखवून त्यांचा छळ करू लागले. त्यांचे रक्त जमिनीवर वाहिले, पण त्यातूनच धर्माचे बीज रुजले.

**४१०१** (१४ : २४, १७ दिसेंबर ५५, ३७४)

(१८५६) नव्या वर्षाचे पंचांग मिशनने छापले आहे. किंमत १ आणा.

**४१०२** (१४ : २४, १७ दिसेंबर ५५, ३७५)

मि. डफ हे नामांकित मिशनरी युरोपच्या दौऱ्यावरून मुंबईस परतले. नेटिवांच्या कल्याणासाठी त्यांनी २५–३० वर्षे अव्याहत श्रम केले. वेगवेगळ्या मिशनात तारणाचा उपदेश केला.

**४१०२अ** (इंम : ३७५)

**४१०३** (१४ : २४, १७ दिसेंबर ५५, ३७५–३७६)

रे. जेम्स मिचेलसाहेब दोन वर्षे विलायतेस राहून परत आले. ते पुणे मिशनात राहातील.

**४१०३ अ** (इंम : ३७५)

**४१०४** (१४ : २४, १७ दिसेंबर ५५, ३७७–३७९)

रे. डफ यांच्या अध्यक्षतेखाली फ्रीचर्चची परीक्षा झाली. ख्रिस्तवासी निजखिट्ची परंपरा कायम राहील, असा भरवसा त्यांनी व्यक्त केला. या देशाच्या सुधारणेत मिशनरीलोक अग्रेसर आहेत, हे कोणीही कबूल करील. आता सर्वच शाळांना सरकारी मदत मिळते. पण येथील अडचणी अनिवार आहेत. येथे अनेक धर्मांची मिसळ झाली आहे. माणसाची बुद्धी, शरीर व नीती धर्मानेच वृद्धिंगत होईल. अंतःकरणातल्या भावना निर्मळ बनविण्यास पुस्तकापेक्षा धर्माचा जास्त उपयोग होतो. फ्रेंच लोकांनी धर्माचे अधिष्ठान सोडल्यामुळे तेथे अंदाधुंदी निर्माण झाली. कलियुग म्हणजे कलहयुग झाले आहे. आता सत्ययुग येणार आहे. त्या गौरवी दिवसांत सर्व लोक एकाच देवबापाची भक्ती करतील.

**४१०४ अ** (इंम : ३७६–३७७)

**४१०५** (१४ : २४, १७ दिसेंबर ५५, ३८१–३८३)

एका लहानशा गोष्टीवरून दीपिकाकर्ता पाद्री लोकांना जुलमी म्हणत असतो. शाब्बाथ दिवस पाद्र्यांनी काढला नाही. तो पूर्वीचाच आहे. सप्रमाण वाद असेल, तर आम्ही तयार आहोत. पण दुर्भाषण आम्हांस आवडत नाही. एका धर्मान्तरित ख्रिस्ती माणसाने पत्नीचा ताबा मिळविण्याचा प्रयत्न केला, एवढ्यावरून तो आम्हांस दूषणे देतो. हिंदू धर्मास समुद्रापलीकडे जाण्याची मोकळीक नाही. हिंदूंनी युरोपियनांच्या तारणाचा मार्ग कधी दाखविला आहे काय ? त्यांच्या मनात दुसमानी राक्षसीण वसती करून आहे. ख्रिस्ती ग्रंथलेखकांना इतर विद्यांची माहिती नव्हती, हा त्याचा आक्षेपही चुकीचा ठरतो. कारण ईश्वराने जेवढी प्रेरणा दिली, तेवढेच त्यांनी लिहिले.

**४१०५ अ** (हंस : ३७९–३८१)

**४१०६** (१७ : २४, १७ डिसेंबर ५५, ३८३–३८४)

दारूचे उत्पन्न सोडल्यामुळे सरकारचा तोटा आहे. परंतु प्रजेला मात्र अमूल्य लाभ आहे. सरकारास थोडीशी अडचण होईल. कित्येक लोक भर ज्वानीमध्ये दारू पिऊन आपला सर्वनाश करून घेतात. सरकारने न्यायाने राज्य करावे. अनीतीकारक चित्रांवर बंदी, सती व बालहत्या प्रतिबंधक कायदा, असे सरकारने केले. जुगाऱ्यांना शिक्षा दिली. दारूचे मक्ते देऊन सरकार पापाचे धनी होते आहे. अमेरिकेतील संस्थानांत १८२६ पासून मद्यपानबंदीची चळवळ सुरू आहे आणि त्यातून जनतेचा फायदा झाला. दहापैकी नऊ अपराध दारूतून निर्माण होत आहेत. म्हणून दारूबंदी करावी, असे ‘ मद्यपानद्वेष्टा ’ पत्रात म्हणतो.

**४१०७** (१४ : २४, १७ डिसेंबर ५५, ३८५–३८८)

जगातील पदार्थ ईश्वरी अंश आहेत :

गणेशशास्त्री लेले यांनी या मतावर धूमकेतू पत्रातून टीका केली आहे. पण ईश्वर जर पवित्र आहे, तर देवतांच्या पापी आचरणाची कारणमीमांसा कशी करता येईल? पारशी शास्त्रात होर्मज् हे पुण्याचे व अरिमान हे पापाचे अशी दैवते मानली आहेत. पुण्य केले, तर स्वर्गात देवकन्यांचे सहवाससुख मिळेल, असे अर्जुनगीता सांगते. यातून देवलोक मिळविण्याचा पोरकट उपाय दिसतो. देवाला नीचत्व येऊन त्यासही स्त्री आहे, असे सिद्ध होते. पारलौकिक सुख ऐहिकाच्या पातळीवर उतरते आणि स्वर्गातही पापापासून मुक्ती नाही, याची खात्री पटते. सैतान हा पूर्वी ईश्वराचा दूत होता. तो स्वेच्छेने भ्रष्ट झाला. पापामुळे सर्पाला कायमचा मृद्‌भक्षक बनविलेले आहे. असे उत्तर अमेरिकन मिशनातील ख्रिस्ती याने दिले आहे.

४१०८ (१४ : २४, १७ डिसेंबर ५५, ३८८)

मुलींच्या शाळेतील परीक्षेस अनेक सभ्य गृहस्थ उपस्थित होते. २५० मुलींची परीक्षा झाली. गेल्या वर्षापेक्षा ७५ कन्या जास्त आहेत. मुलींनी प्रश्नांची चांगली उत्तरे दिल्ही.

४१०९ (१४ : २४, १७ डिसेंबर ५५, ३८८)

एल्फिन्स्तन कॉलेज व पुणे कॉलेज यांची वार्षिक परीक्षा :

यावर्षी परीक्षेसाठी पंच नेमले असून त्यांना ५० रुपये रोजप्रमाणे मानधन दिले जाईल. कपतान रीवझ्, बारिस्टर हावर्ड, प्रो. फ्रेजर, सर्जन हेन्स व मि. जी. पोप, कॅ. कूपर, रे. अंडरसन व मि. हिल्ल हे परीक्षा घेतील. शिकवणारेच परीक्षक असल्यामुळे पक्षपात होतो, अशी शंका आता राहणार नाही.

४११० (१४ : २४, १७ डिसेंबर ५५, ३८८)

नामदार गवरनर सुरतेच्या दौऱ्यावरून परत आले.

४१११ (१४ : २४, १७ डिसेंबर ५५, ३८८)

इंग्रजी मराठी कोश :

मि. मोल्स्वर्थ यांची डिक्शनरी ज्यांना हवी असेल, त्यांनी एल्फिन्स्तनच्या सेक्रेटरीसाहेबाकडे नाव नोंदवावे.

(१) या पुस्तकाची सगळी किंमत २८ रुपये पडतील. ती सर्व रक्कम आगाऊ भरावी.

(२) वर्गणीदार लोकांस किंवा त्यांच्या मनुष्यास मुंबईस व पुण्यास मात्र प्रती वाटल्या जातील.

(३) नव्वद पृष्ठांचा एकेक भाग, असे दोन महिन्यांत भाग निघतील.

(४) आता ५३ पानांचा एक वांटण्यास तयार झाला आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४११२** (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, ३–५)

ज्ञानोदय सुरू झाला, तेव्हा पंधरा वर्षांपूर्वी खिस्ती धर्मप्रतिपादन करणाऱ्या वर्तमानकागदाची फार गरज होती. काही दुराभिमानी हिंदू व काहा नास्तिक इतर वृत्तपत्रे चालवीत होते. पहिल्यांदा श्रीमंत शेषाद्रीचे प्रकरण गाजले. ज्ञानसिंधु पत्राने खिस्ती धर्माची हेलना सुरू केली. उपदेशचंद्रिका, विचारलहरी, सद्धर्मदीपिका एकमेकींच्या प्रतिबिंबरूप आवृत्या, नास्तिक टाम पेन वगैरेंचे लेख वाचून टीका करीत. रे. ह्यूमने १८४५ पासून दहा वर्षे ज्ञानोदयाचे काम चालविले. १८५२ मध्ये विचारलहरीशी ज्ञानोदयास सामना करावा लागला. सध्या सद्धर्मदीपिकाही फार बीभत्स भाषण करते. पण आपल्या आईप्रमाणे ती निघून जाणार, यात शंका नाही! खिस्ती धर्माची बखर छापून आम्ही या धर्माच्या सार्वत्रिक प्रसाराचे प्रमाण दिल्हे. लोकांच्या मनात खरेपणाचा प्रकाश पाडण्यास ज्ञानोदय हे उत्तम साधन आहे. विद्याभ्यास आणि सुधारणूक यांवर आमचे सतत लक्ष राहील. ज्ञानोदयाचे घेणारे आणि वाचणारे वाढत आहेत.

**४११२अ** (इंम : १–२)

**४११३** (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, ५)

अडीच वर्षे विलायतेत राहून रे. ई. रॉजर्ससाहेब परत आले. ते मालेगांव मिशनात काम करतील.

**४११३अ** (इंम : ५)

४११४ (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, ५)

विलायतेहून रे. टी. हंटरसाहेब मडमेसह परत आले. ते जनरल असेंब्ली खात्यात आहेत.

'पीक फार आहे व कामकरी थोडे' आहेत.

४११४अ (इम : ५)

४११५ (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, ६)

रे. फेरब्यांक : फेरब्यांक १९ आक्टोबरला अमेरिकेस गेले आहेत.

४११५अ (इम : ६)

४११६ (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, ६)

एक मित्र पत्रात लिहिती की : ज्या जातीत स्त्रीला पुनर्विवाहाची परवानगी नाही, त्या जातीत पुरुषासही दुसरा विवाह करण्यास कायद्याने बंदी असावी. बालहत्येविरुद्ध कायदा केला, तसा हाही कायदा असावा. सद्धर्मदीपिका व विचारलहरी यांनी अज्ञानरूप स्वरूप दाखवून आम्हांस सतत फसविले. त्या सुंदर व चतुर असल्या, तरी त्यांच्या नादी लागू नये.

४११६अ (इम : ६)

४११७ (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, ७-१७)

येशूचा जन्म, प्रगट होण्याची सूचना, तीन वल्हांडण, गालिलात प्रयाण, येरूशलेमात आगमन, प्रभूचे मरण, आकाशात जाणे, या घटनांचा गोशवारा अध्याय व ओवीसह मात्थी, मार्कस, लूका व योहान यांच्या वर्तमानावरून दिला आहे.

४११८ (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, १७–२०)

दरवर्षी आपला ग्रामोपाध्या दक्षिणेच्या लालचीने खोटे सांगून आम्हांस फसवितो. राज-मंत्री, चंद्रबळ, असल्या कल्पित गोष्टी सांगतो. पण आम्ही जे भविष्य देतो, ते खरे होईल. यंदा पाण्याचा तोटा झाला, तरी विद्या मात्र वाढेल. यंत्रांचा प्रसार होईल. उद्योगी लोक सुखी होतील, तर व्यसनी भिकारी होतील. पण जो येशूवर विश्वासतो, तोच सुखी होईल. आकाशाच्या राज्यात अस्वल व कालवड सुखाने एकत्र नांदतील. धुळीत निजलेल्यापैकी पुण्यवान लोक सुखाने राहातील आणि पापी लोक निंदेस व धिक्कारास पात्र ठरतील.

४११९ (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, २०–२२)

हिंदू शास्त्रात ईश्वर एक आहे व देव अनेक आहेत, असे सांगितले जाते. पण सृष्टिनिर्मितीचे श्रेय मात्र काहींनी ब्रह्मदेवास, तर काहींनी शिवास दिले आहे. नामरूपात्मक सृष्टी म्हणजेच ईश्वर, असेही काही समजतात. लिंगपुराणानुसार त्रिगुणात्मक प्रकृतीतून ब्रह्मदेवाचा उदय झाला. तेतीस कोटी देव : यातील कोटी शब्द श्रेष्ठत्व, प्रकार दर्शवितो. गणेशपुराणात गणेशास सृष्टीच्या उत्पत्तीचे श्रेय दिले आहे ! रामदास म्हणतात की, जग हा एक अभाव आहे आणि अभावाला कोणी उत्पन्न करीत नाही ! एकंदरीत परस्परविरोधी वचनेच फार आहेत. शेकडो देव, शेकडो पोथ्या, यांची गर्दी आढळते. म्हणून खऱ्याचा शोध करा, असे 'सत्यवक्ता' आपल्या पत्रात लिहितो.

४१२० (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, २२–२४)

'एक ख्रिस्ती' पत्रात म्हणतो : आमचा देव भस्म करणारा अग्नी आहे. याविषयी कोणास वादविवाद करावयाचा असेल, तर मिशनाची दारे सतत उघडी आहेत. सैतान म्हणतो की, देवाचे नाव उगीचच घेऊ नये. पण येशू सांगतो की, अखंड प्रार्थना करावी. मनामध्ये पूज्यभावना कायम ठेवून देवाचे नेहमी नाव घ्यावे.

**४१२१** (१५ : १, १ ज्यानुएरी ५६, २४)

कलकत्ता असेंब्लीत पुनर्विवाह कायद्याचा खर्डा वाचून दाखविला गेला. मि. ग्रांट व कालविल यांनी विधवांची हीन दशा समजावून दिली. विधवांचे केशवपन करणे आणि शुभसमारंभात त्यांना बाजूस ठेवणे, ही गोष्ट सुज्ञ व विद्वान हिंदूंनाही आवडत नाही. (वर्तमानदीपिकावरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक २, मुंबई, १५ ज्यानुएरी १८५६

**४१२२** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, २६–२८)

सन १८०४ ते ११ या काळात सेरामपूर (बंगाल) येथे नवा करार, तर १८१५ त जुना करार छापला गेला. पण त्याची छपाई बेढब व भाषा अगदी गांवढळ होती. म्हणून १८१७ त मात्थीच्या वर्तमानाचा नवा तर्जुमा तयार झाला. १८२६, १८३० या वर्षी पवित्र शास्त्राच्या आवृत्त्या निघाल्या. रेवरंड डिक्सननी गीतांचे भाषांतर केले. १८४२ मध्ये सर्व भाषांतरांची हुडसून खडसून तपासणी करण्यात आली. आता पवित्र शास्त्र पुन्हा प्रसिद्ध झाले. हा देवाचा पवित्र शब्द आहे. त्याचा सर्वांनी विचार करावा.

**४१२२अ** (इंग्र : २५–२६)

**४१२३** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, २८–२९)

'एक मित्र' लिहितो की : खिस्ती शास्त्राचे मुख्य सिद्धांत व खरेपणाची प्रमाणे समजण्याकरिता ईश्वरविद्येचा ग्रंथ मराठीत हवा होता. हे काही अल्पमती व अविद्य माणसाचे काम नव्हे. कान्सवेलच्या पुस्तकावरून मी काही तर्जुमे केले, ते प्रसिद्ध करावेत.

**४१२४** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, २९-३०)

सुप्रकाशित बुद्धी व विवेक यांनी विचार केला, तरच धर्माची तत्त्वे समजून येतात. आपल्या कर्तव्यकर्माची जाणीव देणाऱ्या शास्त्रास सृष्टिजन्म ईश्वरविद्या म्हणावे. म्हणून प्रश्नोत्तररूपाने एकेक प्रकरण रचले आहे.

**४१२५** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३०)

जो स्वतः सनातन असून वस्तुरूप जगाचा कर्ता-नियंता आहे व स्वतः परिपूर्ण आहे, त्यास ईश्वर म्हणावे. वस्तुमात्रांवरून त्याचे अस्तित्व कळते. तो स्वतः अनादि असून अपालट आहे. नास्तित्वापासून अस्तित्व होत नाही. म्हणून तोच निर्माणकर्ता आहे. या जगातील नियमितपणा व सुमेळ त्याच्या असाधारण सत्तेने झाली आहेत.

**४१२६** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३०)

चार शुभवर्तमानांचा गोशवारा पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला. अमेरिकन मिशन छापखान्यात मिळेल.

**४१२७** (१५ : २, १५, ज्यानुएरी ५६, ३१-३३)

शुभवर्तमानाच्या चारी पुस्तकांची माहिती होण्यास या गोशवाऱ्याची फार आवश्यकता आहे. चारी प्रकरणांचा नीट मेळ पडला पाहिजे. एकच गोष्ट त्यात वेगवेगळ्या प्रकारे लिहिली आहे. भिन्नभिन्न लेखक एकेका गोष्टीची साक्ष देत आहेत. येशूच्या हयातीतल्या बहुतेक गोष्टी चारी ठिकाणी आहेत. त्यावरून काळाचा क्रम समजतो. पौलस हा त्याच्या मरणाचा साक्षीदार असल्यामुळे त्याचे विस्तृत वर्णन दिले आहे.

**४१२७अ** (इंम : ३१)

**४१२८** (१५ : १, १५ ज्यानुएरी ५६, ३३–३४)

या वर्षात फ्रीचर्चमिशन मंडळीने १८ जणांना बाप्तिस्मा दिल्हा. २९ जण नियमितपणाने उपदेश ऐकतात. रे. नेजूबिटचे कार्य सर्वांनाच आठवते.

**४१२८अ** (इंम : ३३)

**४१२९** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३४–३५)

एतद्देशीय लोक मोकळ्या मनाने खिस्ती शास्त्र वाचीत नाहीत. आपलाच धर्म खरा स्थापण्यासाठी पूर्वग्रह धरून वाचतात. येशू हा पवित्र आत्म्याच्या साहाय्यानेच देव होतो. वरपांगी पतकर किंवा तोंडचा आदर यांनी कधीही तारण होणार नाही. ईश्वराची इच्छा येशूच्या बोलण्यामधून दिसते. म्हणून दीपिकाकर्त्याने आमच्या शास्त्राची शास्त्रशुद्ध माहिती करून घ्यावी. नंतरच वाद करावा.

**४१२९अ** (इंम : ३४)

**४१३०** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३५–३७)

'ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : साताऱ्यात पिशाचयोनी आहे की नाही, याची सभेत चर्चा झाली, तेव्हा अध्यक्ष म्हणाले की, 'सर्व शास्त्रे मनोकल्पित आहेत. शास्त्रातील विचार अपूर्ण व पोरके आहेत. या जगात पिशाच योनी मुळीच नाही.' अशा रीतीने ईश्वराच्या व पापपुण्याच्या कल्पनेस या नास्तिकाने हरताळ फासला. हे अध्यक्ष हेडमास्तर असल्यामुळे त्यांचे विद्यार्थीही अशाच मताचे होतील, अशी भीती वाटते.

**४१३१** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३७-३८)

आपण पाप करून जो ईश्वरास दोषी ठरवितो, त्याला नास्तिक म्हणावे. ख्रिस्ती धर्माच्या आगमनाने भूदेवास कंप सुटला. त्या कंपनातून नास्तिकाचे मत बोलत आहे! आपली लबाडी उघडी पडू नये, म्हणून पाप-पुण्याचे श्रेयापश्रेय ते ईश्वराकडे देत आहेत. पाप आहेच आणि त्याच्या प्रायश्चिताचा उपाय शोधला पाहिजे सदसद्विचाराचा उपयोग करून वाईट काय ते नक्की करा. ईश्वराचे अस्तित्व नाकारून बुद्धीचा दुरुपयोग करू नका. नास्तिकांच्या मूर्खपणाने नीतिशास्त्रज्ञांची आजवरची मेहनत फुकट गेली!

**४१३२** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३८)

सन १८५५ मधील ज्ञानोदयातील लेखांची अनुक्रमणिका पुढील अंकात छापली जाईल.

**४१३३** (१५ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३९)

आमच्या देशात विद्येची अभिरुची फारशी नाही. ज्ञानाबाबत थंडाई फारच दिसते. आळसरूप शत्रूचा अंमल सर्वत्र दिसतो. उद्या आणि मग या शब्दांनी सगळा नाश केला. हे दोन शब्द भाषेत नसते, तरी बरे झाले असते. शेकडा पाच लोकदेखील वेळेचा सद्व्यय करीत नाहीत. गाण्याची बैठक व नाटक यांत लोक पैसा व वेळ घालवतात. ज्ञानप्रसारक सभेत मात्र दहा लोकही जमत नाहीत. इतर सभांचाही क्षय होतो आहे. एल्फिन्स्तनचे विद्यार्थी मात्र नियमितपणे एकत्र येऊन निबंध वाचतात. (वर्तमानदीपिकावरून)

४१३४ (१६ : २, १५ ज्यानुएरी ५६, ३९–४०)

नेटिवांतील विधवांची स्थिती गुलामांपेक्षा हलकट आहे. काही लोक सहानुभूतीने विचार करतात. पण कोणीही पुढारी होण्यास तयार नाही. कलकत्त्याच्या अगोदर बंबे असोसिएशन स्थापन झाली. पुण्याच्या सभेने पुनर्विवाह प्रकरणी सह्यांचा अर्ज कलकत्त्यास पाठवून दिला. मयत गंगाधरशास्त्री फडक्यांनी याबाबत फार प्रयत्न केले. मयत बाळशास्त्री जांभेकर हे तर पश्चिम हिंदुस्थानातले एक रत्नच होऊन गेले. बऱ्याच शास्त्रीलोकांचे गुह्यमत पुनर्विवाहास अनुकूल आहे. पण त्यांचा पोटार्थीपणा आड येतो. थेरडे लोक काही करणार नाहीत. वैधव्याहून गोरूपी स्त्रियांस मुक्त करणे, हे कार्य तरुण पुढाऱ्यांनी करावयाचे आहे. काम केले, तर ईश्वर यश देईल.
(वर्तमानदीपिकावरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक ३, मुंबई, १ फेब्रुवारी १८५६

४१३५ (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४१–४२)

हे प्राचीन गाव (बेथलहेम) यरूशलेमजवळ आहे. हे दावीद राजाचे वतनगाव होते. येशूचा जन्म येथे झाला. मेंढक्यास देवदूताचे दर्शन झाले. जेरोमने याच गावात राहून पवित्र शास्त्राचा लातिनमध्ये तर्जमा केला. पांढऱ्या दगडांचे हे गांव पवित्र आहे.

**४१३६** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४२–४३)

सृष्टीतील वस्तुमात्रावरून ईश्वराचे अस्तित्व निभ्रांत पटते. ईश्वर नाही, अशी कल्पना करून आपण स्वतःला फसवितो. भ्रष्ट आणि पापिष्ट स्वभावामुळे माणूस पाप करतो. ईश्वरावरील विश्वास हा धर्माचा पाया आणि मूळ होय. ईश्वर हा जगाचा कर्ता-नियंता असून तो परिपूर्ण आहे. सर्वश्रेष्ठ आहे. अनादि व निर्विकार ईश्वराने विकारयुक्त सृष्टी निर्माण केली. म्हणून त्या दोघांचे अद्वैत अशक्य आहे. कार्य व कर्ता भिन्नच असतात. सृष्टीतील अनात्मिक पदार्थ जड व ज्ञानशून्य आहेत. त्यांना ईश्वरी अंश मानले, तर ईश्वर जड व ज्ञानशून्य ठरतो ! अनेक सुबुद्ध प्राण्यांत अज्ञान, मूढता, कुबुद्धि, दुष्कर्म, ही दिसतात. पण ईश्वर तर नित्य, सर्वज्ञानी, सुज्ञ, पवित्र व सत्कर्मी आहे.

**४१३७** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४३–४५)

जुन्या व नव्या करारांत ६६ प्रकरणे आहेत. दीड हजार वर्षे हे शास्त्र तयार होत होते. इब्री, खाल्दी व हेल्लेनी ग्रीक अशा तीन भाषांत त्यातील मजकूर सापडतो. याचे लेखक तीसाहून अधिक असावेत. नेमशास्त्र, कविता, भविष्य व उपदेश, हेच मुख्य विषय आहेत. 'प्रघटविणे' हे निखालस भविष्यविषयक पुस्तक आहे. काही विद्वानांनी ह्यात ओव्यांची आणि अध्यायांची भर घातली.

**४१३८** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४५–४६)

उदयप्रभा : नेटिव ख्रिस्ती लोकांनी चालत्या वर्षाच्या प्रारंभापासून हे पत्र सुरू केले आहे. हे मासिक म्हणजे ख्रिस्ती बांधवांचा 'दिनकर' व्हावा, हीच सदिच्छा आहे ! कित्येक शिक्षित लोक मराठीस तुच्छ लेखतात. म्हणून या मराठी मासिकाचे कौतुक करावयास हवे. त्यांनी अस्सल मराठीची पद्धत धरून लिहावे. पोरकट मजकूर लिहू नये. (एतद्देशीय ख्रिस्ती लोकांनी सुरू केलेले पहिले मराठी मासिक)

**४१३८अ** (इंम : ४५)

**४१३९** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४७–४८)

दीपिकेने जगिक न्यायाधीश व खरा न्यायाधीश ईश्वर असा भेद करून पवित्र शास्त्रावर टीका केली. परंतु बरे आणि वाईट यांतील निवड आपलट व सार्वकालिक आहे. हिंदू देव तर कर्तुमकर्तुम् समर्थ असतात! पण आम्ही मात्र असे मानतो की, ईश्वराचे न्यायीपण सार्वकालिक आहे. तो पृथ्वीचा न्यायाधीश आहे. देवाचे सामर्थ्य आणि न्यायी वृत्ती नेहमी टिकून राहणार. येशूने स्वतः मरणदंड सोसून बहुतांवरची खंडणी भरून दिली.

**४१३९ अ** (इंम : ४६–४७)

**४१४०** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४८)

लार्ड डल्हौसी यांच्या जागी वैकोंट क्यानिंग ग. ज. म्हणून आले. त्यांच्या स्वागताचा मोठा समारंभ झाला. त्यांच्या कारकीर्दीत सर्वत्र आबादानी व विद्याप्रसार, शांतता आणि सुधारणुक व्हावीत; तसेच, खिस्ती धर्माचा प्रसार व्हावा, अशी प्रार्थना आहे.

**४१४० अ** (इंम : ४८)

**४१४१** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ४९–५१)

गोसाव्याचे भगवे वस्त्र, रामानंदीचा खाकी लंगोट, रामसनीचा पटका, परनामीच्या तुळशीमाळा, नेमावताचे दंडवत, दादूची कफणी, सतनामीचा मैला पोषाक, मानभावाचा काळा पोषाख, विषयपंथाची शक्तिपूजा, गोरखाची सैली, वारकऱ्यांचा टाळमृदंग, कबीरपंथाचा नारळ, हे सगळे पंथ म्हणजे भुसके लड्डू आहेत. शेवटी लाखीराम बाबास पटले की, येशू हाच खरा तारणारा आहे.

**४१४२** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५१–५२)

सन १८५५ मध्ये : रशियाची युद्धात पीछेहाट झाल्यामुळे स्वातंत्र्यप्रेमी जगास फार आनंद झाला. लॉर्ड डलहौसीने अनेक राजांची संस्थाने खालसा करून राजांस नामधारी बनविले. पुनर्विवाहाचा आक्ट लवकर व्हावा, म्हणून सुज्ञ लोकांनी कौन्सिलकडे अर्जी पाठविली. मुंबईमध्ये विद्येचा प्रसार वाढला. वृत्तपत्रांची संख्याही वाढत आहे.

**४१४३** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५२–५३)

रे. जेम्स मिचलसाहेब म्हणाले की, ३० वर्षे भारतात राहिल्यामुळे मला इंग्लंडदेशच परका वाटू लागला ! इकडे विद्या कमी आहे. चांगल्या इमारती नाहीत. लंदन शहरात ७ मजली इमारती आहेत. ब्रिटनमध्ये प्रगत कृषिकर्म, लोखंडी रस्ते, श्रेष्ठ कलाकौशल्य, उत्कृष्ट पाटबंधारे, इत्यादी सोयी आहेत. विद्यावृद्धीवर ते लाखो रुपये खर्च करतात. घरातील धुराचाही चांगला उपयोग करतात.

**४१४४** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५३)

इष्ट सनास ४ ने भाग गेला, तर फेब्रुआरीचे २९ दिवस धरावेत. काही बाकी उरली, तर २८ दिवस धरावेत.

**४१४५** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५३–५४)

रशियन लोकांनी कारस किल्ला व देश जिंकले. दोस्त फौजांना मागे हटावे लागले. आस्ट्रियाने तहाची तयारी चालविली आहे.

**४१४६** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५४–५५)

कल्याण ते नेरळ आगीची गाडी सुरू होणार.

**४१४७** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५४–५५)

तुर्की सरकारने गुलामगिरीवर निर्बंध घातले.

**४१४८** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५४–५५)

कयानिंगच्या कारकीर्दीत अयोध्या व इंदूर संस्थाने खालसा होणार.

**४१४९** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५५–५६)

सौधाम्पटनहून इंग्लंडला जाणाऱ्या टपालाचे हासील कमी झाले आहे.

**४१५०** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५६)

नीळकंठ गोरेशास्त्री महाराज दिलीपसिंगाबरोबर विलायतेस गेले होते. तेथे १८ महिने राहून परत आले. हे शास्त्री पूर्वी हिंदू धर्माचे फार अभिमानी होते. पण त्यांचा मनःपाल्ट होऊन त्यांनी खिस्ती धर्म स्वीकारला. आता ते काशी मिशनात राहातील. (उदयप्रभावरून)

**४१५० अ** (इंम : ५६)

**४१५१** (१५ : ३, १ फेब्रुवारी ५६, ५६)

जेरोम मडमीने 'खिस्ती धर्मार्थ प्राणार्पण करणाऱ्यांचा संक्षिप्त वृत्तांत' हे पुस्तक इंग्रजीवरून तर्जुमा करून प्रसिद्ध केले. किं. १० आणे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४१७२** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ५७–५८)

मोशाने पाच पुस्तके लिहिली. त्यात पहिले उत्पत्तिविषयक आहे. जगाची उत्पत्ती, जलप्रलय, विवाहाचा नेम, शाब्बाथ, सैतानाची भूलथाप व ईश्वरी नेम त्यातून कळतात. नोहाच्या पुत्रावरून जगाचे तीन विभाग झाल्यानंतर बाबेल शहराची रचना झाली. आब्राहामाचे कुटुंब, दाविद बंधूंची दुसमानी, यांचे वर्णन आहे. मनुष्यमात्राचा उद्धार कसा होईल, ते बाळबोध करून यात सांगितलेले आहे. देवाने अब्राहामाचा वंश निवडून त्यास नेम लावून दिल्हे. तेव्हापासून ईश्वराची भक्ती चालत आली.

**४१७३** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ५८–६१)

ईश्वरप्रेरणा देऊन हे शास्त्र भक्ताकडून लिहवून घेतले. त्याचे २ भाग म्हणजे जुना व नवा करार आहेत. शिवाय ४ शुभवर्तमाने व काही प्रकट पत्रे आहेत. भविष्यवादी मलाखीनंतर या शास्त्रास नवी भर मिळाली नाही. अपाक्रिफा हा इतिहासग्रंथ आहे. पहिल्या जेम्सच्या कारकीर्दीत शास्त्राचे इंग्रजीत भाषांतर झाले. एकूण २६० भाषांत त्याचा तर्जुमा झाला. ईश्वरी शास्त्र फार अगत्याचे आहे.

**४१७४** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ६३–६५)

कारेण लोक ब्रह्मदेशात व सयामात राहातात. इरवादी नदीच्या खोऱ्यात त्यांची दाट वस्ती आहे. त्यांची ४ मुख्य गोते आहेत. त्यांपैकी लाल वस्त्रे घालणारांना लाल कारेण म्हणतात. सध्या तेथे बौद्ध धर्म चालतो. पण मिशनेरीही त्यांचे अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न करीत आहेत. कारेणात मुखपाठ कविता आहेत. विशेष म्हणजे खिस्ती तत्त्वांशी त्यांचे फार साम्य आढळते. कारेण लोकांत पिशाचांची भक्ती आहे !

**४१८४ अ** (इंम : ६१–६३)

**४१८५** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ६५–६६)
सध्या नगर मिशनात ४ मंडळ्या आहेत. ८७ लोक उपदेश ऐकतात आणि १७९ जणांचा बाप्तिस्मा झाला. रे. बार्कर यांनी खोकरला मिशन सुरू केले.

**४१८५ अ** (इंम : ६५)

**४१८६** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ६६)
पवित्रशास्त्र प्रसार सहायक मंडळाची सभा टौनहालात भरेल. २० तारखेस.

**४१८६ अ** (इंम : ६६)

**४१८७** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ६६–६७)
लोकांनी स्वतः होऊन शाळा काढल्या, तर सरकार मदत करणार आहे. सगळेच सरकार करू शकत नाही. पगार, इमारती, वगैरेबाबत काही कमतायी पडली, तर सरकार अनुदान देईल. सरकारातून नेमलेला मनुष्य या शाळांची परीक्षा घेईल. धर्मसंबंधी शिक्षणाबाबत सरकार कसलीही चौकशी करणार नाही.

**४१८७ अ** (इंम : ६६–६९)

**४१५८** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ७०–७१)

'शोक करणारी' आपल्या पत्रात म्हणते की : गावव्या गावात जमा भरते. मतोबाच्या नावाने लोक गळ टोचून घेतात. ते देवाकरिता हे करीत असले, तरीही त्यांच्या किंकाळ्या ऐकवत नाहीत. कित्येक अशक्त स्त्रिया कायमचे पाठीचे दुखणे लावून घेतात. गळवादी हा एक भयंकर नवस आहे. या अघोर कर्मानें ईश्वरास दुःखच होईल. म्हणून स्त्रियानी अशा अविचारी नवसाच्या भरीस पडू नये व पाठीचे कातडे लोंबवून येऊ नये.

**४१५८अ** (इंम : ६९)

**४१५९** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ७१–७२)

एका दारूबाज सुतारास स्वप्न पडले की, आपण जिन्यावरून पडून नरकाचे दारात गेलो. रेवरंड टेनेटने त्यास चांगला उपदेश करून ख्रिस्ताचा भक्त बनविले. पण त्याच्या मित्रांनी त्यास पुन्हा दारूचा मोह पाडला. छाकटा होऊन तो खरोखर जिन्यावरून पडून मेला. म्हणून म्हणतात : दारूबाज देवाच्या राज्याचे वतन पावणार नाही. पापाची क्षमा मागून येशूकडे आले पाहिजे.

**४१६०** (१५ : ४, १५ फेब्रुवारी ५६, ७२)

लंडन : प्राचीन काळच्या निनेवे आणि बाबेलप्रमाणे हे शहर भव्य आहे. लंडनचा विस्तार ७० चौ. मैल आहे. ७९४ देवळे, १५ नाटकगृहे व ५ हजार कलालखाने आहेत. सरकारी इमारतींचे भाडे १२ कोटी रुपये येते. शेकडो धंदेवाईकांची दुकाने तेथे आढळतात. मात्र १२ हजार उनाड मुले दुःसंगतीने चोरीच्या कामात गुंतली आहेत. ३० हजार लोक फक्त चोरी करून जगतात. ३० लाख टन कोळसा यंत्रसामग्रीसाठी वापरला जातो.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४१६१** (१५ : ५, ३ मार्च ५६, ७३–७४)

निर्गम : मोशाच्या दुसऱ्या पुस्तकास निर्गम म्हणतात. इस्रायलींच्या दासपणाची हकीगत त्यात आढळते. अब्राहामाच्या कुळात देवपुत्र जन्मणार, असे भविष्य होते. पण त्याचे नातलग मूर्तिपूजेत गुंग राहून देवास विसरले. मिसरमध्ये तर सर्पपूजा होई. मांत्रिकांना फार मान देत. हट्टीपणा करून ते ४० वर्षे अरण्यात भटकत राहिले. तेव्हा सिना डोंगरावर ईश्वराने मोश्याकडून दहा आज्ञा जाहीर केल्या. ईश्वराची आज्ञा मोडली, तर मनुष्य पापाच्या बंधनात अडकतो.

**४१६२** (१५ : ५, ३ मार्च ५६, ७४–७७)

इतिहास, पवित्रता, शुद्धता, प्रगल्भता व धर्मप्रसार, यांवरून हे ईश्वरप्रणित शास्त्र आहे, याची खात्री पटते. यास विधर्मी इतिहासकारांचीही साक्ष प्रमाण आहे. चमत्कारावरूनही त्याची खात्री पटते. फक्त ईश्वरच भविष्य वर्तवू शकतो. त्रयकाबद्दल या शास्त्रात अतिशय प्रगल्भ विचार आहेत. त्यांच्यात संपूर्ण मेळ आढळतो. काहीही विसंगती नाही. अनेक मूर्तिपूजकांना प्रबोधित करून या शास्त्राने सद्धर्मी बनविले. याचे ग्रंथकार धार्मिक होते. पापाचा त्यांनी निषेध केला. म्हणूनच मोठी छळणूक होऊनही हा धर्म वाढत गेला. या शास्त्राने मानवी मनामध्ये टिकाऊ पालट होतो.

**४१६३** (१५ : ५, ३ मार्च ५६, ७७)

रे. व्हैटसाहेब मडमीसह मुंबईस आले. आमचे प्रियोत्तम आकाशवासी निजबिटसाहेब यांच्या पदावर त्यांची नेमणूक झाली.

**४१६३ अ** (इंम : ७७)

**४१६४** (१५ : ५, ३ मार्च ५६, ७८)

मुंबईत विद्यार्थ्यांची संयुक्त मंडळी स्थापन झाली. कोणत्याही शाळेतील विद्यार्थ्यांस सभासद होता येईल.

**४१६४ अ** (इंग : ७७)

**४१६५** (१५ : ५, ३ मार्च ५६, ८०–८२)

लोकात अनेक दंतकथा केवळ मुखजबानी चालत आल्या आहेत. मातीपासून पुरुष जन्मला आणि त्याच्या फासोळीतून स्त्री उत्पन्न केली. ही दंतकथा बायबलशी साम्य दर्शविते. नौकपलो या सैतानाने मानवास पापामध्ये अडकविले. बागेतील फळाची चव घेणे, त्यावरून शाप मिळून मानवाचे पाप चालू होणे, भुताच्या करणीने मानवाचा अधःपात. हे सारे कथानक खिस्ती शास्त्राशी एकरूपता दाखविते. फक्त देवाचे नाव यवाह असे सांगतात.

**४१६५ अ** (इंग : ७८–७९)

**४१६६** (१५ : ५, ३ मार्च ५६, ८२–८५)

मोश्याने धूर्तपणा करून चमत्कार घडविले, असा आरोप सद्धर्मदीपिकेने केला आहे. पण हे स्वाभाविक चमत्कार होते. उदा. पटकीने मिसर देशातील जनावरे मेली, म्हणून या बखरीच्या खरेपणाबद्दल शंका घेण्यात अर्थ नाही. मोश्याने पाण्यावर काठी मारून नील नदीचे पाणी रक्तमय केले व फारो राजांचा गर्व उतरविला. जळत झुडपामध्ये देव मोश्या प्रगट झाला. नास्तिक लोकांना यातले काही पटत नाही. प्राचीन मिसरचे रहिवासी ज्ञानी व पुण्यवान होते.

**४१६७** (१५ : ५, ३ मार्च ५६, ८५-८६)

सुधारलेल्या लोकांत सध्या तीन प्रकार दिसतात :

१) बुद्धिवादी, २) पुराणावर अविश्वास, पण वेदांवर विश्वास ठेवणारे; ३) खिस्ती मतच खरे आहे, असे समजणारे. क्रमांक दोनचे वेदोभिमानी सुधारणेसाठी काहीच प्रयत्न करीत नाहीत. राजश्री हरि केशवजी व भिकोबा लक्ष्मण यांची ज्ञानेश्वरीवर फार श्रद्धा आहे. परंतु हा ग्रंथसुद्धा कसोटीस लावून तपासला पाहिजे. गुंफेबाहेर येऊन विशती शकाच्या सूर्याच्या प्रकाशात पाहा की, हा काचमणी आहे की हिरा आहे. अज्ञानाचे पोते अगर भ्रमाचा भोपळा वाहून नेण्यात अर्थ नाही.

**४१६८** (१५ : ५, ३ मार्च ५६, ८६-८७)

दुकानात किंवा रस्त्यावर अश्लील तैलचित्रे, नकाशे, बीभत्स गाणी व लावण्या विक्रीस ठेवल्या, अगर मोठ्याने गाणी म्हटली, तर त्यांना शंभर रुपये दंड व ३ महिने सक्त मजुरीची शिक्षा होईल. माजिस्त्रेत अशी पुस्तके व चित्रे ताब्यात घेऊन त्यांचा त्वरित नाश करील. (गवर्नमेंट गॅझेट)

**४१६९** (१५ : ५, ३ मार्च ५६ ८७-८८)

गवरनर नामदार एलफिन्स्तन यांच्या उपस्थितीत शिवरीच्या विद्यार्थ्यांनी मातीची भांडी सर्व लोकांदेखत करून दाखविली. गावात उनाडक्या व चोऱ्या करणाऱ्या मुलांना हा उद्योग देऊन या शाळेने सुधारले आहे. ठग आणि टवळे लोक बालकांना वाममार्गास नेतात. चोऱ्या व शिवीगाळी यांपेक्षा काही उद्योग शिकणे त्यांच्या फायद्याचे आहे. उनाडासारख्या फिरणाऱ्या मुलांना उद्योगास लावले पाहिजे.

**४१७०** (१५ : ५, ३ मार्च ५६, ८८)

सन १८५३ मध्ये मुंबईतील एत्तद्देशीय लोकांकरिता धार्मिक पुस्तक संग्रह हे पुस्तकालय सुरू झाले. अनेक संस्थानिकांनी तसेच हुद्देदारांनी बरेच साहाय्य केले. चांगली पुस्तके वाचण्याची तहान या पुस्तकांनी पूर्ण होते. घाणेरड्या पुस्तकांचे गढूळ पाणी नको आहे. विद्येच्या मिष्ट पक्वान्नांची रुची घ्यावी आणि ज्ञानामृत प्यावे. गाबाळ ग्रंथ, भाकडकथा व इंग्रजी नावेल्स मात्र नकोत. जिज्ञासातृप्ती व बहुश्रुतपणा वाढला पाहिजे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक ६, मुंबई, १८ मार्च १८५६

---

**४१७१** (१५ : ६, १८ मार्च ५६, ८९–९०)

लेवीय हे मोशाचे तिसरे पुस्तक आहे. संप्रदाय व संस्कार पाळण्याविषयीचे नेम त्यात आहेत. ईश्वराचे सेवक व भजनकरी पवित्र असावेत. खाण्यापिण्याविषयीची शुद्धताही त्यात होती. मंडपातील होम, रक्ताचे यज्ञ, वगैरेंचाही उल्लेख त्यात आहे. आहरोन व त्याचे २ पुत्र सेवेस अमान्य होऊन नाश पावल्याची कथाही त्यात सापडते. याजक लोकांनी होम केवळ मंडपाजवळच करावा, सणाचे नेम पाळावेत, मूर्तिपूजकांशी संबंध कधीही ठेवू नये, कारण ख्रिस्ताचे प्राणार्पण हेच एक मनाची शुद्धी करण्याचे साधन होय.

**४१७२** (१५ : ६, १८ मार्च ५६, ९०–९२)

विश्वास व आचरण यांबद्दल पूर्ण व अचूक नियम दाखविणारे असे पवित्र शास्त्र आहे. मानवी तर्क, विवेक मानू नयेत. कारण माणसापेक्षा ईश्वर श्रेष्ठ होय. जुन्या करारातील नेम मात्र फक्त युहदी लोकांनाच लागू आहेत. पण तारक, प्रतिफळ, प्रायश्चित व पश्चाताप, यांविषयी दोन्ही करार एकमत दर्शवितात. रोमन कॅथॉलिकांत फक्त धर्मगुरूसच पुस्तक वाचू देतात. ही वहिवाट अयोग्य आहे. प्रत्येकास त्यातील अभिप्राय व बोध कळले पाहिजेत. मनोभाव, तत्परता व नम्रता दाखवून सिद्धांत समजावून घ्यावेत. पौलस तर सुरुवातीच्या ख्रिस्ती लोकांना पाठलाग करी. पण पुढे तो पश्चात्तापी बनून ख्रिस्ताचा खरा सेवक झाला. शास्त्राचे वचन गंभीरपणे व मर्यादेने वाचावे. हलक्या थट्टामस्करीच्या कामासाठी वाचू नये. दुर्भाषण ही ईश्वरनिंदाच होय. शास्त्राचा अभ्यास तत्परतेने करावा.

**४१७३** (१५ : ६, १८ मार्च ५६, ९३–९४)

मादक पदार्थवर्जक मंडळीची सभा झाली. या मंडळीचे काम नियमित चालते. मराठी भाषेत सभेचे काम झाले, तर ते अधिक उपयुक्त होईल. मोरोबा विनोबा यांना चिटणीस नेमले आहे. कलालखान्याची दुसमानी पुष्कळांच्या मनात आहे. परंतु त्यांना कोणीतरी पुढारी पाहिजे आहे. नेटिवांत छाकटे वाढत आहेत. दुर्व्यसनाचा झरा अगदी शुष्क करावयास हवा. मद्यपानप्रतिबंधक अर्जावर आणखी सह्या मिळवाव्यात.

**४१७३ अ** (इंम : ९२–९३)

४१७४ (१५ : ६, १८ मार्च ५६, ९४–९६)

युहदी लोकांना सणाची कारणे माहीत नव्हती, तरी ते सर्व सण पाळीत. म्हणून गोविंदराव सांगतात की : वल्हांडणेचा दिवस ते पाळतात, कारण परमेश्वराने त्यांना वाचवले. यार्देन नदीजवळचा दगडाचा ढीग नदी ओलांडण्यासाठी रचला होता. पण पुढे मूळ उद्देश कोणासच कळेना! म्हणून विधीचे मूळ कारण समजल्याशिवाय कोणताही विधी पाळू नये.

४१७५ (१५ : ६, १८ मार्च ५६, ९६–९८)

'एक हिंदू' पत्रात लिहितो की : सकेशा विधवेच्या मृत्यूनंतर तिला 'तसेच' स्मशानात नेण्यास भिक्षुक तयार होईनात. त्यांनी क्षौर प्रायश्चित्ताचा आग्रह धरला. पण काही मुद्रा मिळाल्यावर मात्र ते गप्प बसले! आता इतर सकेशा विधवा फारच घाबरतील. विधवेच्या गंगाविधीशिवाय तिच्या नवऱ्यास मोक्ष मिळत नाही, अशीच रूढी आहे. मग बलात्काराने क्षौराचा गजब होतो. गावात शंकराचार्य येत असले, तर तिला तोंड लपवून बसावे लागते. वैधव्य हे पूर्वजन्मीच्या पापाचे फळ समजले जाते. सुज्ञांनी विचार करावा की, या चालीपासून मनुष्याचे नेमके कोणते कल्याण होणार आहे? असल्या रूढीने ईश्वर संतुष्ट होतो का?

४१७६ (१५ : ६, १८ मार्च ५६, ९८-१०२)

ख्रिस्ती धर्मावर आक्षेप घेणाऱ्यांत टाम पेनइतका दुर्गुणी, अज्ञानी, निंदक दुसरा कोणीही झाला नाही. त्याच्या विवेकयुग या पुस्तकास तर कंपाझिटरही मिळेना. कलकत्ता येथील त्याच्या शिष्यांनी लिंगायताचे प्रेत मखरात बसवून व सजवून मिरवितात त्याप्रमाणे या पुस्तकास नवीन आवृत्तीच्या सुबक मखरात बसविलेले आहे. ज्याचा बापच भंगट, रक्तपिती झालेला असेल, त्याचे पोर कसे असणार, हे कोणीही सांगेल. पेनचा बाप जोसफ हा काचोळ्या करीत असे. शाळा सोडल्यावर जहाजावर नोकर झाला. तो रोगट व कठोर दिसे. लग्नानंतर उधाऱ्या थकल्यामुळे तो पळून गेला. कायदा व न्याय यांना तो निर्दय, चांडाळ म्हणत असे. अनेक हलक्या नोकऱ्या करीत त्याने कामान सेन्स पुस्तक लिहिले. हा मनुष्य अप्रामाणिक व वडचागी होता. त्याच्या खोटेपणामुळे त्याजवर वारंवार सावकाराकडून जप्ती येत असे.

४१७७ (१५ : ६, १८ मार्च ५६, १०२)

'नाटकापासून बुडणूक' : एक अनामिक कवी लिहितो की : मूल जर स्त्रीवेष घेत असेल, तर पालकांनी त्याला आडवावे. नाटकवाल्यांनी कित्येकांची पोरे पळवली. त्यांचे आईबाप धायधाय रडत आहेत. शिक्षण सोडून मुले नाटकी बनतात. मुखाला रंग लावून ते पातकी बनतात. शरीर सजवून ते राजा झाले, तरी निस्तेज दिसतात. विद्यारूपी कल्पतरू टाकून देऊनही पोरे नाटकाच्या एरंडाला कवटाळतात. नाच करणे, दुर्व्यसन, जुगार, यांतच ती मग्न होतात. विद्येचे अमोल्य रत्न कायमचे हरविले जाते. हलक्याच्या संगतीने हलकेपणाच येतो. म्हणून मुलांचे लाड करू नका.

**४१७८** (१५ : ६, १८ मार्च ५६, १०२-१०३)

शिमग्यात ताशे व ढोल जोरजोगत बडविले जातात. कर्णेंद्रिय बधिर होते. शिव्या देताना लोकांनी बीभत्स पुस्तकांचा कायदा मात्र विसरून जाऊ नये. सरकारनेही फाका घालणारांचा बंदोबस्त करावा. ईश्वर हाच पृथ्वीचा न्यायाधीश आहे. त्याची भीती बाळगावी. तालीमबाज व लढाईत लोक यांना पकडण्यास शिपाई भितात; तरी कमिशनरांनी शिपायांना ताकीद द्यावी. मारवाडी लोक नग्न बाहुल्यांसमोर नाचतात. त्यांचा बंदोबस्त करावा.

**४१७९** (१५ : ६, १८ मार्च ५६, १०३)

'स्वदेशहितेच्छू' आपल्या कवितेत लिहितो की : लोक स्वच्छंदीपणाने लालमुखे बनतात. रांडाना गाण्यास लावतात. एखाद्या याचकाला दान करावे म्हटले, तर यांचा जीव जातो. सत्कृत्यासाठी पैका ओपायला कोणीच तयार नसते. पापरूपी रांडेने सगळे जग व्यापले आहे. ही यमरूप होळी नेटिवांचा सर्वनाश करणार.

**४१८०** (१५ : ६, १८ मार्च ५६, १०४)

पोलीसचे सीनियर मॅजिस्ट्रेट जाहीर करतात की : रहादारीच्या ठिकाणी अथवा दुकानात बीभत्स चित्रे किंवा पुस्तके बुध्या लोकांच्या पाहण्यासाठी मांडणे, हा गुन्हा आहे. रस्त्यावर बीभत्स लावण्या व गाणी म्हणणे किंवा शिव्यागाळी करणे, हा दखलपात्र गुन्हा आहे. अपराध्यास तीन महिने तुरुंगवास आणि शंभर रुपये दंड, अशी शिक्षा होईल. गुलाल व चिखल उधळण्यासही बंदी केलेली आहे.

**४१८० अ** (इंम : १०४)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४१८१** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १०५)

राबर्ट यंग इस्क्वॉर : यंगसाहेब मडमीसह इकडे आले. ते सुरतेत ऐरिश मिशनच्या छापखान्यावर काम करणार आहेत. ते वेगवेगळ्या भाषांत निपुण असून त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आहे. त्यांनी छपाईसाठी बहुत प्रकारचे टैप आणले आहेत.

**४१८१ अ** (इंम : १०५)

**४१८२** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १०६–१०७)

डलहौसीसाहेब ८ वर्षांहून जास्त काळ गवरनर जनरल होते. त्यांनी कामकाजाच्या रीती बदलून अनेक उपयुक्त कामे केली. लोकांचे फार हित झाले. इंग्रजी राज्यात अनेक छोटी संस्थाने मिळाली. नळ, तारायंत्र, लोखंडी रस्ते, वगैरे कामे केली. महाराणा रणजितसिंग म्हणत असे की, 'सबै लाल हो जायगा.' ते डलहौसीने खरे केले ! मूळ राजाचा मोड, सातारचे सामिलीकरण, ब्रह्मदेशातील जय, कराड, नागपूर, अयोध्या, यांचे सामिलीकरण, ही त्याची मोठी कामगिरी होय. ज्ञानाचा उदय, इन्साफाची शिस्त, व्यापारास मोकळीक, या कल्याणोदयाच्या गोष्टी त्यांनी केल्या. धर्मांतरविषयक कायदा करून इस्टेटीचे नुकसानही टाळले. गंगानदीच्या नळाची योजना सुरू केली. शाळा, उद्योगशाळा, स्त्रियांचा अभ्यास, यांकडे लक्ष पुरविले. मुंबईत त्यांना दिलेल्या मानपत्रावर ९०० सह्या आहेत.

**४१८२ अ** (इंम : १०६–१०७)

**४१८३** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १०८–१०९)

मुंबईतील पवित्रशास्त्रप्रसारक मंडळी :

या मंडळातर्फे १३४०६ पुस्तके वाटली. त्यांत १२०० फुकट वाटली. एका साहेबाने रद्दी म्हणून कागद गोळा केले. उत्सुकतेने तो वाचू लागला, तर खिस्ती धर्माचा कट्टर अनुयायी बनला. ज्यांना नवा करार हवा असेल, त्यांनी मिशनातून घ्यावा.

**४१८३ अ** (इंम : १०७–१०८)

**४१८४** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १०९–१११)

विष्णु हा कुमारिकेचा पुत्र होता. त्या पराक्रमी देवाने आपले पाय स्वतःच धुतले. कृष्ण व खिस्त ही नावे सारखीच दिसतात, वगैरे विधाने दीपिकाकर्त्याने केली. अडचण फक्त एकच आहे की, भागवताच्या बखरीस साक्ष व प्रमाण नाही. यहुदी लोकांच्या शास्त्रात अनिवार प्रमाणे आहेत. गालिलकर येशू वधस्तंभावर गेला, हे हजारो लोकांनी पाहिले. नावे व मनोरे याची साक्ष देतात. येशूने रोगी व आंधळे, पांगळे धडधाकट बनविले. हिंदू कहाण्या मात्र उपहासास्पद आणि कल्पित आहेत. म्हणून परिपूर्ण व शुद्ध देवाची भक्ती करावी.

**४१८५** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १११)

पुणे फ्रीचर्च मिशनचे काम व्यवस्थित चालते. दोघांचा नुकताच बाप्तिस्मा झाला.

**४१८५ अ** (इंम : १११)

**४१८६** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १११)

मथुरा मिशनात १० मंडळ्या व ६७७ लोक आहेत. ५०९१ लोकांनी मूर्तिपूजा सोडली. बगाड घेण्यावर सरकारी बंदी आली.

**४१८७** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११२–११३)

'साताऱ्यातील एक' लिहितो की : भुते आहेत, यावर हिंदूंचाच काय, पण ख्रिस्ती लोकांचाही विश्वास आहे. नास्तिकपणाचे बीजारोपण प्रथम पुण्यात झाले. नंतर इतर गावांत नास्तिकपणा पसरला. प्राण ही शरीराची क्रिया आहे. मेल्यावर मनुष्य पिशाच रूप कसा होईल ? ज्यांच्या मनांचा पायाच कच्चा आहे, असे लोक ख्रिस्ती धर्मावर बेफाम टीका करतात.

**४१८८** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११३)

देवाचे सत्‌शास्त्र हे सर्वकाळ स्थिर असते. देवावर विश्वास ठेवण्यास हा खंबीर पाया होय. देवभक्तांनो, भावना ठेवा. देवाचे सुवंदित नाव नेहमी वाखाणा.

**४१८९** (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११३–११४)

'अज्ञानांधकारातून बाहेर पडू इच्छणारी स्त्री' पत्रात म्हणते आहे की : वडनेरचा बहिरोबा म्हणजे सत्त्वाची जागती जोत समजला जातो. पूर्वीचा बहिरोबा तेलणीशी व्यभिचार करी. म्हणून लोकांनी त्यास आडात टाकला. नवी मूर्ती काशीहून आणली. या देवाचा रथ मिरवणुकीने निघाला की, एका तेलणीच्या घरापाशी अडून बसतो. त्याच्यावर टीका केली, तर माणूस आजारी पडते. गुरवाने पूजा सोडली, तर त्याला हिवताप लागला, असे सांगितात. मग तो बहिरोबा आडातून वर कां येत नाही ? हिंदूंचे देव पलंगावर झोपतात, विडे खातात ! साऱ्याच गप्पा आहेत.

४१९० (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११४–११५)

'यात्रेत जाणारा' लिहितो की : पाली येथे खंडोबाच्या लग्नासाठी २५ हजार लोक जमले. खंडोबा अनेकांच्या अंगात येतो, पण बंद मुठीत काय आहे, ते सांगू शकत नाही. खंडोबाचे लग्न फार थाटाने होते. खोबरे व भंडारा सगळीकडे उधळतात. विवाहासाठी पितळी मुखवट्याचा खंडोबा व म्हाळसा आणतात.

४१९१ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११५–११७)

डाक्तर विल्सन व्याख्यानात म्हणाले की : न्यायशास्त्राचा कर्ता गौतम ऋषी असून त्यात फक्त तर्कसंग्रह आहे. वैशेषिक शास्त्राचा कर्ता कनाड नामक होता. तो म्हणतो, देवाने आकार मात्र उत्पन्न केले. अणुरेणु अनादि आहेत. मीमांसाकार जयमिनीने फक्त वैदिक क्रियाकर्मे स्पष्ट केली. सांख्यशास्त्रकर्ते कपिलमुनी म्हणाले की, ज्ञानानेच मोक्ष मिळेल. ते निरीश्वरवादी आहेत. पातंजलीच्या योगशास्त्रात इद्रियदमनाने मोक्षाचा मार्ग स्पष्ट केलेला आहे. आत्मा हाच ईश्वर असून सिंधूमधील बिंदूप्रमाणे तो देवात मिसळतो. पण ईश्वर हा पुरुष नसून पदार्थ आहे, अशी भावना षड्दर्शने वाचून तयार होते. पापपुण्याचा निश्चित निकषही त्यातून कळत नाही. ईश्वराचे आज्ञापालन, हे मानवाचे मुख्य कर्म होय. या दर्शनात तारणोपाय नाही.

४१९२ (१५ : ७, ४ एप्रिल ५७, ११७–११८)

कन्येचे रुपये घेऊन लग्न करणे, ही दुष्ट चाल आहे. ही माणसे नाहीत, तर राक्षसच आहेत. पैका मिळाला, तर ७० वर्षांच्या वृद्धालाही ते जावई करतात. १५०–२०० असा कन्यांचा दर असतो. सावकाराकडे मुली तारण म्हणूनही ठेवतात. पोर विकण्याचा अधिकार सावकाराचा आहे. या निर्दय चालीने मुलींची पशूप्रमाणे विक्री होते. दुसऱ्या बाजीरावाच्या दोन अल्पवयी विधवा अजून हयात आहेत. त्याने ८० व्या वर्षी दोन लग्ने केली. सारांश, ही चाल बंद व्हावयास हवी.

४१९३ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११८–११९)

मुंबई पाणी कायदा :

पिण्याच्या पाण्याचा नाश कोणीही करू नये, म्हणून हा कायदा केलेला आहे. सार्वजनिक विहिरी व तलाव पोलीस अंमलदाराच्या हातात दिलेली आहेत. पोलीस त्यावर देखरेख करतील. जनावरांना चिंचुपुगलीस नेण्याची गुराख्यांवर सक्ती करावी. सार्वजनिक ठिकाणचे पाणी घेण्यास एखाद्याला जर कोणी अटकाव केला, तर पोलीस ताबडतोब कारवाई करतील. अटकाव करणारास १०० रु. दंड व एक महिन्याची कैद भोगावी लागेल. (सन् १८५६ चे आक्ट नं. ७)

४१९४ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, ११९)

नगरचे जड्ज मि. उडकाक यांनी येथील तुरुंगात केकताड, केळीची सोपटे व ताग यांपासून कागद तयार करण्याचा यशस्वी प्रयोग केला. हा शोध अगदी नवा आहे. तरटाच्या कागदापेक्षा हा कागद सफेद व गुळगुळीत आहे.

४१९५ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १२१)

मुंबई विभागास पाण्याचा कायदा लागू झाल्यामुळे पाण्याची तंगचाई थोडी कमी होईल. सध्या कित्येकांना पिण्याचे पाणीही मिळत नाही. दरोग्याच्या देखरेखीने व्यवस्था सुधारेल.

४१९६ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १२०)

नवे गवरनर जनरल क्यानिंग यांनी कारभार हाती घेतला आहे. सरकारने एक ठराव प्रसिद्ध करून नेटिव्ह हिंदूंनी आपल्या रिवाजाप्रमाणे दाराशी जोडे काढून ग. ज. साहेबांचा मान राखावा, असे सांगितले आहे. पारशांत मात्र असल्या चाली नसल्यामुळे हा ठराव त्यांना लागू नाही. (ज्ञानप्रकाशवरून)

४१९७ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १२०)

मुंबईच्या फौजदारांनी चंडोलाचे ६ आखाडे पकडले. हे दुर्व्यसन फारच माजले आहे. असल्या अंमलाने शरीर क्षीण होऊन मृत्युला आमंत्रणच मिळते. व्यसनी लोक भुरट्या चोऱ्या करून पोराबाळांचे खूनही करतात.

४१९८ (१५ : ७, ४ एप्रिल ५६, १२०)

पुण्याजवळ धुळवड खेळताना एकजण राहाडीत पडून मेला. चार लोकांवर खटला भरला आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक ८, मुंबई, १६ एप्रिल १८५६

४१९९ (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२१)

मोशाच्या गणनाग्रंथात म्हटले आहे की : मिसर देशातून इस्रायली लोक निघाल्यावर पहिली मोजणी झाली. नंतर ४० वर्षांनी दुसरी गणना झाली. गणनेवरून कुळाचा बोध होई. छावण्याच्या शुद्धतेची हकीगतसुद्धा त्यामध्ये सापडते. मिसरहून कूच करण्यापासून तर मोआबाच्या मैदानात मुक्काम करण्यापर्यंतची तपशीलवार हकीगत या पुस्तकात मिळते.

**४२००** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२१–१२६)

ईश्वर स्वयंभू व सनातन आहे. सर्वज्ञता व सर्वसमर्थता हे त्याचे आवश्यक गुण, तर सुज्ञता, कृपाळूपणा, हे मानसिक गुण होत. ईश्वर अनुत्पन्न आहे. त्याचे अस्तित्व अनादि होय. तो सनातन आहे. कारण त्यास आदिअंत नाही. तो आपला आहे, कारण बदलत नाही. तो सदासर्वदा सर्वच ठिकाणी आहे. त्याला तिन्ही काळांचे ज्ञान असते. तो सर्वसमर्थ, सर्वज्ञ, पवित्र, न्यायी, कृपाळू व सत्यशील आहे. भक्तांचे कल्याण तोच करतो. पाप्यास दंड लावितो. त्याचे संपूर्ण ज्ञान होणे कठीण, म्हणून दुर्ज्ञेय आहे.

**४२०१** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२६)

पुस्तकमंडळीने या वर्षात ८० हजार पुस्तके वाटली. १० नवीन पुस्तके छापली. पुस्तके ठेवण्याकरिता नवे घर बांधल्यामुळे चांगली सोय झाली.

**४२०१ अ** (इंम : १२६)

**४२०२** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२७)

बुद्धिवर्धक सभेने नवीन पुस्तक 'बुद्धिवर्धक मासिक' ज्ञान व नीतिप्रसार यांसाठी (गुजराथीत) हे पुस्तक छापले आहे.

**४२०२ अ** (इंम : १२५–१२६)

**४२०३** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२७)

जनार्दन रामचंद्र यांनी 'दारूपासून अनर्थ' हे पुस्तक लिहिले. यातील गोष्टी पूर्वी ज्ञानोदयातून प्रसिद्ध झाल्या.

**४२०३ अ** (इंम : ३–६)

**४२०४** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२७)

बाबा पद्मनजींनी 'कुटुंबाची सुधारणा' ग्रंथ दक्षिणा प्रैज कमिटीतर्फे छापविला. तो बराच उपयोगी ठरेल.

•

**४२०४ अ** (इंग : १२७)

**४२०५** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२८)

सरकारचे अनुदानाचे नेम याजबी प्रसिद्ध झाले आहेत. ज्या गावात विद्येची रुची आहे, तेथील लोक आपल्या लेकरांना विद्येचा प्रसंग यावा म्हणून सतत झडतील. म्हणून लोकांना नियमांची माहिती करून द्यावी. गावकऱ्यांना एकत्र बोलावून शाळा काढण्याची सूचना करावी. कामगार लोकांनीही खटपट करून शाळा काढाव्यात. सरकारकडून मदत घ्यावी. मात्र सगळाच भार सरकारवर टाकू नये.

**४२०५ अ** (इंग : १२७–१२८)

**४२०६** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १२८–१३४)

नगरच्या धर्मान्तराची हकीगत :

'एक ख्रिस्ती ' लिहितो की : सावळाराम आणि लक्ष्मण रावजी हे साळी तरुण ख्रिस्ती मंडळीस मिळण्याकरिता मिशनात आले. ते दोघेही शिक्षित आहेत. त्यांचे वय १६ च्या पुढे आहे. ख्रिस्ती धर्माचा सतत विचार करून ते ख्रिस्ताकडे आले. बराच काळ ते सातत्याने पवित्र शास्त्र वाचीत व साहेबाशी चर्चा करीत असत. नातेवाईकांना शास्त्राचे पुस्तक दाखविल्यावर घरातून विरोध होऊ लागला. शाळाही बंद झाली, म्हणून ते पळून बालटैनसाहेबाकडे आले. त्यांच्या नातेवाईकांनी झुंडीने येऊन बंगल्याभोवती गोंधळ केला. मुलांनी पोलीस अधिकाऱ्यासमोर सांगितले की, आम्ही स्वखुशीने येथे आलो. तरी मुलांना ओढून नेण्याचा नातेवाईक प्रयत्न करीत होते. त्यांनी लक्ष्मणास पळवून नेले. पुढे त्यास पोलीस अधिकाऱ्यासमोर आणल्यावरही त्याचा पूर्वीचा जबाब कायम राहिला. मुलांना स्वेच्छेप्रमाणे वागण्याचा अधिकार आहे, असा निर्णय अधिकाऱ्यांनी दिला. नेटिवांच्या दुष्ट मसलती व दांडगाई वाया गेली.

**४२०७** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १३४)

युनैटेडं स्तुडेंत्स असोशियन :

रामवाडीजवळ विद्यार्थ्यांच्या संयुक्त सभेत भाषणे होतील.

**४२०७अ** (इंम : १३४)

**४२०८** (१५ : ८, १६ एप्रिल ५६, १३५)

खाजगी शाळांचे ग्रांट इन एड चे नियम तपशीलवार छापले आहेत. विद्यार्थ्यांची संख्या मात्र २५ पेक्षा जास्त असली पाहिजे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

४२०९ (१५ : ९, १ मे ५६, १३७–१३८)

युनैटेड ष्टुडेन्स असोशियन :

संयुक्त विद्यार्थी सभा सात वेळा भरली. तीन वक्त्यांची भाषणे झाली. जे लोक दिवसभर कामात गुंतलेले असतात, त्यांना बुद्धी वाढविण्याचा प्रसंगच येत नाही. त्यांना ही व्याख्याने फायदेशीर ठरतील. मात्र त्यांनी आपले अवांतर वाचनही वाढवावे.

४२०९ अ (इंम : १३७)

४२१० (१५ : ९, १ मे ५६, १३९–१४०)

बंगाल प्रांतात जमीनदारांचे मोठे प्राबल्य आहे. ते स्वतःचे बंदीखाने तयार करतात. स्वतःच न्याय निवाडा देतात. तेथे गरीब ख्रिस्ती लोकांना कोणीच कैवारी नाही. बारिसाल जिल्ह्यात ख्रिस्ती धर्म फार वाढल्यामुळे जमीनदार चिडले. त्यांना नेहमी त्रास देतात. या गोष्टी एका मिशनऱ्याने इंग्लंडच्या सोसायटीस कळविल्या आहेत. धर्मपिसे लोक कसा त्रास देतात, याची हकीगत तिकडे समजली. ख्रिस्ती मंडळी स्वतः फिर्याद करून या जुलमाचा बंदोबस्त करील.

४२१० अ (इंम : १३८)

**४२११** (१५ : ९, १ मे ५६, १४०-१४६)

'मिशनातील एक खिस्ती' लिहितो की : हेन्री या पोलीस अधिकाऱ्याने सावळ्यारामास आप्ताच्या घरी राहण्याची परवानगी दिली. घरी नेल्यावर आप्त सावळ्यास त्रास देऊ लागले. त्यांनी प्रायश्चित्ताचा आग्रह धरल्यावर सावळ्याने स्नानास संमती दिली. पण ब्राह्मणास नमस्कार करण्यास नकार दिला. तरी त्याने पंचगव्य घेतले, हे मात्र वाईट केले. पुढे सावळ्या पुन्हा पळून मिशनात आला. बाप्तिस्मा रीतसर झाला. पण नातेवाईकांनी गर्दी करून गोंधळ केला. लक्ष्मणाचेही नातेवाईक बाप्तिस्मास विरोध करीत होते. त्यास परोपरीने मोहात पाडीत होते. लक्ष्मणची खात्री झाली आहे की, खिस्ती धर्मच खरा आहे. त्याचे आप्त त्यास पळवून नेण्याचा बेत करीत होते. पण तो मिशनात आला व खिस्ती झाला. खऱ्या तारकाकडे आला.

**४२११ अ** (इंम : १४०)

**४२१२** (१५ : ९, १ मे ५६, १४६)

नगरच्या साळी मुलांच्या धर्मान्तराबाबत ज्ञानप्रकाशने अशी बातमी छापली की, रेवरंड उर्फ पाद्री याने मुलांना भुरळ पाडून अथवा मेस्मेरिझम करून त्याजकडून खिस्ती धर्म घेतविला !

**४२१३** (१५ : ९, १ मे ५६, १४६-१४७)

गोविंदराव सांगतात की : मोशयप्रमाणेच येशूचे चमत्कारसुद्धा इंद्रियगम्य होते. याबाबत कोणी फसणे अशक्य आहे. कारण प्रत्येक वेळी ३ ते ५ हजार लोक हजर होते. बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे लिखित संस्कार तर सतत पाळले जातात. उपदेशकांच्या नेमणुकीचाही लेवी पुस्तकात स्पष्ट उल्लेख आहे. त्या मानाने इतर धर्मातील चमत्कार कल्पित कहाण्याप्रमाणे वाटतात.

**४२१४** (१५ : ९, १ मे ५६, १४७–१४८)

धर्मसंबंधी बोध हा सर्वांत महत्वाची गोष्ट आहे. दुराग्रही देवभोळी माणसे स्वतःच्या आचरणातील दोष पाहात नाहीत. सध्या साधू, ब्रह्मचारी, पंचाक्षरी, यांसारख्या ढोंगी लोकांचे प्रस्थ फार माजलेले दिसते. तुळशीची माळ आणि ढाळ असा त्यांचा बाह्यवेष असतो. ते ईश्वरास आवडत नाहीत. साधूपण काही विजेप्रमाणे किंवा उष्णतेप्रमाणे शरीरात प्रवेश भरू शकत नाही. ज्ञानशून्य व आचारभ्रष्ट लोकांच्या ठिकाणी देव येणे अशक्य आहे. पूर्वीच्या साधूंनीही असल्या ढोंगाचा तिरस्कार केला.

**४२१५** (१५ : ९, १ मे ५६. १४९)

कोर्ट आफ डरेक्टर्सनी जगन्नाथाचे उत्पन्न २२ हजारांऐवजी फक्त १६ हजार रुपये केले आहे.

**४२१६** (१५ : ९, १ मे ५६, १४९)

रत्नागिरीस एक साधू आला असून तो विठोबाच्या देवळामध्ये गाभाऱ्यात बसतो. स्त्रिया दर्शनास आल्या की, त्यांना खडे मारतो. इंग्रजी राज्यामध्ये असले वर्तन खपणार नाही. पोलीस त्यास फाशात अडकवतीलच.

**४२१७** (१५ : ९, १ मे ५६, १४९)

नवे वकील : २० विद्यार्थी यंदा वकिलीच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले.

**४२१८** (१५ : ९, १ मे ५६, १४९–१५२)

जनरल दिपार्टमेंट : सरकारी ग्रँट इन् कोडचे परिपत्रक छापले आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

**४२१९** (१५ : १०, २६ मे ५६, १५३-१५८)

ईश्वरविद्या : प्रकरण ४

ईश्वराचे त्रैकपण : बाप, पुत्र व पवित्र आत्मा मिळून त्रैक ईश्वर होतो. हे तिघे वेगळे असले, तरी तत्त्व आणि गुण यांनी अभिन्न आहेत. यासह यहोवा म्हणतात. ईश्वराचे ज्ञान सृष्टिपदार्थावरून होत नाही, तर पवित्र शास्त्रावरून होते. मृण्मय शरीर, प्राणमय जीव आणि विवेकमय आत्मा, यांनी मनुष्य बनतो. पण ईश्वर सर्वदा परिपूर्ण आहे. त्रयकातील व्यक्ति भिन्न व स्वतंत्र असतात. त्यांचा अधिकार व महत्त्व समान आहे. येशु देवपुत्र असल्यामुळे तो पूर्ण ईश्वरी आणि मानवी प्रकृतीचा आहे. तो एक संयुक्त व्यक्ति आहे. त्याचा जन्म, मृत्यु पूर्ण मानवी आहे. एखादी गोष्ट गूढ वाटली, तरी शास्त्रबोध अमान्य करू नये. समजून घ्यावे, विश्वासाने मान्य करावे. विश्वासाचे अगत्य फार आहे.

**४२२०** (१५ : १०, २६ मे ५६, १६०-१६५)

आपली विचारशक्ती कोणते काम निंद्य वा स्तुत्य किंवा स्तुत्य वा सदोष आहे, याचा निवाडा करते. वाईट कामाने बुद्धी मळीण होते. सद्सदविचार ही मात्र ईश्वराची वाणी होय. तिला धिक्कारले, तर आपण अपराधी होऊ. परंतु अयोग्य वर्तन, ही काही स्वतंत्रतेची वागणूक नव्हे. पापाचे वर्तन, हे दासपणच आहे. म्हणून मनाची साक्ष घेऊन विवेकबुद्धीस अनुसरावे. खऱ्या-खोट्याचे अचूक ज्ञान ईश्वरासच असते. ईश्वराला हिशोब द्यावा लागेल, अशी जाणीव ठेवली, तर विवेकशक्ती जागृत राहील. खरेपण हे डोंगराप्रमाणे स्थिर राहाते. आपल्या भावनांवर व विचारांवर विवेकाची सत्ता असावी. व्यसने, अनीती, दुसऱ्या धर्मावर जुलूम करणे, हे मनाच्या दासपणाचे ३ प्रकार होत. या देशात आपल्या विवेकबुद्धीने वागण्याची सर्वांना स्वतंत्रता आहे. लोकांच्या चालीप्रमाणे वागण्यापेक्षा ईश्वराच्या सांगण्याप्रमाणे वागावे. म्हणजे तो साहाय्य करतो. (युनायटेड स्टुडंट्स सोसायटी पुढे केलेले भाषण)

**४२२० अ** (इम : १५८–१६०)

**४२२१** (१५ : १०, २६ मे ५६, १६५)

रेल्वेसाठी बळी नाही : खोपोली ते कल्याण रस्त्याकरिता इंग्रज सरकार, माणसांचा बळी देणार, अशी अफवा कोणीतरी पसरविली. पण रेल्वेअधिकाऱ्यांनी याचा साफ इन्कार केला. अशा गप्पांवर विश्वास ठेवू नये.

**४२२२** (१५ : १०, २६ मे ५६, १६६–१६८)

टामस पेनचे खाजगी जीवन लज्जास्पद होते. पत्नीला तो भाडोत्री मोलकरीण समजत असे. आईने कामासाठी पैसे दिले की, तो 'कुपुत्र' सगळे चैनीत उडवी. हा निष्ठुर व निर्दय मुलगा आईचे ऐकत नसे. त्याने बंदुकीच्या दारूचा कारखानाही सुरू केला होता. खटपटदेवतेची आराधना करणाऱ्या या गृहस्थास नेहमी श्रीफलमाता मिळत असे! अमेरिकन सरकारला फसवून त्याने पैसे व जमीन मिळविली. एका तरूण स्त्रीला फितवून तिच्यासह तो पळून गेला. त्याचा अंतकाळ फार हृदयद्रावक झाला. मृत्युसमयी तो अशक्त व ओंगळ दिसला. आजाराच्या यातनांनी तडफडून हा नास्तिक देवाचे नाव घेऊ लागला. पण पवित्र शास्त्रावर आपला विश्वास नाही, असे तो उद्धटपणाने म्हणत होता. त्याच्या पुस्तकाच्या प्रकाशकांनी त्याचे खरे चरित्र छापले पाहिजे होते.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

**४२२३** (१५ : ११, १४ जून ५६, १६९–१७३)

जे काही घडते, ती ईश्वराची योजना आहे. त्यास साधनाबरोबर परिणामही माहीत आहे. पापमार्ग सोडून ईश्वराची योजना ओळखावी. त्यात तारण आहे येशूच्या प्रायश्चित्तावर विश्वास ठेवावा. मग ईश्वरी कृपेने त्यांचीच निवड होते. ईश्वरास प्रत्येक गोष्टीचे पूर्वज्ञान आहे. पूर्वविचारावाचून काहीच घडणे शक्य नाही. आपण आपल्या इच्छेप्रमाणे, स्वतंत्रतेने वागत असतो. पण ईश्वराची निश्चित योजना असते. तरीही जे होणे असेल, ते होईल, हा विचार खोटा, असंगत, दुष्ट बुद्धीचा आहे. कार्य आणि कारणारा यांचा निश्चित संबंध ईश्वराने लावून दिला आहे. सर्व मानवांच्या उद्धाराची निश्चित योजना त्याच्याजवळ आहे. म्हणून ईश्वरी आज्ञा हा जगाचा नेम समजून काटेकोरपणाने वागावे. त्यानेच पापी माणसाचे तारण होईल.

**४२२४** (१५ : ११, १४ जून ५६, १७३–१७४)

भारतात दीड वर्ष धर्मोपदेशकाचे काम करणारी मंगर मडम मरण पावली. लोकांच्या कल्याणासाठी ती इकडे आली. बेशुद्धीतही ती धर्माच्या कामाबद्दल बोले. अनेक स्त्रियांना तिने शिकविले. सातारा मिशनात ती राहात असे.

**४२२४ अ** (इंग : १७३)

**४२२५** (१५ : ११, १४ जून ५६, १७५–१७६)

लोकांची मोजदाद :

दि. १७ जुलैपासून विद्याभ्यास खात्यातर्फे लोकांची मोजदाद सुरू होणार आहे. लोकांच्या अज्ञानी समजुतीमुळे यात फार अडचणी येतात. आपली मोजदाद झाली, तर काही अरिष्ट येते; माणसे मोजली की, ती कमी होतात; असे या लोकांना वाटते. स्त्रियांची माहिती विचारली, तर ते वहीम धरतात. विधवांची व म्हाताऱ्यांची तर माहिती देतच नाहीत. रेल्वेसाठी बळी देण्यास लेकरे हवी आहेत, अशा समजुतीने मुलांचीही खरी माहिती सांगत नाहीत. म्हणून मोजणी कामगारांनी सौम्यपणाने बोलावे. लोकांना भीती दाखवू नये. मोजणीकार सहनशील व खंबीर असेल, तर हे काम फार चांगले होईल. वेसकर व कुलकर्णी यांचीही मदत घ्यावी. शूद्रासकट सर्वांची माहिती काळजीपूर्वक गोळा करावी. मोजदाद हा सुधारणुकीचा पाया आहे.

**४२२५ अ** (इंम : १७४)

**४२२६** (१५ : ११, १४ जून ५६, १७७)

मुंबई इलाख्यात गतवर्षी २ लाख ३० हजार लोकांना देवी काढण्यात आल्या. देवीरोगाचा बिमोड करणे आवश्यक आहे. पूर्वीपेक्षा २७ हजार अधिक लोकांना देवी काढल्या. जेथे हा उपाय केला, तेथे फार मोठा अनर्थ टळला. लोक जाणुनबुजून याविषयी हयगय करतात, हे चांगले नाही. मोजदादीमध्ये देवी काढल्या ही नोंद घेतली पाहिजे.

**४२२६ अ** (इंम : १७७)

**४२२७** (१५ : ११, १४ जून ५६, १७७–१७८)

मोश्याचे ग्रंथ व येशूचे चरित्र खरी असल्यामुळेच लोक विश्वास ठेवतात. एखादा बादशहा कसे राज्य करीत होता व त्याचा मृत्यू कसा झाला, यापेक्षाही येशूचे चरित्र महत्त्वाचे आहे. बारकाईने तपास करून, साक्षी पाहून शास्त्रामध्ये त्याचा समावेश झाला. म्हणून याचा नकार करणे, हा नास्तिक वेडेपणा होय.

**४२२८** (१५ : ११, १४ जून ५६, १७८–१७९)

भविष्यवचन, लोकांचे कायदे, साक्षी, यांवरून मोशे व येशू यांची चरित्रे अगदी विश्वासार्ह ठरतात. खोटा ग्रंथ खरा भासविता येत नसतो. एखाद्याने कायद्याचे खोटे पुस्तक लिहिले, तरी न्यायाधीश ते मानणार नाही. परमार्थसंबंधी आचरणाचे नियम मोशाने लावून दिल्हे आहेत. मनःकल्पित असे या ग्रंथात काहीच नाही.

**४२२९** (१५ : ११, १४ जून ५६, १७९–१८०)

रशिया आणि दोस्त राष्ट्रे यांच्यामध्ये तह होणार असून तहाच्या अटी निश्चित झाल्या. तुर्कस्थानातून परकीय फौजा निघून जातील. तुर्की सुलतान आता स्वतंत्र राहील. त्याच्या शिपायांची संख्या मर्यादित असेल. काळ्या समुद्रावर मात्र संयुक्त कबजा राहील.
सारांश, तुर्कस्थान रशियाच्या गुलामगिरीतून मुक्त होईल.

४२३० (१५ : ११, १४ जून ५६, १८०–१८१)

आमचेकडे लहानपणी लग्ने होतात. पुरुषांना वाटते की, स्त्री ही बटीक आहे. पण स्त्रियांवाचून संसार व्यर्थ आहे. त्या काटकसरीने घर चालवीत असतात. स्त्रीबुद्धिः प्रलयं गता, हे वाक्य खोटे आहे. 'स्त्रियांची साहसिक कामे' या पुस्तकातील गोष्टीवरून असे कळते की, एखादा अपराधी तुरूंगात असला, तर त्याची पत्नी वाटेल तो धोका पतकरून त्यास वाचविण्याचा प्रयत्न करते. स्त्री कल्याणकारक व सुखदायक आहे. क्षुल्लक कारणावरून तिच्यावर रागास्त्र सोडणे अयोग्य आहे. विद्यारूपी भूषणाने तिला सजवून ज्ञानी करावे.

४२३१ (१५ : ११, १४ जून ५६, १८१–१८२)

कलकत्ता रिव्यू म्हणतो : पुरुष अनेक विवाह करू शकतो. पण स्त्रीला मात्र वैधव्यातून सुटका नाही. वेदांचे काही मंत्र असे आहेत की, त्यांवरून पुनर्विवाहाची रीत समजते. मनु, नारद, हरित, याज्ञवल्क्य स्मृतींमध्ये म्हटले आहे की, पित्याने द्रव्यलोभाने विवाह करून दिला, तर स्त्रीला पुनर्विवाह करता येईल. 'महानिर्णय तंत्र' ग्रंथात तर सगळ्याच विधवांना पुनर्विवाहाची परवानगी दिली आहे. राजा वल्लभ बहादुरांनी सन १७५६ मध्ये पंडितसभा भरवून आपल्या कन्येच्या दुसऱ्या विवाहास परवानगी घेतली. पतीचे मरण, संन्यास, नपुंसकत्व, धर्मान्तर, या कारणांनी स्त्री निराधार झाली, तर स्त्रीला पुनर्विवाह करता येतो, असे नारदस्मृती म्हणते.

४२३२ (१५ : ११, १४ जून ५६, १८२–१८३)

१२ मे रोजी कल्याण-खोपोली रेल्वे सुरू झाली. लोकांची सोय झाली. पनवेलमार्गे जाण्याची गरज नाही. जहाजवाले फार भाडे घेत असत. गरिबांवर जुलूम करीत असत. पण तिसऱ्या वर्गाच्या डब्यात लोकांना उभे राहावे लागते; तरी त्यात बाक असावेत.

**४२३३** (१५ : ११, १४ जून ५६, १८३)

एतद्देशीय भाषांत पत्रावर पत्ता लिहिण्याची पद्धती सध्या फार गैरसोयीची आहे. त्यामुळे देशी भाषांतली पत्रे लवकर पोहोचत नाहीत. तरी सर्व मरातब गाळून, व्यक्तीचे संपूर्ण नांव, आळी, कसबा, शहर, अशा क्रमाने पत्ते लिहावेत, असा जाहीरनामा पोस्ट मास्टर जनरल यांनी प्रकट केला आहे.

**४२३४** (१५ : ११, १४ जून ५६, १८३–१८४)

१८५६ चा कायदा : बीभत्स पुस्तके, शृंगारिक चित्रे, रस्त्यावर व दुकानात लावण्याविषयी कायद्याचा मसुदा आम्ही प्रसिद्ध केला होता. तो जसाच्या तसा पास झाला. कौन्सिलने फक्त देवळावरील व रथावरील धार्मिक चित्रांचा अपवाद केला. रस्त्यावर बीभत्स बोलण्यासही कायद्याने बंदी झाली.

**४२३५** (१५ : ११, १४ जून ५६, १८४)

पुनर्विवाहाविषयी : कलकत्याच्या बाबूलोकांनी अर्ज केला आहे की, एखाद्या विधवेने पुनर्विवाह केला, तर त्याची नोंद सरकारात व्हावी. कारण पती जर लबाड असला, तर तो विवाहाची कबुलीच देणार नाही. गोरूप स्त्रियेस दोन्हीही घरे पारखी होतील.

**४२३६** (१५ : ११, १४ जून ५६, १८४)

आगीच्या गाडीचा दर : मुंबई तागाईत खोपोली या गाडीचे पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या वर्गाचे दर दिले आहेत. प्रवाश्यांना कमीत कमी २० पौंड सामान नेता येते.

**४२३७** (१५ : ११, १४ जून ५६, १८४)

पुणे-मुंबई दरम्यानची डाक १ जून १८५६ पासून रेल्वेने येत आहे. त्यामुळे २ तास अगोदर डाक येऊ लागली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक १२, मुंबई, २६ जून १८५६

---

**४२३८** (१५ : १२, २६ जून ५६, १८५–१८७)

अनुवाद : मोश्याच्या पाचव्या पुस्तकास अनुवाद म्हणतात. यात बोधपर भाषणे मिळतात. इस्रायली लोक ४० वर्षे अरण्यात फिरत होते. शेवटी मोश्याने भाषण करून त्याना नेम लावून दिल्हे. अर्थात त्यांच्या दुराचरणाने त्यांना वाईट दिवस येणार, हे भविष्यसुद्धा त्यानेच वर्तविले. देवावरील विश्वास कमी झाला की, अवनत दशा येते. ईश्वराची माणसांवर प्रीति आहे. पण माणसानेही चुका करू नयेत. म्हणून खनानातील मूर्तींचा आणि दुष्ट लोकांचा निषेध करावा लागला. सभामंडप व याजकदेखील त्याने नेमून दिले. आपल्या प्राप्तीचा दशमांश देवास देण्याचा नेम केला. आपला अधिकार यहोशवास देऊन तो मरणास सिद्ध झाला. १२० व्या वर्षी त्याचा मृत्यु झाला. देवाने त्यास पुरले. हे शेवटले अध्याय यहोशवाने लिहिले असावेत.

**४२३९** (१५ : १२, २६ जून ५६, १८७)

शाहू दाजी आणि कासमभाई या दोघांना रे. मोडक यांनी दीक्षा दिली. पालकांच्या प्रयत्नास दाद न देता ते दोघे येशूवर दृढ विश्वास ठेवून ख्रिस्ती झाले. गावातले लोक त्यांना आपल्या विश्वासाप्रमाणे चालू देतील अशी आशा आहे.

**४२३९ अ** (इंम : १८७)

**४२४०** (१५ : १२, २६ जून ५६, १८९–१९०)

यंदाची मोजदात विद्याभ्यासाच्या दृष्टीने होणार आहे. सार्वत्रिक शिक्षणासाठी किती शाळा घालाव्या लागतील, याचा अंदाज घ्यावयाचा आहे. पाश्चिमात्य लोक बिनचूक माहिती देतात, तशी माहिती सर्वांनी देणे आवश्यक असते देशपरिज्ञानाविषयी जरी याचा उपयोग झाला नाही, तरी देशात अज्ञान किती आहे, याची कल्पना यावरून येईल. लाखो लोकांना विद्येचा प्रसंगच आलेला नाही. विद्यापीठाचे किरण त्याजवर पोहोचलेच नाहीत. त्यास ओनाम्यापासून शिकविण्याकरिता लाखो शाळा हव्यात. राष्ट्रीक विद्याभ्यासाबद्दल संशयच आहे. सुधारकांनी नेटाने व नेकीने प्रयत्न केले पाहिजेत. सुबुद्धीने काम झाले, तर सरकारी पैक्याची मदत मिळेल. इंग्रजांनाही वाटेल की, अंधारात गेलो आणि हा देश उजेडमय करून गेलो.

**४२४० अ** (इंम : १८८–१८९)

**४२४१** (१५ : १२, २६ जून ५६, १९०–१९४)

अलीकडे येशूचे साधुत्व, शास्त्राचा उत्तमपणा, त्यांतील शुद्ध नीती, यांबद्दल शिक्षित लोक शंका घेत नाहीत. पण येशू हाच तारक आहे, हे मत त्यांना आग्रहीपणाचे वाटते. येशू-निष्कपट होता, पापी लोकांना दासपणातून मुक्त करून त्याने सद्गुणी वगैरे बनविले. लोकांना पश्चाताप व्हावा म्हणून तो जन्मास आला. तो सुळावर जात असताना लोकांनी थट्टा केली. पण तो क्षमाशील राहिला. त्याची नम्रता व सहनता अलौकिक होती. आपणांस शिक्षा करणारांसाठी त्याने प्रार्थना केली. तो स्वतःस तारणारा म्हणवितो, एवढ्याच कारणावरून त्याला कमी ठरविणे चूक आहे. म्हणून येशूवर विश्वास ठेवा.

**४२४२** (१५ : १२, २६ जून ५६, १९४–१९६)

एक अनामिक पत्रकर्ता म्हणवितो की : जे धर्म अंतःकरणाने साध्य आहेत, ते सर्व देवाला प्रियकर आहेत. यातच उद्धाराचा मार्ग आहे. पण आमचे उत्तर असे आहे की, मानवी अंतःकरणास अवडेल, ते खरे नसते. निरनिराळ्या धर्मांची तत्त्वे इतकी वेगळी आहेत की, अशा परस्परविरुद्ध पद्धतींनी ईश्वर संतुष्ट होतो म्हणणे बालिशपणाचे ठरेल. ईश्वराची जर इच्छा नाही, तर पाप टिकलेच कसे, असेही तो विचारतो. पण देवाने जलप्रलयाची संकटे आणून मानवास धडा शिकवला. पापनाशाचा उपायही दिला. याकरिता देवाचे आभार मानलेच पाहिजेत. आम्हांस ईश्वराविषयी पूर्ण ज्ञान होणे अशक्य आहे. परंतु देवपुत्राच्या वचनांवरून ईश्वर समजतो. त्यास वैरी मानणे अयोग्य होय.

**४२४२ अ** (इंम : १९६–१९७)

**४२४३** (१५ : १२, २६ जून ५६, १९७–१९८)

'स्वशिक्षा' या विषयावर बोलताना मि. यंग म्हणाले की, मनुष्यमात्रास शिक्षणाचे फार अगत्य आहे. शिक्षणाने सुख मिळते. सरकार पैका देऊन साहाय्य करीत आहे. शिक्षणाचे फळ मात्र स्वतःच्या मेहनतीवर अवलंबून असते. जगातल्या नामांकित विद्वानांनी स्वतः कष्ट करून विद्या केली.

**४२४४** (१५ : १२, २६ जून ५६, १९८)

सदर अदालतीने नवा वटहुकूम काढला आहे. त्यानुसार लाच घेणाराइतकाच लाच देणाराही अपराधी ठरेल.

**४२४५** (१५ : १२, २६ जून ५६, १९८)

ब्रिटिशांचे २२,४५७ सैनिक लढाईत मेले. पैकी ४२७९ पटकीने गेले. रशियाचे तर ५ लाख लोक मेले.

**४२४६** (१५ : १२, २६ जून ५६, १९९)

'एक प्रवासी' लिहितो की : तिसऱ्या वर्गात फारशा सोयी नाहीत. डबे पावसाने गळतात. माणसे बकऱ्याप्रमाणे कोंडतात. हा विलायती व्यवस्थेचा मासला आहे की काय? बसण्यास बाके नाहीत. मुले चेंगरली जातात. एक उनाड पारशी मधेच शिरून बायका-मुलांना गुद्द लगावीत असतो! ही तर अंदाधुंदी आहे. उकाड्याने व घामाने सचैल स्नान घडते.

**४२४७** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

बंगालच्या गवरनराने जगन्नाथाचे वेतन २३ हजारांवरून १६ हजार केले. पण आता पुरीच्या राजाने ही जहागीरच रद्द केली आहे.

**४२४८** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

एका गृहस्थाने मृत्युपत्रात लिहिले की : आपली संपत्ती पत्नी व मूल यांच्यात वाटून द्यावी. पुत्र झाला, तर पुत्राचे निम्मे द्रव्य तिने घ्यावे व कन्या झाली, तर आईचे निम्मे कन्येस द्यावे. पुढे तिला एक पुत्र व एक कन्या झाली. मग विभाग कसे करावेत? उत्तर असे की, संपत्तीचे ७ विभाग करून १ मुलीस, २ आईस व ४ मुलास द्यावे.

**४२४९** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

युरोपमध्ये १२ करोड रुपयांची कॉफी खपते.

**४२५०** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

इंग्लंडमध्ये यंत्राने जेवढे काम होते, तेवढे काम ८० कोटी लोकही करू शकणार नाहीत.

**४२५१** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

इंग्लंडमध्ये डॉक्टरांचे प्रमाण १५०० मनुष्यास १ असे आहे.

**४२८२** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

भरकुंभ, जि. पुणे या ठिकाणी बंड सुरू झाले.

**४२८३** (१५ : १२, २६ जून ५६, २००)

मोजदाद सध्या तहकूब आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक १३, मुंबई, ४ जुलै १८५६

**४२८४** (१५ : १३, ४ जुलै ५६, २०१–२०३)

मुंबई मंडळीचे काम फार समाधानकारक आहे. देशसुधारणा करण्याचे दोन मार्ग आहेत. एक म्हणजे कायदा. तो कायदे मंडळाकडून होत असतो. दुसरा लोकांचा प्रयत्न. सुधारकांनी आपल्या वर्तणुकीचा कित्ता इतरांस द्यावा व मदत करावी.

**४२८४ अ** (इंम : २०१)

**४२८५** (१५ : १३, ४ जुलै ५६, २०२–२०५)

'सत्यवक्ता' लिहितो की : काही नवशिके तरुण अनीतीची पुस्तके इंग्लंड देशाहून आणतात. नास्तिकाच्या ग्रंथांना ते गीता किंवा व्यंकटेशस्तोत्र मानतात. म्हणून अशा पुस्तकांना आम्ही सोमलखार म्हणतो. या नाशकारक पुस्तकांनी धर्मभावना लयास जाईल. फ्रेंच राज्यक्रांतीत रूसो वा वाल्टेर या नास्तिकांना फार महत्त्व आले. इन्साफ आणि नीति हा देशाचा पाया असतो. नास्तिकांना ख्रिस्ती धर्माबद्दल काहीच आदर वाटत नाही. त्यातून अंदाधुंदी, अनीती, कपट व घातपात निर्माण होतात. हे निरीश्वरवादी लोक कामदेवाची गाणी गाऊन शिंदळीस धर्ममंदिरात बसवितात. फ्रान्समध्ये हजारोंची कत्तल झाली. नास्तिक वृत्तीने माणसाचा पशु होतो.

**४२८६** (१५ : १३, ४ जुलै ५६, २०५)

'एक मित्र' पत्रात म्हणतो की : पंढरपुरात अज्ञानी समजुती फार आहेत. विठोबाच्या पागोट्याची लांबी कमी होते. कारण देव त्याचा उपभोग घेतो, असे लोक म्हणतात. यावर टीका करावी, तर त्यांच्या कपाळास तिडीक उठते.

**४२८७** (१५ : १३, ४ जुलै ५६, २०५–२१६)

शाहूदाजी व कासम महंमद या दोन गृहस्थांनी प्रसिद्धपणे बाप्तिस्मा घेतला. ते २५ वयाच्या आतले आहेत. विद्वत्ता व सौजन्य यांत ते प्रसिद्ध आहेत. आपले वडलोपार्जित धर्म खोटे आहेत, म्हणून त्यांनी केवलेश्वर मत धारण केले. आता त्यांस ख्रिस्ती धर्मच खरा वाटतो. शाहूरावाचा भाऊदेखील त्याच मताचा आहे. शाहूच्या नातेवाईकांनी त्यास मारहाण केली. मिशनरी लोकांनी त्यास कोंडून ठेवले, अशी खबर पोलिसात दिली. काही दिवस घरी जाऊ दिले, तेव्हा स्नानाची व गंधाची सक्ती केली. फौजदाराची मदत घेऊन तो पुन्हा मिशनात आला. नातेवाईकांनी प्रेम व धाक यांचे प्रयोग केले, तरी शाहूचा निश्चय अभंगच राहिला. आता हा गवगवा बहुतकरून शांत झाला आहे. (पुढे चालू)

४२५८ (१५ : १३, ४ जुलै ५६, २१६)

पाथर्डी तालुक्यात एके गावात महामारीने २० माणसे मेली. परंतु तेथील मामलेदार सुस्त राहिला. त्याने रिपोर्ट करून औषधे आणावयास हवी होती.

मेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक १४, मुंबई, १५ जुलै १८५६

४२५९ (१५ : १४, १५ जुलै ५६, २१७)

शाहुरावाची जेवढी कठोर परीक्षा झाली, छळणूक झाली, तेवढी खिस्ती धर्मात कोणाचीही झाली नसेल. त्यांना मित्रांचे साहाय्य नव्हते. पण आकाशातला बाप जो ईश्वर, त्याची मदत होती. ईश्वराने त्यांना बोध व शांतवन करणारा पवित्र आत्मा दिल्हा. कारण जो विश्वासतो, त्यास देव अंतर देत नाही, गाढ अंधकारातून तसेच सैतानाच्या दृढ बंधनातून सोडवितो. शाहुराव सद्गुणात आणि पवित्रतेमध्ये वाढत राहावेत हीच प्रार्थना आहे.

४२५९ अ (इंग्र : २१८–२२०)

४२६० (१५ : १४, १५ जुलै ५६, २२०–२२२)

उत्पत्तीची क्रिया दोन प्रकारची आहे. सामोग्रीवाचून म्हणजे शून्यातून काही निर्माण करणे, यास अझामोग्रिक उत्पत्ती म्हणावे. एका पदार्थातून दुसरा बनविणे, यास ससामोग्रिक उत्पत्ती म्हणावे. मनुष्यदेह मातीतून बनतो, म्हणून तो दुसऱ्या प्रकारचा होय. सामर्थ्यवान ईश्वराने सारे जग केवळ शब्दाने निर्माण केले. पाच हजार साडेआठशे वर्षांपूर्वी हे काम ६ दिवस चालू होते. त्याने उत्पन्न केलेल्या वस्तू परिपूर्ण आणि यथासांग होत्या. त्या त्या वस्तूने आपल्या जातीचे बीज व संतती टिकविली, वाढविली. जगाच्या पवित्रतेची व सुखाची त्यास काळजी आहे.

**४२६१** (१५ : १४, १५ जुलै ५६, २२३–२२४)

दीपिकाकर्त्याने शाब्बाथ दिवसास काही शास्त्राधार आहे काय, याची चर्चा केली. पण खिस्ती धर्माच्या ईश्वरप्रणितपणाविषयी त्याला काहीच अगत्य नसल्यामुळे त्याच्या चर्चेस उत्तर देण्याचे कारण नाही. दुर्भाषण करून शब्दयुद्ध करण्याची आमची इच्छा नाही. खिस्ती लोकांचा देव म्हणजे सैतान आहे, असेही तो लिहितो. डाक्तर कमिंगच्या ग्रंथातील क्षितिरचनाविद्या बैबलातील उल्लेखाशी जुळत नाहीत. पण क्षितिरचनाविद्यनेही आपल्या चुका कबूल केल्या आहेत. कित्येक शास्त्रज्ञ सत्कारबुद्धीने बैबलावर विश्वास ठेवतात. या दोहोंत पूर्ण सुमेळ आहे.

**४२६२** (१५ : १४, १५ जुलै ५६, २२४–२२६)

ईश्वरभक्त दावीद म्हणे की : मी विस्मित प्रकारे घडलो आहे. आत्म्याला राहाण्यासाठी देवाने शरीररूपी घर तयार केले. आपले अवयव हे आत्म्याचे सेवक आहेत. डोळे हे दुर्बिणीप्रमाणे आहेत. हाडांनी शरिराची मांडावळ केली आहे. आपला काळीजरूपी बंब दर चार मिनटांत १२ शेर रक्त चालवितो. हे शरीररूपी घर नेहमी नीट ठेवले पाहिजे. नाक, डोळे, जीभ हे पहारेकरी त्यानेच ठेविले. झोपेच्या औषधाने आम्ही निरोगी राहातो. आश्चर्याच्या घरात आत्मा वसती करतो.

**४२६३** (१५ : १४, १५ जुलै ५६, २२६–२२९)

भविष्य हे पवित्र शास्त्राचे सहावे लक्षण होय. दुसरे देऊळ बांधल्यानंतर ४९० वर्षांनी येशूचा जन्म होईल, असे भविष्य होते. विरोधक धर्मगुरूंनी येशूविरूद्ध खोट्या साक्षीदारांना चिथावले. खिस्ताच्या मेलेल्यातून उठण्याची वार्ताही छपवून ठेवली. पूर्वेकडील देशांत अशी समजूत होती की, यहुद्यांचा राजा जन्मास येणार आहे. देवाचे वचन अक्षरशाहा खरे झाले. 'तो आपली कबर अधार्मिकासी आणि धनवानासी करील,' असे भविष्य होते. हेही खरे झाले. कारण दोन चोरांमध्ये येशू वधस्तंभी दिल्हा गेला व धनवानांच्या स्मशानभूमीत पुरला गेला.

४२६४ (१५ : १४, १५ जुलै ५६, २२९)

सर जमशेटजींनी देशबंधूंच्या कल्याणासाठी सतत परिश्रम केले. आता वृद्धावस्था प्राप्त झाल्यामुळे त्यांना काम होत नाही. आपल्या या जगमित्राचे सतत स्मरण राहावे, यासाठी काहीतरी केले पाहिजे. म्हणून टौनहालात सभा भरली होती. २० हजार रुपये वर्गणी जमा झाली.

४२६५ (१५ : १४, १५ जुलै ५६, २२९-२३०)

अहमदाबादेत एक विंचू उतरविणारा मांत्रिक आहे. आपल्या मंत्राचा परिणाम विंचवावर सव्वा प्रहरच टिकतो, असे तो म्हणतो. दलपतराम दामाभाई यांनी स्वतः प्रयोग करून यातला फोलपणा दाखवून दिला. सात पिढ्या हा मंत्र चालत आला, असे सांगणारे मांत्रिक अज्ञानच वाढवितात. त्यापेक्षा विंचूदंश झालेल्या जागेवर नाद्रिक ॲसिडचा ठिपका लावावा, म्हणजे यातना होत नाहीत.

४२६६ (१५ : १४, १५ जुलै ५६, २३०-२३१)

सिंवू मानगीर याच्या चेतावणीने सांथल लोकांनी बंड केले. तो घायाळ झाला, तरी त्याने लढाईचे मैदान सोडले नाही. पाच रुपये कर्जाचे निमित्त करून त्याने सावकारावर हल्ला केला. अनेक घरांना आगी लावून क्रूरपणे कत्तली केल्या. कित्येक इंग्रज व दोन मडमा मारल्या. लष्कराने घेरा घालून त्याची टोळी पकडली. भागलपूरच्या बंदीखान्यात तो महाभारती कृत्य व पहिलवानगिरी दाखवीत असे. आपले नाव प्रख्यात झाले, याचाच त्याला अभिमान वाटे.

४२६७ (१५ : १४, १५ जुलै ५६, २३१-२३२)

एखादा मनुष्य आपल्यापेक्षा अधिक हुशार व चतुर असला, तर चार लोकांत पाणउतारा करावा, हा वाईट मतलब होय. अब्रूदार गृहस्थास कमी दाखविणे, धर्माचे निमित्त करून निर्दोषी मनुष्याची निंदा करणे, सूडाचे डावपेच रचणे, अरेरावई, वैर, लोभ, लालुचपणा, हे दोष मनात वागविणे, यास वाईट मतलब म्हणतात.

४२६८ (१५ : १४, १५ जुलै ५६, २३२)

आपला स्वार्थ साधण्याकरिता खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे करणे, साधी गोष्ट उलटसुलट व आडवीतिडवी करणे, हे नीच व हलक्या मनुष्याचे लक्षण होय. वाजवी रीतीने शत्रूशी सामना करणारे लोक थोडे असतात. मतलबी लोकांमुळेच सॉक्रेटीसावर अनेक संकटे आली, अनीति व दुराचार वाढले. असली मतलबी माणसे पृथ्वीवर नसती, तर बरे झाले असते.

४२६९ (१५ : १४, १५ जुलै ५६, २३२)

पूना अखबारवर पत्राने म्हटले आहे की : विलायतेत लखोट्यावरच ठसा उठवितात. हिंदुस्थानात मात्र पैशाच्या आशेने नोकर तिकिटे काढून घेतात. घातकी, दुष्टबुद्धीचे लोक दुसऱ्याचे नुकसान करतात. लखोट्यावर ठसा असला, म्हणजे हे प्रकार थांबतील. लखोट्याची पावती देणे सरकारने बंद केले, हेही अयोग्य आहे. (ज्ञानप्रकाशवरून)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक १५, मुंबई, १ ऑगस्ट १८५६

४२७० (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २३३–२३४)

मोश्याचा वारस यहोशवा यानेही पुस्तक लिहिले. जे देवाची परम आज्ञा विसरले, त्यांची राज्ये गेली. ज्यांनी देवावर विश्वास ठेवला आणि देवासी लगटून राहिले, त्यांची यहोशवा प्रशंसा करतो. आपल्या भक्तासाठी स्वतः ईश्वर लढाई लढला. यहोशवाच्या मृत्यूची हकीगत दुसऱ्या कोणीतरी लिहिली असावी.

**४२७१** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २३४–२३७)

जग चालविण्याचा ईश्वराचा मनोदय हेच ईश्वरी सूत्र होय. जगाचे संरक्षण व पालन ईश्वरच करतो. त्याच्याजवळ अनंत गुण, ज्ञान, चांगुलपण आहे. संपूर्ण सृष्टीतील प्राणी व लोक जे कार्य स्वतःच्या इच्छेने करतात, त्यासही ईश्वरी प्रेरणा असतेच. त्यांच्या स्वतंत्र कर्मातून ईश्वरी मनोदय सिद्धीस जातात. चिमणीच्या पडण्याइतकी राज्याच्या उलथापालथीस देवाची प्रेरणा कारणीभूत असते. विशाळाइतकीच तो हलक्याचीही काळजी घेतो. म्हणून ईश्वराशी मान्यवृत्ती धरावी. त्याची सत्ता कबूल करा, त्याजवर भरवसा ठेवून त्याचे भय बाळगा. ईश्वर सुज्ञ आहे. त्याचे हेतु, प्रयोजन व परिणाम ध्यानात हवा.

**४२७२** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २३७)

एका माणसाने अनेक विवाह करणे, ही चाल सुधारणेशी अगदी विपरीत आहे. अनेक बायकांचा दादला मिरविण्यात शुद्ध हेतू काहीच नाही. या अतिदुष्ट चालीविरुद्ध सरकारने कायदा करावा. खिस्ती धर्मात ही चाल अजिबात नाही. एकपत्नीत्व हे सत्यतेच व नीतीचे वागणे होय. हिंदूंच्या धर्मासही यात काहीच अयोग्य नाही.

**४२७२ अ** (इंम : २३७)

**४२७३** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २३८–२४२)

'सत्यवक्ता' लिहितो की : नास्तिक मताची पुस्तके कुटुंबघातक असतात. खिस्ती कुटुंब एकमेकांवर प्रीत करून ईश्वराची प्रार्थना करते; तारक येशूवरती विश्वास ठेवते; रोग दुःखसंकटात देवाला शरण जाते; नियमाने शास्त्रवाचन करते; कोणी मृत झाला, तर तो ख्रिस्ताच्या ठिकाणी शांतपणे निजला असे समजते. पण विपरीत पुस्तक वाचल्यामुळे नसत्या शंका मनात येतात. युरोपातील कित्येक कुटुंबांना नास्तिक वृत्तीने घेरले. त्यांची नीती संपली. ते देवाची थट्टा व निंदा करतात. बैल किंवा घोडा मारावा त्याप्रमाणे ते मरतात. टाम पेनची पुस्तके वाचून अनेकानी आत्महत्या केली. नास्तिकांची सुटका प्राणघातानेच होऊ शकते.

**४२७४** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २४२–२४६)

एका पिढीत यरूशलेम शहर भुईबरोबर होईल व धोंड्यावर धोंडा राहणार नाही, हे येशूचे भविष्य खरे झाले. रोमी सेनापती रूफस याने तेथील देवळावर नांगर फिरविला. आपल्यामागे खोटे मसीहा होतील, ही वाणीसुद्धा खरी झाली. नाटकाच्या दरवाजावरही आपल्याच धर्माचा जय होणार, हेही भविष्य सत्य ठरले. यज्ञपशू, वार्षिक प्रायश्चित व पितळी सर्प हे त्याचे दाखले आहेत. आदमने व नोहाने येशूची खरी हकीगत सांगितली. येशूची छळणूक करणाराचीही साक्ष बोलकी आहे. पवित्र शास्त्र ईश्वरापासून आहे व येशूच्या प्रायश्चित्ताने पापाचे तारण मिळाले, याची खात्री बाळगा.

**४२७५** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २४६–२४७)

तारापतनाविषयी लोकांची गैरसमजूत :

आकाशातून ताऱ्याचे पतन होणे, हा मनोरंजक चमत्कार आहे. तारे म्हणजे महान प्रतापी व पुण्यवान पुरुष आहेत व त्यांचे पापांशामुळे ते तेजरूपाने पृथ्वीवरती पडतात, असं लोक मानतात. तारापतन पाहिले असता पाप लागू नये, म्हणून ते देवाचा जप करतात. शास्त्रज्ञांनी याबाबत संशोधन केले आहे. चंद्रावरील ज्वालामुखी पर्वतातून काही धातुमय पदार्थ जमिनीवर पडत असावेत, किंवा सूर्याच्या दीर्घ वर्तुळामध्ये भ्रमण करणारे काही पदार्थ पृथ्वीवर पडतात, अशी या उष्ण पाषाणांची उत्पत्ती आहे.

**४२७६** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २४७–२४८)

एक जवाहिऱ्या नोकरास बरोबर घेऊन प्रवासास निघाला. नोकराने घातपात करून मालकास ठार मारले व मौल्यवान वस्तू घेऊन तो पळून गेला. दुसऱ्या गावात जाऊन त्याने व्यापार सुरू केला. त्याचा मर्तबा इतका वाढला की, तो शहराचा कोतवाल झाला. एक दिवस त्याच्यासमोर धन्याचा खून करणारा मनुष्य कैदी म्हणून आला, तेव्हा पश्चात्तापदग्ध अंतःकरणाने त्याने स्वतःच्या गुन्ह्याची कबुली दिली.

**४२७७** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २४८)

मुंबईच्या गुजराती पत्रांनी असा आरोप केला की, एलफिन्स्तन शाळेचा टीचर अर्देसीर फ्रामजी मुलांची मने वळविण्याकरिता ख्रिस्ती धर्मासंबंधीचे धडे शिकवितो. गवरनरने चौकशी करून निर्णय दिला की, हा शिक्षक बुकातील लेसन शिकवितो. यापलीकडे त्याचा अपराध नाही. अर्थ समजावा, म्हणून उपपादन करण्यास हरकत नाही.

**४२७८** (१५ : १५, १ ऑगस्ट ५७, २४८)

वॉशिंग्टन येथील इंग्रज वकिलास परत बोलावण्यात आले.

**४२७९** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २४८)
फ्रान्समधील पूरग्रस्तांच्या मदतीसाठी २ लाख रुपये जमले.

**४२८०** (१५ : १५, १ ऑगस्ट ५६, २४८)
लॉर्ड डलहौशी यांना ५० हजारांचे पेन्शन मंजूर झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक १६, मुंबई, १५ ऑगस्ट १८५६

**४२८१** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २४९–२५४)
उपदेशक हिंदू गुरूस सांगतो की : येशूस मनुष्य म्हणणेच योग्य आहे. तो पुण्यशील निष्कपट होता. तो देवाचा देहरूप शब्द होता. अवतार काही काळच मानवात राहातो, पण हा कायमचा तारक आहे. देवांच्या गुणकृत्यांत ईश्वर दिसत नाही. त्याच्या अपार दयेने आपले दु:ख नाहीसे होते. वेगवेगळे धर्म परस्पर विरुद्ध, अशी मते सांगतात. सर्व माणसे देवास झडती देणारी आहेत. म्हणून पापक्षेमाचा मार्ग दाखवील, तो खरा धर्म. सत्यतेची सत्ता मोडली की, अनीती व बंड माजते. कल्पित गोष्टी सोडून देऊन आत्म्याची खरी सत्यता ओळखा.

**४२८२** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २५४–२५७)
मनुष्यापासून प्रभूपर्यंत काही पायऱ्या असाव्यात. काही श्रेष्ठ प्रकृतीचे आत्मे असावेत. त्यांना दूत म्हणतात व ते ज्ञानशक्तिचापल्यात श्रेष्ठ असतात. ते आकाशमध्ये ईश्वराच्या कायद्यानुसार वागतात. ईश्वराने परीक्षा घेऊन त्यांना स्थिर केले आहे. त्यांना पहाटतारेही म्हणतात. ते निराकार व अदृश्य आहेत. न्यायाच्या दिवशी ते प्रभूचे हस्तक होतील, गाणी म्हणतील. ज्या दूतांनी देवाची आज्ञा ऐकली नाही, त्यांना भूत, सैतान, अजगर, अशी नावे आहेत. दूतांचा नाकार केला, तर प्रेषित, येशू व परमेश्वर यांचाही नाकार करावा लागेल. म्हणून पापमोह वर्जावे.

**४२८३** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २५७)

रे. शेरीफसाहेब अकरा वर्षांपूर्वी मद्रास मिशनात आले. आता ते मुंबईस जनरल असेंब्लीच्या कामासाठी आले आहेत. मद्रासेतील उपदेशपद्धती ते इकडे चालवतील.

**४२८३ अ** (इंम : २५७)

**४२८४** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २५८)

रे. हार्मसजी 'शास्त्रावाचून मानवाचे ज्ञान पूर्ण होत नाही,' या विषयावर भाषण देतील.

**४२८४ अ** (इंम : २५७–२५८)

**४२८५** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २५८–२६०)

बहुपत्नीकत्वास बंदी करण्याचा कायदा कायदेमंडळासमोर चर्चेसाठी आला. हिंदुशास्त्रात फक्त वंध्यत्वाच्या कारणावरून दुसरे लग्न करता येते. गुजराथी-पारशीही याच मताचे आहेत. फक्त मुस्लीमांनाच हे अमान्य दिसते. कोणतीही गोष्ट लोकमतावर सोपवली, तर होत नाही. सतीबंदी लोकांनी स्वतः होऊन कधी केली नसती. अनेक विवाह म्हणजे राजीखुशीचा जुगार होय. एकच स्त्री असणे तर्कशुद्ध, व्यावहारिक फायद्याचे असते. तरी कालातिक्रम न करता कायदा करावा.

**४२८६** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २६०–२६२)

'पाळ' यात्रेस जाणारा म्हणतो : खंडोबा लग्नास गेला म्हणजे तो देवळात नाही, असे जर तुम्ही म्हणाल, तर ते कोणी ऐकणार नाही. दर वर्षी लग्न करावे लागते, म्हणजे हे देव दरवर्षी रंडके होतात की काय ? जुन्या चाली सोडण्यास लोक तयार नाहीत. दिवटी, बुधली व गेळा घेऊन मिरवतात. विष्ठेचा नैवेद्य दाखवून ती खाणे, हा तर घृणास्पद प्रकार आहे. गळ टोचण्याचे प्रकार येथेही आहेत. हा साराच लोकभ्रम होय.

**४२८७** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २६२–२६४)

अंमलवर्जक सभेत गोविंदजी नारायण म्हणाले की : मादक पदार्थांचा प्रतिबंध व्हावा. दारू हा निंद्य पदार्थ औषध म्हणूनही घेऊ नये. मादक पदार्थांनी देहभान घालविणे, हे ईश्वराच्या आज्ञेचे उल्लंघन होय. असे लोक कुठलाच मानसिक उद्योग करू शकत नाहीत. पोटभर जेवणारे अधाशी लोकसुद्धा बौद्धिक कामे करीत नाहीत. दारूबाजांना सुबोधरूप रक्षक नौकेमध्ये बसवून सन्मार्गरूप देशात न्यावे. दुराग्रस्त अवस्थेतून सन्मार्ग दाखवावा. अंमलवर्जक सभेचे काम स्तुत्य आहे.

**४२८८** (१५ : १६, १५ ऑगस्ट ५६, २६४)

मुंबई टेम्परेन्स युनियन : पुढील सभा १८ जुलैस मिशन देवळात भरेल.

**४२८९** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २६५–२६६)

सुधारणुकेच्या गोष्टी हिंदुधर्माविरुद्ध असल्यामुळे लोक त्या स्वीकारीत नाहीत. पण कैफाचा प्रतिबंधक शास्त्रोक्त असून कल्याणकारक आहे. देशाभिमानाची भावना निर्माण झाली पाहिजे. आठवड्यातून एक तास तरी मद्यपी लोकांना बोध करण्यामध्ये घालवावा. दारूबाजांना मृत्यूच्या व दुर्दशेच्या जबड्यातून बाहेर काढले पाहिजे. म्युनिसिपल कामगार तर रोजची मिळकत दारूत उडवतात. म्हणून दारूची विक्री बंद झाली पाहिजे.

**४२९०** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २६७–२७०)

येशू मृतामधून उठला, यावर सद्धर्मदीपिकेचा विश्वास नाही. मन निःपक्षपाती ठेवून सत्याचा स्वीकार केला पाहिजे. सदसद्विवेकाचीच वाणी ऐकावी. येशूचे पुनरुत्थान झाले, ही गोष्ट अनेक साक्षीदारांनी नोंदविली. शास्त्राच्या नव्या कराराचाच तो पाया आहे. परमेश्वराने त्यास स्वीकारले व पसंत केले. येशू खरोखरच उठला, हे अनेकांनी पाहिले. त्यांच्या स्वभावात पालट होऊन ते खंबीर, वजनदार, विश्वासू बनले. त्यास मारणारांचीही खातरी झाली की, तो देवपुत्र व तारणारा आहे. या घटनेनंतर ३ हजार बाप्तिस्मे झाले. म्हणून ही घटना विश्वासपात्र आहे.

**४२९० अ** (इंमः २६६–२६७)

**४२९१** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २७१–२७६)

'एक सत्यवक्ता' लिहितो की : नास्तिकांची पुस्तके वाचण्याने मनुष्य आपले सुख हरवून बसतो. वोल्टेरच्या जीवनावरून असे दिसते की, त्याचे बुरे हाल झाले. नास्तिक लोक म्हणजे कुकर्मी व फुटक्या कपाळाची मढी आहेत. ह्यूम तर अत्यंत गोंधळाच्या शोकास्पद अवस्थेत सापडला. देवाने दिलेला आनंद, सुख व शांती, यांना तो मुकला. सोमलखाराची मात्रा घेणारांचा अंतही दुःखदायक असतो. आल्टेमोची तर खात्रीच झाली की, आपण नरकात जाणार. कारण पत्नीचा व मित्राचा खून केला होता. नास्तिकाला रोग, दरिद्र, लज्जा व अपकीर्ती मिळते. जे हिंदू नास्तिकांची पुस्तके वाचतात, ते गोंधळलेले आहेत, असे आम्हांस वाटते. कोल्ह्याला चिताऱ्याच्या दुकानात मुखवटा सापडावा, त्याप्रमाणे त्यांची अवस्था चमत्कारिक झाली आहे. नास्तिक लोक चैनी, अनात्मवादी आहेत. त्यांना पापकर्मातच आनंद वाटतो. विखारी रुजवून ते नाशाचा पाया रचतात.

**४२९२** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २७६–२७७)

'एक ख्रिस्ती उपदेशक' लिहितो की : चैत्रात नाशिकमध्ये रामाची यात्रा भरते. रामजन्माच्या वेळी हे लोक मोठा आनंद करतात. कावेबाज व ठक भिक्षुक क्षेत्रामध्ये येणाऱ्या यात्रेकरूंकडून दक्षिणा उपटतात. चोर व भिक्षुक यांच्यामध्ये फारच साम्य आढळते. रामाच्या प्रसादाने धान्यास बरकत येते, अशी समजूत आहे. मूर्तीच्या रथामधून मिरवणुक निघाली की, लोक रेवड्या उधळतात. यात पुण्यप्राप्ती काय आहे ? ईश्वराचा रस्ता कसा सापडणार ? आत्म्याने व सत्यतेने ईश्वरास भजले पाहिजे.

**४२९३** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २७७-२७८)

सरकारने सती व कन्यावध थांबविले, त्याप्रमाणे मुलींची विक्रीही थांबवावी. कोकणात व अहमदनगरकडे मुलींच्या गळ्यात त्यांच्या किंमतीच्या चिठ्या असतात. आंधळा, पांगळा, थेरडा का असेना, त्याने किंमत देऊन तिच्याशी खुलास लग्न लावावे. दहा वर्षांची कन्या ८० वर्षांच्या म्हाताऱ्यास दिली, अशीही घटना घडली आहे ! पाषाणहृदयी आईबाप यापेक्षा मुलींना विहिरीत का लोटीत नाहीत ? त्यांस आपल्या पोटच्या गोळ्याची दयाही येत नाही. पशु कसाबाला देतानाही मनुष्य विचार करतो. ब्राम्हणांतली ही रीत कायद्याने बंद व्हावी.

**४२९४** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २७८–२७९)

'पंढरीचा यात्रेकरी' पत्रात म्हणतो की : यंदा सत्रा लाखाची यात्रा भरल्यामुळे देवळात चेंगराचेंगरी फार झाली. लोक घाबरून देवाची करुणा भाकू लागले. वायूनेच केवळ त्यांचा प्राण वाचवला. घाम तर इतका आला होता की, वस्त्रेही पिळून काढली. कित्येकजण उलट्या होऊन बेशुद्ध झाले. शिपायांची व्यवस्थाही अपुरी होती. मुनसफसाहेबांनी बाहेरून भाते लावले, म्हणून वारा तरी मिळाला. तरी दरिद्री माणसाला देवाचे दर्शन दुर्लभच होते. यात्रेत मरणारी माणसे, हे सरकारवर लांछन आहे.

**४२९५** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २७९)

देव पूर्वी बहुत वेळा बहुत प्रकारे भविष्यवाद्यांकडून बोलला. तो या शेवटल्या दिवसांमध्ये आम्हासी पुत्राकडून बोलला.

**४२९६** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २८०)

कोणी विधवा स्त्रीशी विवाह केला असता, त्याचे व्यावहारिक नुकसान होऊ नये, असा कायदा झाला आहे. तरी लोकांनीच पुढाकार घ्यावा.

**४२९७** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २८०)

एथून विलायतेस विद्युत्यंत्र चालविणे :

भारतातून विलायतेस टेलीग्राफ व्हावे, अशी सरकारची योजना आहे. लंदन शहरापासून बसऱ्यापर्यंत विद्युत्यंत्र होणे कठीण नाही. बसराने कराची जलमार्गाने तार आणली जाईल. ही सबमरीन तार १,४०० मैलांची राहील. विलायतेहून अमेरिकेपावेतो २,४०० मैलांची तार समुद्रमार्गे टाकणार आहेत.

**४२९८** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २८०)

नेरळ पूल पडल्यामुळे बंद पडलेली गाडी १५ सप्टेंबरपासून धावू लागेल.

**४२९९** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २८०)

ग्रांट मेडिकलचे मुख्य गुरू मोरहेड विलायतेहून परत आले.

**४३००** (१५ : १७, १ सप्टेंबर ५६, २८०)

मुंबईत यंदा ६० इंच पाऊस पडला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४३०१** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २८१–२८४)

ज्ञानी व बुद्धिमान मनुष्यास देवपुत्राच्या आगमनाची फार उत्सुकता वाटत असे. उपदेशक सांगतात की : पापाने मनुष्य देवाच्या क्रोधास पात्र झाला. म्हणून तारणाकरिता ईश्वराच्या कृपेचे फार अगत्य आहे. निसर्गाचे चक्र त्याच्या कृपेनेच सुरू राहाते. ज्याला पापाचा पश्चात्ताप झाला, त्याचे तारण स्वतः प्रभु करतात. तारक येशूस पृथ्वीवर पाठवून त्याने मानवजातीवर दया केली. त्यातून मनुष्यजातीसाठी महान कामे झाली. त्याची हकीगत पवित्र शास्त्रात आहे. त्यातल्या आज्ञा पाळल्या, तर ईश्वराची तुमच्यावर प्रीत बसेल. तसेच, तुमचे मन प्रकाशित होईल. येशू हा दयारूप अवतार आहे.

**४३०२** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २८४–२८७)

खिस्ती शकापूर्वी ४००४ या वर्षी ईश्वराने जग उत्पन्न केले. आपल्या प्रतिमा म्हणून पुरुष व स्त्री निर्माण केली. त्यांना सुबुद्ध व पवित्र बनवून मानसिक गुणांत सारखे केले; ज्ञान, सुख व पावित्र्य गुण देऊन निरंतर वाढण्यास योग्य बनविले. शरीर हे भूमीच्या गुणांचे बनले आहे, तर आत्मा विवेकयुक्त आहे, असे मानवाचे मिश्र स्वरूप आहे. देह मर्त्य व अल्पकालिक असला, तरी आत्मा अमर व सार्वकालिक असतो. माणसांचा मूळ बाप आदाम प्रथम एदेन बागेत सुखोपभोग घेत होता. ईश्वरावर प्रीत करीत होता. परमेश्वराने त्याची परीक्षा घेऊन त्यास योग्य बनविले.

**४३०३** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २८५–२८६)

विवेकयुक्त प्राण्याचा स्वभाव त्यास लावून दिलेला आहे. हा नियम अपालट, तसाच सार्वकालिक आहे. तो अंतःकरणात लिहिला आणि विवेकामध्ये ठसविला. बौद्धिक व मानसिक शक्तींचा उपयोग केला, तर आपल्या कर्तव्यकर्माचे यथार्थ ज्ञान होईल. या नियमांचे निरंतर पाळण करावयाचे आहे. आज्ञापालनाने सुख लाभेल व आज्ञा मोडली, तर संकटे येतील. जगणे अथवा मोडणे आपल्या हाती आहे. नेमाचे अतिक्रमण हे पाप होय. पापिष्ट अंतःकरणामुळे दुष्ट माणसे किंवा भुते यांचा नाश होतो. ईश्वराने मोशाजवळ दहा आज्ञा दिल्या. ईश्वरावर आणि माणसावर प्रीति केली पाहिजे. आदामाला व हव्वाला बरे वाईट जाणण्याच्या झाडाचे फळ खाऊ नये अशी आज्ञा केली होती. ही आज्ञा म्हणजे आदिमानवाची कसोटी होय.

**४३०४** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २८८–२८९)

बहुपत्नीकत्वाबद्दल एक पत्र १५ ऑगस्तच्या अंकात छापले आहे. अनेकांना या कायद्याचे अगत्य दिसते. बंगाल प्रांतात तर याची फार जरूर आहे. तिकडे कुलीन ब्राह्मणांत अशी चाल आहे की, एका पुरुषाने १०० बायका केल्या, तरी हरकत नाही. मग त्या सतत माहेरी का राहीनात ! अनेक बायका, ही प्रतिष्ठेची बाब होऊन बसली. ब्राह्मणाचे पाहून इतर हिंदू जातींतही असा रिवाज पडला आहे ! हा अनर्थ व गैरशिस्तपणा बंद व्हावा.

**४३०४ अ** (इंम : २८७–२८८)

**४३०५** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २८९)

ख्रिस्ती शास्त्राविषयी लोक अनेक शंका काढतात म्हणून काही भाषणे योजली आहेत. दर महिन्यास एक व्याख्यान होईल. ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त आहे की नाही, या शंकेचे निवारण होईल. पत्रद्वारा अथवा मुखजबानी व्याख्यान देणाऱ्यांनी आपली माहिती कळवावी. रे. नारायण शेषाद्री पहिले व्याख्यान देतील.

**४३०५ अ** (इंम : २८९)

**४३०६** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २९०-२९१)

जुन्या व नव्या करारांत भविष्य होते की, सर्व जगात ख्रिस्ती धर्माचा प्रसार होईल. येशूपूर्वी १५०० वर्षे हे भविष्य खरे होणार, हे संभाव्य आहे. येशूने शिष्यांना आज्ञा दिल्ही की, सगळ्या जगात जाऊन शुभवर्तमान गाजवा. म्हणून प्रतिकूल गोष्टींतूनही या धर्माचा प्रसार झाला. १७३२ मध्ये मोरेवियन मंडळी स्थापन झाली. हल्ली तेथे शुभवार्तिकांची चार ठाणी आहेत. इतर देशांतही संयुक्त भाऊ मंडळ काम करीत आहे. १७८४ मध्ये इंग्लंड देशात बाप्तिस्मा मंडळ स्थापन झाले. उइल्यम केरीने अनेक ख्रिस्ती भावांना एकत्र आणले. जान तामसने बंगाल देशात धर्मप्रसार केला. १६२ वर्षांत या मंडळाने ७ कोटी २३ लाख रुपये जमविले.

**४३०७** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २९३–२९५)

मुंबईतील कापसाचे सूत काढण्याचा कारखाना :

४०० हात लांबरुंद असणाऱ्या घरात चक्रे गरगरा फिरत असतात. यंत्रे फिरवायास माणूस नाही. ती आपोआप फिरतात. कापूस स्वच्छ करणे, तसेच बारीक सूत काढणे, ही कामे सफाईने होतात. हा कारखाना निदान ६ लाखांचा आहे. ६० घोड्यांच्या शक्तीची, वाफेवर चालणारी यंत्रे हा चमत्कार घडवितात. तयार सूत एकेका चाकावर गुंडाळले जाते. सूत काढण्याच्या यंत्रात एका वेळी १६०० चात्या फिरून ६ तासांत १६ लक्ष हात सूत तयार होते. एक माणूस हाताने फारतर एक हजार हात सूत काढू शकतो. म्हणजे त्याचे ५० वर्षांचे काम यंत्र एका दिवसात करते. किती सूत तयार झाले, त्याचे आकडे एका घड्याळावर आपोआप दिसतात.

**४३०८** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २९५)

अतिशूद्राच्या तीन शाळा असून ३०० मुले आहेत. ८ शिक्षक शिकवतात. तरी शिक्षणाची प्रगती जरा कमी आहे. कारण या शाळेस चांगले शिक्षक मिळत नाहीत. पगार जास्त देऊनही शिक्षक मिळत नाहीत. रा. महादेव गोविंद व रिवससाहेब यांनी बक्षिसे वाटली. (ज्ञानप्रकाशवरून)

**४३०९** (१५ : १८, १६ सप्टेंबर ५६, २९५–२९६)

गेल्या लढाईत एकूण ३ लाख ६० हजार माणसे मरण पावली. तरी यांत रशियन शिपायांचा आकडा धरलेला नाही. कज्यापासून चांगले कधी निपजत नसते. कलहाचे तोंड काळे करावे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४३१०** (१५ : १९, २ ऑक्टोबर ५६, २९७–३००)

मूळ पूर्वजांनी शुद्धता व सरलता सोडून स्वधर्मत्याग केला. निषिद्ध फळ खाल्ले. ईश्वरापेक्षा सैतानावर भरवसा ठेवला. आदाम हा ईश्वरी संतानाचा सांकेतिक पुढारी होता. तरी हे पाप मनुष्यजातीस लागत नाही. पण एकंदर मनुष्यस्वभावच पापी आहे. जन्मस्वभावाने तो भ्रष्ट आहे. म्हणून मानसिक शक्तीचा उपयोग करून मानवाने ईश्वराकडे जावे. आपले मन स्वभावतः विपरीत असते. त्याचा पालट होणे अगदीच कठीण असते. म्हणून माणूस नरकदंडास पात्र ठरतो. म्हणून तरणोपाय आवश्यक होय.

**४३११** (१५ : १९, २ ऑक्टोबर ५६, ३००)

फसू नका. देवाची थट्टा होत नाही. माणूस जे पेरितो, तेच पीक पावेल.

**४३१२** (१५ : १९, २ ऑक्टोबर ५६, ३००–३०४)

'एक पालक' लिहितो की : २० वर्षे ख्रिस्ती मंडळात असणारी मलाबाई मरण पावली. ती तैलंगी महार होती. आईबाप नव्हते. पहिला नवराही मेला. देवीच्या रोगाने तिचे दोन्ही डोळे गेले. गोपाळ नावाच्या आंधळ्या महारासी तिने लग्न केले. गोपाळ बुद्धिमान होता. ओवी ऐकून पाठ करी. या दोघांना चर्मचक्षू नव्हते. तरी अंतश्चक्षूंनी ते येशूस पाहात. तिची तिन्ही मुले ख्रिस्तात स्थिरावली. ती तापट आणि तामसी होती. परंतु राग शांत झाल्यावर पश्चात्ताप करीत असे. शेवटच्या आजारीपणामध्ये आपल्या हातून भक्ती घडत नाही, म्हणून तिला फारच खेद वाटत असे. या अंध स्त्रीने विश्वासाच्या नेत्राने ईश्वरास ओळखले.

**४३१२अ** (इंम : ३०४–३०६)

**४३१३** (१५ : १९, २ ऑक्टोबर ५६, ३०६)

परभू सेमेनरी :

'सभेस जाणारा' पत्रात म्हणतो की : काल एका बोलक्या बावाची सभा झाली. मि. बोएन, रामचंद्र बाबा व शेषाद्रि यांनी त्याला प्रश्न विचारले, तेव्हा त्याच्या मूळ विवेचनात व या उत्तरांत मोठाच फेर दिसला. आपल्या प्रभावी भाषणांने हा बाबा लोकांना लोहचुंबकाप्रमाणे ओढून घेतो, एवढे मात्र खरे आहे. पण प्रश्नांची उत्तरे द्वाड व अयोग्य भाषेत देतो. आपला प्रश्न संपण्याच्या आधीच रानटीपणाने बोलतो. श्रोतेही गोंधळ करतात.

**४३१४** (१५ : १९, २ ऑक्टोबर ५६, ३०६)

कालपासून आगगाडी खोपोलीस चार वेळा जाऊ लागली. त्यापैकी एक वेळ रात्री ७॥ वाजतां डाक घेऊन जाती.

**४३१५** (१५ : १९, २ ऑक्टोबर ५६, ३०७–३१२)

ईश्वर अतिश्रेष्ठ आहे. तो अवताररूपाने प्रगट होतो, तेव्हा त्याचे मोठेपण दिसते. ख्रिस्ताचे गौरव त्याच्या गुणांवरून कळते. देवाचा साधु रूप धरतो. येशूने गरीबाघरी जन्म घेऊन, नम्र राहून, हाल सोसून, दंड सोसला. उपदेशक सांगतो की, ख्रिस्ताने यहूदा देशात जन्म घेतला. आब्राहामाच्या कुळात तो जन्मला. तो निष्पाप व पवित्र होता. कुमारिकेच्या पोटी तो जन्मला. पवित्र आत्मा त्याजवर आला. ईश्वर बीजावाचून झाड निर्मितो, त्याप्रमाणे हा चमत्कार घडला. वयाच्या तीस वर्षांपर्यंत तो कोणास फारसा प्रगट झाला नाही. लहानपणी तो ईश्वरभक्त होताच. योहानने त्याचा बाप्तिस्मा केला. यार्देन नदीच्या काठी त्याजवर पवित्र आत्मा उतरला. 'पश्चात्ताप करा, म्हणजे आकाशाचे राज्य मिळेल,' हा येशूचा संदेश होता. त्याने आंधळ्यास डोळे दिले, रोग्यास निरोगी केले व कोडी शुद्ध केले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४३१६** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३१३–३१६)

येशूची कीर्ती वाढल्यावर पेरोशी नावाच्या याजकास त्याचा द्वेष वाटला. जुन्या धर्मगुरूंचे ढोंग व कपट त्याने उघडे केले, म्हणून तेही रागावले. नवा धर्मस्थापक कोणी राजा असेल, असे हे धर्मगुरू म्हणत. येशूने मृतास जीवित केल्यामुळे लोक चकित झाले होते. पण यहुदा या फितुरी शिष्याने घात केला. तरी येशू शांतपणाने दुःख व मरण सोसून आकाशात गेला. माझे शरीररूप देऊळ तुम्ही मोडले, तरी मी ३ दिवसांत पुन्हा उठेन, असे तो म्हणे. पिलातस या अधिकाऱ्याने येशूची चौकशी केली. स्वतःला देवपुत्र म्हणविणे, हाही अपराधच ठरला आणि त्याला देहदंडाची शिक्षा झाली. येशूचा मृत्यु झाला, तेव्हा सूर्य अंधक होऊन भूमिकंप झाला. येशूने नम्रपणाने मरणदंड सोसला. तारणाकरिता, ईश्वराची कृपा, तसेच खरेपण हवे, अशी त्याची श्रद्धा होती.

**४३१७** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३१६–३१७)

राजश्री गोविंदजी नारायण ज्ञानप्रसारक सभेत म्हणाले की : ज्ञानसंग्रह म्हणजे सायक्लोपीडिया या ग्रंथाचे सभेला फार अगत्य वाटते. मंडळाने सुरूस लिहिणारे लेखक नेमून निबंधरूप पुस्तक तयार करून घ्यावे.

**४३१७अ** (इंम : ३१६)

**४३१८** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३१७)

काही दिवस विराम खाऊन विद्यार्थ्यांचे (दी युनायटेड स्टुडंट्स सोसायटी) हे इन्स्तटुशन मंडळ पुन्हा सुरू झाले आहे. रे. व्हैटसाहेब अध्यक्ष आहेत.

**४३१८अ** (इंम : ३१७)

**४३१९** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३१७)

रे. फोरजीटसाहेब आपल्या पत्रात म्हणतात : अंगावरचे दागिने चोरून कोणीतरी दोन लेकरांचे खून केले, तेव्हा मातापितरांनी जो शोक केला, त्याची आठवण झाली की, अंगावर रोमांच उभे राहातात. दागिन्यांच्या हौसेपायी ही दोन बालके निर्दय राक्षसांच्या तावडीत सापडली. आपल्या अज्ञानाने आपण अनर्थाच्या तुफानात सापडतो. सोन्याच्या भूषणापेक्षा लेकरांना विद्येच्या भूषणाने सजवावे. डागिणे घालण्याची चाल घातक आहे, हे हजारोवेळा सिद्ध झाले आहे. त्यापेक्षा शोभिवंत साधे कपडे घालावेत.

**४३२०** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३१८–३२१)

सन १७९४ मध्ये मिस्तर बोग याने तारणाराचे राज्य वाढावे, म्हणून धर्मोपदेशकांची सभा भरविली. या सभेस हजारोंनी देणग्या मिळाल्या. मंडळात फाटाफूट होऊ नये, याकरिता मंडळीच्या व्यवस्थेचा प्रकारही ठरविला. १७९७ त प्रथम ताहिती बेटावर उपदेशक रवाना झाले. सन १८०१ मध्ये इंग्लीश चर्चच्या अनेक शाखा निघाल्या. आफ्रिका, हिंदुस्थान व चीन देशांत शेकडो उपदेशक गेले. अमेरिकेन मिल्स, हाल व रिचार्डस यांच्या प्रयत्नाने शुभवर्तमान प्रसारक मंडळी सुरू झाली. हल्ली ६१ मंडळ्या आहेत. परक्या भाषांचा अभ्यास करून या लोकांनी बायबलचे अनेक भाषांत तर्जुमे केले. ज्या भाषांत लिपी नव्हती; त्या भाषांची लिपीसुद्धा तयार केली; कोश व व्याकरणे रचली. पवित्रशास्त्र प्रसारक मंडळीने १८०४ मध्ये काम सुरू केले व ९० लाखांच्या देणग्या मिळविल्या. लंडनच्या मंडळीने १७९९ पासून कार्य करून घरोघर पुस्तके विकली. हिंदुस्थानात आज ३५० उपदेशक व ७८७ शाळा आहेत. मुंबईत अमेरिकन मिशनची स्थापना १८१३ मध्ये झाली. १२०५१ शास्त्राच्या प्रती विकल्या.

**४३२१** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२१)

बहुत लोक शोध करितील व ज्ञान वाढेल.

**४३२२** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२२-३२४)

या हर्षकारक समाजाचे नाव ज्ञानप्रसारक सभा आहे. ते टेबलाचे अथवा खुर्चीचे नाव नाही. लोक आले नाहीत, तर सभेच्या कामास मांद्य येते. प्रत्येक सभासद आवश्यक, तसेच भूषणकारक असतो. सभेचे सावयव आणि शुद्धरूप लोकांपुढे गेले पाहिजे. मराठीमध्ये सुधारणूक होऊन नवेनवे ग्रंथ व्हावेत. सायक्लोपीडिया तयार होऊन भाषेला परिपूर्णता यावी. यासाठी निबंध तयार करावेत. केवळ वर्गणी देऊन स्वस्थ बसू नये. या सभेत श्रोत्यांची संख्या वाढली पाहिजे. या सभांचा आदर ठेवला, तरच देशाचा उत्कर्ष सुलभ होईल.

**४३२३** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२४-३२७)

'सत्यशोधक ख्रिस्ती' लिहितो की : मुंबापुरात एक ब्रह्मचारी बावा आलेला आहे. लोक त्यास भगवद्भक्त आणि ज्ञाता समजतात. बावा पुनर्विवाहाच्या विरुद्ध बोलतात. अशा लोकांना ते दुष्कर्मी म्हणतात. मूर्ख व वेडगळ तत्त्वे सांगतात. भावभोळे व विचारशत्रू लोक त्यांच्या नादी लागले आहेत. बाबा म्हणतात, मूर्तिपूजा अवश्य करावी. बाबा जातिभेद मानतात. मौजीबंधनास त्यांची सम्मती आहे. बऱ्याच वेळा उडवाउडवीची उत्तरे देतात. परधर्म स्वीकारणारे लोभी असतात; तसेच स्वतःला ओळखले की, ईश्वरास ओळखल्यासारखे आहे, ही बावाची तत्त्वे आहेत. भूगोलाच्या हिंदु शास्त्रातील चुका सांगितल्या, तर हे बावा विपरीत उत्तरे देतात. परधर्मी लोकांना माझे बोलणे समजणार नाही, असे ठासून सांगतात. ख्रिस्ती धर्मावर मिथ्या दूषणे देतात.

**४३२४** (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२७)

सत्याला सर्वकाळ जय आहे, परंतु असत्याला नाही.

४३२५ (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२८)

मुंबई इलाख्यातून इराणच्या लढाईसाठी दहा हजार सैनिक जाणार असून त्यांची तयारी जोरात चालू आहे. २० हजार खंडी सामान जहाजाने जाईल.

४३२६ (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२८)

रशियाचा बादशहा मरण पावला. त्याने ३० वर्षे राज्य केले.

४३२७ (१ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२८)

वाशिंदे ते नागपूर घाट तयार होणार.

४३२८ (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२८)

भारतात ४ हजार मैल तारायंत्रे तयार झाली. त्यास २० लक्ष रुपये खर्च झाला.

४३२९ (१५ : २०, १७ ऑक्टोबर ५६, ३२८)

अमेरिकन मिशनाच्या मासिक सभेत 'शास्त्रातील कित्येक गोष्टी या विद्येवरून कळून आलेल्या गोष्टीसी विरुद्ध आहेत.' या शंकांना उत्तर दिले जाईल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४३३०** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३२९–३३२)

दुख व मरण यांकडून पापी माणसाच्या तारणाचा जो उपाय, त्याला प्रायश्चित्त असे नांव आहे. ईश्वराचे ऋण फेडण्याचा तो मार्ग आहे. हे द्रव्यादिकाचे ऋण नसून महान् पित्याचे ऋण आहे. ख्रिस्ताने अन्यायाचा भार स्वतावर घेऊन आम्हास न्यायीकृत केले. योग्य तो पापदंड भरला. अर्थात स्वतावर पापे घेतल्यामुळे तो पापी होत नाही. त्याच्या ठिकाणी ईश्वरी, तसाच मानवी प्रकृतीचा संयोग होता. म्हणून त्यास हे शक्य झाले. ईश्वराच्या नेमशास्त्राचा मान त्याने राखला. मानवी देह व आत्मा यांजकडून त्याने दुःख सोसले. तो स्वतः पवित्र होता. पाप्यांच्या तारणाकरिता तो आला. पश्चात्ताप आणि आज्ञापालन यांजकडून पाप नाहीसे होते.

**४३३१** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३२–३३३)

पंजाबात मिशन स्थापण्यासाठी रे. हंटरसाहेब इकडे आले. स्कॉच् मिशनामध्ये माणसे कमी होती, म्हणून ते त्या मिशनात राहिले. आता ते बहुतेक वजिराबाद धर्ममंडळामध्ये काम करतील.

**४३३१ अ** (इंम : ३३२)

**४३३२** (१ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३३)

रे. के. मिचेलसाहेब १८५३ पासून पुण्यात आवेशाने फ्री चर्च मिशनाचे काम करीत होते, पण रोग बळावल्यामुळे स्वदेशी रवाना झाले.

**४३३२ अ** (इंम : ३३३)

**४३३३** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३३)

रे. ग्लासगोसाहेब व्याख्यान देतील. व्याख्यानाचा विषय, 'ग्रहनक्षत्र चंद्रादि ही नुसती आस्पदे आहेत किंवा निवासभुवनेही असावी' असा आहे.

**४३३३ अ** (इंम : ३३३)

**४३३४** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३४)

हेजनसाहेबांनी शास्त्रातील गोष्टींस विद्येचे शोध प्रतिकूल आहेत, या विषयावर व्याख्यान दिले. पण श्रोते अगदी थोडे होते. मुळात शोध केल्यावाचून शंका काढू नयेत. शंका काढल्यावर अनुपस्थित राहाणे, यात कपटभाव आहे. शिवाय सत्यतेच्या प्रमाणाविषयी ते अज्ञानी राहातात. दुराग्रह धरून प्रकाशाचा अव्हेरही करतात.

**४३३४ अ** (इंम : ३३३–३३४)

**४३३५** (१ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३५–३३६)

मिशनरी लोकांना बावाशी वाद करणे जमत नाही, अशी समजूत कोणीतरी मुद्दाम फैलावीत आहे. पण तेथे जात्यभिमान फार दिसतो. बाटलेल्या महारांस तेथे येऊ देत नाहीत. चर्चेस मुक्तद्वार मिळण्याकरिता मोकळ्या मैदानावर सभा भरवावी. दोन अध्यक्ष असावेत. या वादछत्राचे काळवेळ व नियम ठरवावे. उभयपक्षांतून एकेकाने वाद करावा. श्रोत्यांनी मत मांडावे. पण इत्यर्थ ठरवू नये.

**४३३५ अ** (इंम : ३३४–३३५)

**४३३६** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३६–३३८)

'एक उपदेशक' लिहितो की : निर्जीव मूर्तींत मंत्राने प्राणप्रतिष्ठा करण्याचे सामर्थ्य ब्राह्मणात आहे, असे नेटिव समजतात. पण ईश्वराखेरीज हे कोणालाही शक्य नाही. ब्राह्मण लोक मेलेला जो, त्यास जिवंत करतात काय ? मूर्तींच्या नावावर अनेकांना वेतन मिळाले. मारुतीच्या देवळास चावडी बांधण्यासाठी इंग्रेज सरकारकडे अर्ज जातात. पण या चावडीत ख्रिस्ती लोकांना कोणी राहू देत नाही. यशायाने म्हटले आहे की, मूर्ती म्हणजे शून्य होय. मूर्तींवर दागिने घालण्याने चोर, उंदीर व मारवाडी, यांचे भय मात्र निर्माण होत असते. म्हणून मूर्तिपूजेचे बंड मोडले पाहिजे. मूर्तींच्या वर्षासनाचा पैसा गरीब लोकांच्या शिक्षणाकरिता खर्च करावा.

**४३३७** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३३८–३४१)

पूर्वी सरकारी नोकर असणाऱ्या ब्रह्मचारी बावाने शंकराचार्य कवच धारण केले. छोटे पांडित्य छोट्या चिटलिंगापुढे चालते. काही प्रश्न केला, तर हा बावा क्रोधमुद्रा धारण करतो. गर्दीमुळे चेंगराचेंगरी फार होते. श्रोते मोठ्याने ओरडत असतात. कोणताही प्रश्न विचारला की, बावा ठराविक उत्तरे देतात. अनुभव घेऊन पाहा, शास्त्र वाचून पाहा, आणि शोधून पाहा. असल्या उत्तरांनी सत्याचा शोध लागणे कठीण आहे, असे पत्र 'सभापांडित्य अवलोकन करणारा हिंदू' याने लिहिले आहे.

**४३३८** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३४१)

एक बंदिवान चौकसनीसाची नजर चुकवून कैदेतून पळाला. नंतर एका गरीब माणसाच्या घरी आश्रयास राहिला. त्यांची लाचार व दरिद्रि अवस्था पाहून त्याला फार वाईट वाटले. त्याने सल्ला दिला की, 'मला पकडून द्या व सरकारी बक्षीस मिळवा.' याप्रमाणे कैद्यास कोतवालीत हजर करून गरिबाने बक्षीस मिळविले. सरकारला जेव्हा या कैद्याचे औदार्य व दयाभाव कळला, तेव्हा त्याची निर्दोष सुटका झाली.

**४३३९** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३४१–३४२)

नारायणबावा नावाचा साधू विठ्ठलाच्या देवळात भजन करीत असे. तुकारामाच्या प्रत्येक अक्षरास मान डोलावणारा विठ्ठल आपल्या गाण्यास प्रतिसाद देत नाही, म्हणून त्याने मूर्तीच फेकून दिली. बावास कैद झाली. तुरुंगात उपोषण करून त्याने मृत्यु पत्करला.

**४३४०** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३४२–३४३)

मि. लिजेट यांच्या खर्ड्यात म्हटले आहे की : लोक खरी माहिती देत नाहीत. कारण त्यांना वाटते की, माणसागणिक नवे कर वाढतील. असले अटकाव असूनही १८५७ मध्ये मनुष्यगणना होणारच आहे. निरक्षर लोकांविषयीची माहिती पोलीस खात्याची मदत घेऊन गोळा केली जाईल.

**४३४१** (१५ : २१, ४ नोव्हेंबर ५६, ३४३–३४४)

उपदेशक म्हणतात की : येशू हाच खरा सद्गुरू होय. तो अंतर्ज्ञानाने खरेपण जाणीत होता. तो देवाजवळ खरेपण शिकला. माणसांची माहिती ऐकीव असते. याकरिता माणसांना खरा गुरू मानता येत नाही. साकल्याने सत्य प्रगट करण्यास तोच लायक आहे. तो देशगुरू नसून जगद्गुरू होता. तो जगाचा उजेड झाला. त्याच्या आज्ञेवरून बारा प्रेषितांनी समुद्रवलयांकित पृथ्वीवर त्याचा संदेश पसरविला. येशूला फार माहितगारी होती. ईश्वर त्याच्या तोंडून आपले वचन आणि आज्ञा बोलत असे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक २२, मुंबई, १७ नवेंबर १८५६

**४३४२** (१ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३४५–३४७)

प्रायश्चित्त हे परिपूर्ण व सार्वत्रिक असावे. प्रायश्चित्त घेणारा अपार श्रेष्ठत्वाचा व महान् योग्यतेचा आहे. हे प्रायश्चित्त एका बरोबर सर्वच मानव जातीस लागणारे आहे. ईश्वरी आज्ञा व आमंत्रण यांस पुरणारे असे ते असावे. देवपुत्रावाचून कोणीही ते घेऊ शकला नसता. कारण तो सर्वांत पवित्र व निर्दोष होता. माणसाने पाप केले, म्हणून मानवी अवतार धारण करावा लागला. माणसाची विपरीत वर्तणूक, पश्चात्तापाचा व विश्वासाचा अभाव, या दोन कारणांनी प्रत्येक माणूस काही त्याच्या योग्यतेचा होत नाही. येशूच्या प्रायश्चित्ताने सगळे जग तरेल. येशूने आमच्या बदला स्वतःस खंडून घेतले. या सिद्धांताचे ज्ञान ईश्वराच्या शास्त्राने होते.

**४३४३** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३४७–३५०)

'एक ख्रिस्ती' पत्रात म्हणतो की : धूमकेतूने ख्रिस्ती धर्मावर दूषणे लावली आहेत. खडकावर पेरलेल्या बीप्रमाणे काही लोकांच्या मनात सत्य रुजत नसते. हिंदू धर्मामध्ये अजूनही ख्रिस्तावर विश्वास ठेवणारे अनेक लोक आहेत. ईश्वराने सद्गुण निर्माण केले, मग पापही त्यानेच तयार केले, असे धूमकेतू म्हणतो. ईश्वर पापाचा कर्ता नाही. कारण आमची विवेकबुद्धी पापाची टोचणी लावते. पापातून फक्त दुःखच निर्माण होते. मरणाचे लोकांना भय वाटते. शास्त्रात पापाचा महान द्वेष दिसतो. आकाशामधील दूतांना पापावरून बाहेर टाकले जाते. तो पापाचा कर्ता नसल्यामुळेच त्याने येशूला पापाच्या निर्दालनासाठी पाठवले. बरेवाइटाचे ज्ञान देणारे झाड केवळ आदिमानवाची परीक्षा पहाण्यासाठी लावले होते. ईश्वराची आज्ञा तुच्छ मानल्यामुळे आदाम व हव्वा यांचा अधःपात झाला.

**४३४४** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५१–३५२)

जगात पाप चालते, एवढ्यावरून ईश्वराचे शास्त्र कधीही सदोष ठरणार नाही. सद्सदविवेकबुद्धी वाढून पापाचा प्रतिबंध व्हावा, म्हणून ईश्वराने धर्म दिल्हा. जेथे पापाची लज्जा वाटत नाही, तेथे विवेकाचा अभाव जाणावा. मनुष्यास मोकळीक देणे, म्हणजे काही पापास प्रोत्साहन नव्हे. स्वातंत्र्याचा उपयोग विवेकबुद्धीने केला पाहिजे. बरे आणि वाईट यांत निवड करण्याची शक्ती मानवाजवळ आहे. शक्ती व इच्छा यांचा तुम्ही दुरुपयोग केला, तर तो दोष तुमचा आहे. ईश्वराने पाप निर्माण केले नाही. नास्तिकपणा टाकून विचार करा.

**४३४४ अ** (इंम : ३५०)

**४३४५** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५२–३५३)

'सभेस जाणारा हिंदू' पत्रात म्हणतो की : ब्रह्मचारी बाबा म्हणतात की, जर मंत्र यथाविधी जरले, तर त्यांचा खरेपणा दिसतो. पण ज्ञानेश्वर म्हणतात, मंत्राने शत्रू मरत असता, तर तलवारीची गरज काय? साखरेने ज्वर जात असेल, तर कडू लिंबाची आवश्यकता काय? यावर बाबा सांगतात, मंत्राने माणसे मेली तर मरतात, नाही तर नाही! असली कडवट भाषणे केल्यावर हिंदू लोकही सभेस येणार नाहीत.

**४३४६** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५३–३५५)

सुशिक्षितांनी काही उद्योग मिळाल्यावर सभेचा संबंध सोडावा, हे नवलच आहे. विद्येचे झरे जेथून फुटतात, तेथील उदक ग्रहण केलेच पाहिजे. अशा वागणुकीमुळे विद्येचा अंकुर जळून जाईल. प्रत्येक माणसाचे गुण ओळखावेत. आळशाने मुंगीकडून उद्योग शिकावा. या देशात अजूनही विद्येची अभिरुची निर्माण होत नाही. १८२२ पासून एल्फिन्स्टन विद्यालय आहे. पण तर्कटी लोक मुलांना शाळेत पाठवीत नाहीत. इंग्रजांनी परिश्रम करून नामांकित विद्यालये चालविली. परभाषेप्रमाणे स्वभाषेचीही गोडी वाटली पाहिजे. सर विलियम जोन्स संस्कृत शिकण्यासाठी दिवसाला १७ रुपये खर्च करीत असे. डिमास्थितीसप्रमाणे आपल्या भाषेत प्रावीण्य मिळवून देशाभिमान वाढवला पाहिजे. देशकल्याणाच्या कार्यात श्रम आणि द्रव्य यांची काटकसर करू नका.

**४३४७** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५५–३५७)

कंपनी सरकारतर्फे विद्यमान माजिस्त्रेत पुणे जाहीर करतात की : जेजुरी वगैरे ठिकाणी देवळाजवळ गळ टोचण्यास कायद्याने बंदी करण्यात येत आहे. हे अज्ञानी क्रूरकर्म करून पोट भरणारांस दंड व शिक्षा केली जाईल. तसेच स्तंभावर चढून फेर घेणे अगर शरीरास तलवार मारून घेणे, हेही ताबडतोब बंद करावे. नाहीतर खटला भरला जाईल.

**४३४८** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५६–३५७)

रात्रीच्या वेळी गाडीवाल्यांनी फाणस घेतल्याशिवाय हिंडू नये अगर भिकाऱ्यांनी ओरडत फिरू नये, अशी दवंडी पिटण्यात आली आहे. हा हुकूम मोडला, तर वीस रुपये दंड होणार आहे.

**४३४९** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५६–३५७)

एका बोहऱ्याने दुकानात नग्न, बीभत्स २५ तसविरा लावल्यावरून त्यास पाच रुपये दंड झाला.

**४३५०** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५६–३५७)

एका विधवा स्त्रीची इस्टेट गिळंकृत केल्याबद्दल बापू दीक्षित यास व इतर ६ जणांस कैद व दंडाची शिक्षा झाली.

**४३५१** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५७)

तंबाकू ओढू नये किंवा त्याचा इतर कोणताही उपयोग करू नये. तंबाकूने आळस वाढतो. मज्जातंतूचा जोर कमी होऊन हस्तादिकास कंप सुटतो. तंबाकू पौष्टिक किंवा दीपक नसून मादक मात्र आहे.

**४३५२** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३५७–३६०)

आरशामध्ये चेहरा दिसावा, त्याप्रमाणे येशूच्या मनातील कल्पना प्रगट होतात. दुसऱ्याचा वाईट मतलब तो लगेच उमजे. चुना लावलेली कबर सुंदर दिसते, त्याप्रमाणे माणसे वरून सुंदर, पण आतून मळाने भरलेली असतात. यहूदाचे कपट त्याने ओळखले. आणि नाथानेलाचा निष्कपटपणाही ओळखला. उपदेशक म्हणतात, देवाची सगळी कार्ये त्यास अनादि काळापासून ठाऊक होती. मनुष्याचा भरवसा व प्रीत बसेल, अशा रीतीने तो उपदेश करी. ऐकणाराच्या बौद्धिक पात्रतेप्रमाणे त्याचा उपदेश असे. तो पापाचा निषेध करीत असे. तो ढोंगी गुरू नव्हता. तो अभिषिक्त मशीहा, म्हणजे तारणारा होता. लबाड लोकांचे ढोंग व अभिमान उघडकीस आणून त्यांना रागावत असे.

**४३६३** (१५ : २२, १७ नोव्हेंबर ५६, ३६०)

डाक्तर ग्लासगो यांचे अमेरिकन मिशनात व्याख्यान होणार असून विषय 'ख्रिस्ती शास्त्रात ज्या तफावती व असंगत्या कित्येकांना वाटतात त्यांच्या शंकांना उत्तरे' असा आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक २३, मुंबई, १ दिसेंबर १८५६

---

**४३६४** (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३६१–३६६)

येशू ख्रिस्त खरा सद्‌गुरू होता. तो अनेक दाखले देई. तारणाच्या अरुंद दरवाज्याने जाण्यासाठी लगट केली पाहिजे. फारच थोडे त्या वाटेने जाऊ शकतात. असे सांगून तो लबाडांना निरुत्तर करी. तो वादात अजिंक होता. सत्यरूप ईश्वराचे खरेपण त्याला पटले होते. तो नेमाने चालत असे. म्हणून ज्यांची कामे वाईट होती, त्यां सर्वांना त्याची भीती वाटे. यहुदी लोकांना तो सैतानाचे पुत्र आणि पापाचे दास म्हणत असे. देवाचा ओठांनी सन्मान करून ते देवापासून हजारो मैल दूर असतात. मी थोडका वेळ तुमच्याबरोबर आहे, असेही तो बजावीत असे. एकच खरा शिष्य हजारो ढोंगी शिष्यांपेक्षा श्रेष्ठ असतो, याची त्यास जाणीव होती. खरेपणाचे चिलखत असल्यामुळे तो मरणास भ्याला नाही. शास्त्रीपारोशी लोकांनी देवाच्या घरास व्यापाराचे घर बनविले, म्हणून त्यांचा निषेध त्याने केला. तो निःपक्षपाती होता. ईश्वरावर प्रीति करणारांशी तो दयेनेच वागत असे.

**४३६५** (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३६६–३७०)

केवळ डोक्यावर पाणी शिंपडणे, एवढी दीक्षा पुरेशी नाही. अंतःकरणामधल्या अशुद्ध भावना व वासना पालटून आरंभ होणे, हा खरा पुनर्जन्म आहे. पवित्रीकरणाचे उपाय व साधने मानवाने नेमशास्त्रात शोधावी म्हणजे आत्मा निष्पाप होतो. तारणासाठी, पुनर्जन्म आवश्यक आहे. त्यानेच आकाशलोकांत सहज जाता येईल. हा पुनर्जन्म जिवंतपणीच झाला पाहिजे. पुनर्जन्माने माणूस सुप्रकाशित होत असतो. त्याने माणसाचे स्वातंत्र्य नष्ट होत नाही. उलट पवित्र आत्म्यची प्रेरणा मिळत राहाते. राजीखुषीने ईश्वराकडे जातो, म्हणून तो कर्ता आहे व ईश्वरी आज्ञेप्रमाणे वागतो, म्हणून तो अकर्तासुद्धा आहे. असा माणूस पवित्र, शांत, धीरगंभीर दिसत असतो. पापी, दुर्गुणी, ईश्वराबद्दल समज नसणारे, असे लोक पुनर्जन्माविषयी उदास राहातात.

**४३६६** (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७०)

मि. मंतगमरी विलायतेहून आले. ते सुरत मिशनात राहातील.

**४३६६ अ** (इंम : ३७०)

**४३६७** (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७१–३७२)

ब्रह्मचारी बावाच्या व्याख्यानावर कोणास काही शंका काढावयाच्या असतील, तर त्यांनी रे. बोएन यांजकडे लेखी द्याव्यात. बावाच्या श्रोत्यांना प्रवेश देताना जातिभेदाची तरतूद आहे. पण खरा शोध करण्यासाठी सर्व जातींना तेथे येऊ देणे आवश्यक आहे.

**४३६७ अ** (इंम : ३७०–३७१)

४३५८ (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७३–३७४)

दीपिकाकर्ता म्हणतो की : खिस्ती ग्रंथ म्हणजे केवळ फसविण्याचा प्रकार होय. आणखी तो आरोप करतो की, खिस्त पापी होता. यास्तव तो देव नव्हता. हिंदू शास्त्राचे कर्ते मात्र पुण्यवान होते, असे त्याचे मत आहे. परंतु हेच तर्कसूत्र पुढे चालविले, तर असे सिद्ध होईल की, जो, देव पाप करतो, तो पापीच आहे. मग त्याचे भक्त पापीच होणार. म्हणजेच, हिंदू शास्त्रकर्त्यांना खरा देव कळलाच नाही.

४३५८ अ (इंम : ३७२–३७३)

४३५९ (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७४)

पोष्टाच्या पत्रे वाटणाऱ्या कर्मचाऱ्यांना हिरवा डगला व तांबडे पागोटे असा पोषाख दिला जाईल.

४३६० (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७५–३७६)

सिरक्याशन सैनिकांनी रशियावर जय मिळविला.

४३६१ (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७५–३७६)

फ्रेंच व इंग्लिश वकिलांनी नेपल्स सोडले.

४३६२ (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७५–३७६)

तुर्की व इंग्लिश सैन्य 'प्रिन्सिपॉलिटीस' मुलुख सोडणार नाही.

**४३६३** (१५ : २३, १ डिसेंबर ५६, ३७५–३७६)

ख्रिस्ती धर्मप्रसारास ईश्वराने अनुकूलता दाखविली आहे. ताहिती बेटाचे रहिवाशी रानटी व मनुष्यभक्षक होते. त्यांच्या ओतू नावाच्या राजाने ख्रिस्ती धर्माचा अंगीकार केला. मादागास्करच्या राजाने ख्रिस्ती धर्मोपदेशकांना फार उत्तेजन दिले. सांडविच बेट व तुर्कस्तान या प्रदेशांतही ख्रिस्ती धर्म वाढत आहे. दोस्त राष्ट्रांत तुर्कस्थानदेश सामील झाल्यापासून तेथे धर्मप्रसारास अनुकूल वातावरण मिळाले. शुद्ध नीती आणि येशूसारखा ईश्वरी अवतार, यांच्या योगे शुभवर्तमान वाढते आहे. बहुतलोक ख्रिस्ती धर्मास अनुकूल झाले. मोटेवियातील देवळात ३०० हून अधिक लोक उपदेश ऐकतात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १५, अंक २४, मुंबई, १६ डिसेंबर १८५६

---

**४३६४** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३७७–३८२)

आमच्या शुभवार्तिकांनी रानटी लोकांना पवित्र शास्त्र समजावून सांगितले. एका दारूबाज जुगाऱ्यास उपदेश केल्यावर तो इतका चिडला की, झोपलेल्या उपदेशकास ठार मारण्यासाठी तयार झाला. पण हळूहळू त्याचे मन पालटले. ख्रिस्ताच्या सहवासाने त्यांच्या वेडगळ चाली संपूर्ण बदलल्या. ते ख्रिस्ती झाले. मूर्तिपूजेची व्यर्थतासुद्धा त्यांच्या ध्यानात आली. आता ते कल्पित देवावर आणि ढोंगी साधूंवर विश्वासत नाहीत. ग्रीनलंडमध्ये ख्रिस्ती उपदेशकांच्या जिवास धोका झाला. ताहिती बेटावर उपदेशकांना लुटण्यात आले, तरी धैर्याने त्यांनी काम चालविले. न्यूझीलंडमध्ये तर सतत भय व संकटे होती. मनुष्यभक्षक रानटी लोकांमध्ये राहावे लागले. ब्रह्मदेशातील मिशनरी जडसनला दोन वर्षे बंदीशाळेत पडावे लागले. पण प्रभू त्याजबरोबर असल्यामुळे तो बचावला. अमेरिकेतील मतभेदामुळे दोन मिशने काम करू लागली. पण असे अनर्थ होऊनही ख्रिस्ती धर्माचा प्रसार चालू राहिला.

**४३६५** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३८२)

मनुष्याचा राग तुझी स्तुती करील, आणि रागाचे शेष तू बंद करीसील.

**४३६६** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३८२–३८४)

प्रीत दोन प्रकारची आहे. परोपकारी व प्रसन्नतेची. सचेतन प्राण्यांना सुखी करण्याच्या इच्छेस परोपकारी प्रीत म्हणतात. शेजाऱ्यावर प्रेम करणे, प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी ईश्वर मानणे, हे या प्रीतीचे लक्षण होय. हे प्रेम निःस्वार्थी व निःस्पृही असते. असेच अस्वार्थिक प्रेम प्रसन्न प्रीतीतही दिसते. प्राण्यांचे पवित्रपण व चांगुलपण ओळखुन ही प्रीत परोपकार करते. परोपकारात दुसऱ्याचे हित, तर प्रसन्नतेत दुसऱ्याचे चांगुलपण आहे. नीतीने वागून ईश्वराच्या आज्ञा पाळाव्यात. सर्व सुबुद्ध प्राण्यांना प्रीत सर्वोत्तम तसेच अति प्रियकर वाटते.

**४३६७** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३८४)

गाडनरसाहेब मडमेसह मुंबईस आले. पुण्याच्या फ्री चर्चमध्ये के. मिचेलच्या जागेवर ते काम करतील.

**४३६७अ** (इंम : ३८४)

**४३६८** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३८५–३८७)

डाक्तर कमिंगच्या भूस्तरविद्येवरून दीपिकाकर्ता मोश्यास खोटे ठरवू पाहातो. पण ४ हजार वर्षांपूर्वी ईश्वराच्या आज्ञेवरून मोश्याने बिनचूक शास्त्र तयार केले. मोशाची ओवी चूक म्हणजे अयोग्य आहे. आदामाच्या अधःपातापूर्वीही इतर प्राण्यांना मरण येत होते. माणसाचे मरण मात्र पापाच्या योगाने होते. ईश्वरानेच दिवस व रात्र निर्माण केली. मनुष्यापूर्वीही देवाचे दूत होतेच. विनाकारण शाब्दिक छळ करण्याने काही साधत नाही. हिंदू शास्त्रात सांगतात की, अंडापासून पृथ्वी झाली. ते चूक आहे.

**४३६८अ** (इंग : ३८४–३८५)

**४३६९** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३८७–३८९)

एक नासिककरीण बाई लिहितात की : सुज्ञ व दयाळू लोकांनी अनेक गावांमध्ये मुलींच्या शाळा सुरू केल्या. पण मंदमती व मूढ लोक अज्ञानांत तोंड पाहून अंधारामध्ये वेळ घालवतात. स्त्रिया नोकरी करतील काय, असे ते विचारतात. स्त्रिया जर शिकल्या, तर सासूसासऱ्यांना तो अपमान वाटतो. अविद्वान स्त्रिया गाईम्हशीप्रमाणे वाढतात व मरतात. अडाणी स्त्रियांना उंची वस्त्रे व अलंकार यांत सुख वाटते. हेव्यादाव्यात व मत्सरात त्या दिवस घालवतात. त्यांना व्यावहारिक विद्या शिकवून निराशेच्या कर्दमातून बाहेर काढावे. सुशिक्षित स्त्री निर्मत्सरी असते. विद्येचे अमोल्य रत्न त्यांना द्यावयास हवे. दुसऱ्याची गृहछिद्रे काढण्यापेक्षा मनोरंजन व ज्ञान मिळवावे. त्यात विश्रांती सुख व आनंद आहेत. अडाणी स्त्रिया आपटधोपट, कज्जा, भांडण, शिव्यागाळी, यांतच मग्न राहातात. म्हणून स्त्रिया शिक्षित असल्या पाहिजेत.

**४३७०** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३८९–३९०)

'एक ख्रिस्तदास' लिहितो की : बावाने एक जाहीरनामा काढला, त्यात तो म्हणतो की, व्यसने व बैबल वाचून हिंदू धर्म सोडणे टाकावे. म्हणजे शास्त्र वाचण्यास तो जुगाराच्या माळेत बसवितो. बावा बैबलाविषयी अज्ञानी असून त्याच्या मनात द्वेष आहे. बावा खाजगीत सांगतो की, हिंदू धर्म खोटा, देवाची भक्ती म्हणजे ढोंग आहे. म्हणजे बावाच ढोंगी व दुतोंड्या ठरतो. बावा योगसाधन व आत्मज्ञान यांचा ताठा मिरवितो. पण त्या ज्ञानात अर्थ नाही. भगड व अफिमी लोकही समाधीतच असतात. मानवाचे पाप ओळखणे, हे खरे आत्मज्ञान होय. परमेश्वर आनादि अनंत आहे, तर आपण भणंगभिकारी आहोत. आपले धर्मकर्म जर दोषयुक्त असेल, तर ते टाकले पाहिजे. परंतु त्याच्यात धैर्यच नाही. बावाने शांतिकारक ख्रिस्ती धर्मामध्ये यावे.

**४३७१** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३९१)

सन १८५७ चे पंचांग अमेरिकन मिशन प्रेसमध्ये छापले जाईल.

**४३७२** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३९१)

मेडिकल कॉलेज वार्षिक परीक्षेसाठी इंग्रजी लेखन-वाचन, गणित, पदार्थविज्ञान, इतिहास-भूगोल, हे विषय ठेवले आहेत.

**४३७३** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३९२)

हेरात शहर इराणी सैनिकांनी जिंकले. हेरातचा सरदार इसाखान याच्या मुसक्या बांधून त्यास इराणात पाठविले. सरदार सादिक तर नानरास लाच देऊन कैदेतून पळाला. उमीखान या वकिलाचा खून झाला. हालके या बेटावर किल्ला बांधून इराणची एक लक्ष फौज राहिली व रशियन फौज मदतीस येणार आहे.

**४३७४** (१५ : २४, १६ डिसेंबर ५६, ३९२)

इंग्रज आरमाराने कंतान शहरावर हल्ला करून शहराचा पुष्कळ नाश केला. या लढाईने चीनचा व्यापार बंद पडला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४३७८** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, २–३)

सुख आणि शांती यांचा वास्तव अर्थ समजणारे लोक देवदूताप्रमाणे दुर्मिळ आहेत. ते आगंतुक वाटले, तरी घरंदाज असतात. धांडोळा घेऊनही सुख मिळत नाही. विद्येचा निदिध्यास आणि वर्तणुकीचा निर्धार, हाच सुखाचा झरा आहे. हिंदु लोक पुढाऱ्यांच्या मागून बेधडक चालतात, सुष्टदुष्ट ओळखीत नाहीत. त्यांचे अज्ञान व दुर्बळपण मोडण्यासाठी आम्हांस त्यांचे विचार जागवावे लागतात. कादंबरीचे कृत्रिम दूध देऊन गंमत करणेही शक्य आहे. पण हा आहार म्हणजे उपासी मारणे होय. विचारी मानस खऱ्या आणि सुखाच्या मार्गावर न्यावयाचे आहे. खरेपण जाणावे आणि चांगले आचरावे. आम्ही हा बोध करतो, म्हणून काही संपादक आमची निंदा करतात. तरीही आम्ही हा मार्ग टाकणार नाही.

**४३७८ अ** (इंम : १–२)

**४३७९** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, ३–६)

पाप सोडणे आणि पवित्रपण धरणे, यास पश्चात्ताप म्हणतात. केवळ दंडाला भिऊन पश्चात्ताप केला, तर तो पोकळ व निरुपयोगी आहे. यहूदाने आपला आत्मघात केला. चोरांनाही पश्चात्ताप होतो. पण तो पापदंडास भिऊन होतो. पाप म्हणजे नीच अथवा अधम वर्तणूक. ईश्वराच्या आज्ञा मोडणे, देवाचा अपमान करणे होय. खऱ्या पश्चात्तापाने तारणाचा मार्ग सापडतो. पश्चात्ताप लगेच झाला पाहिजे, मनापासून पाहिजे, मरणापूर्वी झाला पाहिजे. येशूच्या वतीने दिलेल्या तारणमार्गाकडे वळले पाहिजे. देवाचे पावित्र्य, वैभव, दया, न्यायीपणा, ही ओळखावी. भावना-वासना, इच्छा आणि कर्मे, यांच्यात पालट झाला, तर तो खरा पश्चात्ताप समजावा.

**४३७७** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, ६–७)

पुण्यातील मांग-महारांच्या शाळेचा रिपोर्ट :

चिटणीस मोरो विठ्ठल वाळवेकर यांच्या अहवालावरून दिसते की, हे परोपकारी काम चांगल्या रीतीने चालले आहे. शूद्र लोक अनेक वर्षे अज्ञानांधकारात मग्न असून त्यांस विद्येची आवड नाही. मुलांस ते भीक मागण्यास लावतात, मो या उपसण्यास पाठवतात. मुलेही आळशी व चंचल आहेत. ब्राह्मण शिक्षक मिळत नाही. मिळालाच, तर टिकत नाही. सरकारने दरमहा काही नेमणूक करून दिली, तर खर्च चालविणे सोपे पडेल.

**४३७७अ** (इंम : ६)

**४३७८** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, ७–१०)

पश्चिम इराणात अरूमी गावी डीकन गवर्जीस हा शिक्षक होता. त्याजकडून चोरी व व्यभिचारादि कर्मे घडली. त्याची मुलगी शाळेत शिकत होती. तिच्या बोलण्यावरून त्याला धर्माची वाटाघाट समजली. तो कठोर व लोभी गृहस्थ रडून प्रार्थना करू लागला व खरा पश्चात्तापी झाला. पुढे त्याने खिस्ती धर्म स्वीकारला व तो उपदेशक बनला. गरीब लेकराबाळांना तो उपदेश करीत असे. सर्वांनी पाप टाकून देवाशी सलोखा करावा, असे त्यास वाटे. तो गुडघे टेकून सद्‌गदित अंतःकरणाने प्रार्थना करी. सद्‌गुण व ज्ञान वाढल्यामुळे तो निर्लोभी झाला. भर पावसात आणि नदीच्या पुरातून जातानाही तो नव्या कराराचे पुस्तक जवळ ठेवीत असे. देवाच्या गोष्टी सप्रेम व हृदयभेदक रीतीने बोलत असे.

**४३७९** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १०–११)

'एक सावध करणारा' लिहितो की : स्त्रिया सुशिक्षित असाव्या याविषयी एका नासिककर बाईनी लिहिलेला निबंध ज्ञानोदयाने प्रसिद्ध केला. परंतु त्यातील बहुतेक भाग 'स्त्रीविद्याभ्यास' ग्रंथावरून उतरून घेतला आहे. बाईनी आपल्या बुद्धीने निबंध लिहिला नाही. अशावेळी अवतरण चिन्हांत वाक्ये देऊन जो प्रामाणिकपणा दाखवावा, तोही त्यात नाही. वर्तमानदीपिकेतही अशी अनेक 'चोरीची पत्रे' प्रकाशित होतात. प्रस्तावनेतील वाक्येही चोरलेली असतात! विद्यार्थी असे लेख लिहून मोराची पिसे लावलेल्या डोमकावळ्याप्रमाणे हास्यास्पद होतात. लबाडी उघडकीस आली की, ते उपहासास पात्र होतात.

**४३८०** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, ११–१३)

'सदोदित शोक करणारी' लिहिते की : सती व बालहत्या यांवर बंदी केली, तशी बालविवाहावर कायद्याने बंदी असावी. मुलगी चार वर्षांची झाली की, तिचे लग्न करतात. मुलाचीही नीट चौकशी करीत नाहीत. खाऊनपिऊन सुखी असला, म्हणजे लग्न ठरते. लहानपणी लग्न केल्यामुळे कोडकौतुक होते, असे ते समजतात! पण मुलींना गोवऱ्या थापण्यापासून कामे करावी लागतात. सासू तिला वऱ्याच्या भाकरीही देत नाही. असल्या आई-बापांचे ईश्वर कधी भले करणार नाही. मुलगी कष्टाने कोमून तिची वाढ खुंटते. दिवसानुदिवस ती भुईतच जाते. नवरा आपला पाटाची बायको आणण्यास तयार असतो! मुलीच्या नशिबी प्रीतीऐवजी दुःख व दास्यत्वच येते. म्हणून डोळे झाकून बालिकांना दुःखसागरात ढकलण्याची ही रीत बंद करा.

**४३८१** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १३–१५)

'एक यथार्थवादी' लिहितो की : सैतानाने अनेक व्यसने निर्माण केली. हत्ती पकडण्यासाठी खड्डा करतात, त्याप्रमाणे आता मोहमय नाटकांचे फार बंड माजले आहे. नाटकाच्या नीच धंद्याने लोकांचे द्रव्य व नीती नाश पावत आहेत. नाटकवाले असभ्य आणि लोभाविष्ट असून मुलांना नाचणे, उद्धटपणा, स्त्रियांचे हावभाव, यांचे शिक्षण देतात. मुलांना जागरणाचा रोग जडतो. ते मर्कटासारखे वेडेविद्रे चाळे करतात. नाटकवाले सुधारणेच्या नावांवर लुटारूपणा करीत आहेत. ही शुद्ध बुडवणूक आहे. देवाच्या न्यायासनाची थट्टा आहे. मुलांना नाटकाचा नाद लागला की, गरीब आईबाप आणखी गरीब होतात. तरी नाटककारांचे प्राबल्य कमी करावे.

**४३८२** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १४–१५)

इंग्रजांचे लष्कर बुशयर येथे उतरले. बंदुकांच्या व तोफांच्या लढाईमध्ये कित्येक इराणी सरदार मेले. इंग्रज क्याप्टन जोन्स याच्याकडे इराणी सेनेने निरोप केला आहे की, आम्ही दोन दिवसांत किल्ला रिकामी करून देत आहोत. तरी क्लार्कसनने किल्ला घेतला, तेव्हा थोडा प्रतिकार झालाच.

**४३८३** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १६)

यात्रिकक्रमण : दुसरा भाग प्रसिद्ध झाला. पृ. २१५
खिस्ती लोकांचे कर्तव्यसार : हे नेटिवांनाही उपयोगी ठरेल. पृ. ८७
मतपरीक्षा : यात खिस्ती धर्माची प्रमाणे दिली आहेत. पृ. ७६
पवित्र शास्त्रातील पुरातन गोष्टी : दुसऱ्या आवृतीची छपाई सुंदर आहे. पृ. १०९
विद्यामाला : गुजराती दुसरी आवृत्ती
लेकुरवाळ्या स्त्रियांस बोध : इंग्लिश निबंधाचा तर्जुमा आहे. पृ. ३१
खरेपणा काय आहे ? : यात पवित्र शास्त्रातील वाक्ये सापडतील.
खंडोबाची गोष्ट : जेजुरीचे लाजिरवाणे प्रकार यात दिले आहेत. पृ. ४५
खिस्तीशास्त्र ईश्वरदत्त आहे याविषयी इतिहासावरून प्रमाणे : लवकरच प्रसिद्ध होईल.
याखेरीज उद्धाराचा उपाय, दिवाळीच्या सणाविषयी, रामनवमी, गोकुळाष्टमी, गणेशचतुर्थी, वगैरे चोपडी फुकट वाटली जातील.

**४३८३ अ** (इंम : १५–१६)

**४३८४** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १६)

आयोध्या संस्थानचे उत्पन्न १ कोटी १० लाख ७७ हजार आहे.

**४३८५** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १६)

बडोद्याची लोकसंख्या ३ कोटी, तर उत्पन्न ६ कोटी आहे.

**४३८६** (१६ : १, १ ज्यानुएरी ५७, १६)

सन १८५७ चे पंचांग प्रसिद्ध झाले. किंमत १ आणा.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४३८७** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, १७–१९)

ईश्वराच्या अलौकिक कर्तृत्वावर भरवसा ठेवणे, येशूस तारणारा व जामीन मानणे, यास विश्वास म्हणतात. अन्यायाने व कपटाने सत्यता दाखविली, तर तो विश्वास खोटा आहे. खिस्ती धर्माचा इतिहास, त्यातील चमत्कार, यावर पूर्ण विश्वास ठेवावा. मग पवित्र माणूस ईश्वराकडे फिरतो. ईश्वराचा सन्मान वाढवितो. खिस्ताशी संयुक्त होऊन प्रायश्चित्ताचे फळ मिळवितो. शास्त्राच्या उपदेशाने त्याच्या मनावर योग्य संस्कार होतो. आपल्या पापाची क्षमा झाली. येशूने सांगितलेले तारण आपण मिळविले यावर त्याचा भरवसा असतो. भविष्यवादी व प्रेषित यांनी याविषयी साक्षात प्रमाण दिले आहे. (प्रश्नोत्तर)

**४३८८** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, १९–२४)

डीकन गवर्जीसने ऐहिक प्रीत भगदी टाकिली. त्याने स्वतःला धर्मप्रसारास वाहिले. वेतन न घेता ३ वर्षे कार्य केले. मग कुटुंबासाठी सहा रुपये घेत असे. लक्ष्मीआवड सोडून आपला वाटा उचलला. दररोज सहकुटुंब तो प्रार्थना करी. येशूचे नाव त्याच्या कानास दिव्य गायनासारखे वाटे. निःस्पृह सेवा करून खिस्ताचे ऋण फेडी. जन्मस्वभावाने आपण नासके आहो; म्हणून दुष्ट लोक उपद्रव देण्यापासून विराम पावेपर्यंत भक्ती करावी. देव हा थकलेल्या लोकांचा विसावा आहे. त्याची प्रकृत्ती आजारी असतानाही तो देवळात जाई. रोगी असूनही तो नम्र आणि प्रफुल्लित होता. आपल्या भावाबहिणींची त्याला काळजी वाटत असे. मगजरोगाने भ्रांत व बेशुद्ध असताना तो 'फुकट कृपा' असे शब्द उच्चारी. ईश्वराजवळ भूक-तहान-रोग नाही. म्हणून तो ईश्वराकडे जाण्यास फार उत्सुक असे. नव्या कराराचे पुस्तक जवळ ठेवून तो येशूमध्ये झोपी गेला.

**४३८९** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, २४)

रे. फेरबँक, वुड, हार्डिंज, आणि दीन मडमांसह मुंबईस आले. वुडसाहेब साताऱ्यात, तर बाकीचे तिघे नगरास जातील. फोरबँक व दीन मडम यांचा तर जन्मच या देशातला आहे. साहेबांनीही पूर्वी धर्मप्रसाराचे काम उत्तम केले आहे.

**४३८९ अ** (इंम : २४)

**४३९०** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, २५)

मुंबईतील पवित्रशास्त्र प्रसारक :

या मंडळाच्या अहवालावरून दिसते की, शास्त्राची गोडी सर्वत्र वाढत आहे. खजिन्यात पैका बराच आला. शास्त्राची आणखी एक मराठी आवृत्ती प्रसिद्ध होईल.

**४३९० अ** (इंम : २५)

**४३९१** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, २६–२७)

'मूर्तीपूजेचा त्रास करणारा' पत्रात लिहितो की : खेड्यात कोणाला सर्पदंश झाला, तर त्यास बहिरोबाच्या देवळात ठेवतात. बहिरोबा विष उतरवितो, ही समजूत अज्ञानपणाची आहे.

**४३९२** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, २८–२९)

शिवाजी महाराजांपूर्वी हिंदू लोक अभिवादनासाठी 'जोहार' म्हणत असत. शिवाजीने मोठ्या परिश्रमाने स्वराज्य स्थापन केले. नंतर अमूल्य व अविनाशी सुखाच्या शोधार्थ तो तुकाराम महाराजांकडे गेला. निःस्वार्थी तुकारामाने शिवाजीने आणलेला मौल्यवान नजराणा परत केला आणि त्याला रामदासांकडे जाण्यास सांगितले. शिवाजी राजांनी समर्थ रामदासांकडे जाऊन आपले राज्य रामदासांच्या पायावर वाहिले. तेव्हा रामदास स्वामींनी ही गुरुदक्षिणा लगेच परत दिली व या प्रसंगाची आठवण म्हणून 'राम राम' उच्चारण्यास सांगितले. हिंदूंचा बावटाही भगव्या रंगाचा केला. (ज्ञानप्रसारकवरून)

**४३९३** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, २९–३०)

'लोकांस व्यसनी पाहून त्रास पावणारा' पत्रात लिहितो की : ग्वाल्हेर संस्थानचे उत्पन्न ५ कोटी आहे. पण खाजगी खर्चातच १६ लाख रुपयांची चांदी उडते. दरबारात रांडा, गवई, कलावंतिणी, साजिंदे व भांड यांचा भरणा मोठा आहे. सरदारापासून तर भंग्यापर्यंत रंडी आहेच. शेकडा ९५ लोक रंडीबाज आहेत. दरबारची मर्जी सुप्रसन्न झाली, तर सोन्याचे तोडे बक्षीस मिळतात! आळशी, निरुद्योगी व हलकट लोकांवर अफाट खर्च होतो. यापेक्षा तळी विहिरी, सडका, धर्मशाळा, विद्याशाळा, असल्या उपयुक्त कार्यांवर खर्च करावा. सध्याच्या अंदाधुंदीमुळे दिवाकरासदेखील या राज्यावरून जाण्यास लाज वाटत असेल!

**४३९४** (१६ : २, १९ ज्यानुएरी ५७, ३०-३२)

मनुष्यातील गुरू इतरांसमोर गुरूचे सोंग वठवतात. पण शिष्यांना खरा स्वभाव दाखवतात. उपदेशक म्हणतात, येशू मात्र सर्वश्रेष्ठ गुरू होता. दैहिक गोष्टीवर चित्त ठेवून सुखाचा शोध घेणारांना ईश्वराकडे जाण्याचा मार्ग त्याने शिकविला. सर्वांसमक्ष भीती सोडून देऊन ईश्वरास स्वीकारा, असे तो सांगे. सर्वकाळच्या जीवनाकरिता असे धैर्य आवश्यक असते. म्हणून १२ निवडक शिष्यांना त्याने प्रेषितांची पदवी दिली. ते निरक्षर असले, तरी नम्र आणि विश्वासू होते. योहान व याकोब तर कोळी होते! ज्ञानी लोकांना लाजविण्यासाठी येशूने मूर्खांस निवडले, दुर्बलांना उत्तेजन दिले. मासे धरणारांना माणसे धरणारे असे बनविले. देवाच्या राज्याची गुप्त गोष्ट त्यांना कळविली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

---

## ज्ञानोदय, पुस्तक १६, अंक ३, मुंबई, १० फेब्रुवारी १८५७

---

**४३९५** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ३३-३८)

येशूच्या शिष्यांना एक चमत्कार दिसला. येशू सूर्यासारखा तेजस्वी झाला. लखलखीत ढगातून वाणी आली की, हा ईश्वरपुत्र आहे. विधर्मी लोकांनी फटके मारले, तरी आपल्या कार्यात दृढ राहण्याचा संदेश मिळाला. मनुष्याचा पुत्र गौरवाच्या सिंहासनावर बसावा, म्हणून त्यांना धर्मप्रसारासाठी वसत्या वाटून दिल्या. मृत्यूपूर्वी स्वतः शिष्यांचे पाय धुतले. गुरू असूनही तो नम्र मित्राप्रमाणे वागे. चमत्कार, बोध, निषेध, यांच्या साहाय्याने उपदेश करी. या प्रेषितांनी त्याचे गुण व कृपेची संपत्ती सगळ्या राष्ट्रांमध्ये गाजवली. अंधाराला सोडून उजेडाकडे जाण्याचा संदेश दिला. (संवादस्वरूप)

**४३९६** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ३८–४१)

कोणत्याही पापी मानवास ईश्वराने निर्दोषी मानणे, यास न्यायीकरण ही संज्ञा आहे. अशा पश्चात्तापी मानवास पुण्यवान् माणसाची प्रतिफळे मिळतात. खरा विश्वास धरला, तर माणूस न्यायीकृत होतो. दाता दान देण्यास बांधलेला नाही, त्याप्रमाणे ईश्वरही न्यायीकरणास बांधील नाही. तारकावर विश्वास ठेवा, म्हणजे पापांची क्षमा होते. विश्वासावरूनच नेमशास्त्र सिद्ध होते. विश्वासाइतकेच कृतीलाही तारणाच्या कार्यात महत्त्व मिळाले आहे. शुद्ध व पुण्यमय कामांनी माणूस तरून जातो. ईश्वरास आवडेल, अशा रीतीने भजन व सेवा करावीत, जे शापित लोक आहेत, त्यांना हा पवित्रांचा धर्म आवडत नाही.

**४३९७** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४१–४२)

रे. जे. मरे मिचेल :

अठरा वर्षापूर्वी रेवरंड मिचेल या देशात आले. आजारीपणामुळे ते आता स्वदेशी गेले आहेत. एतद्देशीयांच्या कल्याणासाठी त्यांनी सक्त मेहनत केली. उत्कृष्ट उपदेश करणारा, निपुण शिकविणारा व चांगला निबंध लिहिणारा, अशी त्यांची ख्याती झाली. अडाण्यांना समजेल अशा बाळबोध भाषेत पुस्तके लिहिण्यात ते नामांकित ठरले. इंग्रजी व मराठी दोन्ही भाषांत त्यांनी पुस्तके लिहिली असून त्यांच्या २–२ आवृत्ति निघाल्या.

**४३९७अ** (इंम : ४१)

**४३९८** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४२–४३)

आरक्टिक समुद्राचा शोध घेणाऱ्या फ्रांकलीन साहेबाचे जहाज बर्फात गुप्त झाले. त्यांना शोधण्यासाठी प्रयत्न जारी आहे. ब्रिटिश लोक किती शोधक आहेत, ते यातून दिसते. कैटोसाहेब विमानातून स्वर्गावर आरोहण करतात. अग्निरथाच्या प्राबल्याने अनेक लोक खोपवलीपर्यंत जातात. प्रयत्नी परमेश्वर, ही म्हण ब्रिटिशांच्या अंगी पूर्ण रुजलेली आहे. कितीही अटकाव आले, तरी ते शोधकार्य सोडीत नाहीत. आमचे एतद्देशी लोक मात्र रांडबाजी, जुवेबाजी, सुरापान, यांसारख्या ख्यालीखुशालीत मग्न आहेत! देशकल्याणाचा विचार त्यांस अगदी नाही.

**४३९९** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४२–४३)

अमदाबादेत नार्मल क्लास सुरू होणार आहे. एज्युकेशनल इन्स्पेक्टर टी. सी. होप यांनी परीक्षा जाहीर केली. जे आदमी उत्तीर्ण होतील, त्यांना दरमहा ५ रुपये वेतनावर पंतोजीचे काम मिळेल. (ज्ञानप्रकाशवरून)

**४४००** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४३–४६)

दरवर्षी फेब्रुवारीत घोड्यांच्या पैजा होतात. बडे संभावित आणि तमासगीर लोक शर्यतीवर पैसे लावतात. मुक्या जनावरांना कारणावाचून दुःख दिले जाते. कोंबडे, हत्ती, यांची झुंज, पैलवानांच्या कुस्त्या, हे प्राचीन मनोरंजनाचे प्रकार आहेत. घोड्यांची पैज ही चाल तर मूर्खत्वाची व उपहासास्पद आहे. पैज पूर्ण होईपर्यंत लोकांचा जीव घोड्यांतच अडकतो! या उमद्या जनावरास उरी फुटेपर्यंत पळवितात. सृष्टीच्या निर्मितीत ईश्वराची अपारशक्ती दिसते. आपण मात्र पशूशी विनाकारण क्रूर वर्तणूक करतो. सुकुमार व कोमल अंतःकरणाच्या मडमाही हा दुष्ट खेळ पाहात असतात. हा दुष्टपणाचा समुद्र लोहचुंबकाप्रमाणे प्रेक्षकांना स्वतःकडे खेचून घेतो. दुष्कर्म, चोरी, दिडनाली केव्हा तरी उघडकीस येते. पैसे लावणारे हरतात, तसेच त्यांच्या कुटुंबाची धूळधाण होते. दुष्ट खोडीचे व व्यसनाचे बीज पेरले जाते. लोकांना लुटून स्वतः मातबर होण्याचा हेतू या पैजेत दिसतो. लोकांनी द्रव्यलोभ सोडून पश्चात्ताप करावा.

४४०१ (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४६)

चांगला विद्यार्थी शाळेचे नियम पाळतो. शाळेत वेळेवर जातो. कोणीही त्यास त्रास दिला, तर शिक्षकांना सांगतो. मिठाई खात नाही. घड्याकडे लक्ष देतो. पालकांना आनंद होईल असे वागतो. कोणाचाही द्वेष करीत नाही. सतत ईश्वराचे नाव घेतो.

४४०२ (१६ : ३, ११ फेब्रुवारी ५७, ४६)

पाच महिन्यांची एक चमत्कारिक मुलगी कल्याणहून येथे आली. तिच्या छातीवर मांसाचा गोळा असून दोन्ही हात व पाय त्यास लटकले आहेत. असले कनिष्ठ प्राणी कधीकधी जन्मतात, त्यांना पाहण्यास फार गर्दी होते.

४४०३ (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४६–४७)

कृष्णस्वामी नावाचा मलबारी वैद्य रक्तपितीवर हमखास इलाज करतो. तो सध्या मुंबईत आहे. तरी तज्ज्ञांनी चौकसपणे परीक्षा करावी.

४४०४ (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७)

नगरच्या माजिस्त्रेताने तेथील बाजाराची जागा बदलली, त्याचा निषेध म्हणून दुकानदारांनी दुकाने बंद ठेवली. म्युनिसिपल कमेटीच्या मेंबरांवर लोक घसरा काढीत आहेत. माजिस्त्रेत टायटलर रागावला असून त्याचा संशय असा आहे की, मेंबरलोक दुकानदारांना सामील असावेत. या प्रकरणातून ४५ मेहनतू लोक राजीनामा देतील, अशी शक्यता आहे.

४४०५ (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

इराणच्या शहाने लगेच तह केला नाही, तर इंग्रज फौज शिराजवर आणि तेहरानवर हल्ला करील.

**४४०६** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

इंग्रजांच्या व रशियनांच्या युद्धात इंग्रजांनी १ अब्ज ६३ कोटी, तर रशियाने १ अब्ज ९८ कोटी रुपये खर्च केले !

**४४०७** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

१८५६-५७ च्या पहिल्या सहामाहीत मुंबई इलाक्यात ६६ लक्षांची शिल्लक आहे!

**४४०८** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

मॉर्सेल्स बंदरातून येणाऱ्या पत्रांचे डाकेचे हशील कमी झाले.

**४४०९** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

पोलिसांना कर्ज देण्यास सावकारांना मनाई करण्यात आली.

**४४१०** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

संस्थानिक किंवा पेन्शनर अधिकारी मृत्यु पावला असता सरकार २०० रुपये अंत्यसंस्कारासाठी देईल.

**४४११** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

कलकत्यात नाण्यांचा तुटवडा झाल्यामुळे मुंबईहून ४० रुपये नेण्यात आले

**४४१२** (१६ : ३, १० फेब्रुवारी ५७, ४७–४८)

भारतातून गतवर्षी ४० लाखांचे सोने व १२ कोटींचे रुपे रवाना झाले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४४१३** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ४९–५२)

पवित्र आत्म्याची प्रेरणा मिळून जर सद्‌भाव निर्माण झाला, तर तो अखंड टिकतो. ढोंग मात्र टिकत नसते. पुण्यवानही कधी कधी पापे करतात. म्हणून सन्मार्गामध्ये शेवटपर्यंत टिकलो, तरच आपले तारण होईल. त्यासाठी खरा पश्चात्ताप व मनःपालट हवा. ईश्वराने स्वतः नेमून दिलेले नेम पाळावेत. तसे बोध आणि आज्ञा शास्त्रामध्येच आढळतात. खरी भावना असेल, तर ईश्वरच त्यांस टिकवितो. भयाने व कापण्याने आपले तारण साधावे. स्वतःचा उद्धार करून घेण्याची प्रबळ प्रेरणा मात्र हवी असते.

**४४१४** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५२–५४)

शरीर व आत्मा यांचा वियोग होणे, यास मरण म्हणतात. शरीर चलनरहित पडून विदेही आत्मा बाहेर पडतो. हनोख व एलिया सोडून सर्वांनाच मरण आहे. कोणत्याही अवस्थेत व कोणत्याही वेळी मृत्यू येईल. तो ईश्वराचा अधिकार आहे. अधर्मी लोकांना मरण भयंकर वाटते, कारण तो सुखाचा शेवट होय. मरणासाठी सर्वदा तयार असावे. मृत्यूपूर्वी मरणाचा पवित्र पालट व्हावयास हवा. म्हणून गांभीर्य व नम्रता ठेवून त्या मरणाचा विचार करावा. अविचार, कुबुद्धी ठेवून विनोद व उपहास करू नये.

**४४१५** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५४)

दक्षिणा प्रैज कमिटीने शंकुछेद हा तर्जुमा प्रकाशित केला. खगोलविद्येमधील सिद्धांत या पुस्तकावरून समजतात. असे विषय स्वभाषेत शिकले असता फार उपयुक्त ठरतात. त्याने विद्यावृद्धी होईल. किंमत ६, (हटन्स कोनिक सेक्शनचे भाषांतर)

**४४१५ अ** (इंम : ५४)

**४४१६** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५५)

८ फेब्रुवारीस एक ब्राह्मणाचा मुलगा ख्रिस्ती होण्याकरिता देविडसन् साहेबकडे मनी स्कुलात आला. त्याच्या आईने ब्रह्मचारीबावास बरोबर घेऊन शाळेत प्रवेश केला. गर्दी वाढली, तेव्हा देविडसनने पोलिसाकडे तक्रार केली. बावानेही उलट फिर्याद केली. शेवटी दोघांनी मुकदमे काढून घेतले.

**४४१६ अ** (इंम : ५४–५५)

**४४१७** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५५–५६)

'सत्यवक्ता मित्र' लिहितो की : नारायण बाळकृष्ण गद्रे हा दहा वर्षांचा मुलगा देविडसनकडे बाप्तिस्मा मागू लागला. मुलाच्या आईने ब्रह्मचारीबावा यांना समजूत घालण्यासाठी आणले. देविडसनने बावावर कोर्टसमन लावले. बावानेही मारहाणीची तक्रार गुदरली. पण धर्माच्या बाबतीत सरकारने हात घातला, तर फार खराबी होईल. ब्रह्मचारीबावा तरी या मुलास जातीत घेणार आहे काय?

**४४१८** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५६)

सेठ करमसी वाणी यांनी दानधर्मासाठी ५ लक्ष रुपये ठेविलेले आहेत. त्याच्या नातलगांनी भागवत-सप्ताह केला. भागवताची १०८ पुस्तके ब्राह्मणांस दिली. १० पासून १०० रुपयांपर्यंत दक्षणा व फलाहार दिला. सर्व ब्राह्मणांना गाड्यांतून मिरवून घरोघर पोहोचविले. कै. करमसीने शिवालय बांधले, पाण्याचा तलाव बांधला. पण नातलगांनी हे १०-११ हजार रुपये गोरगरिबांकरिता खर्च करावयास हवे होते.

**४४१९** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

मरणसमयी व्यक्तीच्या मनात येणाऱ्या पदार्थांची तसबिरी काढण्याचा शोध एका अमेरिकन डॉक्टरचे लावला.

**४४२०** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

कोल्हापूर जिल्ह्यात जमाबंदीची थकबाकी फार असते.

**४४२१** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

मिस्तर हावर्ड यांना डरेक्टर आव् पब्लिक इन्स्त्रक्शन म्हणून काईम केले.

**४४२२** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

फ्रान्सची लोकसंख्या ३ कोटी ६० लाख आहे.

**४४२३** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

कलकत्ता कायदेमंडळाने फौजदारी कायदे एकत्र करून पेनल कोड बनविले.

**४४२४** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

पारीस येथे ३५ लैब्रऱ्या असून १४ लक्ष ग्रंथ आहेत.

**४४२५** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

कलकत्यात युनिव्हर्सिटी होणार.

**४४२६** (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

दिल्लीचा राजा (बादशहा) आजारी आहे. तो गेला, तर त्याचे राज्य खालसा करण्याचे इंग्रज सरकारने ठरविले आहे!

४४२७ (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५७–५९)

जानेवारी १८५७ मध्ये मुंबईत १९८० मृत्यु झाले.

४४२८ (१६ : ४, २४ फेब्रुवारी ५७, ५९–६४)

येशू दयाळू व ममताळू होता. ईश्वरासंबंधी ज्ञान हे जगात सर्वश्रेष्ठ ज्ञान होय. येशू काही खगोलविद्या शिकविण्यासाठी पृथ्वीवर आला नाही, तर तारणोपाय सांगणे, हा त्याच्या आगमनाचा हेतू होता. प्रसंगोपात्त त्याने उपदेश केला. देवानेच मला नेमले व मी तारण करणार, असे तो म्हणे. देवप्रभू एकच आहे. देव आत्मा आहे. अनेक देवांच्या पूजेचा त्यास कंटाळा येतो. जे अंतःकरणाने शुद्ध, तेच त्यास पाहातील. म्हणून सद्‌गुण घेऊन दुर्गुण वर्जावेत. देव हा मनुष्यांचा आकाशातील बाप आहे. तोच खरा राजा आहे. त्यापासून व त्याकडूनच सर्व गोष्टी आहेत. माणसाचा मनःपालट होऊन नवा जन्म झाला की, तारण मिळते. आत्मा शुद्ध होतो. चांगल्या झाडाचे फळ चांगलेच असते. इतर धर्म मनुष्याचा गर्व व अभिमान वाढवितात. ख्रिस्ती धर्म मात्र खरे तेच सांगतो.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४४२९** (१६ : ५, ४ मार्च ५७, ६५–६९)

ख्रिस्ताच्या मतानुसार पुनर्जन्म नाही. मनुष्याचा असा एकच एक जन्म असतो. ईश्वराने आपणास शरीर, बुद्धी व मन ही दिली. तो आपली परीक्षा पाहात असतो. या जन्मातील घटना म्हणजे पूर्वजन्मीच्या कृत्याचे फळ, ही समजूत चूक आहे. आपला जन्म ही तारणाची सुवर्णसंधी होय. जगाच्या प्रलयकाळी ईश्वर पापपुण्यानुसार निवाडा करील. मनुष्याचा स्वभाव पापी असला, तरी त्याने पवित्रपण मिळवावे. आपले आयुष्य हे ईश्वराचे कृपादान आहे. ईश्वर हाच खरेपण व सर्वकाळचे जीवन आहे. पवित्र लोकांना तो आपले पुण्य देत असतो. शुद्ध आचरण देवास आवडते. पापाकडून देवाकडे फिरणे, यासच पश्चात्ताप हे नाव आहे. नम्रता, विश्वास, एकनिष्ठा ठेवून प्रार्थना करा. पापाची क्षमा मागा व सुमार्गात चाला. बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे दोन संस्कार त्याने नेमले आहेत. येशूचा कित्ता घेत राहा. जो शेवटपर्यंत राहील, तोच तेथे टिकतो. येशूच्या मध्यस्थीने खरे तारण मिळते.

४४३० (१६:५, ४ मार्च ५७, ६९–७४)

हिंदू धर्म प्राचीन असला, तरी त्याचे मूळ अंधकारव्याप्त आहे. त्यात अनेक मतांची सरमिसळ आहे. ते १८ धान्यांचे कडबोळे आहे. नास्तिक मतापासून बहुदेव मतापर्यंत त्यात सर्व आहे. ते असमंजस व अबद्ध वाटते. ब्रह्मरूप व्हा, म्हणजे दगडासारखे व्हा, असाच अर्थ होतो ! अविनाशी आत्मा व परतंत्र मी या दोन कल्पनांवर अनेक ग्रंथ लिहिले गेले. इंग्रजांनी त्यांच्या वाईट चालींचा पाया खणून काढला. हा धर्मरूप वृक्ष मुळापासून डळमळू लागला. बावासारखे अभिमानी हिंदू त्याचे समर्थनच करीत आहेत. सृष्ट पदार्थांचे वर्णन करणाऱ्या ग्रंथांनाच ते बावबल समजतात ! पुराणातील देव म्हणजे तर शृंगाराचे पुतळे आहेत. यांचे गुरू घोक्ये भट्ट नुसतीच पोपटपंची करीत असतात. त्यांच्या वेदांतमताने सृष्टी ही केवळ माया आहे. निराकार ईश्वरास पदार्थांचे ज्ञान होत नाही. म्हाताऱ्यांच्या सभेत पुराणांची मते सांगून तरुणांना जातिभेदनिर्मूलनाचा उपदेश करणारा बावाच ढोंगी आहे ! मांसभक्षकांचा धर्म वाईट, असे तो म्हणतो. धर्माचे कौपीन पांघरून नास्तिक मताचे बीज पेरतो. पण धर्म हाच सुखाचा मूळ झरा आहे. म्हणून त्याचा कावा लक्षात घ्यावा.

४४३१ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७४–७७)

'एक यथार्थवादी' म्हणतो की, बात्राच्या सभेस हिंदूंइतकेच पारशी लोकही मोठ्या संख्येने येतात. आपल्या वाक्चातुर्याने तो लोकांना मोहामध्ये टाकीत असतो. श्रोत्यांमध्ये सत्यार्थी फारच थोडे असतात. ख्रिस्ती धर्मावर टीका आणि हुल्लड, माजविणारेच फार आहेत. नम्र व सोशिक मिशनऱ्यांचे शाब्दिक हनन करण्यामध्ये यांचा फार वेळ जातो. शब्दपांडित्य करून ओढून ताणून आणलेल्या विधानांची चर्चा बाबा तासन्‌तास करतो. पारशी लोक बावास महापुरुष समजून नमस्कार करतात. पारशांच्या धर्मात म्हटले आहे की, जमिनीस खड्डा केला, तर त्यातून भुते वर येतील! कुत्रा हा त्यांच्या दृष्टीने अतिशय पवित्र प्राणी आहे. असे हाडवैरी एक होऊन ख्रिस्ती धर्मावर हल्ला करीत आहेत. बावाच्या सभेपासून चांगले असे काहीच निष्पन्न होणार नाही. बावा एक पुस्तक लिहीत आहेत. ते लवकर प्रसिद्ध झाले, तर त्याचे खंडन करणे शक्य होईल.

४४३२ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७७–७८)

नामदार गवरनरांनी मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेचा हुकुम काढला असून ते स्वतः चॅन्सेलर आहेत. कौन्सिलात अनेक युरोपिन मंडळीसह डॉ. भाऊ दाजी, सर जमशेद, जगन्नाथ शंकरशेठ वगैरे लोक आहेत.

४४३३ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७७–७८)

गेल्या आठवड्यात मुंबईत ४११ मृत्यू झाले. पैकी १६४ पटकीने गेले.

४४३४ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७७–७८)

जगातील कापसाच्या सात अष्टमांश कापूस अमेरिकेत पिकतो.

४४३५ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७७–७८)

जमिनीचे शिंपण चांगले व्हावे, म्हणून वीस लाखांच्या देणग्या जमल्या आहेत.

४४३६ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७७–७८)
रुस्तमजी बैरामजी लंदन विद्यापीठात डॉक्टरची परीक्षा उत्तीर्ण झाले.

४४३७ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७८–८०)
राजापूरच्या गंगेच्या पाण्याने कहुगजकरणादि रोग बरे होतात, असे भाविक लोक सांगतात. असे औषधी झरे अमेरिकेतही आहेत.

४४३८ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७८–८०)
कर्नाटकाच्या नबाबाचे पेन्शन निम्म्याने कमी करून ३५००० झाले आहे.

४४३९ (१६ : ५, ४ मार्च ५७, ७८–८०)
अयोध्येच्या राजघराण्यास १७ लाखांची जहागिरी सरकारने दिली आहे.

४४४० (१६ : ५, ४ मार्च ५७, ७८–८०)
मातुश्री बायजाबाईसाहेब मथुरेत १ लाख रुपये खर्च करून यज्ञ करणार आहेत.

४४४१ (१६ : ५, ४ मार्च ५७, ८०)
जनरल औटरॅम यांनी इराणी फौजेवर जोराचा हल्ला चढविल्यामुळे त्यांची फौज पळून गेली. इराण्यांच्या युद्धसाहित्याचा विध्वंस झाला. ७०० सैनिक मेले. युद्धाचा परिणाम म्हणून मिशनरी लोकांवर इराणने बंदी घातली. शाळा बंद करून धर्मप्रसारावरही नियंत्रणे आणली. एका लुटारूने आशकरखान या सरदारास ठार मारले अशी बातमी आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४४४२** (१६ : ६, २४ मार्च ५७, ८१–८४)

माणसाचा आत्मा अपांचभौतिक असल्यामुळे त्याचा नाश कधीच होत नाही. मरणानंतरही त्याची शक्ती कायम राहाते. सुरवंटामध्ये पालट होऊन त्यास पूर्णावस्था येते, त्याप्रमाणे मरणाकडून शरीराचा पालट होतो. पुण्यकर्म केल्यामुळेच अमरत्व प्राप्त होईल. वाईट कर्म केले, तर विवेकबुद्धीची टोचणी लागते. व्यवहारात अन्यायी लोक सुखाने जगत असले, तरी शेवटी त्यांस वाईट फळ मिळते. आपापल्या कर्मानुसार मरणोत्तर स्थिती मिळत असते. पाप्यांना सर्वकाळ दुःखच मिळते. आत्मा मात्र विदेही व सचेतन आहे. मरणोत्तर स्थितीमध्येही मनुष्याचे गुण व शक्ती वाढत राहातात. जगाच्या समाप्तीच्या दिवसापर्यंत, म्हणजे मध्यस्थितीत आत्मा अधांतरी राहील. न्यायाच्या दिवशी ईश्वर प्रत्येकाबद्दल निर्णय देईल.

**४४४३** (१६ : ६, २४ मार्च ५७, ८४–९०)

येशूने आपला खरेपणा पटविण्याकरिता अनेक चमत्कार केले. तो देवपुत्र आणि मानवांचा तारक होता. ईश्वराची उपयुक्त कामे येशूकडून प्रगट झाली. त्याच्या सर्व चमत्कारांवर ईश्वरी सर्वसंपन्नतेचा शिक्का दिसतो. मनुष्यावर उपकार व देवाचे गौरव, हे त्याचे हेतू होते. येशू हा जगाचा उजेड व मनुष्याची भाकर आहे. त्याने आमची दुःखे वाहिली, शोक साहिले. त्याने कोडी शुद्ध केला. आंधळ्याला दृष्टी दिल्ही. एका वातरोग्यास बरे केले. लोकांच्या अंगातील भुते घालविली. फेफरेकऱ्यास निरोगी बनविले. खूप मोठ्या जनसमुदायास भाकरी दिल्या. वारा व समुद्राच्या लाटा यांवरही सत्ता चालवून नुकसान टाळले. लाजारसाला तर थडग्यातून जिवंत केले. आपल्या शिष्यांनासुद्धा चमत्कार करण्याची शक्ती प्रदान केली. द्वेषी व अभिमानी लोकांना हे सामर्थ्य कधी पटणार नाही. खिस्त हाच खरा सद्‌गुरू आहे.

**४४४४** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९१–९२)

गेल्या अंकातील उल्लेखांमुळे काही पारशी लोकांना वाईट वाटले, असे ऐकतो. तरी पारशांनी आपल्या धर्माविषयी माहिती पाठवावी, म्हणजे पारशी धर्म कसा आहे, ते आम्हास समजेल. ते जोपर्यंत आपली धर्मतत्त्वे प्रसिद्ध करीत नाहीत, तोपर्यंत इतर लोकांच्या सांगण्यावर विश्वास ठेवणे आम्हांस भाग पडते.

**४४४४ अ** (इंम : ९०–९१)

**४४४८** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९१–९२)

पुस्तके व निबंध करणारी मंडळी :

पुस्तकमंडळीने गेल्या वर्षी निरनिराळ्या मराठी पुस्तकांच्या ६० हजार प्रती छापल्या. त्या सर्व खपल्या. मंडळीने नवे पुस्तकालय बांधले असून तेथे अनेक भाषांतील पुस्तके स्वस्त किंमतीत मिळतात.

**४४४८ अ** (इंम : ९१)

४४४६ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९२–९४)

'एक निष्पक्षपाती' लिहितो की : नारायण बाळकृष्ण गद्रे डेविडसन साहेबाकडून परत घरी गेल्यावर मोघेनामक गृहस्थाने त्याच्या पवित्रपणाची जाहीर खात्री दिली आहे. मिशनऱ्याच्या घरी तो ताक व नारिंगेच घेत होता, ब्राह्मणाच्या दुकानातले लाडू खात होता, अशी ग्वाही दिली आहे. नारायणास नाच्या किंवा सोंगाड्या बनविले आहे. त्यामधले खरेखोटे कोणासच माहिती नाही. ही सर्व लबाडीच्या पिढ्याची द्वारे आहेत. मिशनरी लोकांच्या घरून तो परत आला, हा आपला विजय झाला, असे ते समजतात. पण परत जाऊन त्याची जातिभ्रष्टता संपेल काय ? श्रीपत शेषाद्री, नाना महागावकर, महादेव खांडेकर, यांच्यापेक्षा त्याची गत वेगळी होणार नाही. ज्ञान, विद्या व सुख यांना मात्र ते कायमचे दुरावले ! इसापनीतीतल्या सारंग्याप्रमाणे ते आपला उपहास करून घेत आहेत.

४४४७ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९४–९५)

शिरस येथील तेजमल मारवाड्याचा मुलगा अंगावर दागिणे घालून फिरत होता. तिघा चोरांनी त्यास भुलथापा देऊन रानात नेले व त्याचा प्राण घेतला. दागिने पळवले. पोलीस पकडण्यासाठी आले, तेव्हा एका अपराध्याने तरवारीने मान कापून घेतली.

४४४८ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९५)

हडपसरचा चिमणाजी तांबट आपल्या गड्यास बरोबर घेऊन गाडीमधून माल नेत असताना घोंगड्या पांघरलेल्या १२ जणांनी त्यांच्यावर हल्ला केला. १७५ रुपयांची भांडी व कपडे गेले. तांबट इस्पितळात उपचार घेत आहे. पोलीसचौकशी चालू आहे. यावर उपाय म्हणजे पोलिसांच्या चौक्या वाढवाव्यात.

**४४४९** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९५)

अयोध्येत एका लांडग्याने ६ मुलांना मारले. लांडग्यास ठार मारले, तर तेथील जागा ओसाड पडते, अशा लोकभ्रमामुळे त्याचा कोणी बंदोबस्तही करीत नाही. तरी काही गांवकऱ्यांनी १२ लांडगे मारले व ११ पिले जिवंत पकडली. त्यांना सरकारने बक्षीस दिले.

**४४५०** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९५–९६)

दि. १६ फेब्रुवारी रोजी मौलवी शिकंदरशहा हत्यारबंद लोकांबरोबर एका मशिदीत येऊन निमाज पढू लागला. मॅजिस्त्रेत घरबर्न याने त्यास प्रतिबंध केला. तेव्हा जनरल फार्बस याने ताबडतोब कारवाई करून सर्वांची शस्त्रे हस्तगत केली. मौलवीचे ६ अनुयायी मरण पावले. त्याचा मालमत्तेत इंग्रजांविरुद्ध परराष्ट्रांना लिहिलेली पत्रेही सापडलेली आहेत.

**४४५१** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

पागोटे चोरले, असा आळ आल्यामुळे एका मुसलमानाने दिव्य केले. त्यात हात भाजून तो मरण पावला.

**४४५२** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

शिक्षणखात्याचे इन्स्पेक्टर डाक्तर पीट आजारीपणाच्या रजेवर गेल्यामुळे डा. हेन्स यांची नेमणूक झाली.

**४४५३** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

जानेवारीत गुन्हेगाराकडून ५,८३७ रुपये दंड वसूल झाला.

**४४५४** (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

फेब्रुवारीत मुंबईमध्ये १,७२५ लोकांचा मृत्यु झाला.

४४८५ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

जी. आय. पी. रेल्वेचे ८ दिवसांचे उत्पन्न १३,८५८ रुपये आहे.

४४८६ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

ग्रेट ब्रिटनमध्ये कुत्र्यावरील करापासून २ लाख ८९ हजार रुपये उत्पन्न मिळते.

४४८७ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

गोकुळदास तेजपालजी यांनी नवीन शाळा सुरू करून दहा हजार देणगी दिली. दरमहा ते १५ रुपये आणखी देणार आहेत.

४४८८ (१६ : ६, २४ मार्च ५७, ९६)

मुंबईच्या एका मेमनने दहा हजारांचा प्रेक्षणीय लग्नमंडप उभारला. तो पहाण्यास शेकडो लोक जातात.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १६, अंक ७, मुंबई, ४ एप्रिल १८५७

४४८९ (१६ : ७, ४ एप्रिल ५७, ९७-१००)

थडग्यात भंगलेली व मातीसी मिळालेली शरीरे यथास्थित सजीव, अविनाशी होऊन आत्म्याशी संयोग पावतात. त्यास जे मेले त्यांचे पुन्हा उठणे म्हणतात. हे असंभाव्य किंवा असंगत नाही, तर होणारच आहे. बायबलात तसे अनेक दाखले मिळतात. वनस्पतींचेही पुनरुज्जीवन होते. दुर्बळ शरीर अविनाशी व श्रेष्ठ होऊन पुन्हा उठेल. ईश्वराला कोणतीही गोष्ट अशक्य नाही. जगाच्या समाप्तीच्या सार्वत्रिक न्यायदिवसी सगळेच उठतील. सांप्रतचा देह मरणोत्तर स्थितीला अयोग्य आहे. म्हणून काही पालट होणे आवश्यक आहे. पापाचा भागीदार असा हा देह बदलला पाहिजे. ईश्वराकडून दंड पावणारांना मात्र असा सुखकारक पालट मिळणार नाही. पावित्र्य व चांगुलपणा मिळून पुण्यवानाचा गौरव होईल. दूत तुतारी वाजवतील. मग येशू हा पालट घडवून आणील. कष्ट, रोग व जर्जरता यांपासून लोक मुक्त होतील. उद्धार पावणारे हर्ष व जयजयकार यांसह उठतील, तर पाप्यांना दंड, भय थरकाप यांसह उठावे लागेल. नीतिमान लोकांना एकमेकांची ओळख पटेल. ख्रिस्ती माणसाच्या आशेचा हा पाया उपकारक व आगत्याचा आहे.

**४४६०** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १००–१०७)

मनुष्यांमध्ये राहून येशूने चमत्कार घडविले व त्यांच्या कल्याणासाठी आपले स्वतःचे बलिदान केले. खांबीच्या मरणास तो मान्य झाला. त्याने जन्मभर दुरुत्तरे व पाठलाग सोसला. माणूस व देव यांचा समेट करून दिल्हा. मरणाचे भविष्य त्याला आधीपासूनच माहीत होते. तो नेमलेल्या मरणास सामोरा गेला. मानवाच्या अपराधामुळे घायाळ होऊन आमच्या अन्यायामुळे तो चेंगरला गेला. देवाचा हा कोकरा बलिदान करून गेला. त्याचे शरीर म्हणजे भाकर आणि रक्त म्हणजे द्राक्षरस झाला. जगाच्या पापाकरिता त्याने पराकाष्ठेचे दुःख भोगलेले आहे. आमची पापे त्याने शरीरावर वाहिली. प्रायश्चित्ताने ईश्वर क्षमा करतो. पण दंड देण्याचे कामही करतोच. मानवावरील प्रेमामुळे त्याने तारणाचा उपाय सांगितला. कर्जदाराने जामीन द्यावा, तसा हा प्रकार आहे. यातून तारलेले नम्र राहतात. अनुपकारी, द्वेष्टी व दुष्ट मानवासाठी त्याचे बलिदान झाले आहे. येशूने आकाशाचा दरवाजा आम्हांसाठी उघडला. दुर्वासना दूर करून पापापासून मुक्त केले. त्याने अनंत गौरव मिळविले.

**४४६१** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १०७–१०८)

मद्यवर्जक सभेच्या वार्षिक सभेत सातच लोक हजर होते. दारूच्या दुकानावरती जास्त जकात बसवायास हवी. कारण या पिठ्यांपासून फार अनर्थ होतो. नवीन करांचे सर्व उत्पन्न गोरगरिबांसाठी खर्च करावे. सणच्या दिवशी हे पिठे बंद राहतात, त्याप्रमाणे रविवारीही त्यास बंदी करावी. रविवारी खलाशी दारू पिऊन धिंगाणा करतात. त्यावर कडक नियंत्रण ठेवावे. भंडारी लोक नुकसान होईल म्हणून निषेध करीत आहेत, पण त्याकडे लक्ष देऊ नये. भंडाऱ्यांचे सगळे पिठे बंद झाले, तर फारच बरे होईल.

**४४६१ अ** (इंम : १०७)

**४४६२** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १०८)

मुंबईत टाकसाळीसमोर सेंत्रल म्युझियम उघडले आहे. ना. गवरनर साहेबांनी त्याचे उद्घाटन केले. शेकडो नेटिव लोक हे संग्रहालय पहाण्यास येत आहेत. दर शुक्रवारी तेथे फक्त स्त्रियांना प्रवेश आहे. दर शनिवारी वेगवेगळ्या कचेऱ्यांमधील लोकांना परवाने घेऊन तेथे जाता येईल.

**४४६२ अ** (इंम : १०८)

**४४६३** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १०९)

'एक सत्यवक्ता' म्हणतो की : कर्मविपाकाचे तत्त्व हिंदू लोकांनाही मान्य आहेत. म्हणून पाप हे रोगाचे मूळ आहे. डाक्तर लोकांनी व शिक्षण खात्यानेही याचा नीट विचार करावा. माणसांना पापाचाच रोग लागला आहे. सबब खरा वैद्य जो येशू ख्रिस्त त्याच्याकडे या. म्हणजे रोगनिवारण होईल. शरीरच काय, आत्माही निरोगी बनेल.

**४४६४** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १०९–१११)

पूर्वजन्मीच्या पापकर्माचा परिणाम म्हणून रोग उत्पन्न होतात. या रोगाच्या निरसनासाठी शास्त्राने देवपूजा, शांती, जप, दान, ब्राह्मणभोजन, औषध सांगितलेले आहे. क्षयरोगासाठी सुवर्णदान, पांडुरोगासाठी भूमिदान, गर्भपातामुळे जलोदर रोगास व सन्निपातार्थ अश्वदान, अतिसारावर देवळे बांधणे, वायुरोगाकरिता भूमीचे दानधर्म, भगंदराकरिता सुवर्णदान, असे अनेक उपाय हिंदूंच्या शास्त्राने सुचविलेले आहेत.

४४६५ (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १११-११२)

डब्लिन शहरातील धुराडी झाडणाऱ्या मुलाला अक्षरवटिका काढता येत होत्या. त्याने जन्मात पुस्तक पाहिले नव्हते. कोणत्याच पंतोर्जीकडे तो शिकला नाही. एका सोबत्याने त्यास शिकविले. रस्त्यातील दुकानांच्या पाट्यावाचून त्याला अक्षरांची ओळख झाली. पहा, प्रयत्न केला असता काय होणार नाही ?

४४६६ (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १११)

बंगाल इलाख्यातील साथल नावाच्या गव्हार लोकांनी बंड करून रयतेला व सरकारला फार त्रास दिल्हा. मिशनरी सोसायटीने त्यांच्या सुधारणुकीसाठी सतत प्रयत्न चालविले आहेत. सरकारनेही हे काम स्तुत्य आहे, असे म्हटले आहे.

४४६७ (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १११-११२)

इंग्लंडने आपला खर्च १७ कोटी रुपयांनी कमी केला असून रशियन लढाईसाठी प्रजेवर बसविलेला कर काढून टाकला.

४४६८ (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १११-११२)

भागीरथी नदीस हिमालयाच्या पायथ्यापावेतो कालवा काढला असून त्यात बारा घोड्यांची शक्ती असणारी आगबोट चालते.

४४६९ (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १११-११२)

नवीन शोध लावणारांना सनद देण्याचा कायदा तूर्त तहकूब केलेला आहे.

४४७० (१६ : ७, ४ एप्रिल ५७, १११-११२)

पंजाबमधील जवसाची लागवड फार फायदेशीर ठरली आहे.

**४४७१** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, ११२)

जुन्नरमध्ये यंदा शिमग्याच्या दिवसांत कोणीही अवाच्य बोलला नाही अगर शरिरास विपरीत चिन्हे लावली नाहीत. शुभकार्याप्रमाणे लोकांनी पितळी कंदील व कागदाचे आकाशदिवे लावले. अशी वहिवाट हमेशा व दरसाल राहिली, तर लोक नक्कीच पुण्यमार्गाकडे लागतील. (ज्ञानप्रकाशवरून)

**४४७२** (१६ : ७, ४ एप्रिल ५७, ११२)

युनैटेड स्ट्युडेंस असोसिएशन :

संयुक्त विद्यार्थी सभेत अनेक अगत्याच्या विषयांवर चर्चा झाली.

**४४७२ अ** (इंग : ११२)

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४४७३** (१६ : ८, २५ एप्रिल ५७, ११३–११७)

एका विशिष्ट दिवशी सर्वांसमक्ष सर्वांच्या कर्मांचा हिशोब घेऊन त्यांस सार्वकालिक स्थितीत नेणे, यास सार्वत्रिक न्याय म्हणतात. आपल्या कामाचे प्रतिफळ त्या व्यक्तीस मिळेल. जगाच्या समाप्तीस हा न्याय होईल, असे ईश्वराचे वचन आहे. विस्तीर्ण अंतराळामध्येच ही न्यायसभा भरेल. न्यायाधीश येशू आपल्या गौरवी आसनावर बसेल. तो पूर्ण वैभवाने व तेजाने प्रगट होईल. त्याला प्रत्येकाचे कर्म व हेतू कळले आहेत. ईश्वराचा न्याय सर्वांना सारखाच असतो, याची जाणीव या समारंभाने होईल. सर्व बुद्धियुक्त प्राण्यांना कामाचे प्रतिफळ मिळेल. अज्ञानी लोकांचा न्याय सृष्टिजन्य ज्ञानावरून होईल. पवित्र लोकांचा न्याय त्यांच्या मानसिक स्थितीवरून होईल. प्रभूचे न्यायीपण निर्बाध असते. म्हणून नीतिमान् लोक अपालट व स्थिर राहातील. मग नव्या काळाचा प्रारंभ होईल. आकाशे पडद्यासारखी गुंडाळली जातील, तर तत्त्वे मोठ्या तप्ततेने जळून जातील. दुष्टांना मात्र लज्जा, पामरपण व क्लेश भोगावे लागतील. देवाची कृपा व प्रसन्नता मिळविण्यासाठी पुण्य करावे. (प्रश्नोत्तरे)

**४४७४** (१६ : ८, २५ एप्रिल ५७, ११७)

मिशनरीसोसाईटी : चर्चच्या वार्षिक रिपोर्टावरून कळते की, मंडळीची ६ ठाणी चालू आहेत. १२ युरोपियन, तर चार नवे मिशनरी आहेत. २६० जणांनी बाप्तिस्मा घेतला असून ७३ लोक प्रभुभोजनास येत असतात.

**४४७४ अ** (इंम : ११७)

४४७५ (१६ : ८, २५ एप्रिल ५७, ११७–१२२)

आता ख्रिस्ती धर्मप्रसाराचा वृतांत सांगतो. १७९३ पासून भारतात व लंकेत १७ मंडळ्या काम करीत असून २० हजारांनी दीक्षा घेतली. सांडविच बेटात २१ हजारांनी घेतली. ब्रह्मदेशात १३ हजार लोक ख्रिस्ती झाले. कित्येक हजार सतत उपदेश ऐकण्याकरिता येतात. मादागास्करमध्ये राणीचा जुलूम सोसूनही लोक उपदेश ऐकतात. मित्सलवाडीच्या धुलाजीने कित्येक वर्षे बायबल वाचले. चीनमधील बंड हा शास्त्राचाच प्रभाव होय. रानटी जमातीमधील बीभत्स नाच व वेड्या चाली ख्रिस्ताच्या सहवासाने थांबल्या. मनुष्यबळी बंद पडले. आफ्रिका व न्युझीलंड येथे स्वच्छता वाढली. मूर्तिपूजा कमी झाली. व्यवसाय व कलाकौशल्य यांत वाढ झाली. मिशनऱ्यांनी रानटी लोकांच्या भाषेसाठी लिपी व व्याकरण ही तयार केली. शाळा घालून प्रौढांसाठींही ज्ञानदान केले. भारतातील अतिशूद्रांना सन्मार्गास लावले. राराटोंगा बेटावरील राजास उपदेश करून अमानुष शिक्षाही बंद केल्या. ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला की, नीतीही सुधारते. म्हणून बायबल हे त्यांना हितगुजाप्रमाणे वाटते.

४४७६ (१६ : ८, २४ एप्रिल ५७, १२२–१२५)

मादाग्यास्कर बेट :

या लहानशा बेटावर २८ लक्षांची लोकवस्ती आहे. हवा अत्यंत बाधक आहे. किनाऱ्यावर दाट झाडी आहे. राजा रादाबर याने ख्रिस्ती उपदेशकांची मदत घेऊन देश सुधारला. पण तो मेल्यावर राणावालो या राणीने ख्रिस्ती लोकांचा अमानुष छळ सुरू केला. अनेकांना ठार मारले. जे वाचले, ते चोरून शास्त्र वाचीत. लंडनचा मिशनारी एलिस तेथे गेल्यावर त्याचे स्वागत याच लोकांनी केले. राजपुत्र रादामाला सुसंस्कृत वृत्तीचा मुलगा आहे. लोक त्यास फार मान देतात. ख्रिस्ती धर्माबद्दल त्यास प्रेम वाटते. आता या बेटावरील ख्रिस्ती लोकांना चांगले दिवस येतील.

**४४७७** (१६ : ८, २४ एप्रिल ५७, १२५-१२७)

फत्तेगडच्या छावणीत मोठी गडबड उडाली आहे. कारण प्रत्येक ठाण्यावरती ५-५ चपात्या वाटण्याचा कार्यक्रम सुरू आहे. आपणास मिळालेल्या चपात्यांमधून एक ठेवून बाकीच्या इतरांना वाटा, असा खास निरोपही येतो. टपालाच्या डाकेपेक्षाही जास्त वेगाने चपात्या वाटल्या जात आहेत. याचा अर्थ काय असेल? पगारवाढीसाठी सर्व शिपायांनी कट तर केला नसेल? अशा उलाढालीबद्दल युरोपात अनेकांची धरपकड झाली असती. हे काम राजाविरोधी की मनुष्यविरोधी? यात काही विषबाधेचाही संभव आहे की नवसाची फेड आहे? १८१८ त पेंढाऱ्यांचे बंड झाले, तेव्हा नारळे वाटली जात होती. चोरइशारतीमुळे एका पाटलाकडून दुसऱ्या गावच्या पाटलाकडे नारळ रवाना होई. या घटनेचा खरा हेतू शोधणे आवश्यक आहे.

**४४७८** (१६ : ८, २४ एप्रिल ५७, १२६-१२८)

दारू विकण्यापासून अनर्थ :

मतलबी माणसाला वाटते की, दारू विकण्यात अयोग्य काहीच नाही. सुविचारी माणूस म्हणतो की हा अनर्थ आहे. तेवढ्यात एक म्हातारी रडत ओरडत तेथे येते व कलालाच्या दुकानाकडे हात करून म्हणते की, दारूने माझ्या एकुलत्या एक मुलाचा घात केला. माझी म्हातारपणची काठी हिरावून घेतली. दारू पिऊन मुलगा मरण पावला. कामगार ५-५ रुपये मिळवतात व सगळे दारूपायी घालवितात. म्हणून सुविचारी गृहस्थ म्हणतो की, आणखी दारूचे दुकान उघडून या पापामध्ये आपण भर टाकू नये.

**४४७९** (१६ : ८, २४ एप्रिल ५७, १२८)

गेल्यावर्षी आस्ट्रेलियात १२५ टन सोने निघाले.

**४४८०** (१६ : ८, २४ एप्रिल ५७, १२८)

मार्च महिन्यात मुंबईत २०४३ माणसं मेली.

४४८१ (१६ : ८, २४ एप्रिल ५७, १२८)

मुंबईत रस्त्यावर पाणी शिंपण्यासाठी घोडागाडीचा उपयोग सुरू झाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई., टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १६, अंक ९, मुंबई, ११ मे १८५७

४४८२ (१६ : ९, ११ मे ५७, १२९-१३१)

ईश्वरविद्या प्रकरण २३ :

मरणोत्तर सुखावस्था :

नीतिमान भक्तांस सर्वकाळची सुखावस्था मिळते. मरणानंतर ते तिसऱ्या आकाशात दिव्य लोकात राहातात. त्यांस शारीरिक उपभोग मिळत नाही, तर आत्मिक सुख मिळते. देवाच्या गौरवी सहवासात त्यांना प्रीतीचा लाभ होतो. हे आकाशवासी लोक आनंदाने व मैत्रीने तेथे राहातात. उद्धार पावलेले लोक खरे सद्गुणी व अत्यंत सुखी असतात. त्यांचे सुख सतत वाढते. इतर धर्मांच्या स्वर्गकल्पना अशुद्ध, भ्रष्ट व ऐहिक सुखाच्या आहेत. त्यांचा सौख्यलोक पृथ्वीपेक्षा काही वेगळा नाही. खिस्ती लोकांचा स्वर्ग मात्र शुद्ध व खरा पवित्र आहे. मोशयाच्या व्यवस्थेमध्ये हाजारोंना स्वर्ग मिळण्याची सोय आहे. मरणाने अनहित नाही. आपण नातेवाईकांपासून दुरावलो, तरी देवपुत्राजवळ राहातो.

**४४८३** (१६ : ९, ११ मे ५७, १३१–१३९)

दुष्ट आणि अपश्चात्तापी माणूस मात्र सार्वकालिक दंडामध्ये जातो. म्हणूनच मोशे व येशू ख्रिस्त यांनी कळकळीने सांगितले की, परलोकाचा दंड चुकवून तारण साधा. पाप्यांना उपदेश करण्यासाठी त्याने पराकाष्ठेचे श्रम केले. तरीही जे पाप करतात, त्यांना दंड करणे सर्वांच्या हिताचे असते. देवाच्या दहा आज्ञा पाळल्या नाहीत, तर त्याचा कोणता परिणाम होतो, हे सगळ्यांना कळले पाहिजे. दुष्टाला दंड केल्यामुळे ईश्वर निष्ठुर ठरणार नाही. दुष्टाला नरकवास देणे, हे त्याच्या दयाळू व न्यायी वृत्तीस अगदी साजेसे आहे. पश्चात्ताप न होता मरणे, हे कायमचे दुःखाचे कारण आहे. अग्नी व गंधक यांच्या नरकामध्ये त्यांना न्यायदिनापर्यंत वाट पहावी लागते. दुःसह यातनांनी ते तळमळतात. त्यांना मानसिक यातना असह्य होतील. अघोर व दारुण क्लेशास ते कंटाळतील. म्हणून दुष्ट सोबत्यांना सोडून द्यावे. पाप्याच्या तारणाची काहीच आशा नाही. जलप्रलयाच्यावेळी फक्त नोहाच वाचला. कारण तो सद्भक्त होता. फारो व कोराह यांचा नाश झाला. म्हणून सगळ्यांनाच तारण मिळते, ही खोटी समजूत सोडून द्यावी.

**४४८४** (१६ : ९, ११ मे ५७, १३८–१३९)

क्ले नावाच्या मातीपासून आलुमिनम धातू तयार करण्याचा शोध लागला आहे. ही तांबड्या किंवा इतरही रंगात मिळते. इंग्लंडच्या एका व्यापाऱ्याने या धातूचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याचे ठरविले आहे. तो हलका, चिवट व टिकाऊ आहे. जहाजे, यंत्र, वाद्ये, भांडी, यांसाठी आलुमिनमचा उपयोग होईल. कदाचित् अलंकारही तयार करता येतील. लोखंडापेक्षा तो स्वस्त आहे. मातीच्या मोलाने तो विकला जाईल. ईश्वराने मानवास बुद्धीचे सामर्थ्य दिल्हे. त्याचा उपयोग करून त्याने अनेक चमत्कार घडविले.

४४८५ (१६ : ९, ११ मे ५७, १३९-१४०)

नारायण बाळकृष्ण व नाटककार मंडळी :

नारायण बाळकृष्ण पत्रात लिहितो की : काही मित्रांनी थापा मारून मला एका छापखान्यात नेले. तेथे पांडुरंग अंतोबाने अक्षरांची स्पर्धा आहे, असा भास निर्माण करून माझे नांव लिहिण्यास सांगितले. नंतर बगीतून नाटकाच्या कोठडीत नेले. मग माझ्या आईची भेट घडविली. आंघोळ घालून जानवे घालण्यास लावले. जबरस्तीने सगळ्यांनी एक पत्र लिहावयाला लावले. त्यात 'मी अक्षम्य भक्षण केले नाही. माझे मित्र थालीपीठ आणून देत होते' असे लिहावे लागले. मित्रांनी सारख्या थपडा मारल्या. हे निवेदन धूमकेतूने छापले नाही, म्हणून हिंदू हितेच्छूला दिले. मला जबरीने तमाशालाही वेऊन गेले. एकटे ठेवून स्वैपाक करण्यासही लावीत. शेवटी मी पुन्हा पळालो. डेविडसनच्या घरी आलो.

४४८६ (१६ : ९, ११ मे ५७, १४१-१४२)

नगरचे परोपकारी जड्ज्य उडकाक यांनी मोठ्या परिश्रमाने व पदरमोड करून येथे म्युझियम सुरू केले. व्यायाम व सहल यांकरिता रमणीय बाग तयार केली. प्राचीन मोगलाई इमारतीचा जीर्णोद्धार केला. नामांकित वस्त्रे, रमणीय कारंजे, हस्तकौशल्याने काढलेल्या सुंदर तसबिरा येथे आहेत. तुरुंगातील कैद्यांनी केलेल्या करंड्या व तबकेसुद्धा आहेत. होळकरांची पितळी तोफही येथे दिसते. विलायती खेळांच्या सरंजामाप्रमाणेच, काचेच्या व मातीच्या बाहुल्या व कळसूत्री गाड्याही आहेत. विलायती धाटणीची मृत्तिकापात्रे नगरास व येवल्यास तयार झाली. एक मेणाचे बाळ तर इतके सुंदर आहे की, ते खरे, सजीव वाटते ! मसजिदीचे घुमट रंगवून सुशोभित केले आहेत. दुर्मिळ अलंकार व नकली फळे यांचे प्रदर्शन येथे पहावयास मिळेल.

४४८७ (१६ : ९, ११ मे ५७, १४२-१४३)

डाका शहर मलमलीसाठी प्रसिद्ध आहे. इतकी तलम आणि सुंदर मलमल दुसऱ्या कोणत्याही शहरात तयार होत नाही. ती पृथ्वीवर अजोड ठरेल. या बारीक वस्त्रावरती दव पडले, तर वस्त्र दिसत नाही! ती स्वस्त असून कणखर आहे. विलायती मलमल मात्र लवकर फाटते. या मलमलीचा व्यापार अत्यंत किफायतशीर होईल.

४४८८ (१६ : ९, ११ मे ५७, १४३-१४४)

मुंबई इलाख्याचे क्षेत्रफळ १ लाख ४९ हजार ४०७ मैल असून त्यापैकी ५८,८०८ चौ. मैल ब्रिटिश अंमलाखाली आहे. गुजराथ, महाराष्ट्र, असे दोन भाग मिळून हा प्रांत तयार झाला. जमाबंदीचे १३ जिल्हे असून प्रत्येक जिल्ह्याला एक कलेक्टर कारभार पहातो. त्यास सालीना २८ हजारांचे वेतन मिळते. न्यायदानाचे कामही त्याजकडे असते. जमिनीचे सारे तंटे त्याकडे जातात. त्यास फौजदारीचेही मर्यादित अधिकार आहेत. सन १८५१ मध्ये या इलाख्याची प्रजा १ कोटी २६ लाख ५ हजार ७४६ होती.

४४८९ (१६ : ९, ११ मे ५७, १४४)

नाटक विडंबन कटाव :

नाटककंपनीत पळून जावे, असा मोह मुलांना होतो. कारण तेथे दहीपोहे खाण्यास मिळतात. संध्या करण्याचा त्रास नाही. भ्रष्ट रीतीमुळे मुले तेथे जातात. सगळी रात्र गाणे गातात. लोक हसून त्यांची थट्टा करतात. पण त्यांना ते फार आवडते. पानसुपारी खाऊन भांग पिता येते. सोंगात कुचराई केली, तर मात्र पोरगा भिकारी होतो. नाटकवाले चंची घेऊन मिरवितात. पण लोकांच्या मनोरंजनाकरिता वेडीवाकडी तोंडे करून नाचतात. कारण नसताना नाटक वठविण्याकरिता शोकाचा विलाप करतात. जगनमित्राच्या आणि बोधामृताच्या विद्वान संपादकांनीही नाटक्यावर वारंवार कृष्णोदकसिंचन केलेले आहे. लोकांची निद्रा केव्हा उडणार आहे?

चला मुलानो आता नाटका ।
मित्र आप्त हे तुमचे हटका ।
घरातून कसी होईल सुटका ।
यास्तव तुम्ही एथे राहावे ॥

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

४४९० (१६ : १०, २५ मे ५७, १४५–१५१)

ईश्वरविद्या प्रकरण २५ :

ईश्वरी कृपादाने पावण्याची साधने :

शास्त्राचा उपदेश ऐकणे, नियमित धर्मसुशिक्षण घेणे, पवित्र शास्त्र वाचून त्याचे सतत मनन करणे, कुटुंबात ईश्वराची भक्ती करणे, बाप्तिस्मा व प्रभुभोजन घेणे, ही कृपादानाची साधने आहेत. ईश्वरी शास्त्राचे ज्ञान झाल्यावर मानवी मन धार्मिकतेच्या हेतूने प्रेरित व्हावयास हवे. मग प्रभू येशूचा आर्शीवाद मिळतो. धार्मिकपणा व ज्ञान यांचा अतूट संबंध आहे. हत्यारे चालविण्यास कारागीर हवा. त्याप्रमाणे पवित्र आत्म्याचे कर्तृत्व प्रगट झाले पाहिजे. ईश्वर कृपेच्या साधनाने मानवास पवित्र करतो. मनुष्याचे स्वतंत्र कर्तृत्व आणि ईश्वराधीनता, यांचा मनोहर संगम व्हावा. आपली मानसिक कर्मे स्वसंतोषाने आणि पूर्ण स्वतंत्रतेनेच होत असतात. याने भक्ताचे धार्मिकपण वाढून पवित्रीकरण पूर्ण होते. अभक्ताच्या मनाचाही पालट यातूनच घडत असतो. यामुळे नास्तिकही देवाकडे फिरू शकेल. म्हणून संपूर्ण मनोभावाने, सुधारणा करून घेण्याच्या इच्छेने देवाचा आर्शीबाद घ्यावा.

४४९१ (१६ : १०, २५ मे ५७, १४८–१५१)

ईश्वराच्या परिपूर्ण व अत्युत्तम गुणस्वभावास आणि अधिकारास शोभेल अशा रीतीनेच त्याची भक्ती करावी. त्याचा सन्मान व स्तुती करावी. एकांतभक्ती, कुटुंबभक्ती, लौकिक अगर मंडळातील भक्ती, असे ३ प्रकार भक्तीचे आहेत. शाब्बाथ, देवळातील भक्ती, प्रभुभोजन, या सर्वांना लौकिक भक्ती म्हणतात. त्यासाठी प्राप्तीचा दशांश नियमित द्यावा. जे देवळात जात नाहीत, ते स्वतःची मोठी हानी करून घेतात. कुटुंबामध्ये मनन, उपदेश, गीत, प्रार्थना, याप्रकारे भक्ती करता येते. शिवाय रोज एकदा तरी एकट्याने प्रार्थना करावी. यासाठी धर्मनिष्ठ बुद्धी व भावना असाव्या. त्यातून मानवाचा ईश्वराशी प्रत्यक्ष संबंध येतो. त्रयकाबाचून कोणाचीही भक्ती करू नये. येशूस मध्यस्थ मानून समंजसपणे व गंभीर राहून प्रार्थना करावी. मित्रासाठीच काय, परंतु वैऱ्यासाठीही प्रार्थना करावी. ईश्वराचे गौरव आणि मंडळाची वृद्धी यातच मानवाचे कल्याण आहे. दिव्यलोकवासी लोकही अशीच प्रार्थना करतात. खरा ख्रिस्ती प्रार्थनेवाचून राहणार नाही.

४४९२ (१६ : १०, २५ मे ५७, १५१-१५५)

सातान्याच्या जिल्हा माजिस्त्रेताने हुकूम काढला की : यात्रेच्या वेळी कोणीही यात्रेकरूस गाभाऱ्यात जाता येणार नाही. चौखांबी मंडपातूनच दर्शन घ्यावे लागेल. या आदेशामुळे राऊळातील रगडा कमी होईल. म्हातारे, बायकापोरे चेंगरून गुदमरतात. गर्दी हटविण्याकरिता बडवे लोक उपरण्याच्या तोब्याने लोकांना मारतात. आता तरी देवभोळ्या प्रवाशांचे हाल थांबतील. ज्याचे मन पवित्र आहे, त्याला तीर्थयात्रेची गरज नाही. पंढरपुरात उचले व भामटे चोऱ्या करतात. अफाट गर्दीमुळे कॉलऱ्याची साथ सुरू होते. पुण्याच्या ज्ञानप्रकाश पत्राने या व्यवस्थेबाबत फार समाधान व्यक्त केले. धूमकेतूने म्हटले आहे की : नेवासा, नरसिंगपूर, वाडी, या सर्वच ठिकाणी देवाचे दर्शन बाहेरून घ्यावे लागते. तेव्हा पंढरपूरच्या नव्या व्यवस्थेबद्दल कोणीही तक्रार करू नये. लक्षाश्रमी भिक्षुकांना मात्र आपली पोटगी बुडाली, हे दुःख झाले. बडवे हे देवस्थानचे नोकर आहेत. त्यांनी फिर्यादी केल्या म्हणून हुकूम बदलणार नाही.

४४९३ (१६ : १०, २५ मे ५७, १५५)

वेदांत विषयावर उत्कृष्ट निबंध लिहिणारास एशियाटिक सोसैटीच्यातर्फे एक गृहस्थ तीन हजार रुपये बक्षीस देतील.

४४९४ (१६ : १०, २५ मे ५७, १५५-१५८)

इस्त्राएल लोकांतील सद्गुणशोधक मंडळीचा रपोट :

टैरस राजाने यहुद्यांना निर्वासित बनविले. सध्या ते पृथ्वीच्या पाठीवर विखरून राहिले आहेत. एवढे पुरातन राष्ट्र कोठेही आढळणार नाही. स्वजातीच्या कल्याणाकरिता त्यांनी नवीन मंडळ स्थापन केले. १८५२ पासून त्याचे कार्य वाढतच आहे. शनिवारी सायंकाळी सभा करून वृत्तपत्रांचे व पुस्तकांचे सामुदायिक वाचन होते. उत्साही तरुण स्वतः निबंध लिहून आणून वाचतात. त्यांनी बेनी इस्त्रायली लायब्ररी स्थापन करून ११०८ पुस्तकेही जमविली. पुस्तके व निबंध मंडळीनेही त्यांना मदत केली, असे चिटणीस योसेफ राजपुरकर कळवितात.

४४९५ (१६ : १०, २५ मे ५७, १५८-१५९)

आपल्या सुंदर पत्नीस तुच्छ मानून अनीतीकडे वळणारांची समजूत पडणे कठीण आहे. त्यांना वडील माणसांचा धाक नाही. बायकापोरे उपाशी मेली, तरी चिंता नाही. पानतंबाखू व गांजा यांतच ते निमग्न आहेत. चांगला धंदा सोडून बोडक्यांच्या नादाला ते लागतात. क्षणभंगुर देहात असणारी अमोल्य बुद्धी त्यांनी कसबिणीजवळ गहाण टाकली. पैका, अब्रू, पत, सारे सारे गेले : रांड ठेवली की राड होतेच ! चांगल्या वस्तीत कसबिणी राहातात व आपल्या अश्लील नृत्यांनी लोकांना वेडे करतात. म्हणून जगन्मित्रपत्राने सूचना केली आहे की, त्यांना डंकीणडोलासारख्या रस्त्यावर स्वतंत्र जागा द्यावी.

४४९६ (१६ : १०, २५ मे ५७, १५९)

२७ मे रोजी मुंबईत रात्री ८ वाजता बराच पाऊस पडला.

४४९७ (१६ : १०, २५ मे ५७, १५९)

झोप म्हणजे ईश्वरी कृपेची देणगी आहे. झोपेने विश्रांती मिळते. सबब ती ईश्वराची करामत आहे. झोप लागलेल्या माणसाप्रमाणेच आणखी एक चमत्कारिक अवस्था आहे व ती म्हणजे मृत्यू होय. नकळत झोप येते, तसाच मृत्युसुद्धा येतो ! म्हणून मृत्यू येण्यापूर्वी सावध व्हा. उरलेल्या वेळेचे सार्थक करा. ज्ञानमार्गाकडे आणि पुण्याकडे मन वळवावे.

४४९८ (१६ : १०, २५ मे ५७, १५९-१६०)

मद्रासच्या पार्नाली गावात २८ फेब्रुवारीस आकाशात गडगडाट होऊन दोन दगड खाली आले. त्यांचे वजन प्रत्येकी १८॥ शेर होते. ते जळालेले असून धुरकटल्याप्रमाणे काळे वाटतात. भाविक लोकांना मात्र वाटते की, स्वामीमहाराजांच्या कोपामुळे असे घडले. म्हणून ते दगडांची पूजा करतात !

४४९९ (१६ : १०, २५ मे ५७, १६०)

सिंहलद्वीपाच्या किनाऱ्याजवळ ९ लाखांचे मोत्याचे शिंपले सापडतात.

४५०० (१६ : १०, २५ मे ५७, १६०)

सुप्रीम कोर्टाचे च्रान्सलेतर मर्फी मरण पावले.

४५०१ (१६ : १०, २५ मे ५७, १६०)

यंदा डाकेचे उत्पन्न २० लाखांवरून १६ लाखांवर, इतके कमी आले.

४५०२ (१६ : १०, २५ मे ५७, १६०)

इंग्लंडमध्ये दारूपासून एक कोटीचा आयात कर वसूल होतो.

४५०३ (१६ : १०, २५ मे ५७, १६०)

मुंबई इलाख्यात सर्पांचा उपद्रव वाढून अनेकांचे मृत्यू झाले. सरकारने सर्पांचा नाश करण्यासाठी २५,४३७ रुपये खर्च केले.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

४८०४ (१६ : ११, १० जून ५७, १६१–१६५)

जगिक कामे सोडून ईश्वराची प्रार्थना करण्याचा दिवस म्हणजे शाब्बाथ होय. दर सातव्या दिवशी शाबाथ पाळावा. ईश्वराची भक्ती व सेवा करून कोणत्याही क्षणी आकाशात जाण्याची तयारी ठेवावी. सीना डोंगरावरच्या दहा आज्ञांमध्ये शाबाथाचा उल्लेख आहे. तो येशूच्या मेलेल्यातून उठण्याचा दिवस होय. पवित्र कामाकरिता धर्मादाय गोळा करण्यास हा दिन योग्य आहे. आदल्या दिवसाच्या मध्यरात्रीपासून प्रार्थना करावी. पारमार्थिक वृत्तीने दिवस घालवावा. रोग्यांना, दुःखितांना, हलाखीमध्ये असलेल्या लोकांना काही मदत करावी. प्रभूचा दिवस पाळून सुखी व सद्‌गुणी बनावे.

४८०५ (१६ : ११, १० जून ५७, १६५–१६७)

ईश्वराच्या भक्तमंडळाला सार्वत्रिक किंवा पृथक्, दृश्य अथवा अदृश्य, युद्धप्रवृत्त अथवा जयवंत, अशी नावे आहेत. प्रसिद्धपणे मंडळीत गेले की, ती सार्वत्रिक होते. येशूने सांगितलेले नेम पाळणारांची पृथक् मंडळी आहे. उघडपणे धर्म स्वीकारला की, ती दृश्य बनते. मनातून ख्रिस्तावर प्रीत ठेवली, तर ती अदृश्य मंडळी होते. पापाच्या सैतानाशी लढून पवित्रपण मिळविले की, युद्धप्रवृत्त मंडळ झाले. पावित्र्य मिळवून आकाशवास झाला, म्हणजे जयवंत म्हणावे. परस्परांशी करार झाला की, पृथक मंडळ झाले. प्राचीनकाळच्या पशुयज्ञात याचे मूळ दिसते. खरे धार्मिकपण, पापाचा कंटाळा, प्रामाणिकपणा हे गुण मंडळीस अत्यावश्यक असतात. सद्धर्माचे ज्ञान मिळवून पुण्य पदरी पाडून घ्यावे. युद्धप्रधान मंडळाच्या सर्व जगात ख्रिस्ती धर्माचा प्रसार होत आहे.

४५०६ (१६ : ११, १० जुन ५७, १६७–१७२)

सांडविच आणि दक्षण सागरातील बेट यांवर लढाया, बालहत्या, दुर्गुण व रोग यांचे फार प्राबल्य होते. त्यातून ९० टके लोकसंख्या कमी झाली ! खिस्ती मिशनऱ्यांनी त्यांच्या लढाया थांबवून तह घडविले. भारतातही अतिशूद्रांना धीर देऊन आपलेसे केले. नगर जिल्ह्यात अनेक महार खिस्ती होऊन ब्राम्हणापेक्षा विद्वान बनले. आफ्रिका व ग्रीनलंड येथेही मिशनऱ्यांबद्दल आपलेपणा आहे. पिडलेल्यांस आश्रय व दास्यत्वास स्वतंत्रता मिळू लागली. मिशनऱ्यांनी गुलामगिरीविरुद्ध कायदे करण्यास तेथील सरकारांना भाग पाडले. गुलामांचा व्यापारही बंद करविला. भारतात हजारो स्त्रिया दुःख व धिक्कार यांच्या योगे निराश आहेत. मिशनऱ्यांनी मुलींसाठी शाळा सुरू केल्या. बहुपत्नीकत्वाची चाल मोडून काढली. पण त्यापेक्षा अविनाशी आणि अमर आत्म्याची ओळख करून देणे, हे त्यांचे फार मोठे असे कार्य होय. मूर्तिपूजेचे बंड मोडून एकाच देवाची भक्ती करण्यास शिकविले. खोंड लोकांत बालकांचे बलिअर्पण होते, तेही बंद केले. आपा चव्हाणासारख्या भामट्याचाही मनःपालट घडविला.

४५०७ (१६ : ११, १० जून ५७, १७२)

ज्यांचे केस पिकले आहेत, त्यांच्यासमोर तू उठून उभा राहा आणि वडिलांस मान दे.

४५०८ (१६ : ११, १० जून ५७, १७३–१७५)

सद्गुणशोधक सभेत रा. गोविंद नारायण म्हणाले की ३०–४० वर्षांपूर्वी इस्रायली लोक अज्ञानसागरात गडद होऊन गेले होते. पण हिऱ्याला पैलू पाडल्यावर तो अधिकच प्रकाशतो, त्याप्रमाणे त्यांच्या बुद्धीस, आचरणास व कृत्यांस तेज येत चालले आहे. त्यांचा उदयकाळ जवळ येत चालला. डाक्तर विल्सनसारख्या परोपकारी, दयाळू आणि विद्वान लोकांनी .. या कार्यास हात घातला. तुमच्यातील ८–१० वर्षांची मुलेही इंग्रजी आणि मराठी शिकतात. मंडळाने पुस्तकालय व ज्ञानप्रसारक सभा सुरू केल्या. सद्गुणांचा शोध करून तुम्ही कल्याण पावत आहात. आपण पुस्तके व वर्तमानपत्रे वाचता त्याप्रमाणे दर शनिवारी निबंध वाचण्याची प्रथा ठेवा. म्हणजे ज्ञानाचा शोध लागेल.

४५०९ (१६ : ११, १० जून ५७, १७५)

मी कोण इत्यादि हे प्रश्न अगत्याचे आहेत. असे प्रश्न स्वतःला पुसत परमेश्वराचे भय ठेवून काम करावे. अंतःकरण निर्मळ ठेवावे. बुद्धीच्या सामर्थ्याने सदाचरण व नीती यांचा अवलंब करावा. सबळ निर्बळांस मारतो व लबाड खऱ्यास हरवितो, असे हे दुष्ट जग आहे. पण जगात सद्गुणांची कामे करण्यासाठी ईश्वराने मला जगात पाठविले. पापी माणसाचे काळे तोंड ईश्वर पाहात नसतो. आपली वाईट कामे, अन्यायाने मिळविलेली दौलत, गरिबांचे गळे कापणे, यांबद्दल आपण ईश्वराजवळ काय उत्तर देणार आहोत ? विचार करा. ईश्वराचा संतोष मिळवा.

४५१० (१६ : ११, १० जून ५७, १७६)

धारचे राजेसाहेब यशवंतराव पवार यांचे अल्प आजारानंतर निधन झाले. मृत्यूपूर्वी त्यांनी धाकट्या भावास गादीवर बसविले होते. कैलासवासी महाराज आजच्या मानाप्रमाणे मोठे सुधारलेले असून गोरगरिबांना मदत करीत असत. (वर्तमानदीपिकावरून)

४५११ (१६ : ११, १० जून ५७, १७६)

एका घरात जुगार खेळल्याबद्दल ८–१० असामींना अटक झाली आहे. विशेष म्हणजे त्यांत एक गोसावीणही होती. माजिस्त्रेताने फक्त गोसाविणीस निर्दोष सोडले व इतरांकडून दंड घेतला.

४५१२ (१६ : ११, १० जून ५७, १७६)

राजाराम महाराजांचे सहकारी संताजीराव घोरपडे यांना मर्दुमकीबद्दल सेनापतिपद मिळाले. कापसीची जहागीरीही मिळाली. पुढे त्याच्या मुधोळ, गजेंद्रगडकर व कापसी अशा तीन शाखा झाल्या. कापसीचे राजेसाहेब रामचंद्रराव यांचा नुकताच मृत्यू झाला. त्यांचे घराणे फार प्रख्यात आहे.

४५१३ (१६ : ११, १० जून ५७, १७६)

१७ मे ते २४ मे या कालावधीत जी. आय्. पी. रेल्वेस लोखंडी सडकेपासून एकूण १६ हजार ६८७ रुपये उत्पन्न झाले.

४५१४ (१६ : ११, १० जून ५७, १७६)

मे महिन्यात मुंबई टापूत एकूण १७०२ माणसे मरण पावली.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४९१५** (१६ : १२, २२ जून ५७, १७७–१७८)

ख्रिस्ती धर्माच्या योगाने बहुत लोकांना कुटुंबातील सुखाचा अनुभव मिळत आहे. अन्य धर्मी लोकांत सुख व समाधान फार कमी आहे. आईबापांच्या सदाचाराने आणि सुबोधाने लेकरेही तशी बनतात. परस्परप्रीती व ईश्वराचे सद्भय धरून कुटुंबाचे खरे हित करावे. ईश्वराच्या गुणांचे गायन जेथे चालते, त्यांनाच ईश्वरी आशीर्वाद मिळतो आपण ईश्वराच्या इच्छेस मान्य झालो, म्हणजे खरे सुख मिळते. तो प्रीतिरूपच आहे. नगरचा आंधळा गोपाळ व साडेबारा नामक पंथात फिरलेला लखीराम हे ख्रिस्ताकडे आल्यामुळे सुखी झाले. रामजी नावाच्या शेतकऱ्याची ख्रिस्तावर इतकी श्रद्धा होती की, मृत्युनंतरही लोक त्यास वाखाणितात. ख्रिस्ती धर्मापासून अमोल्य लाभ आहेत.

**४९१६** (१६ : १२, २२ जून ५७, १७८–१८१)

ख्रिस्ती धर्माच्या प्रसारास ईश्वर अनुकुल आहे. येशूने भविष्य वर्तविले की, हा धर्म सगळ्या जगात पसरेल. आकाशातील दूतांनी सांगितले की, आदामाचे संतान समुद्राच्या काठावरील रेतीसारखे वाढेल. राष्ट्रे तुझे वतन आहेत व पृथ्वी तुझी सीमा आहे. नीतिमान आबाद होऊन रानवट त्यांच्यापुढे लवतील. शत्रू मात्र धूळ चाटतील. पृथ्वीच्या तारणाकरिता येशूस नेमून दिल्हे आहे. चीनमध्ये मिशनऱ्यांना अटकाव होता, परंतु अनेक देशांत ख्रिस्ती धर्मप्रसाराचे चांगले फळ दिसले. हिंदुस्थानात जे काही झाले, ते दिसण्यात थोडे व लोकांच्या दृष्टीने तुच्छ असले, तरी अंती सत्यधर्म विजय पावेल. ईश्वराच्या भक्तास कोणी नाश अथवा उपद्रव करणार नाही. ख्रिस्ताच्या उपदेशामुळे कित्येक रानटी लोक सौम्य झाले. तरुण शिक्षितांनी ही फळे ओळखावीत. त्यांनी सत्याचा मनापासून शोध करावा. सर्वांची पारख करावी.

**४५१७** (१६ : १२, २२ जून ५७, १८१–१८३)

जेम्स बीटि या नामांकित साहेबाच्या ५ वर्षांच्या मुलास अक्षर ओळख होती, पण ईश्वरविषयक ज्ञान नव्हते. म्हणून साहेबाने बागेत एका ठिकाणी मुलाचे नाव कोरून ठेवले व त्यावर पालापाचोळा टाकला. मुलाने खेळताना पाला दूर केला, तेव्हा त्याला वाटले की, आपले नांव आपोआप उगवले ! पण जगात आपोआप काहीही होत नसते. शेवटी कर्त्यावाचून कोणतेही कार्य होत नाही, हे मुलास पटले. रूसोमारख्या नास्तिकास हे कधी पटले नसते. या नियमशुद्ध जगाचा कर्ता ईश्वर असून तो ज्ञानी व बुद्धिमान आहे. सुशिक्षित लोक नास्तिक मताचा आग्रह धरतात. तसलीच पुस्तके वाचीत राहातात. पापाने सर्वनाश होतो, हे मत त्यांच्या मनावर ठसविले पाहिजे. अंधाराची आवड सोडावी.

**४५१८** (१६ : १२, २२ जून ५७, १८३–१८४)

'नासिककरीण बाई' पत्रात लिहितात की : खेड्यात धर्मशाळा, चावडी अगर देऊळ यांशिवाय मुक्कामाला जागाच नसते. म्हणून अधिकाऱ्यांनी लक्ष ठेवून त्यांची उस्तवारी व बंदोबस्त ठेवावा. सध्या तर ही गोसाव्यांची जोगड्यांची वतनदारी बनलेली आहे. आपली आगटी व गांजा घेऊन गोसावीबाबा शिष्यांसह तेथे आराम करीत असतात. तेथेच खोकून बेडके टाकतात. त्यांच्या गप्पाही घाणेरड्या असतात. कोणीही दुसरा मुशाफिर आला, तर त्यांना अडचण वाटते. गावकऱ्यांना ते गांजाचे व्यसन मात्र लावतात. दयाळू सरकारने या जोगड्यांना चावडीबंदी करावी. मुशाफिरांची सोय करावी.

४८१९ (१६ : १२, २२ जून ५७, १८४–१८५)

उदयप्रभा नियतकालिकात बातमी आली की, अफूच्या व्यापार बंद करण्यासाठी विलायतचे लोक पार्लमेंटास अर्ज करणार आहेत. त्यात म्हटले आहे की, हा व्यापार हत्यारबंद जहाजातून चालतो. चीनमध्ये प्रतिबंध असूनही त्यात खंड पडलेला नाही. याने ईश्वराचा अपमान होऊन ब्रिटिशांच्या नावास बट्टा लागतो. अफूचा पुरवठा ईस्ट इंडिया कंपनी करते आणि सालीना ३ कोटींचे उत्पन्न मिळविते. याकरिता कंपनीस दिलेला अफूबाबतचा परवाना ताबडतोब रद्द करावा, म्हणजे हा अनर्थकारी व्यापार थांबेल.

४८२० (१६ : १२, २२ जून ५७, १८५–१८६)

लोकहो, हल्ली तुमची मने अस्वस्थ दिसतात. निद्राकाल खेरीजकरून तुम्ही राजकीय घडामोडींचा विचार करता. दिल्लीतील बंडाने राज्यक्रांती होऊन स्वराज्य मिळेल, असे तुम्हास वाटते. परंतु राज्याधिकारी होण्याची तुमची इच्छा अगदी व्यर्थ आहे. पूर्वीचे स्वराज्य किती दिवसांपर्यंत टिकले, याचा नीट विचार करा. त्यांच्या जुवाखाली आपणांस काय व किती सौख्य मिळाले, ते आठवा. मग तुम्हांस पटेल की, इंग्रज प्रभूच बरा आहे. या राज्यात देणग्या मिळत नाहीत, सरंजाम बंद झाले, हुद्दे दूर गेले व धर्मावर जुलूम होतो, अशा अनेकांच्या तक्रारी आहेत. पण इमानाने चाकरी केली, तर वेतन मिळते. वंशपरंपरेने दिली, तर अज्ञान, आळस, दुराचार वाढतो. ज्यांची योग्यता आहे, त्यांना हुद्दही मिळतात. धर्मावर कोणतीही जुलूमजबरदस्ती नाही. अनिष्ठ चाली मात्र कायद्याने बंद केलेल्या आहेत. हिंदू लोकांच्या हाती राज्य जाणे अयोग्य आहे. कारण ही प्रजा शुद्ध प्रेतवत आहे. उद्योग, कलाकौशल्य, विद्या व शास्त्र यांत ती प्रवीण असली, तरच राज्याचा संपूर्ण पृथ्वीवर दरारा बसेल. नाहीतर यापेक्षाही निकृष्ठावस्थेत जाईल. म्हणून राज्यक्रांतीच्या खटपटीत पडून आयुष्य फुकट घालवू नका. इतर राजेलोकांपेक्षा हाच प्रभू योग्य आहे. आधी मनुष्यपणास योग्य असे नाव मिळविण्याकरिता झटा. (ज्ञानप्रकाशवरून)

**४८२१** (१६ : १२, २२ जून ५७, १८७)

हल्लीच्या बंडामुळे सरकारी नोटांची फार खराबी होत आहे. इंग्रेज सरकारच्या हातून हे राज्य जाणार, या भावनेने बंगाली नोटा कोणी घेत नाही. जवळ असलेल्या नोटाही तोटा सोसून विकतात. म्हणून नोटा स्वस्त झाल्या. बंडखोर इंग्रजांना हाकलून लावतील, असे जे लोक मानतात, ते मूर्ख आहेत. बंडखोर फार तर एखादे गांव काही दिवसपर्यंत आपल्या ताब्यात ठेवू शकतील. पण लवकरच इंग्रज सैन्य त्यांना पकडून ते गाव ताब्यामध्ये घेईल. चिनी लष्कर येत आहे, ते बंडखोरांना जेर करील. म्हणून सर्वांनी निर्धास्त राहावे. सुखदायक इंग्रजी राज्य कायम राहाणार. व्यापाऱ्यांनी कसलीही धास्ती बाळगू नये.

**४८२२** (१६ : १२, २२ जून ५७, १८७)

सन १८५६ मध्ये इंग्लिश पोस्ट आफिसातून ७ कोटी दशलक्ष वर्तमानपत्रे रवाना झाली.

**४८२३** (१६ : १२, २२ जून ५७, १८८–१८९)

लूसी आणि फॅनी या मुलींच्या चुलत्याने त्यांना वाघाची गोष्ट सांगितली. एक गृहस्थ आपल्या पत्नी व लहानग्या लेकरासह अरण्यातून प्रवास करीत होता. एकदा त्याना निबिड प्रदेशात निजावे लागले. पत्नीला सारखी भीती वाटत होती की, तेथे वाघोबा येईल. मध्यरात्री तिला स्वप्नात दिसले की, वाघाने लेकरू पळविले. ती दचकून जागी झाली व डोंगर कोसळला, असे समजून पळत सुटली. रानात तिने पाहिले की, वाघ लेकरास घेऊन पळत आहे. तेवढ्यात एका शिकाऱ्याने वाघास मारले. लेकरू सुखरूप परत मिळाले. ईश्वराने स्वप्नरूपाने इशारा करून लेकरू वाचविले. म्हणून रोज निजण्यापूर्वी प्रार्थना करा.

**४५२४** (१६ : १२, २२ जून ५७, १८९-१९१)

बंगाल इलाक्यातील जमीनदार शेतकऱ्यांची जमीन हिसकावून घेतात. सरकारने काशी प्रांतात शाळा काढल्या, त्यात १० हजार मुले आहेत. लोक १ टक्का कर खुशीने देतात. बंगाली जमीनदारांचे उत्पन्न करोडो रुपये असून ते काहीही देत नाहीत. आग्रा येथे हजारो शालेय पुस्तके छापली जातात. वायव्य प्रांतात तर ११२ दुकाने चालतात. पंतोजी तयार करण्यासाठीही शाळा आहेत. तेथील परीक्षा स्वतः गव्हर्नर घेतात. कित्येक शिक्षकांनी पवित्र शास्त्र मुखपाठ केले आहे. बनारस कॉलेजात इंग्रजीप्रमाणे संस्कृत शिकविण्याचीही व्यवस्था केलेली आहे. प्रि. बालंटैन अतिशय मेहनती आहेत. शाळेतील शिक्षण देशी भाषेमधून दिले जाते. तरीही इंग्रजी ज्ञानाचा पाया पक्का करणे आवश्यक आहे. वाङ्मय त्या त्या भाषेत शिकवावे, परंतु शास्त्रविद्या स्वभाषेतूनच शिकवावी.

**४५२५** (१६ : १२, २२ जून ५७, १९१-१९२)

मुंबईत मृगाचा पाऊस चांगला झाला नाही. आर्द्रा मात्र पडत आहेत.

**४५२६** (१६ : १२, २२ जून ५७, १९१-१९२)

बंडखोरांवर कोर्ट मार्शल करण्याचा ठराव लेजिस्लेटिव्ह कौन्सिलने पास केला.

**४५२७** (१६ : १२, २२ जून ५७, १९१-१९२)

आता गावठी शिपायांना नवी काडतुसे दिली जाणार नाहीत. दिलीच, तर त्यात गोडे तेल व मेणच असेल.

**४५२८** (१६ : १२, २२ जून ५७, १९१-१९२)

कोटात इंग्रेजी बाजारजवळ होणारी गाड्यांची गर्दी सरकार हटविणार आहे.

४८२९ (१६ : १२, २२ जून ५७, १९१–१९२)
रेल्वे कंपनीस एका आठवड्यात १८,६९० रुपये उत्पन्न मिळाले.

४८३० (१६ : १२, २२ जून ५७, १९१–१९२)
जिल्ह्यातील पोलिसांची संख्या वाढविली जाईल. त्यात मुसलमान फक्त तिसरा हिस्सा असतील.

४८३१ (१६ : १२, २२ जून ५७, १९१–१९२)
पारिस शहराची लोकवस्ती ११ लाख ७४ हजार ३१६ आहे.

४८३२ (१६ : १२, २२ जून ५७, १९२)
मि. शमुवेल राहमीम यांचे सद्‌गुणशोधक मंडळीपुढील भाषण आम्हांस मिळाले. पण ते फार अशुद्ध आहे, म्हणून छापले नाही. तरी पत्रे शुद्ध व चांगल्या अक्षरात असावी.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी.ग्रॅहॅम, प्रिंटर

विशेष टिपण :

४८३३ सन १८५७ मधील १३ वा अंक उपलब्ध नाही. त्यामुळे या भागात १६ पाने कमी आहेत. १४ व्या अंकास २०९ पानापासून सुरुवात आहे.

## ज्ञानोदय, पुस्तक १६, अंक १४, मुंबई, १५ ज्युलै १८५७

**४५३४** (१६ : १४, १५ जुलै ५७, २०९–२१६)

यहुदी व्यवस्थेत दत्तक लेकरासही ईश्वराच्या कराराचा शिक्का दिला जाई. हा दीक्षेचा नेम ईश्वराने लावून दिल्हा आहे. दीक्षा झाली की, आईबाप त्यास सुमार्गी लावण्यास झटतात. विधी आणि संस्कार पाळून ते लेकरू ईश्वराचा आशीर्वाद मिळविते. ईश्वर, दिव्य व मनुष्ये, यांच्यासमोर प्रभूचा बोध व शिक्षा यांचा प्रतिपाळ करण्याची शपथ घ्यावी. अल्पसे पाणी अंगावर टाकूनसुद्धा दीक्षा देतात. योहानाच्या वेळी दीक्षेची पद्धतच नव्हती. येशू त्र्ययकांपैकीच असल्यामुळे त्याला दीक्षेची जरूरीच नाही. दीक्षा झाली की, पापापासून अलिप्त राहाण्याची जबाबदारी आलीच. खिस्ताने तीन हजार लोकांना एका वेळी पाणी शिंपडून दीक्षा दिली. हा लौकिक भजनाचा विधी असल्यामुळे देवळात झाला पाहिजे. मन पवित्र ठेवून दीक्षा द्यावी. मात्र दोनदोनदा दीक्षा देणे अयोग्य आहे. तो पोरखेळ ठरेल. ढोंगी व कपटी लोकांचा बाप्तिस्मा रद्द करावा. दीक्षेच्या रीतीबद्दल जरी मंडळ्यांत मतभेद असला, तरी तो किरकोळ आहे.

**४८३८** (१६ : १४, १५ जुलै ५७, २१६–२१७)

हल्ली इंग्लिश फौजेने दिल्ली शहरास वेढा दिलेला आहे. दररोज लढाई होत आहे. आतापर्यंत हजार बंडखोर जखमी होऊन पळाले. २३ जून रोजी फार मोठे रणकंदन झाले. शहरात पटकीची साथ वाढत आहे. दिल्लीतील बंड शमले नाही, तर हे शहरच बदमस्त आणि बंडखोर आहे, असे समजून ते जमीनदोस्त केले जाईल. रोहिलखंडाच्या एका पेन्शनर नबाबाने ब्रिगेडियरला मारले. सगळ्या गोऱ्यांना ठार मारण्याचा हुकूम दिला. नसीराबाद, नीमच, इंदूर, ग्वाल्हेर, म्हौ, (महू) येथे दंगे झाले पण शिंदे व होळकर अगदी तटस्थ राहिले आहेत. जनरल हावलाक कानपुरास जात आहेत. चीनची पलटणे येत आहेत. एकूण १० हजार इंग्रज सोल्जर्स आहेत. शिवाय इंग्लंडची फौज येणार आहे. या गोंधळात गरिबांचे मात्र नुकसान होत आहे. पुणे व मालेगाव येथून महूकडे लष्कर रवाना होईल.

**४८३९** (१६ : १४, १५ जुलै ५७, २१७–२२०)

इस्रायलींच्या सुधारक मंडळीची स्थापना झालेली पाहून आम्हांस आनंद वाटतो. लोकांतील न्यूनता दूर करणे आवश्यक आहे. मानवाच्या मनावर बसलेला अंगभूत दुर्गुणांचा ठसा दूर करून सद्गुण वाढविणे अत्यंत कठीण असते. पैसे जमविण्यापेक्षा हे काम फार अवघड आहे. अब्राहाम व दाविद यांसारखे ज्ञानी ईश्वरभक्त पुन्हा झाले नाहीत. ईश्वराने आपणांस बखोर म्हणजे ज्येष्ठ पुत्र म्हटले. इतरांस लोआमी म्हणजे दुसऱ्याचे लोक म्हटले. आज आपल्यामध्ये विद्या अगदी कमी आहे. सुधारणा अजिबात नाही. या अज्ञानी लोकांनी सुधारणेसाठी काहीही केलेले नाही. आमचा खरा शत्रू गर्व आहे. आम्ही दुसऱ्यांना पुढे येऊ देत नाही. म्हणून निबंध लिहिण्यास उत्तेजन देऊन ते वृत्तपत्रातून छापवून आणावेत. आपले उणेपण मनमोकळेपणाने कबूल करा व ते दूर करण्याचा मनापासून प्रयत्न करा. लोकांना सुबोध करा.

४६३७ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२०)

गणू माळी याने रखवालदाराचे काम करीत असताना कोर्टाच्या खजिन्यातून ९०० रुपये चोरले म्हणून त्यास बुधवारवाड्यासमोर २५ फटके मारण्यात आले. शेकडो लोक ही शिक्षा पहाण्यास हजर होते.

४६३८ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२०)

बँक ऑफ इंग्लंड : या नावाचे जहाज विलायतेहून येत असता खांदरी बेटाजवळ फुटले. त्याजवरील खलाशी लहान बोटीतून किनाऱ्यावर पोहोचले. ते सलामत आहेत. या जहाजावर बराच माल होता.

४६३९ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२०)

जन्मणे व मरणे : मुंबईत व कुलाब्यात जून महिन्यात १५०७ मनुष्ये मरण पावली, तर ६०७ बालके जन्मास आली.

४६४० (१६ : १४, १५ जुलै ५७, २२०)

एका अमेरिकन माणसाने असा नवीन शोध लावला आहे की, त्याच्या योगे एका दिवसात १२० मण बर्फ तयार होते. तसेच, एका कोसावर गोळी झाडू शकणारी बंदूकही बनविली आहे. सध्याच्या बंदुकांतून फार तर ३०० वार (मीटर) पर्यंत गोळी जाते :

४६४१ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२१)

प्यारिसच्या एका संभावित कुटुंबातील तरुणास चोरीच्या आरोपावरून पाच वर्षे कैदेची शिक्षा झाली. पण त्या तरुणाने अजब शोध लावला. फक्त दोन सुया, एक टाचणी, थोडासा पेंडा व सूत, यांच्या साहाय्याने त्याने एक घड्याळ तयार केले. त्याचा आकार शंकूसारखा होता. मोठमोठे लोकही या शोधाने चकित झाले असून त्या तरुणाची सुटका व्हावी, म्हणून तजवीज करीत आहेत.

**४८४२** (१६ : १४, १५ जुलै ५७, २२१)

पुण्याच्या पोष्टहापिसात २७ जून १८५७ पासून ओझ्यांच्या अगर बुकांच्या पेड अगर नाटपेड बंग्या घेणे बंद झाले आहे.

**४८४३** (१६ : १४, १५ जुलै ५७, २२१)

एका नामांकित वैद्याच्या मृत्यूनंतर त्याच्या पुस्तकांची लिलावाने विक्री झाली. लिलाववाल्याने आरोग्याचे सर्वोत्कृष्ट नियम सांगणारे पुस्तक म्हणून एकाच ग्रंथाची चढ्या दराने विक्री केली. त्यात चारच सुलभ व मोल्यवान नियम आहेत. 'आपले मस्तक थंड ठेव. पाय गरम ठेव, रात्री अल्प आहार घे. सकाळीच उठ.' या चार नेमांत आरोग्याचे रहस्य साठविलेले आहे.

**४८४४** (१६ : १४, १५ जुलै ५७, २२१)

एका अरबी म्हणीत मूर्खांची लक्षणे सांगितलेली आहेत. कारणावाचून रागावणे, निरुपयोगी बडबड करणे, निष्फळ गोष्टींचा शोध घेणे, अनोळखी माणसावर विश्वास टाकणे, शत्रुमित्रांत तारतम्य न पहाणे, ही मूर्खलक्षणे समजावी.

**४८४८** (१६ : १४, १५ जुलै ५७, २२२)

एका कऱ्हाडा ब्राह्मणावर मुंबईतील ग्रामण्य पाच महिन्यांपासून चालू आहे. कारण त्याचा एका मांगीण कसबिणीशी संबंध होता. पण त्याने ब्राह्मणांची समजूत घालून सांगितले की, आपण वाईट कर्म केले नाही. मग काही जणांनी त्याच्याशी अन्नव्यवहार सुरू केला. पण बहुसंख्य लोक त्यास अपांक्तच मानतात.

४५४६ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२२)

आळस हा सर्वथा नाशकारक असा दुर्गुण आहे. त्याने कित्येकांचा फायदा बुडविला. आळशी लोक सदा झोप घेतात. १० रुपये लाभासही तुच्छवत समजत असतात. विद्वान लोक तर श्रमाचा कंटाळा करतात. ससा आणि कासव यांची गोष्ट आठवून पहा. आळसामुळे आयुष्याचा अपव्यय होतो. उलट मंदबुद्धी लोक कष्ट करून प्रगती साधतात.

४५४७ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२२–२२३)

साक्सनी, हंगेरी व हार्टस् या देशांत दरवर्षी १८ लाखांचे रुपे सापडते. ५० वर्षांपासून रशियातही पुष्कळ रुपे मिळत आहे. ग्रेट ब्रिटनमध्ये शिशाच्या खाणीत रुपेही मिळते. मिडलटन या गृहस्थास दरमहा २० हजारांचे उत्पन्न मिळते. रुपे शुद्ध करण्यासाठी ते कुटून व भाजून पाऱ्यात मिसळतात, तेव्हा रुपे शुद्ध होते.

४५४८ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२३)

प्राचीन काळी मोत्यास फार किंमत होती. ब्रूटसची आई सर्वीलिया हिने पाच लाखांचा मोती बादशहास दिला होता. क्लिओपाट्स राणीने एका पेयासह २५ लाखांचा मोती विरघळून पिऊन टाकला होता.

४५४९ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२३)

नवरा अग्नी असला, तर बायकोने पाणी व्हावे. बायको आग असली, तर नवऱ्याने वारा होऊ नये.

४५५० (१६ : १४, १५ जुलै ५७, २२३)

इराण व इंग्लंड यांचा तह झाला आहे. सेनापती जेम्स औटराम मुंबई येथे आले, तेव्हा त्यांच्या सन्मानार्थ २७ तोफांची सरबत्ती झाली.

४५५१ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२३)

जे आज होण्याजोगे आहे, ते उद्यावर ढकलू नये. जे स्वतः करण्याजोगे असेल, ते दुसऱ्यावर सोपवू नये. मिळविण्याअगोदर पैसा खर्चू नये. गरज नसली, तर स्वस्तामध्ये मिळणारा जिन्नसही घेऊ नये. जीवनाच्या गरजेसाठी जेवढा खर्च होतो, तेवढा खर्च फुशारकी व चैनीखातर करू नये. खादाडपणा करू नये. संतोषाने काम करावे. म्हणजे कंटाळा येत नाही. पुढे होणाऱ्या गोष्टीविषयी धास्ती धरू नये. राग आला तर दहा अंक मोजावेत.

४५५२ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२३)

काश्मीर हा मोठा देश आहे. तेथील हवा इटलीतील रमणीय उष्ण हवेप्रमाणे असते. शीतकालात लापलंद देशाप्रमाणे थंडी असते. जमीन कोणतीही वस्तू विपुलपणे पिकविणारी आहे. गवताची कुरणे सतत टवटवीत असतात. डोंगर बर्फाने आच्छादलेले असून यंत्राने सोडावेत तसे पाण्याचे लोट डोंगरमाथ्यावरून वाहातात. काश्मीरात कापड, साखर, मीठ, यांची आयात करावी लागते, तर लोकरीची व मोत्यांची निर्यात होते. शालजोड्यांचे ३०० माग असून हा व्यवसाय उत्तम चालतो. हा व्यापार ५० हजारांचा आहे.

४५५३ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२४)

गुजराथेतील गिराशी लोकांच्या जमिनीची चौकशी करून त्यांच्या अमानत रकमा परत देण्याचा हुकूम झाला.

४५५४ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२४)

इंडियन नेव्ही खात्याचा अधिकार कप्तान जॉर्ज वेलस्लीने सर हेन्री लिकी यांचेकडून स्वीकारला.

४५५५ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२४)

टिपू सुलतानाच्या मुलांना दरमहा ३८९६ रुपये भत्ता मंजूर झाला.

४५५६ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२४)

२८ जून रोजी कोटात १५ इंच तर भाइखळ्यास २० इंच पाऊस झाला. पण यंदा एकतृतीयांशही पाऊस पडलेला नाही.

४५५७ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२४)

सुरक्षिततेसाठी मुंबईत ४० गोरे स्वार ठेविले आहेत.

४५५८ (१६ : १४, १५ जुलै ५७, २२४)

मुंबई बँक ७ टक्क्यांप्रमाणे वाटाणी देणार.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४६५९** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २२५–२३०)

प्रभुभोजन :

येशूच्या मरणाच्या स्मरणार्थ हा संस्कार आहे. मृत्यूच्या आदल्या रात्री हा संस्कार प्रभूने स्वतः स्थापिला. मोडलेली भाकर व ओतलेला द्राक्षरस हे त्यातील पदार्थ असतात. भाकरी हे त्याचे मोडलेले शरीर, द्राक्षरस हा रक्त आहे. अर्थात या उपमा आहेत. मूर्तिपूजकांप्रमाणे ती असंगत कांक्षा नाही. यातून बोधाची व विश्वासाची प्रेरणा मिळत राहाते. प्रभूच्या मरणाचे स्मरण राहणे, माणसांचा परस्परसंबंध टिकणे, देवाची कृपेचा करार करणे, हे त्याचे हेतू आहेत. असंमजस, वेडगळ व भ्रमिष्ट लोकांना हे भोजन देऊ नये. यात अयोग्य प्रकार घडला, तर ते पाप होय. योग्य रीतीने वागले, तर तो मनाचा पुनर्जन्म आहे. सद्भावनेने तेथे जावे. शाब्बाथाप्रमाणे पावित्र्य राखावे. म्हणजे ईश्वराची अवकृपा तुम्हांवर होणार नाही.

**४६६०** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३०)

रे. आर्. जी. वैल्डरसाहेबांनी सहा वर्षे कोल्हापूर मिशनात काम केले. प्रकृती बिघडल्यामुळे ते स्वदेशी गेले. त्यांनी कित्येक चांगली पुस्तके लिहिली.

**४६६० अ** (इंम : २३०)

**४६६१** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३०)

पंजाबात शीअलकोट शहरात बंडवाल्यांनी रे. टी. हंटरसाहेबाची कुटुंबासह हत्या केली. ते जनरल असेंब्लीच्या शाळेत काम केल्यानंतर पंजाबात मिशनचे कार्य करीत असत.

**४८६१ अ** (इंम : २३०)

**४८६२** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३०–२३१)

दिल्ली शहर अजून हस्तगत झाले नाही. गेले १५ दिवस अनर्थाच्याच बातम्या येत आहेत. ६० बंडखोर मारले गेले. पटकीचा वाखा चालूच आहे. अखबराबादेस ६०० इंग्रजांपैकी ५० मारले गेले. मुलालेकरांनी गढीत आश्रय घेतला. जनरल हॅवलॉक १५००० बंडवाल्यांशी निकराने लढा देत आहे. नानासाहेब घायाळ होऊन ब्रिठोरमध्ये लपला. बंडवाले लष्कर जाळीत आहेत. नानासाहेबाने तहाच्या गोष्टीकरून जनरल व्हीलरला फसवून ठार मारले. २४० गोऱ्या स्त्रियामुलांना लिलाव करून जिवे मारले. एखाद्या सुज्ञास वाटेल की, याचा सूड म्हणून देश उध्वस्त करून ओसाड करावा.

**४८६३** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३१)

लुधियानात अमेरिकन मिशनाची घरे व शाळा जाळली. छापखान्याचा नाश केला. ५० हजारांचे नुकसान झाले. अलाहाबादेस एक लाखाचे नुकसान झाले. अयोध्येत जनरल लॉरेन्स गोळी लागून ठार झाला. लखनूच्या बंडखोरांनी तोफांचा भडिमार करून अनेक गोऱ्यांना ठार मारले.

**४८६४** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३२)

पंढरपुरात दंगा : पंढरपुरात मामलेदार कचेरीतील कैद्यांनी पळून जाण्याचा कट केला होता. बाहेरचे काही लोक कचेरीवर चालून आले. मामलेदार व २ शिपाई यांना ठार मारून त्यांनी कैद्यांस सोडविले व ते पळून गेले.

**४८६५** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३२)

बाजीराव पेशव्याचे दत्तपुत्र नानासाहेब पळून बिठोरला गेले. आपल्या कृत्याचे फळ त्यांना भोगावेच लागेल. सिंहापुढे कोल्ह्याचे काय चालणार?

**४५६६** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३२–२३३)

'आगगाडीत बसणारा' लिहितो की : आगगाडीत बसण्यालाच काय, पण श्वास टाकण्यालाही जागा नसते. बटाट्यांप्रमाणे खच्चून भरलेली माणसे एकमेकांच्या अंगावर पडत असतात. अशक्तांना बुक्क्यांचा मार मिळतो. आरडाओरडा चाललेला असतो. रेल्वेच्या खाटक्यांना त्यांची दया येत नाही. माणसांचे लोट अंगावर आदळतात. कित्येक लोक बेशुद्ध पडतात. लुच्चे लोक स्त्रियांना उद्देशून थट्टा व अभद्र भाषणे करतात. म्हणून स्त्रियांसाठी वेगळा डबा असावा. म्हणून आगगाडीच्या गर्दीवर नियंत्रण ठेवावे.

**४५६६ अ** (इंम : २३४)

**४५६७** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३४)

मुंबईत एका गृहस्थाकडे एक धुतारा गोसावी आला. हा साधू रुपयाचे सोने करतो, अशा बढाया त्याच्या शिष्यांनी मारल्या. या किमयागाराने प्रथम एका रुपयाऐवजी यजमानास सोने 'करून दिले.' यजमानाने आपले रुप्याचे दागिने त्याच्याकडे दिले. तेव्हा तो सगळे दागिने घेऊन पळून गेला. तेल गेले, तूप गेले, हाती धुपाटणे आले, या म्हणीप्रमाणे झाले.

**४५६८** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३५)

एका कावळ्याने वडवाघळीचे पिलू चोरले. वडवाघळी त्याच्याशी भांडू लागली, पण कावळा मूल देईना. कावळ्याने एका वकिलास अधिकार देऊन कोर्टामध्ये हे आपलेच मूल, असे सिद्ध केले. वकिलास स्वतःच्या कौशल्याचा अभिमान वाटला व आपले ४२ पिढ्यांचे पूर्वज स्वर्गात जाण्याइतका आनंद झाला. तो कावळ्याकडे बक्षिशी मागू लागला. कावळ्याने त्याला घाणीमधले कीटक दाखवून म्हटले, 'हे पहा तुमचे ४२ पिढ्यांचे पूर्वज; ते अजून नरकातच आहेत!'

**४८६९** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३५–२३६)

कोचीनच्या शोदामान्थूर गावी पर्वतामधून एकाएकी अग्नीचा झोत मोठ्या वेगाने बाहेर आला व ठिणग्या उठल्या. हा अग्निवर्षाव अर्ध्या कोसाच्या प्रदेशात चालू होता. अनेक श्वापदे जळून मेली.

**४८७०** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३६)

पुण्याजळवच्या जंगलातून काष्ठे, पर्णे व कोळसे नेण्याबद्दल अरण्यारक्षक गिबसन यांनी ६ महिन्यांपूर्वी जकात बसविली होती. ती कृपाळू सरकारने रद्द केली. ज्ञानोदयाने याबाबद २-३ वेळा लिहिले होते. या कृतीने कोळी व मावळे लोकांना संतोष होईल.

**४८७१** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३६)

पुणे शहरात गांजेकस लोक फार झाले आहेत. या ज्ञानवल्लीस इतका भाव आला आहे की, भांगेचा मक्ता १४०० रुपयांवर गेला. गेल्या वर्षी हे उत्पन्न चौथा हिस्सा देखील नव्हते. सरकारने पाच दुकानांना परवाना दिला. प्रजेस अशा प्रकारे दुर्व्यसनात घालून उत्पन्न वाढविणे या शहाण्या सरकारास अयोग्य आहे.

**४८७२** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३६)

उत्तर हिंदुस्थानामधील दंग्यात ज्यांचे नुकसान झाले, त्यांना मदत करण्यासाठी एक फंड उभारण्याकरिता एक सभा झाली. ना. गवरनर अध्यक्ष होते. त्यांनी स्वतः दोन हजार, तर जमशेद घराण्याने ४०५० रुपये दिले. एकूण ३३ हजार जमले.

**४८७३** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

पेट्रिआटिक फंडात १ कोटी ४३ लक्ष रुपये जमले.

**४६७४** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

दंगाफिसाद करणारांना सेशनने फाशीची शिक्षा देऊन लगेच अंमलात आणावी, असा कायदा झाला. अशा फाशीस वरिष्ठांच्या मंजूरीची आवश्यकता नाही.

**४६७५** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

अक्कलकोटच्या सयाजीराव महाराजांना देवाज्ञा झाली.

**४६७६** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

बंडाचा बिमोड व्हावा म्हणून साहेब, मडमा व नेटिव यांनी प्रार्थना केली.

**४६७७** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

भुलेश्वरच्या देवळाजवळ पर्जन्यवृष्टीसाठी शृंगऋषीचा पुतळा केला आहे.

**४६७८** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

सदाशिवशास्त्री लेले भडोचच्या कोर्टात शास्त्री झाले.

**४६७९** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

कलकत्यामध्ये रुप्याच्या धुरावर दिवे लावले आहेत.

**४६८०** (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७)

सर जमशेद यांना राणीने बारोनेटचा किताब दिल्हा.

४५८१ (१६ : १५, १ ऑगस्ट ५७, २३७–२४०)

श्रावणी आदितवाराविषयी :

'एक वाचणारा' लिहितो की : श्रावणात हिंदूंचे देव सर्व निद्रेतून जागे होतात. आदितवारी लोक श्मश्रू करीत नाहीत. कारण सूर्याच्या तोंडात केस पडतात! सूर्यनारायणाची यथासांग पूजा करतात. पाटावर सूर्याचा मुखवटा काढून ब्राह्मण पूजा सांगतो. मग लोक ब्राह्मणाच्या पायाचे तीर्थ पितात. कहाणी वाचणे, हे स्त्रियांचे कार्य तर तासभर चालते. गणपती व मारुती यांच्या चरित्रांतही सूर्याबद्दल काही कथा आहेत. त्या भाविकपणाने वाचतात. परंतु हे लक्षात घ्या की, ईश्वर एकच आहे. आत्मिक सूर्याचा प्रकाश मिळविणे सूर्यपूजेपेक्षा जास्त महत्त्वाचे आहे. ख्रिस्ताचा आश्रय करा.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४५८२** (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २४१)

मंडळीचे मुख्य नियम शास्त्रातून कळतात. मंडळीचे अधिकार सरकारी अधिकाऱ्याकडे नसतात. शास्त्राचा अभिप्राय पाहून व्यवस्था ठेवली जाते. पालक, कारभारी भविष्यवादी व प्रेषित, हे पूर्वी अधिकारी होते. सध्या फक्त पालक व कारभारीच आहेत. येशू हा सर्वांचा राजा होय. मंडळाचे पंच पालक निवडतात. तो शिक्षक तसाच पहारेकरीही असतो. शास्त्ररूपी धनाची, तसेच कृपेची तो व्यवस्था पहातो. दीक्षा, प्रभुभोजन, विवाह, लौकिक भजन, यांची तो व्यवस्था ठेवतो. उपजीविकेपुरते नेमस्त वेतन त्यास मिळते. व्यवस्थेसाठी स्त्रियांशीही सल्लामसलत तो करतो. प्रत्येक ठराव अधिक मते पाहून करतात. जे मंडळीत येण्यास अयोग्य वाटतात, त्यांना बंदी करतात. सभासदांची परीक्षा घेतात. लौकिक अपराध झाला, तर त्यांना दूर करता येते. थोडा काळ सस्पेंडही ठेवता येते. कायमचे बहिष्कृत करण्याचाही त्यांना अधिकार आहे. क्षमा मागितली, तर प्रभुभोजनास परवानगी देतात. खरा पश्चात्ताप दिसला, तर क्षमा करतात.

**४५८३** (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २४८–२५०)

सर हेनरी लारेन्स : सर लारेन्स हे नामांकित परोपकारी साहेब लखनूरला मरण पावले. त्यांचे नाव भरतखंडात प्रख्यात आहे. ज्या शिपायांचे शिक्षण व कल्याण ते करीत होते, त्यांनीच बिथरून ठार मारले. १८४२ मध्ये ते अफगाण देशात एजंट होते. शीख लढाईत त्यांनी पराक्रम केल्यावर ते पंजाबचे कमिशनर झाले. यावर्षी ते अयोध्येत कमिशनर होते. दंगलखोरांविरुद्ध त्यांनी कडक कारवाई केली. अनेकांना फाशी दिल्हे. त्यावरून शिपाई बिथरले आणि गढीवर हल्ला करून त्यांनी लारेन्स यांना मारले. त्यांनी अनेक शाळांना पैक्याची मदत केली. अशा न्यायी, उदार, समंजस व लोककल्याणेच्छू अधिकाऱ्यांना ठार मारून दंगेखोरांनी मोठी चूक केली. ईश्वराने असे अधिकारी वारंवार या देशाला द्यावेत.

**४५८३ अ** (इंम : २४७–२४८)

**४५८४** (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५१–२५४)

'एक वाचणारा' लिहितो की : बाबा पद्मनजींनी यमुनापर्यटन नावाचा ग्रंथ रचला. प्रस्तावनेतच त्यांनी सुधारणेचे विराट स्वरूप सांगितले. सुधारणारूपी स्त्रीच्या अंगावर मोलवान कपडे व अलंकार असले, तरी मळकट चिंध्या व कथलाचे दागिनेही लावले आहेत! आपले लोक विद्या शिकून ज्ञानी व विचारवान् झाले, तरी खऱ्या सुधारणेचे त्यांस धैर्य नाही. विधवांचा पुनर्विवाह करून देण्यास ते पुढे येत नाहीत. बालविवाह व स्त्रियांवरील इतर अन्याय जोपर्यंत बंद होत नाहीत, तोपर्यंत खरी सुधारणूक अशक्य आहे. ख्रिस्ती धर्मविरहित सुधारणूक म्हणजे रानटी अवस्था होय. मग टीकाकार काहीही म्हणाले, तरी ते अयोग्य आहे.

**४५८४ अ** (इंम : २५४–२५५)

**४५८५** (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५५–२५६)

विद्युतद्वारा बातमी देण्याच्या यंत्रात अबे कासेली आफ फ्लारेन्स याने आश्चर्यकारक शोध लावला आहे. कोणत्याही लिपीतील बातमी किंवा चित्र या यंत्रात ठेवले, तर त्या गावी ते पाठविता येते. मोर्सच्या यंत्राने दर मिनटास ८४ अक्षरे जात असत, तर कासेलीचे यंत्र मिनटास ५०० अक्षरे पाठवते! हशीलही अगदी अल्प आहे. आता मोठ्या बातम्याही ताबडतोब जातील. युरोपात कासेलीच्या युक्तीचा सर्रास उपयोग होतो.

**४५८६** (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५६)

पंढरपूरच्या मामलेदारास मारल्याबद्दल १८ लोकांना पकडले होते. त्यांचा इन्साफ झाला असून तिघांना काळ्या पाण्याची जन्मठेप झाली, तर सहा जणांना तोफेच्या तोंडी देण्यात आले.

४६८७ (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५६)

पंढरपुराहून सरकारी शिपाई रोकड घेऊन जात असताना शिपायास घायाळ करून चोर पैसे घेऊन गेले.

४६८८ (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५६)

लेफ्टनंट ओसबर्न यांना रेवाच्या महाराजांनी फौजेची मदत दिल्ही.

४६८९ (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५६)

केरोलीच्या राजाने जाहीर केले की, बंडवाल्याना मदत करणाराचे डोके उडविले जाईल.

४६९० (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५६)

सागरच्या पोस्टमास्तरने लखोटे उघडून त्यातील मजकूर बंडवाल्यांना सांगितला, म्हणून त्याला फासावर चढविले आहे.

४६९१ (१६ : १६, १५ ऑगस्ट ५७, २५६)

जनरल असेंब्लीच्या स्कुलामध्ये वादविवाद व चर्चा होणार आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४५९२** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २५७–२६०)

पृथ्वीवर असा काळ येईल की : ख्रिस्ताची मंडळी सतत सुख पावेल. येशूकडून सतत आशीर्वादित होईल. असे हजार वर्षे चालेल. पवित्र आत्मा व प्रकाश यांची वृष्टी होईल. प्रीती व सुख वाढेल. सर्व राष्ट्रे व वंश ख्रिस्ताकडे वळतील. जमीनही भरपूर पीक देईल. येशू आता आकाशिक गौरवाने व वैभवाने युक्त होऊन राहात आहे. मर्त्य व अशक्त मानवी प्रकृतीचा तो स्वीकार करणार नाही. पण तो आमच्या अंतःकरणात वस्ती करील. हल्लीपेक्षा त्याकाळात पाप कमी होईल. ख्रिस्ती संस्कार चालूच राहातील. सहस्रकाचा निश्चित दिवस दिलेला नाही. १२६० वर्षे ख्रिस्ती धर्मीयांना पीडा होणार आहे. या हिशोबाने १८६६ पासून ख्रिस्ती धर्माच्या वैऱ्यांचा नाश होईल. भविष्यवाक्याच्या आश्वासनाप्रमाणे एक दिवस म्हणजे एक वर्ष धरले, तर ३ लाख ६० हजार वर्षे हा आनंदाचा काळ चालू राहील. म्हणून सगळ्या मंडळींनी त्याची पूर्वतयारी चालविली आहे. हा काळ समाप्त झाल्यावर सैतान पुन्हा मोकळा होईल. म्हणून सहस्रकाच्या आगमनाकरिता आपण प्रार्थना करावी.

**४५९३** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६१)

युनेटेड स्टुडेंट्स असोसियशन : रा. भवानी विश्वनाथ विद्यार्थ्यांच्या सभेत म्हणाले की, स्त्रीविद्याभ्यास मोठा अगत्याचा आहे! नंतरच्या चर्चेत मात्र काहीजणांनी बालविवाहास अनुकूलता दाखविली. जनरूढीच्या योगाने आमच्यात गैरशिस्त चाली आहेत. बालविवाहाने दुर्व्यसनाच माजतात. पुनर्विवाहाच्या आवश्यकतेवर मात्र एकमत झाले. बाबा पदमनजीच्या पुस्तकात ख्रिस्ती मते सांगून विधवांच्या स्थितीबद्दल अतिशयोक्ती केली, म्हणून नाराजी दाखविली. परंतु यमुनापर्यटन हा इतिहास नाही. मात्र तशा घटना घडण्याजोग्या आहेत, हे मान्य करावे लागेल.

**४८९३ अ** (इंम : २६४)

**४८९४** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६३)

मराठी आणि इंग्लिश कोश हा कोश : प्रथम १८३१ मध्ये छापला होता. त्याची दुसरी आवृत्ती काढण्यासाठी मोल्स्वर्थसाहेबास सरकारने इंग्लंडहून आणले. आता हा ग्रंथ छापून तयार झाला. दाक्तर विल्सनचा अभिप्रायही त्यास जोडला आहे. दा. मोल्सवर्थची कीर्ती भरतखंडात अक्षय राहील, यात शंका नाही.

**४८९४ अ** (इंम : २६३)

**४८९५** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६३)

इंग्लिश आणि गुजराथी कोश : या ग्रंथात इंग्रजी शब्दांचा गुजराथी अर्थ दिलेला असून त्याचे १० भाग होतील. किंमत ३० रुपये राहील. टाइप सुंदर आहे.

**४८९५ अ** (इंम : २६३)

**४५९६** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६४–२६५)

तुकारामाची गोष्ट : हे पुस्तक त्राक्ट सोसायटीने छापले. रे. मरे मिचेल त्यात म्हणतात की, आमच्या तारणासाठी तुकारामाने काहीच केले नाही आणि त्याला जगद्गुरू म्हणावे हे योग्य नाही.

खरा आश्रय : एक म्हातारा आणि तरुण यांचा धर्माच्या बाबतीत संवाद दिलेला आहे. या पुस्तकाच्या हजारो प्रती खपल्या.

खगोलविद्या : रेवरंड फ्यारब्याक साहेबांनी लिहिले असून आवश्यक तेथे आकृतीही घातल्या आहेत.

रोम बादशहाचा वृत्तांत : जूलियस सीझरपासून त्रेजनपर्यंतच्या १४ बादशहांच्या मनोरंजक गोष्टी यात वाचावयास मिळतील.

विद्यार्थी : दुसरी आवृत्ती छापली असून विद्यार्थ्यांच्या फार उपयोगी आहे.

**४५९६ अ** (इंम : २६३–२६४)

**४५९७** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६५–२६६)

ता. ९ जुलै रोजी शिअलकोट छावणीत बंड झाले. पराभवानंतर बंडखोर काश्मीर प्रांतात पळून गेले. पुढे ते लपत छपत रेवातीरावर आले जनरल निकलसन्साहेबाने या टोळीवर हल्ला करून त्यांचा पूर्ण विध्वंस केला. तोफांच्या भडिमारानेच ते मरून गेले. काश्मीरमधील बंडवाल्यांना आधिकाऱ्यांनी पकडले. एकूण ५७२ जणांना फाशी देण्यात आले. लाहोरच्या बंगाली पलटणीची हत्यारे काढून घेतली होती, तरी त्यांनी दंगल केली. एकूण ५०० बंडखोर गोळीबारात ठार झाले. बंडवाल्यांचा नाश निश्चित आहे.

४५९८ (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६६)

ब्रिटिश सरकारच्या कुमकेस चहूकडून गोऱ्या पलटणी येत आहेत. कलकत्यात १० हजार सैन्य तयार आहे. चीनमधून लॉर्ड एलीगनची १६०० ची फौज येणार आहे. मोरिशसहून ३३ वी पलटण येईल. इंग्लंडातून ३३ जहाजे भरून २५ हजार सैनिक निघाले. बंडाच्या सुरुवातीस सिंह झोपेत होता. म्हणून कोल्ह्यांनी त्याच्या शेपटाचे केस उपटले. आता तो जागा होऊन पंजा हलवितोय. कोल्हे पळत आहेत. तो जेव्हा उभा राहील, तेव्हा हे कोठे लपतील ?

४५९९ (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६७)

दिल्ली येथे एका खिस्ती उपदेशकास बंडखोरांनी तलवारीचे घाव घालून मारले. आम्हांस उपदेश करा, असे ते उपरोधाने म्हणत होते. उपदेशकाचे त्यांनी फार हाल केले. शेवटी तो मृत्यू पावला.

४६०० (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६७–२६८)

दिनापूर येथे २५ जुलैस बंड झाले. हत्यारबंद शिपायांबरोबर युद्धसाहित्य नेले जात असताना काळ्या शिपायांनी गडबड सुरू केली. सर्वांना फितविले. दिनापूर कॅन्टोनमेंटावर हल्ला केला. ३००० रुपये घेऊन सगळे पळाले. २५० इंग्रज कप्तानांनी नदीमधून आगबोटी चालवून त्यांचा पाठलाग केला. बंडवाल्यांनी त्यांना एका आंबराईत गाठून १६० ठार मारले. ९० कप्तान बचावले. बंडखोरांनी गयेची तिजोरी लुटली. जनरल उट्राम दिनापूरचा बंदोबस्त करीत आहे.

**४६०१** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २६८–२७०)

काही बेईमान शिपायांनी बंड केले. तेवढ्यावरून मुसलमान डौल दाखवितात. हिंदू लोक पेशव्यास गादीवर बसवितात. इंग्रजी राज्य बुडाले, अशा गटारी बातम्यांवर विश्वास ठेवतात. इंग्रजांच्या राज्यात आपण भिकारी झालो, असे लोकांना वाटते. पण पूर्वी काही सगळेच मानकरी नव्हते. मुस्लीम व हिंदू राज्यांत कित्येक भिकारी होते. लखनूरच्या नबाबाने हनुमानगडाच्या देवळात ढोल वाजविल्याबद्दल कित्येक ब्राह्मणांस व बैराग्यांस कापून टाकले. असला जुलूम आता होत नाही. महंमदगंजाने कित्येक हिंदू मारले. जोगाईच्या अंब्यास देवळाची सावली मशिदीवर येते, म्हणून मुस्लिमांनी देऊळ तोडले, तेव्हा इंग्रजांनी त्यांना कठोर शिक्षा दिली. दिल्लीच्या बादशहाचा हुकूम खुद्द दिल्लीत चालत नसता तो प्रांतावर प्रधान नेमतो, हे अगदी आश्चर्यकारक आहे. ज्या ज्या गावी बंड झाले, तेथे इंग्रजांचा एक आणासुद्धा नाश झाला नाही. बंडवाले मात्र आगदी निर्मूल झाले. गटारबातम्या बोलून मिशावर हात फिरवणारांपासून सावध राहा.

**४६०२** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७०–२७१)

पुणे लष्कर भागातील मौलवी नूर उलहुदा यास दंग्याच्या संशयावरून अटक झाली. त्याने निजाम व बेळगांव येथील मौलवी यांच्याकडे गुप्त पत्रव्यवहार करून गडबड करण्याचा कट रचला होता. इंग्रज साहेबांच्या बटलरांनाही पकडले. या लोकांच्या जवळची शस्त्रेही काढून घेणार आहेत. कोणत्याही देशात सभ्य-असभ्य, विचारी, दांडगे, शहाणे, अविचारी, असे सर्व प्रकारचे लोक असतात. पारशी लोक मात्र इंग्रजांशी इमान राखून आहेत. कारण त्यांचे मुसलमानांशी वैर आहे. बंडखोर एक लाखच आहेत, तर प्रजा पंधरा कोटी आहे! म्हणून कोणताही बिघाड झाला, तरी देश विपत्तीत पडणार नाही.

**४६०३** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७१)

नगर जिल्ह्यात अकोला येथे महाजनाच्या घरी दरवडा पडून बरेच द्रव्य चोरीस गेले. भिल्लांवर संशय आहे. पण लोकांना वाटले की, पेंढारी आले. कित्येकांनी आपले द्रव्य जमिनीआड करण्याचा उद्योग चालविला आहे.

**४६०४** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७१)

ग. ज. लार्ड क्यानिंगचे सक्रतार बहादुर जाहीरनाम्यात लिहितात की : बंडवाल्यांना पकडून देणारास ५० रुपये बक्षीस दिले जाईल. मात्र त्याजवर गुन्हा शाबीत झाला पाहिजे. पेन्शन्दारांनी आपली राजनिष्ठा जाहीर केली नाही, तर त्यांना बंडखोर समजून त्यांची पेन्शन बंद केली जाईल. बंडखोरांची मालमत्ता धरून दिली, तर लोकांना बक्षीस मिळेल.

**४६०५** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७१)

मद्रासेत लोकोपयोगी इंजिनिअर खात्याची कामे चालू आहे. परंतु त्यापकी निम्मी कामे सरकारने बंद केली. अनेक ओव्हरसिअर व मजूर कामावरून कमी केले. मुंबई खात्याचाही खर्च कमी करणार आहेत.

**४६०६** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७१)

गवरमेंटच्या एकुस्ता गाझिटावरून असे कळते की, हल्ली जी पोस्ट हापिसे बेसनदी पोस्टमास्तरांच्याकडे आहेत, ती ताबडतोब सनदी अंमलदारांच्या ताब्यात दिली जातील.

**४६०७** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

चीच बंदरावर राहणाऱ्या एका भाट्यास ९ इसमासह जुगार खेळताना पोलिसांनी पकडले. जुगारखान्याच्या मालकाला ४०० रु. दंड झाला, तर इतरांना १५ ते २५ रुपये प्रत्येकी दंड किंवा १५ दिवसांचा तुरूंगवास, अशी शिक्षा झाली.

**४६०८** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

सातारा जिल्ह्यातील रयतेने आपल्याजवळची तरवार, पिस्तुल, तोफा, वगैरे प्राणघातक शस्त्रे ताबडतोब सरकारजमा करण्याबद्दल तेथील माजिस्त्रेताने जाहीरनामा काढला आहे. हत्यारे परत न करणारास ५० रुपये दंड किंवा ६ महिने शिक्षा मिळेल. नगरातही काहीजणांची शस्त्रे पोलिसांनी ताब्यात घेतली.

**४६०९** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

सिंधमध्ये अफवा पसरविणे, दंगा करणे, या गुन्ह्यांना फाशीची शिक्षा देण्यात येणार आहे.

**४६१०** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

कोतवाली अंमलदाराच्या हुकमाखेरीज लढाऊ हत्यारांच्या विक्रीस बंदी झाली.

**४६११** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

ना. रिविस यांनी लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या सभासदत्वाची शपथ घेतली.

**४६१२** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

साताराची माजी राणी व दत्तकपुत्र यांना सुरक्षिततेसाठी दिवदिवा येथे आणून ठेवले आहे.

**४६१३** (१६ : १७, १ सप्टेंबर ५७, २७२)

काश्मीरच्या गुलाबसिंग महाराजांचा अल्प आजारानंतर मृत्यू झाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४६१४** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २७३–२७४)

रे. ज्यार्ज क्यांडी :

क्यांडीसाहेब नुकतेच स्वदेशी गेले. ते चांगल्या कामांची आवड बाळगणारे व लोककल्याणाची कृत्ये झटून करणारे, असे प्रख्यात होते. प्रथम लष्करी कामगार व नंतर उपदेशक होऊन ट्रिनिटी चॅपलमध्ये त्यांनी २० वर्षे उपदेश केला. समाजाने त्यांना दहा हजाराचे बक्षीस दिल्हे. त्यांनी दोन शाळा स्थापन केल्या. त्यात दासपणामधून सोडविलेली शिद्दी जातीची मुले होती. क्यांडीसाहेब आपल्या कार्याने धन्य झाले.

**४६१४ अ** (इंम : २७३)

**४६१५** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २७४)

चर्च मिशनरी सोसायटीचे मेंगीसाहेब प्रकृती बिघडल्यामुळे स्वदेशास गेले. ईश्वर त्यांस आरोग्य देवो !

**४६१५ अ** (इंम : २७४)

**४६१६** (१६ : १८; १५ सप्टेंबर ५७, २७४–२७७)

दयाळू इंग्रज सरकारने पाश्चिमात्य विद्येचा प्रचार या देशामध्ये केला. शाळा स्थापून विद्येची गोडी लावली. कोट्यावधी द्रव्य वेचले. लायक नेटिवांना अधिकार दिला. त्यांचे हुद्दे नाना फडणविसापेक्षा श्रेष्ठ आहेत ! स्त्रिया व अतिशूद्र यांनाही त्यांनी शिकविले. मिशनऱ्यांच्या उदार प्रयत्नांमुळे खरा धर्मही समजला. सत्याच्या शोधासाठी नगरमध्येही मंडळ स्थापन झाले. अनेक साहेबांनी देणग्या दिल्या. ३०० पुस्तकेही जमविलेली आहेत. मंडळाने स्वतःची घटना तयार करून व्यवस्थापक मंडळमुद्धा नेमले. लोकांनी आपली मदत शाहूराव कुकडे यांचेकडे पाठवावी.

**४६१६ अ** (इंम : २७७–२७९)

**४६१७** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २७९)

'एक ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : नगर व पुणे या गावांत बाघाची सोंगे मोहरममध्ये नाचण्याची बंदी झाली, तसे मुंबईतही व्हावयास हवे आहे. विद्वान व संभावित मुसलमानांसही ते आवडत नाही. कित्येक मौलवी या अनाचारामुळे दहा दिवस घराबाहेरही पडत नाहीत. या सोंगांस बंदी केल्यामुळे त्यांच्या धर्मामध्ये हात घातल्यासारखे होणार नाही, तरी सरकारने कायदा करावा.

**४६१७ अ** (इंम : २७९)

**४६१८** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८१–२८४)

भरतखंडावर आलेला अनर्थ दूर करण्यासाठी लोक ईश्वराची प्रार्थना करीत आहेत. चर्चप्रमाणे देवळातही भजने होत आहेत. ईश्वर सर्वसमर्थ असून दंगेखोरांना आवरण्यास समर्थ आहे. पण प्रार्थना सावधगिरीने करावी. देवाचा अपमान होता कामा नये. आपण जर सेवकाची भूमिका विसरलो, तर देव क्रोधायमान होईल. देवाचे पवित्रपण नेहमी मनात वागवावे. जी पुराणे देवांची दुष्ट कामे सांगतात, ती खोटी आहेत. आपले पाप मान्य करून नम्रता धरावी. देव पाप करतो किंवा करवितो, असे म्हणणारे लोक अगदी कृतघ्न आहेत. देव व मनुष्य यांच्यात मध्यस्थी करण्यास कोणीतरी श्रेष्ठ व्यक्ती हवी व ती येशू ख्रिस्तच आहे. तो एकच दाता असून आम्ही त्याच्यापाशी विश्वासाने मागणे मागू.

**४६१८अ** (इंम : २८०–२८१)

**४६१९** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८४–२८६)

'एक ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : श्रावणातल्या सोमवारी लोक महादेवाची स्तुती करतात. शिव आणि शक्ती यांनीच जगाची उत्पत्ती केली, म्हणून पुत्रप्राप्ती व धनलाभ हे हेतू धरून अभिषेक करतात. मोठा हुद्दा मिळावा म्हणून ब्राह्मणाच्या मंत्रपठनासह बिल्वपत्रे व तांदळाची मूठ वाहतात. भसरूप राखेचे पट्टे अंगावरती ओढतात. नंदीचीही यथासांग पूजा होते. स्त्रियांची गर्दी तर फारच असते. एका भिल्लाने शिवरात्रीच्या दिवशी रात्रभर बेलाची पाने तोडून देवावर टाकली, म्हणून त्यास स्वर्ग मिळाला. शंकराने सगळे जग निर्माण केले व मनुष्यांच्या जाती निर्माण केल्या, असे शिवपुराण म्हणते. पण मेलेल्यांतून उठून चाळीस जगात राहणारा व देवाजवळ बसणारा येशू हाच खरा तारक होय.

**४६२०** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८६)

मिस्तर लेनिशिया या अमेरिकन व्यापाऱ्याने भारतात पुनर्विवाह चालू करण्याच्या कामास मदत म्हणून ५०० रुपये दिल्हे, आहेत.

४६२१ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८७)

इराणच्या लढाईत हुशारीने वर्तणूक करणारांना पदव्या मिळणार.

४६२२ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८७)

शिक्षकांनी मराठीत, गुजराथीत व कानडीत प्रतिष्ठा मिळविली, तर ३०० रु. इनाम मिळेल.

४६२३ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८७)

ना. हेन्री विल्सन यांनी कोर्ट आव डिरेक्टर पदाची शपथ घेतली.

४६२४ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८७)

दिल्ली हस्तगत झाल्यावर दिल्लीच्या राजास कसलेही वचन देऊ नये अगर त्याच्याशी करार करू नये, अशी सूचना इंग्रज सरकारने केली.

४६२५ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८७)

कागलच्या कारभाऱ्याकडे एक स्वामी आला. त्याचा शिष्य नृसिंहशास्त्री हा मंत्रविद्येत प्रवीण आहे. एका कारभाऱ्याची रुप्याची वाटी चोरीस गेली असता त्याने प्रत्येकाचे नाव एकेका चिठीवर लिहिले. नंतर त्या चिठ्या शेगडीत जाळल्या. त्यांची राख पाण्यात टाकली. नंतर पाण्यातून एक चिठी काढून दाखवली : त्यात ज्याचे नांव निघाले, त्याने वाटी परत दिली. पण हिंदू लोक असल्या थोतांडावर कसे विश्वास ठेवतात, तेच कळत नाही. अशा युक्तीने जर चोर सापडत असता, तर शास्त्री भीक मागत कशाला हिंडतो?

४६२६ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८७-२८८)

श्रावन द्वादशीस पवित्रा बारस म्हणून गुजराथी लोकांची मोठी जत्रा भरते. सूत मिश्रित रेशमाच्या माळा घेऊन लोक महाराजांकडे जातात. ही पतितरूप माळा स्वामीच्या पायास लावून गळ्यात घालतात. स्त्रियाही भारी कपडे व दागिने घालून मोठ्या नखऱ्याने मंदिरात जातात. मोठी दक्षिणा देतात.

४६२७ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८८)

भडोचमध्ये काही मुस्लिमांनी पारशी मोबादास ठार मारून स्त्रियांची अबरू घेतली. दंगेखोरास पकडून कोर्टात नेले. चार जणांना फाशी, अकरा माणसांना जन्मठेप व ३० लोकांना ३ वर्षे कैद, अशी शिक्षा झाली.

४६२८ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८८)

अलीबाग येथे गौरीस पोहोचविण्याकरिता २५-३० माणसे होडीत बसून समुद्रात गेली. एकाएकी नाव उलटून सगळे समुद्रात बुडाले. हे सगळेजण दारू प्यालेले होते, म्हणून हा अनर्थ घडला.

४६२९ (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८८)

कोटातील एका सोल्जराने दारू पिऊन तलवारीने एका शिपायास व घोड्यास जख्मी केले. माजिस्त्रेताने सोल्जरची चौकशी करून त्यास ३ महिने सक्तमजुरीची शिक्षा दिल्ही. सरकारने दारूची दुकाने बंद केल्याशिवाय असले अनर्थ थांबणार नाहीत.

४६३० (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८८)

ठाण्याच्या तुरूंगात एक खोज्या तरूण कैदेत होता. कैद्याच्या आईने २ पपनसांमधून २५ आणि ६० रुपये नाझरास पाठविले. या प्रकाराची चौकशी होत आहे.

**४६३१** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८८)

राजश्री हरी जनार्दन यांना देवाज्ञा झाली. ते सदर अदालतीचे वकील होते.

**४६३२** (१६ : १८, १५ सप्टेंबर ५७, २८८)

इराणच्या लढाईत २ कोटी ८६ लाख रुपये खर्च झाला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १६, अंक १९, मुंबई, १ ऑक्टोबर १८५७

**४६३३** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २८९)

गवरनर जनरलनी असा जाहीरनामा काढला आहे की, दुष्ट आणि घातकी लोकांच्या वर्तणुकीमुळे देशाच्या विश्वासू प्रजेवर मोठा अनर्थ गुजरला आहे. म्हणून संकटनाशासाठी देवाची प्रार्थना करावी. अपराध बंद व्हावे, सर्वत्र शांतता व स्वस्थता राहावी, म्हणून ईश्वराचा आशीर्वाद मागावा.

**४६३३ अ** (इंम : २८९)

**४६३४** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९०)

रे. ए. आबट प्रथम २३ वर्षांपूर्वी भारतात आले. अकरा वर्षांपूर्वी ते स्वदेशी गेले होते. गरीब आणि अडाणी लोकांना ते उपदेश करतात. आता ते सहकुटुंब भारतात आले आहेत. त्यांची नेमणूक नगर जिल्ह्यात होईल.

**४६३४ अ** (इंम : २८९–२९०)

**४६३८** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९०)

पवित्र शास्त्राची दुसरी आवृत्ती १२०० पृष्ठांची असून विक्रीस तयार आहे. छपाईच्या किरकोळ चुका असल्या, तरी अर्थ बराबर लक्षात येतो. किंमत अवघी १ रुपया आहे.

**४६३८ अ** (इंम : २९०)

**४६३९** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९०–२९२)

माजी ग. ज. लार्ड एलेनबरो पार्लमेंटमध्ये म्हणाले की, सध्याचे ग. ज. क्यानिंग खाजगी पैशामधून मिशनरी मंडळ्यांना मदत करतात. त्यामुळे प्रजेस असे वाटते की, आपल्या धर्मात ढवळाढवळ झाली. त्याबद्दल एका विद्वान बाबूने म्हटले आहे की, जेव्हा ग. ज. नी या देशातील दुष्ट चाली बंद केल्या, तेव्हा अशी ओरड झाली नाही. या सुंदर देशात बंडरूपी अग्नी पेटला. बंडवाले पिशाच्याप्रमाणे लूटमार व रक्तपात करीत आहेत. ही घटना केवळ ग. ज. च्या देणग्यांनी होते म्हणण्यात अर्थ नाही. एलेनबरोची नक्कीच गैरसमजूत झाली आहे. इंग्रजांनी पूर्वीच्या राज्यकर्त्यांप्रमाणे कधी जुलूम केला नाही. इंग्रजांची नीती, विद्वत्ता आणि निस्पृह बुद्धी, यांबद्दल आम्हांस काहीही संशय नाही.

**४६३७** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९२–२९७)

एका हिंदू गृहस्थाने सत्यधर्माचा शोध घेतला. त्यास ख्रिस्ती धर्मच खरा वाटून त्याने तो धर्म स्वीकारण्याचे ठरविले. एका अंमलदाराने त्याला पैशाचे अमिष दाखविले. पण पैशाने आत्म्याचा उद्धार होत नाही. सारासार विचार पाऊन विवेकाने वागावे. धर्माबद्दल स्वतः खातरी करून घ्यावी. वाडवडलांची मते डोळे मिटून स्वीकारणे अयोग्य होय. संत तुकाराम व रामदास यांनी जातिभेदाचा व सोवळ्याचा स्पष्ट शब्दांत निषेध केला आहे. कोणत्याही शास्त्रलेखाचे प्रत्यंतर पाहिल्यावाचून विश्वास ठेवू नये. येशूच्या जन्माचे भविष्य दूतांनी वर्तविले व ते खरे झाले. येशूने जन्मांधास डोळे दिले. मेलेल्यास जिवंत केले. पश्चातापाने तारण होईल, असे येशू म्हणत असे. हजारो लोकांसमक्ष त्याने चमत्कार केले. तो मेलेल्यांतून उठला व देवाजवळ स्थिरावला. त्याच्या १२ शिष्यांनी जगभर शुभवर्तमान गाजवले. याबद्दल सत्यधर्मशोधकाची खातरी झाली.

**४६३८** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९७)

धुळे येथील आनंता नावाच्या सुताराने कळीची गाडी बनविली आहे. ही गाडी दोन हात लांब व दीड हात रुंद असून तिला ४ चाके आहेत. ही गाडी फक्त मौजेसाठी असून तो मोठी गाडीही करणार आहे. सदरहू सुतार गुणी आहे. सरकारने त्यास उत्तेजन देणे आवश्यक आहे. लोकांनीही त्याच्या कौशल्याचे चीज करावे.

**४६३९** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९७)

पुण्यातील गाडीवानांनी आपल्या गाड्या बंद केल्या आहेत. कारण अशी अफवा पसरली आहे की, लष्करी सामान नेण्यासाठी सरकार या गाड्या ताब्यात घेते. म्हणून पुण्याच्या माजिस्रेताने असा हुकूम काढला की, त्यांच्या गाड्या कोणीही जबरीने घेणार नाही. गाड्या बंद असल्यामुळे धान्याचे भाव वाढू लागले आहेत; तर गाडीवानांनी अफवावर विश्वास ठेवू नये. कोणी त्यांच्यावर जबरी केली, तर त्याला शिक्षा होईल.

**४६४०** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९७–२९८)

हिंदुस्थानात इंग्रज सरकारच्या अंमलाखाली ८ लाख ३७ हजार ४१४ मैल क्षेत्रफळाचा प्रदेश असून त्याची लोकसंख्या १३ लाख १९ हजार ९०१ आहे. राजेरजवाड्यांच्या संस्थानी प्रदेशाचे क्षेत्रफळ १२९४ चौ. मैल असून त्यामध्ये ४ कोटी ८३ लाख ७६ हजार २४७ लोक राहातात. पोर्तुगीज अंमलाखाली ५ लाख १७ हजार १४९ चौ. मैलाचा प्रदेश असून त्यात फ्रेंचांचा प्रदेशही धरला आहे. तेथे २ कोटी ३२ लाख ५५ हजार ९७२ लोक आहेत.

**४६४१** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९८)

उद्योग हे मोठे धन आहे. उद्योगी माणूस गरीब असला, तरी सुखी होतो. निरुद्योगी आणि आळशी लोक कधी सुखी होणार नाहीत. एका माणसाचे दोन हजार रुपये उत्पन्नाचे शेत होते. कर्जाच्या पेचात आल्यामुळे त्याने निम्मे शेत दुसऱ्या शेतकऱ्यास विकले. सतत उद्योग करून तो शेतकरी इतका गबर झाला की, तो उरलेले शेत विकत घेण्याची तयारी दाखवू लागला. मूळ मालकाशी बोलताना तो म्हणाला, "तुमच्यात व माझ्यात दोन अक्षरांचा फरक आहे. तुम्ही स्वतः आराम करून नोकरांना शेतावर 'जा' म्हणून सांगता. मी मात्र स्वतः शेतावर जाऊन नोकरांना 'या' म्हणतो."

**४६४२** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९८–२९९)

जगात नफा झाला, तरी आनंद मानू नये. नुकसान झाले, तरी दुःख मानू नये. समाधानी असावे. एका सार्वभौम राजाजवळ सर्व प्रकारची सांसारिक सुखे होती. तो चतुर व निपुण होता. त्याची मुले सुशील व आज्ञाधारक होती. तरी त्याच्याजवळ चिंता व सुखाभाव दिसे. प्रधानाने या चिंतेचे बीज विचारले, तेव्हा राजा म्हणाला : ऐहिक सुखे असली, तरी या सुखाचे मंदिर जे समाधान ते मजजवळ नाही. माझ्याजवळ दांभिक सौख्य व अंतरंग काळजी यांवाचून काहीही नाही. राज्यपदाची इच्छा करण्यापेक्षा माणसाने समाधानी राहावे.

**४६४३** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, २९९–३००)

एका नास्तिकाने ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल गुरूशी व्यर्थच वाद चालविला, तेव्हा गुरूने त्यास ढेकूळ फेकून मारले. सर्वव्यापी ईश्वर कोठेही दिसत नाही आणि अपराधाचे शासन त्याने का करावे, असे आचरट बोलणे ऐकून गुरूला कंटाळा आला होता. नास्तिक माणूस पोलिसांना घेऊन आला, तेव्हा गुरू म्हणाला : 'मस्तक दुखते, तर नेमके दुःख मला दाखवा! मनुष्य ईश्वरी सत्तेतच काम करतो, मग मला ढेकूळ मारण्याबद्दल शिक्षा कां व्हावी?' पोलिसांनी मूर्ख नास्तिकाला हाकलून दिले.

**४६४४** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३००)

कोणीतरी लिंबाच्या फोडीवर शेंदूर टाकून ते अदालतीच्या शिरस्तेदाराच्या घरासमोर ठेवले होते! हिंदू लोक यास जादू म्हणतात. अशा जादूटोण्याने माणसे मरतात, असाही त्यांचा समज आहे. परंतु अशा हलक्या व नीच उपायांनी कोणी मरत नाही. जन्ममरण ईश्वराने आपल्या हातात ठेवले आहे. म्हणून अशा कृत्यात पैसा दवडण्यापेक्षा काही लोकोपयोगी कामामध्ये खर्च करण्याची बुद्धी परमेश्वराने या लोकांना द्यावी.

**४६४५** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३००)

लक्षद्वीप बेटावर दुष्काळ पडल्यामुळे सरकारने पायोनियर या आगबोटीवरून धान्यसामग्री रवाना केली आहे.

**४६४६** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३०१)

मुंबईपासून आठ कोसांवर असलेल्या चौल गावी रामेश्वरच्या देवळामध्ये तीन कुंडे आहेत. ही कुंडे वायू, पर्जन्य आणि अग्निदेवता यांची आहेत. पर्जन्य अगदी पडेनासा झाला. तर पर्जन्यकुंड उघडतात. पण त्यानिमित्त ४-५ हजार खर्च करून यज्ञ करावा लागतो. अशीही समजूत आहे की, जो कुंड उघडतो, तो मरतो! यंदा कुंड उघडणारा जिवंत आहे की नाही कुणास ठाऊक!

**४६४७** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३०१)

दिल्ली शहरावर तीन दिवस तोफांचा भडिमार करून दिल्लीचे अनेक भाग इंग्रजांनी ताब्यात घेतले. अतिशय कठीण लढाई झाली. हजारो मारले गेले. (१३ सप्टेंबर १८५७ रोजी)

**४६४८** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३०१)

लंडन शहराच्या बंदोबस्ताकरिता ठेवलेल्या फौजेसाठी ४ लाख ३४ हजार ८१० रुपये खर्च होतो. उत्पन्न ४ कोटी ७९ लक्ष ७ हजार १७० आहे.

**४६४९** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३०१)

डामराचे वृक्ष मलबारच्या अरण्यात आहेत. त्यांच्या चिकास डामर म्हणतात. डहाळ्यांचे तुकडे भट्टीत घालून हा चीक एकत्र करतात.

**४६५०** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३०१)

आळशी माणसे उद्योगी पुरुषाजवळ जाऊन त्याचा अमोल्य वेळ बुचाडून घेतात. काही उपयोगी कामासाठी जाण्याऐवजी ते गंमत म्हणून जातात. तरी उद्योगी माणसाजवळ उगीच गप्पा मारावयास जाऊ नये.

**४६५१** (१६ : १९, १ ऑक्टोबर ५७, ३०१)

नामदार गवरनरांनी धीरजलाल मथुरादास यांना दिवाणी व फौजदारी अदालतीत सरकारी वकील नेमले.

**४६८२** (१६ : ११, १ ऑक्टोबर ५७, ३०२–३०४)

जगामध्ये येशू फक्त निष्पाप आहे. आकाशाला व सूर्यालाही डाग आहेत, पण येशू निष्कलंक आहे. नेटिव हिंदू निष्कलंक अवताराची वाट पहात आहेत. येशूस मानवी देह असला, तरी त्याचा स्वभाव निष्पाप होता. दुष्टाईत व अशुद्धपणात राहूनही तो शुद्ध राहिला. उजेडामध्ये अंधार राहात नाही. सैतानाने त्याची परीक्षा घेतली व तो कसोटीस उतरला. सैतानाच्या धमकीस त्याने दाद दिली नाही. त्याचे काही शिष्य अल्पविश्वासी मंदबुद्धी व फितूर होते. पण त्यांच्या कुचाळीकडे त्याने दुर्लक्ष केले. क्रूसावर जातानाही त्याने कोणाबद्दल वैरबुद्धी बाळगली नाही. पाप्यांचा बदली होऊन त्याने दुःख भोगले. यहूदा या फितूर शिष्याच्या लक्षात आले की, निष्पाप रक्त पराधीन करून आपण पाप केले आहे. तेव्हा या शिष्याने गळफास लावून आत्महत्या केली. येशूच फक्त सद्‌गुणी व परिपूर्ण ठरला.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४६५३** (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३०५–३१०)

येशू ख्रिस्त निष्कलंक होता. पुरातन साधू इंद्रियदमन व तप करून परिपूर्ण होत. पण ईश्वराचे नेम पाळून येशू परिपूर्ण बनला. सद्‌गुणांनी देवासारखा झाला. त्याने देवांवर व मनुष्यांवर प्रीत केली. चमत्कार केल्यानंतरसुद्धा तो देवाशी नम्र राहिला. देवाचे उपकार त्याने कबूल केले. जीवनभर देवाची स्तुती आणि सेवा केली. आपल्या मरणाने ईश्वराचा गौरव केला. त्याच्याजवळ अपार ज्ञान व ममता होती. अरण्यात न जाता मानवात राहून त्याने लोकांची सेवा केली. लोकांना सुमार्ग शिकविला. सुगंधी तेल पायास लावणाऱ्या स्त्रीला पापातून मुक्तही केले. जनतेशी समदुःखीपणा, समुदायाचा कळवळा, ढोंगाचा तिरस्कार, हे त्याचे सद्‌गुण होते. सर्वांना पवित्र आत्मा देऊन त्याने प्रकाशित केले. त्याची पवित्र वर्तणूक आदर्श असे. पण जगात नीतिमानाचा सर्व प्रकारे उपहास होऊन घात होतो. त्याप्रमाणे त्याचा मृत्यू झाला.

४६८४ (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३१०–३१३)

येशूने उत्कृष्ट व शुद्ध नीति शिकविली. न्यायी, अंतःकरण शुद्ध असणारे असे दयाळू लोक धन्य असून ते देवाला पहातात. मनाने, बुद्धीने व शक्तीने ईश्वरास भजावे. पाप शरीराइतकेच मनानेही होते. स्त्रीकडे कामदृष्टीने पहाणे, हे व्यभिचारकर्माप्रमाणेच आहे. मनातले दुष्ट विचार माणसाला विटाळवितात. लोककल्याणाकरिताच येशूने चमत्कार केले. त्याने नम्रतेने शिष्यांचे पाय धुतले. शत्रूशीसुद्धा कपटाने किंवा लबाडीने तो वर्तला नाही. तो निर्लोभी होता. क्षमाशील राहून आपणास मारणाऱ्यांच्या तारणाकरिता त्याने प्रार्थना केली. विधर्मी लोकांचे देव विषयलंपट, पापी, द्वेषबुद्धी, आणि पाप घडविणारे वाटतात. त्रयकात तो दुसरा आहे. त्याने कोणाकडूनही सेवा घेतली नाही. उलट तो सगळ्यांची खंडणी झाला. तो ईश्वरप्रतिम, पवित्र आणि विवेकवान होता. अमर व सर्वकाळच्या सुखाला त्याने सर्वकाळचे जीवन म्हटले आहे. ते अविनाशी, निर्मळ व न कोमणारे वतन आहे. सौख्यलोकात आपण गेलो की, देव आपले अश्रू पुशील. येशूचा इतिहास खरा आहे. त्यास साक्ष आणि प्रमाण आहे.

४६८५ (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३१३–३१५)

हरिदास नावाच्या ईश्वरभक्ताने मिशनरी साहेबास निवेदन दिल्हे की : तो पूर्वी मोठा मूर्तिपूजक होता. त्याने तीर्थयात्राही बहुत केल्या. गुरूच्या सांगण्यावरून भवसंसाराचा त्याग केला. बैरागी होऊन हिंडत असताना एका ब्राह्मणाने उपदेश केला की, तू ठाकुराची दररोज पूजा करून ब्राह्मणास दक्षिणा दे. मग ठाकूर स्वतः तुझ्याशी बोलेल. अनेक दिवसांच्या पूजेनंतरही ठाकूर श्रीकृष्ण बोलला नाही. मग शिव्या दिल्या, धमकी दिल्ही, तरी श्रीकृष्ण बोलेना. शेवटी रागावून दगड फेकला व मूर्तीचा भुगा केला. गावातले लोक त्याला फौजदाराकडे घेऊन गेले. ठाकुराच्या खुनाचा आरोप करू लागले. पण दयाळू फौजदाराने सगळे गेल्यावर त्यास पळून जाण्यास मदत केली. पुढे मिशनेऱ्याची भेट झाल्यावर शुभवर्तमान सतत ऐकले. येशूच खरा देव आहे अशी खातरी झाली.

४६६६ (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३१५–३१७)

'ज्ञानोदय वाचणारा' म्हणतो की : मंगळवारास देवीचा वार समजतात. नवविवाहित स्त्रिया पतीसह केळीच्या खुंटाचे मखर बांधलेल्या मंगळागौरीची पूजा करतात. कणकीचे पाच गोळे घेऊन देवी बनवितात. गणपतीच्या जागी सुपारी असते. समंत्र पूजा सांगण्याला ब्राह्मण येतो. या शुभदायक गौरीची पूजा पाच मंगळवारी चालत असते. खरूज आलेले लोकही मंगळवारचा उपास करतात. येशू तर म्हणाला होता की : कोणत्याही मूर्तीच्या पाया पडू नका. खऱ्या मनाने क्षमा मागा. ईश्वर तुमचे पाप भस्म करणारा अग्नी होईल. म्हणून दुष्ट व अमंगळ चाली बंद कराव्यात. ईश्वर तुमचे दार ठोठावीत असतो. खऱ्या अंतःकरणाने त्याला शरण जावे. दगडाचे हृदय काढून नम्र सुहृद मिळवावे.

४६६७ (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३१७)

मुंबई मुकामी दोन शिपायांचा इन्साफ करण्यात आला. सयद हुसेन व मंगळ गड्डीआ या दोघांनी बंडाविषयी बोलताना इंग्रेज सरकारविरुद्ध भाषणे केली. मार्शल लॉप्रमाणे दोघांना फाशीची शिक्षा झाली. त्यांना तावडतोब तोफेच्या तोंडी देण्यात आले. हे पहाण्यास हजारो लोक जमले होते.

४६६८ (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३१७)

फ्रान्सच्या बादशहाने इंडियन रिलीफ फंडास दहा हजार रुपये दिल्हे, तर इंपीरियल गार्डने चार हजारांची देणगी दिल्ही.

४६६९ (१६ : २०, २३ आक्टोबर ५७, ३१७)

सन १८४६ मध्ये दिल्ली शहराची लोकसंख्या १ कोटी ३७ लाख ९७७ होती. सरकारी व गावठी मिळून १९६ शाळा होत्या.

**४६६०** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

आदन येथे आर्वस्थानच्या किनाऱ्यावरून गोडे पाणी आणण्याचा खर्च फार, होतो म्हणून एक यंत्र तयार करून यंत्राने समुद्राचे पाणी स्वच्छ करणार आहेत.

**४६६१** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

सेविंग्स बांक : जे लोक विशेष ठेवीमध्ये पैसे गुंतवितात, त्यांना ३ टक्के व्याज देण्याचे ठरले आहे. लष्करी लोकांस शेकडा साडेतीन टक्के व्याज मिळेल. १६०० रुपये ठेवल्यास चार टक्के व्याज आहे.

**४६६२** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

ब्रिगेडियर जनरल निकल्सन दिल्लीच्या वेढ्यात घायाळ होऊन मरण पावले.

**४६६३** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

पुण्यात माजूम विक्रीसही बंदी झाली आहे. कारण माजूमाच्या नशेमध्ये एखादा माणूस दुसऱ्याचा घात करण्याची शक्यता असते. भांगेचा रांधा करून तयार होणाऱ्या या पदार्थास बंदी केल्याबद्दल गावात थाळी पिटविण्यात आली.

**४६६४** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

मनचरच्या रस्त्यावर भिकोबा नाईक नावाच्या सराफाचा बटवा चोरल्याबद्दल दोन रामोशी व एक मुसलमान यांना शेतकऱ्यांनी मोठ्या शिताफीने पकडले.

**४६६५** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

नगर जिल्ह्यात चंदनापुरीतून आणि इमामपूर घाटांमधून जाणाऱ्या वाहनांना एक आणा दस्तुरी द्यावी लागेल.

**४६६६** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

वायव्य प्रांताचे गवरनर रसेल काल्वीन यांचा मृत्यू झाला.

**४६६७** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

मद्रासमध्ये एत्तद्देशीय भाषांत ३३ साप्ताहिके निघतात.

**४६६८** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

मुंबई मुक्कामी सरकारने दवंडी पिटवून हरएक जातीच्या शस्त्राची नोंद सरकारकडे करण्याचा हुकूम केला. अनेकांनी जवळच्या शास्त्राची माहिती दिली.

**४६६९** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

खंडाळा ते पुणे रेल्वे सुरू होणार असून तिची यंत्रसामग्री न्यावयाची असल्यामुळे बोरघाटामधील आठवड्यातून दोनदा होणारी वाहतूक काही काळ बंद राहील.

**४६७०** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

पंढरपुरात नागेश राघवेंद्र या मामलेदारास दंगलखोरांनी ठार मारले. मामलेदाराच्या पत्नीस दरमहा ३० रुपये पेन्शन देण्याचे सरकारने ठरविले आहे. मामलेदाराबरोबर मरण आलेल्या शिपायांच्या पत्नींना दरमहा दोन दोन रुपये मिळतील. दंगेखोरांना पकडून देणारांना प्रत्येकी १०० रुपये बक्षीस मिळेल. यंदा भरतखंडातील दंगलींची नुकसानभरपाई देण्यासाठी विलायतेत १ लाख ७० हजार रुपये जमले.

**४६७१** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

पुण्यात गंधकाच्या विक्रीस बंदी करण्यात आली. किरकोळ विक्रीस हरकत नाही. तसेच, रेल्वेच्या कारखानदारांना खास परवानगी दिली आहे.

**४६७२** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

ब्रिग्रेडिअर जनरल निकलसन् दिल्ली शहरावर हल्ला करण्याच्या वेळेस घायाळ झाले. नंतर दोन तीन दिवसांनंतर मरण पावले.

**४६७३** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१८)

माजूम : ही भांगेचा रांधा करून, त्यांत काही जायफळ वगैरे जिनसा घालून तो रांधा साखरेच्या पाकात कढवून त्याच्या बर्फीप्रमाणे लहानशा वड्या करतात. पुण्याचे माजिस्त्रेतसाहेब यांनी असा हुकूम फर्माविला आहे की, सरकारातून रजाचिठी घेतल्याखेरीज (माजूम) कोणासही देऊ नये.

**४६७४** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३०४–३१९)

दस्तुरी : नगर जिल्ह्यांत संगमनेर तालुक्यांत चंदनापुरी, इमामपूर एथील घाटांत पुढील जानेवारीपासून दस्तुरी पालक्या येणे, डोल्या हत्तीपासून तो बकऱ्यापावेतो चतुष्पादास दस्तुरी घेणे, याचा जाहीरनामा लागला आहे.

**४६७५** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३१९–३२०)

एक बाई शेजारणीकडे ताक मागण्यास गेली. शेजारणीच्या सुनेने ताक नाही म्हणून सांगितले, म्हणून परत निघाली. रस्त्यात शेजारीण भेटली, शेजारणीने मुद्दाम तिला घरी नेऊन ताक नाही, म्हणून बजावले. कारण, नाही म्हणण्याचा अधिकार सासूला आहे, सुनेला नाही!

**४६७६** (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३२०)

या देशातले लोक अंगावर किंवा डोक्यावर कावळा बसला, तर मुद्दाम मृत्यूची पत्रे पाठवितात. कारण त्याने अशुभहरण होते, अशी सर्वांची समजूत आहे. गडइंग्लजच्या जिवबा अण्णाच्या डोकीवर कावळा बसला. त्याने शेजाऱ्याकडून आपण महामारीने मेल्याबद्दल पत्र सर्वांना धाडले! याला काही शास्त्राधार आहे का, ते मात्र पहावे लागेल.

४६७७ (१६ : २०, २३ ऑक्टोबर ५७, ३२०)

ता. २० सप्टेंबर रोजी दिल्ली शहर इंग्रजांच्या स्वाधीन झाले. अनेक बंडखोर पळून गेले. दिल्लीच्या राजाचे दोन पुत्र व नातू यांना ठार मारून बेगमांना कैद करण्यात आले. अयोध्येकडे पळणाऱ्या बंडवाल्यांच्या टोळ्यांचाही संपूर्ण पराभव झाला. लखनूरच्या लढाईत जनरल नील आणि हावलाक यांचा मृत्यू झाला. म्हणून विजयी फौजेसह जनरल औटराम गेले आहेत.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४६७८** (१६ : २१, २ नोव्हेंबर ५७, ३२१–३२९)

रा. सा. दादासाहेब पांडुरंग यांचा संस्कृत निबंध ही (यमुनापर्यटन) कादंबरीची प्रस्तावना आहे. श्राद्धविधीची तपशीलवार माहिती कारण नसताना दिलेली आहे. नंतर रावसाहेब मुद्यावर आले. महाराष्ट्राच्या ५ लाख ७० हजार हिंदूंपैकी दहावा हिस्साही शिक्षीत नाही. जे शिकलेले आहेत, त्यांना सुधारणेचे धैर्य नाही. पुनर्विवाहास स्पष्ट शास्त्राज्ञा नाही. शास्त्रांचे भारूड फार मोठे आहे. स्मृती तर वेगवेगळ्या काळांत तयार झाल्या. मनु याज्ञवल्क्य विरुद्ध आहेत, तर पराशर अशा विवाहास अनुकूल आहे. रूढीविरुद्ध जाण्यास कोणी तयार नाही. प्राचीन काळी विधवांना नियोगाची मुभा होती. पराशर मात्र स्पष्ट म्हणतो की, पती बेपत्ता, नपुसक, पतित असेल तर किंवा मृत झाला, तर स्त्रीने विवाह करावा. विधवा स्त्रीला इतर शास्त्रांनी सक्तीच्या वैराग्यात डांबले आहे. द्वितीय संबंधास लग्न म्हणण्यास ते तयार होत नाहीत. सती व केशवपन हा तर शुद्ध निर्दयपणा होय. यातून व्यभिचार आणि बालहत्येचे पातक वाढते आहे. म्हणून हा जुलूम बंद झाला पाहिजे. जर विधवेस परपुरुषदर्शन होऊ देऊ नये, महिन्यातून एकदा नापिताचा स्पर्श कसा होऊ देतात, याचे उत्तर कोणी देत नाही! 'यमुनापर्यटन' वाचून त्यांच्या मनास द्रव येईल असे वाटते. विधवांचे कुशल चिंतक फक्त खिस्ती शास्त्रच आहे.

**४६७८ अ** (इंम : ३२९–३३२)

**४६७९** (१६ : २१, २ नोव्हेंबर ५७, ३३२–३३५)

'हिंदूंची स्थिती प्रदर्शित करणारा' लिहितो की : ब्राह्मणखेरीजकरून बाकीचे सर्व लोक घाम गाळून कष्ट करतात. हा नेम नसता, तर मत्सर, चोरी–छिनाली, या दुर्गुणांचा प्रसार झाला असता. निरुद्योगी लोक झोटिंगपाच्छाई करतात. आदामाने बागेतील फळ खाल्ल्यापासून कष्टाचा नेम मानवास लागला. ब्राह्मण मात्र स्वतःस भूदेव समजून गर्वाचे योगाने फुगलेले असतात. इतर जातींना चाकर समजतात. तसे उल्लेख असणारे ग्रंथही त्यांनीच तयार केले. ते लोकांकडून शिधा व दक्षिणा घेऊ लागले. ब्राह्मणी राज्यात त्यांचे महत्त्व फारच वाढले. दुसऱ्या बाजीरावाने राज्य गेल्यावरही त्यांचे लालनपालन सुरू ठेवले. पण एवढा ब्राह्मणांचा आशीर्वाद घेऊनही मराठी राज्याचा विध्वंसच झाला! ब्राह्मणांना श्रेष्ठ मानून लोक फसतात. मोठा गुन्हा करतात. ब्राह्मणांनी आलस्य व अज्ञानच वाढविले. ते अज्ञानाचे चौकीदार होत. मांजरापुढे उंदीर पड खातो, त्याप्रमाणे वागून लोकांनी वेडगळ चाली मात्र वाढविल्या. ब्राह्मणांचे ऐकून खोटा धर्म वाढवला. या अयोग्याचा धिक्कार केला पाहिजे. जेथे तोफ हवी, तेथे फटाकड्यांचा उपयोग होणार नाही.

**४६८०** (१६ : २१, २ नोव्हेंबर ५७, ३३५)

'उत्तराची वाट पहाणारा' लिहितो की : काही ब्राह्मण दाढी ठेवतात. अनुष्ठान शुद्ध रीतीने चालावे, असा त्यात हेतू असतो. मग सगळेच दाढी राखणारे ब्राह्मण पवित्र समजावे का? कौनपूर मुक्कामी अनेकांची कत्तल करून अघोर व घातकी कर्मे करणारे नानासाहेबही दाढी ठेवतात. मग त्यांची जातगोत कोणती समजावी? याचे उत्तर द्यावे.

४६८१ (१६ : २१, २ नोव्हेंबर ५७, ३३५–३३६)

'एक मित्र' पत्रात लिहितो की : सालाबादप्रमाणे लोक पंढरीस जात आहेत. पण मी विचारतो का : तुम्ही आपला पैसा व आयुष्याचा वेळ व्यर्थ कां घालविता? आणि वाटेचे श्रम, भूक-तहान यांच्या संकटात पडता? शेवटी जरीमरीच्या झपाट्यात सापडून का मरता? यात्रेकरूंच्या मनात खरा निष्पापपणा नसतो. कारण ते लबाड्या, ठकबाजी व शिवीगाळ करतात. बुद्धी सुधारत नाही. षड्रिपु कायम राहातात. म्हणून एथेच राहून, दुर्वासना सोडून भक्ती करा.

४६८२ (१६ : २१, २ नोव्हेंबर ५७, ३३६)

एका शेतकऱ्याचा मुलगा बापू गाफील आणि निष्काळजी होता. त्याच्या विसराळूपणावर उपाय म्हणून बापाने प्रत्येक अपराधाबद्दल खांबावर एकेक खिळा मारण्याचे ठरविले. मुलगा ज्यावेळी चांगला वागेल, त्यावेळी एकेक खिळा तो उपटून काढीत असे. मुलाच्या वाईट वर्तनाने खिळ्यांनी खांब भरून गेला! वडलांच्या कानउघाडणीनंतर मात्र चांगला वागू लागला. म्हणून एकेक खिळा उपटला गेला! शेवटचा खिळा काढला गेला, तेव्हा मुलगा रडू लागला व म्हणाला : खिळे निघाले, पण खुणा कायम आहेत. माझ्या मनास जे डाग पडले आहेत, ते कधीच पुसले जाणार नाहीत! म्हणून मुलांनी चांगले वागावे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४६८३** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३३७–३४३)

मरणानंतर देहाची माती होते. येशू जीवनाचा राजा होता. म्हणून तो कुजणे असंभव्य होते. येशूने आपल्या स्वर्गारोहणाचे भविष्य आधीच वर्तविले होते. योसेफ या धनवानाने सुभेदाराकडून येशूचे शव घेऊन ते पुरले. पण धरणीकंप होऊन तो मृतामधून उठला. अनेकांनी त्यास पाहिले. सर्व राष्ट्रांना पश्चात्ताप व पाप्यांना क्षमा गाजविली. थोमा या शिष्याने त्याच्या अंगावरच्या खिळ्यांच्या खुणाही पाहिल्या. नंतर तो गालिलामध्ये प्रगट होऊन ४० दिवस राहिला. त्याने १२ शिष्यांना शुभवर्तमान गाजविण्याचा आदेश दिल्हा. पाचशे जणांना दर्शन देऊन प्रमाण दाखविले. जे त्याच्यावर विश्वास ठेवतात, त्या लोकांना मरणावर जय मिळेल व ते गौरवात जातील. देवाने येशूला प्रभू आणि ख्रिस्त बनविले. सर्वांपेक्षा उंच करून श्रेष्ठ नाव दिल्हे. आपल्या मंडळीचे संरक्षण करून तो तारण देतो. पवित्र आत्म्याने पूर्ण करतो. न्यायाच्या दिवशी तो देवबापाबरोबर येईल. तुतारी वाजत असताना सर्वांचा निवाडा करील. पुण्यवानांना स्वतःच्या संगतीमध्ये नेहमी ठेवील.

**४६८४** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३४३–३४४)

प्रयागमध्ये बंडवाल्यांनी विश्वासघात करून अनेक साहेबलोकांना ठार मारले. सोळा वर्षांचा एक तरुण घायाळ होऊन निसटला व ओहोळामध्ये लपला. पुढे शिपायांच्या हातात पुन्हा सापडला. बंडवाले गोपीनाथ नंदी नावाच्या उपदेशकास छळीत होते. घायाळ तरुण नंदीचे धैर्य खचलेले पाहून म्हणाला की, 'भाऊ, आपल्या प्रिय प्रभूस नाकारू नका' आणि त्याने प्राण सोडला. तेवढ्यात निळी टोपीवाले इंग्रज शिपाई आले, अशी अफवा उठल्यामुळे बंडखोर पळून गेले व नंदी मात्र बचावला.

**४६८५** (१६ : २२, १९ नोव्हेंबर ५७, ३४४)

सरकारची आर्थिक हानी : बंबे टैम्सवरून असे कळते की, बंडखोरांनी इंग्रेज सरकारचे ५४ जमादारखाने फोडून १० कोटी रुपये पळविले. पण यास पुरावा नाही. एवढी रोकड रकम त्या तिजोरीमध्ये कोठून आली?

**४६८६** (१६ : २२, १९ नोव्हेंबर ५७, ३४४–३४७)

'अज्ञानत्व पाहून कळवळणारा' लिहितो की : बंडाचा अनर्थ लवकर थांबावा, म्हणून खिस्ती लोक प्रार्थना करीत आहेत. हिंदू लोकही मूर्तीचे भजन-पूजन करीत आहेत. पण ते व्यर्थ आहे. मुख्य देवास सोडून मूर्तीची पूजा करू नये. पतिव्रता स्त्रीने दुसऱ्या पुरुषास चिंतण्याइतके ते पापरूप आहे. एखाद्या मुलाने दगडास व खांबास बाप मानण्यासारखे आहे. धातुपाषाणाच्या निर्जीव मूर्ती कोणाचेही कल्याण करू शकत नाहीत. निर्जीव मूर्ती निरुपयोगी असतात. त्यापेक्षा पाप कबूल करून देवास शरण जावे. पश्चात्तापपूर्वक प्रार्थना करावी. खऱ्या उत्पन्नकर्त्याचा अपमान करू नये. ढोंग न करता तरणोपायाच्या गोष्टी बोलाव्यात. हे प्रेमाचे व खुशीचे कर्तव्यकर्म आहे. मूर्तिपूजेने खरा ईश्वर संतापतो. देव आत्मा आहे. त्याला मूर्तीमध्ये डांबून टाकू नये. अज्ञानतिमिराचा नाश करावा.

**४६८७** (१६ : २२, १९ नोव्हेंबर ५७, ३४७–३४८)

'ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : श्रावणास बुधवारी बुधबृहस्पतीच्या चित्राबरोबर एका बालकाचे चित्र काढून स्त्रिया त्याची पूजा करतात. भाकरीचा व मुळ्याचा नैवेद्य दाखवितात. गुरूने बुधपत्नीशी व्यभिचार केला. त्यातून झालेले मूल समायिक मानून दोघांनी सांभाळले, अशी कथा आहे! नवग्रहपुराणात म्हटले आहे की, गुरू बुधाचा शिष्य होता! तो जातीचा पुरा असून कर्माचा चुरा करतो ! म्हणून ग्रहांची पीडा टाळण्यासाठी स्त्रिया त्याची पूजा करतात. ब्राह्मणलोक ग्रहांचा जप करून रुपये मिळवीत असतात. खऱ्या ईश्वरास सोडून ग्रहांची पूजा कशाला करता? ग्रह ईश्वराने निर्माण केले आहेत.

४६८८ (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३४८)

'लोकांचा हितेच्छू' लिहितो की : सध्या मोठ्या शहरात सोडती काढण्याचा धूमधडाका चालतो. हा जुगारच असल्यामुळे सरकारी जाहीरनाम्यामध्ये त्याला स्पष्टपणे बंदी केली आहे. सोडतवाले घरोघर जाऊन पैसे जमवितात. पण शंभरातून एखाद्याचेच नशीब उघडते. बाकीचे रडत बसतात. पोलीसकमिशनरांनी लक्ष ठेवून जुगाऱ्यांना शासन करावे.

४६८९ (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३४९)

'तुमचा मित्र' लिहितो की : रिकामटेकडे व मूर्ख लोक भलत्याच समजुती करून घेतात. कोणीतरी चमत्कारिक अफवा उठविली आहे की, पंढरीचा विठ्ठल देवळात नाही, तर तो भक्तांच्या मदतीसाठी उत्तर भारतात निघून गेला! असल्या विक्षिप्त बडबडीने ते फाशात पडतात व विठोबा घोळात सापडतो. अशा कंड्या पिकविणारास कैद भोगण्याची पाळी येईल.

४६९० (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३४९–३५१)

'आत्मपक्षाची हितेच्छु एक स्थानवासी बाई' लिहिते की : नेटिव स्त्रियांना विद्याभ्यास व सुशिक्षा नसल्यामुळे त्या नीच अवस्थेत राहून त्यांच्या मनात वाईट व हलकट गोष्टी भरतात. त्या फुरसतीचा वेळ रिकाम्या व क्षुल्लक गोष्टीत घालवितात. घरबारी ब्राह्मणांच्या स्त्रिया सायंकाळी ओट्यावर बसून हास्यविनोद करतात. तरुण मुलींना हा चांगला कित्ता नाही. मर्यादाशील स्त्रिया या मेळ्यात बसत नाहीत. त्यांची टिंगल करतात. त्यांना खवट, घरकोंगी, मुखजड व अभिमानी समजतात. या स्वतः इतक्या दांभिक आहेत की, परजात सावली टाकून गेली की आंघोळ करतात! नगरला आढळणारी ओट्यावर बसण्याची चाल इतरत्र कोठेही नाही. अर्थात गोशाही वाईटच. पण असल्या अमंगळ व निंद्य चाली सोडून बायकांनी मन पवित्र बनवावे. स्त्रीपक्षाची निंदा होईल, असे वागू नये.

**४६९१** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१)

वाळकेश्वरजवळच्या कचेरीसाठी एक रस्ता बांधला. त्यासाठी १३५० रुपये खर्च झाले.

**४६९२** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

सन १८५६ मध्ये मुंबईत व कुलाब्यात १५७८३ मेले. पैकी २१५१ पटकीने गेले.

**४६९३** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

बंडाचा पुढारी नानासाहेब पेशवा यास पकडणारास ५० हजारांचे बक्षीस जाहीर झाले.

**४६९४** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

बंगालच्या टाकसाळीतून तिजोरीत दररोज ३ लाख रुपये भरण्याचा हुकूम झाला.

**४६९५** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

इंग्रज सोल्जर वाटेल त्यास भोसकतात. म्हणून त्यांना बंदुकाऐवजी सोटे दिल्हे आहेत.

**४६९६** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

पोर्तुगीज वकिलाच्या गाडीखाली रामा अंतोबा मरण पावला.

**४६९७** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

मुंबईतील विहिरी व तलाव यांच्या स्वच्छतेसाठी १२९३ रु. खर्च झाला.

**४६९८** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

अमदाबादेत १८ बंडखोरांना मृत्युदंड दिल्हा गेला.

**४६९९** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५१–३५२)

मुंबईच्या टापूतून दुसऱ्या ठिकाणी जाणारास 'पासनोट'ची सक्ती झाली.

**४७००** (१६ : २२, १९ नोवेंबर ५७, ३५२)

जाहीरनामा : मुंबईचे पोलीस कमिशनर उइलिम क्राफर्ड कळवितात की : कोणीही रस्त्यावर अगर गल्लीत जमाव करू नये. लोकांनी पायी चालताना किंवा वाहन नेताना रस्त्याची डावी बाजू सोडू नये, धर्मासंबंधी जमाव जात असला, तर वाद्ये वाजवू नयेत. प्रार्थनामंदिराजवळ गोंगाट करू नये. हे नियम मोडणारांना कायद्यानुसार शिक्षा होईल.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

**४७०१** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३५३–३५९)

'वाचणारा' लिहितो की : यमुनापर्यटन हे मराठी भाषेतले उत्कृष्ट असे पहिलेच पुस्तक आहे. या ग्रंथाने हिंदू चालींची माहिती मिळते. पण बाळ्याच्या पुस्तकास प्रस्तावना लिहिल्याबद्दल दादोबांना रोष सोसावा लागला. 'ईश्वरच जुलमी लोकांना शिक्षा करील,' असे एक वाक्य त्यात असल्यामुळे लोक नाराज झाले. या ग्रंथाची भाषा चांगली नाही, असा एक आक्षेप आहे. पण ही लेखकाची मूळ भाषा आहे. ख्रिस्ती होऊन तिच्यात काहीही फरक पडलेला नाही. छपाईच्या चुका, हस्तदोष, नजरचूक, हेही लक्षात घ्यावे. यात बीभत्स गोष्टी आहेत, असा दुसरा आक्षेप आहे. पण असंभाव्य असे काहीच नाही. बयाची व अर्जुनाची गोष्ट खरीच आहे. मुद्दाम बायकांकरिता करविलेले नाच पुष्कळांना ठाऊक आहेत. द्वेषबुद्धी सोडून वाचलेत, तर यात बीभत्सपणा आढळणार नाही. काहीजणांना यातली ख्रिस्ती धर्माची मते पसंत नाहीत. पण स्त्रियांच्या पारलौकिक सुखाचा विचार करता त्यात गैर काहीच नाही. स्वतःच्या धर्ममतरूप दिव्याने लेखकाने सगळे वातावरण उजळून टाकले. या देशातील स्त्रीवर्ग सुशिक्षित, सद्गुणी, सुखी व भक्तिमान झाला पाहिजे, असेच लेखकाचे मत दिसते.

**४७०१ अ** (इंग्र · ३५९–३६१)

**४७०२** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६१)

राजश्री विष्णु पुराणिक यास ताप येऊन तो एकाएकी मरण पावला.

**४७०३** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६२–३६३)

देवाने आपल्या कपाळावर काढलेल्या रेषांप्रमाणे आपणास सुखदुःख भोगावे लागते, असे लोक समजतात. दारिद्य हा मागील जन्माच्या कृत्याचा परिपाक मानतात. पण ही गयाळ समजूत आहे. आपले गुण व आचरण यांवरून आपले नशीब ठरते. एक घटिका काम करावे आणि दोन प्रहर चकाट्या पिटाव्या, असा पुष्कळांचा क्रम दिसतो. तापट स्वभाव, व्यसन, गाफिलपणा, दगलबाजी, या दुर्गुणांमुळे जर आपले हाल झालेच, तर नशिबास दोष देणे योग्य ठरते काय? मेहनत, खरेपणा, अब्रूची चाड, हे गुण सद्गुणी मनुष्यास बुरुजाप्रमाणे आहेत. सोंगट्या - दारू - जुगार यांत मग्न राहणारांचे नशीब सांगण्याला ज्योतिषी नकोत. आळश्याच्या घराकडे क्षुधा वारंवार डोकावत असते.

**४७०४** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६३)

'संहार त्वरित इच्छिणारा' पत्रात म्हणतो की : बंडाच्या अनर्थास बलाढ्य इंग्रेज सरकार खंबीरपणे तोंड देत आहे. जीवनातील शांती व समाधान जाऊन अस्वस्थता आणि भय वाढत आहे. निर्दयांची व दुष्टांची मने सैतानाच्या भुलीने भुलली आहेत. शेवटी बंडवाल्यांना पश्चात्ताप होईलच. राजद्रोहाच्या गुन्ह्यांना ते शिक्षा करतील. बंडाचा झेंडा उभारून लूटमार करणारांना परागंदा व्हावे लागेल. सध्या अनेक दुष्टांचा संहार होत आहे. धोंडोपंत ऊर्फ नानासाहेब पकडला गेला, अशी कुणकुण आहे, पण खचीत बातमी नाही.



H-160—45

**४७०५** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६४–३६५)

'ज्ञानोदय वाचणारा' लिहितो की : हिंदुशास्त्रात जातिभेद नाही. ब्रह्मदेवानेच चार वर्ण निर्माण केले. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, हे गुणकर्मानुसार तयार झाले. वहिवाट अशी दिसते की, वर्णसंकर होतो. ब्राह्मण व्यासापासून पंडू हा क्षत्रिय स्त्रीचा पुत्र जन्मला. इंद्र हा देव, पण कुंतीचा पुत्र अर्जुन, त्याजपासून झाला. शृंगऋषी हरिणीचा पुत्र होता. वाल्मीकी कोळी असता, ब्राह्मण म्हणविला गेला. सृष्टीत फक्त पुरुष व स्त्री अशा दोनच जाती आहेत. ख्रिस्ती प्रेषित म्हणतात की, सगळ्या माणसांचे रक्त एकच आहे. याकरिता मनुष्यकृत जातिव्यवस्थेचा त्याग करावा.

**४७०६** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६५)

कित्येक भिक्षुक स्नान न करता धोंडभटी करून यजमानकार्यास जातात. यजमानास काहीच ठाऊक नसते, म्हणून दोष आश्रिताकडे जातो. यामध्ये परमेश्वराची गैरमर्जी आणि कायमचे अकल्याण आहे. आळस व थंडी यांची भीती सोडून ब्राह्मणांनी दररोज स्नानसंध्या करावी. मलिनता झाडून टाका.

**४७०७** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६५)

भुलेश्वराच्या देवळात एका लिंगार्चनी बावाने चौदा अनुष्ठाने सुरू केलेली असून २९० ब्राह्मणांस निमंत्रित केले आहे. भाटे सावकारांनी मोठी शिधासामग्रीही दिली आहे. मेहनतीने अनुष्ठान केले, तर ईश्वर चांगले फळ देईल. पण यावर ख्रिस्ती शास्त्र सांगते की, कल्पित देव पृथ्वीवरून नाहीसे होतील.

**४७०८** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६६)

इराणी लढाईत मेलेल्या इंग्रज सरदारांचे पोषाक व शस्त्रे ही जमिनीमध्ये पुरलेली आहेत. दोन चोर जनरल स्टाकरच्या थडग्याजवळ गेले व त्यांनी दगड खणून काढले. पण हे लोभी चोर घायाळ झाले. एक मेला. दुसरा पळाला !

**४७०८अ** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६७)

अप्पासाहेब कागवाडकर, संस्थान शेडवाळ यांना दीड लक्षाची पेन्शन होती. ते अर्धांगवायूने वारले. ते दानशूर व विद्वान होते. त्यांस पुत्रसंतान नाही. दक्षिणेमधील इतर संस्थानांपैकी मिरजकर व कुरूंदवाडकर यांस मात्र पुत्र आहेत. सांगली, मिरज, जमखिंडी, कुरुंदवाड, मुधोळ, धारवाड, वगैरे संस्थानिकांना १५ लक्ष १५ हजाराच्या नेमणुका आहेत.

**४७०९** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६७)

देबार नावाचे मोठे गलबत आस्ट्रेलियन बंदरात फुटले. त्याचे वजन १९८० टन असून त्याची किंमत ३ लाख रुपये होती. इंग्लंडमधून एका खास आगबोटीद्वारे लाखो रुपयांचे रुपे व सोने रवाना झाले.

**४७१०** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६८)

१८४८ मध्ये कॅलिफोर्नियात प्रथम सोन्याची खाण सापडली. तेव्हापासून ६४ कोटी ३२ लाखाचे सोने मिळाले, तर आस्ट्रेलियात ४१ कोटी ६३ लक्ष रुपयांचे सोने मिळाले.

**४७११** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६८)

मुंबई बँकेने पोलिसांना बक्षीस देण्यासाठी कमिशनर फोर्जेट यांच्याकडे ३ हजार रुपये दिल्हे. खोट्या नोटांचे गुन्हेगार तुक्या विठू याची खबर देणाऱ्या खुशाल ब्राह्मणास त्यांनी २ हजार, तर इन्स्पेक्टर अकबर अली यास एक हजार बक्षीस दिल्हे.

**४७१२** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६८)

गोट्ट हे द्विदल धान्य हिमालयाच्या प्रांतात प्रसिद्ध आहे. गोट्टची शेंग गवारीच्या शेंगेसारखी असते. टरफल काढून मगज दळल्यावर भाकरी व झुणका तयार होतात.

**४७१३** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६८)

दखणात व गुजराथेत हळशी ही तेल बी लावतात. हे बी भाजून खाल्ले तर त्याची चटणी होते. हजारो खंडी हळशी विलायतेस जाते. तेथे यंत्रास लावण्यासाठी तिचे तेल काढतात. घोड्यांस घालतात.

**४७१४** (१६ : २३, १ दिसेंबर ५७, ३६८)

अमेरिकेत चार्टर ओक नावाची ४० फुटी बोट न्यूयॉर्कपासून लिवरपूल येथे जाण्याकरिता बांधली आहे. तुफानी वाऱ्याची तिला किमपी भीती नाही.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## ज्ञानोदय, पुस्तक १६, अंक २४, मुंबई, १५ डिसेंबर १८५७

४७१८ (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३६९–३७४)

प्रत्येक कामाचे फळ असते. झाडाचे पान हलले, तरी त्याचा काही परिणाम होतो. ख्रिस्ताच्या येण्याकडून काही चांगली फळे मिळाली. येशूच्या येण्याने विश्वासणारांना नवा जन्म प्राप्त होतो. विषयसुखात रमलेल्यांना हे कळत नाही. अरण्यात गेल्यामुळे मोक्ष मिळतो, असेही काही समजतात. येशूवर भाव ठेवला की, शुद्ध व पवित्र गोष्टी आवडतात. पवित्र आचरणाचा कित्ता त्याने दिल्हा. अशुद्धांना शुद्ध व सूडकऱ्यांस क्षमाशील असे बनविले. धर्मावर विश्वासणारे परस्पर प्रीतीने बांधले जातात. अनुपम प्रीत व ऐक्यभाव त्यांच्यामध्ये दिसतात. शृंगारिक व बीभत्स बोलणारे निषेध पावून लाजतात. सगळे लोक प्रबोधित होतात. आता सुखाच्या युगाची सगळे वाट पहात आहेत. मग कालवड आणि अस्वल एकत्र चरतील. सिंह बैलासारखा गवत खाईल. पृथ्वी परमेश्वराच्या ज्ञानाने भरेल. परिपूर्णतेची वेळ आता जवळ येत आहे.

४७१९ (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३७४)

कोल्हापूर येथे नुकतेच बंड झाले, परंतु कर्नेल जेकबसाहेब यांनी आपल्या पराक्रमाच्या जोरावर ते लगेच मोडून टाकले. ८ जण मारले, ५० कैद केले. कोर्टमार्शल भरवून ३६ जणांना राजवाड्यासमोर मरणाची शिक्षा दिल्ही. मुधोळ व हळगुळी येथे हजार बंडवाले होते. पण कार आणि मालकम यांनी त्यांचा अगदी मोड केला. जनरल हावलाक मात्र मरण पावले.

**४७१७** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३७५–३७७)

'एक मित्र' आपल्या पत्रात म्हणतात की : ब्रह्मचारी बावांनी काही गोष्टींचा खुलासा करावा. ते ठाणे जिल्ह्याचे असता, मुंबईत प्रगट कसे झाले? आपल्या साधुत्वाची त्यांनी खात्री पटवावी. ते समजतात की, हिंदू धर्माच्या क्षयावर जाज्वल्य औषध आपण देऊ शकू. पण तो मनुष्यस्थापित धर्म आहे. चैनबाज, व्यभिचारी, तमासगीर, खोटारडे, असे लोक तुमच्या सभेस येतात. पण त्यांनी अनाचार सोडला काय? मूर्तिपूजेबद्दल बोलता बोलता आपण स्वतः मूर्ती होऊन बसणे अयोग्य होय. आत्मानात्मविचार नक्की केव्हा सुरू झाला, तेही त्यांनी सांगावे. बावा वाममार्गी पंथाचे अभिमानी आहेत, हेही सर्वश्रुत आहे. या सर्व प्रश्नांबाबत त्यांनी सावधानचित्ताने स्पष्टीकरण द्यावे.

**४७१८** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३७७-३७८)

'पुराणिक व कीर्तने यांची स्थिती दाखविणारा' लिहितो की : विष्णु पुराणिक हा अत्यंत अनीतिमान होता. मुसलमान वेश्येकडे जाण्याच्या छंदामुळे त्याने अनेक वेळा भेंडीबाजारात मार खाल्ला. सुंदर मनुष्यपण व ऐटबाज पोषाख यांनी तो बैलाचा भाऊ बनला होता. कोणाच्या तरी ओट्यावर बसून स्त्रियांवर नजर ठेवीत असे. अनेक स्त्रियांना त्याने नादी लावले. नवराबायकोत बखेडे निर्माण केले. 'यमुनापर्यटन' कादंबरीमध्ये याच विष्णु पुराणिकाचे वर्णन आहे. तो शाक्तपंथी असून विकेशा विधवांशी व्यभिचार करीत असे. असला दुर्गुणी माणूस गेला, म्हणजे एक व्याधी गेली.

**४७१९** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३७८–३८१)

'एक स्थानवासी बाई' लिहिते की : मोहाडी गावच्या एका सात वर्षांच्या मुलाचा दागिन्यापायी खून झाला. डागिणे घालण्यापासून फारच संकटे येतात. इंग्रज सरकारने अशा स्पष्ट सूचना दिलेल्या आहेत. शरीर दागिन्यांनी शोभिवंत करण्यापेक्षा सद्गुणरूप दागिन्यांनी मनाला सजवावे. परवा मुंबईत दोन शतकांपूर्वीची एक विहीर उकरली, तेव्हा लहान मुलाच्या अस्थी मिळाल्या. त्या दुर्दैवी बालकाचा अंत अशाच काही प्रकारे झाला असावा. शिकलेल्या सुधारक लोकांनी तरी दागिने घालण्याचा मोह टाळावा. खरेपणा व सदाचरण यांची मुलांना दीक्षा द्यावी.

**४७२०** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३८१–३८३)

या देशाला हिंदुस्थान म्हणतात. बहुमानाने उत्तरेकडील प्रांताना हे अभिधान लावतात. हिंदूचा अर्थ काळा असा आहे. हिंदू हा शब्द इजिप्त या शब्दावरून आला, असे काहींचे मत आहे. आर्यावर्त ही मात्र मर्यादित संज्ञा आहे. कारण फक्त त्रैवर्णिकांनाच आर्य म्हणतात. वान्स केनेडीने संशोधन करून असे दाखविले की, युरोपियन भाषा व संस्कृत यांमध्ये कमालीचे साम्य आहे. इराणी भाषेशीही साम्य आहे. आर्यांची आद्यभूमी अशिया व युरोप यांची मध्यभूमी होती, असा अनेकांचा कयास आहे. प्राचीन इराणींना ऐर्यपैती म्हणत. ऐर्य वरून आर्य शब्द तयार झाला. प्राचीन आर्य इराणातून भारतात आले असावे. सर विलियम जोन्सनेही या मतास पुष्टी दिलेली आहे. बायबलच्या उत्पत्तिपुस्तकात म्हटले आहे की, याफेताचा मादी नावाचा पुत्र होता. त्याच्या वंशजांनी इराणमध्ये वसाहत केली. या लोकांना आर्य म्हणत असत ! शेमचा पुत्र ओफीर याच्या नावावरून इराणी लोक भारतास ओफीर म्हणत असत. भारताची वसती ईश्वराच्या वचनाप्रमाणे झाली.

**४७२१** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३८३–३८४)

स्वीडनचा राजा गस्टेबस घोड्यावरून फिरत असता, त्याला एका विहिरीवर एक देखणी मुलगी पाणी काढताना दिसली. राजाने तिला स्वतःबरोबर शहरामध्ये येण्याचा सल्ला दिला, तेव्हा तिने स्पष्ट सांगितले की, माझ्या आजारी आईला सोडून मी कोठेही जाणार नाही. तिची मातृभक्ती पाहून राजा तिच्या आईला भेटला. एक पैक्याची पिशवी देऊन म्हातारीस जन्मपर्यंत पेन्शन मिळण्याचीही व्यवस्था केली. म्हातारीच्या मृत्यूनंतर मुलीसही वेतन मिळावे, असा हुकूम दिल्हा.

**४७२२** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३८४)

आमच्या ऐकण्यात चांगल्या आधारावरून आले आहे कीं : त्र्यंबकेश्वर, परशुराम व पुण्यानजीक पाषाण म्हणून एक गांव आहे. अशा तिन्ही संस्थानांचे वर्षासन कंपनी सरकारने बंद केले आहे.

**४७२३** (१६ : २४, १५ डिसेंबर ५७, ३८४)

नामदार गवरनर जनरल यांनी बिहार प्रांतात २० डिप्टीकलेक्टर आणि माजिस्त्रत यांची गैरसनदी पद्धतीने नेमणूक करण्याचे ठरविले आहे.

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

## सूची

### धार्मिक :

## धर्मप्रसार :

## शैक्षणिक, शिक्षणसंस्था, परीक्षा वगैरे :

## विज्ञान, संशोधन, कला वगैरे :

## प्राणि, पशु-पक्षी, वृक्ष वगैरे :



## इतिहास, भूगोल, खगोल वगैरे :

## भूगोल :

### लोकस्थिती :

## प्रजा व सरकारी कारभार :

## आरोग्य :

## पत्रव्यवहार :

होळीविषयी महादेवशास्त्रीचे भाषण ३४७१ (३४७१ अ).

बातम्या :

अक्कलकोटच्या राजाचा मृत्यू ४५७५.
अठरा बंडखोरांना फाशी ४६९८.
अद्‌भुत चमत्कार ४५६९.
अर्देशिर फरामजीविषयी ४२७७.
अनंत चंद्रोबा २३२०.
अनीतीचे फळ २९३३.
अपराध्यास शिक्षा २३७०.
अप्रिंटिस पद्धत ३७२४.
अफिणीचा व्यापार ३१९९, ३६०२ (३६०२ अ), ३६३६.
अभद्र भाषणाची पुस्तके विकण्याची बंदी ४०३८.
अम्मल करणे वाईट याविषयी मराठी भाषेत लहान पुस्तके ३७६७ (३७६७ अ).
अमेरिकेविषयी २०६४, २२४८, २३०९, २८४२, ३१७३, ३१७७, ३८५१, ३८५२, ४४३४.
अलिगडला धरणीकंप झाला ३९३९.
अलिबागचा संन्यासी ३३९७.
अयोध्येच्या राजाची नेमणूक २८९८.
अयोध्या व इंदूर खालसा होणार ४१४८.
अयोध्येचे उत्पन्न ४३८४.
अयोध्येची जहागिरी ४४३९.
अयोध्येत लांडग्यांचा धुमाकुळ ४४४९.
अलि मुरादखान अमीर खैसूर याची बेअब्रू २४२९.
अहमदनगर एथील म्युझिअम ४४८६.
अंत्यजाची आत्महत्या ३५२०.
आकोल्यांत दरवडा ४६०३.
आगकाड्यांचे उत्पादन ३७६५.
आगीची गाडी ४२३२.
आग्र्याचा गवरनर ३१९७.
आलनच्या तजबिरा ३७४०.
आफिरका खंडातल्या दक्षिण प्रांतातील लढाई २३८३.
आस्त्रियाविषयी २३९४, २९०८.
आस्त्रेलियाविषयी २६२२, ४४७९.
इन्स्तटूशन मंडळी ४३१८ (४३१८ अ).
इराणविषयी ३३८९, ४३२५, ४४०५, ४४३१, ४५५०, ४६२१, ४६३२, ४७०८.
इलेक्ट्रिक टॅलिग्राफ ३३२३, ३४६३.

संपादकीय :

स्थलनाम :

## व्यक्तिनामसूची :

## प्रकाशने व प्रकाशननिर्मितीसंबंधी : पुस्तके :

## नियतकालिके :

(जेथें तत्व, महत्व असे छापलेले असेल, तेथे तत्त्व, महत्त्व असे वाचावे)

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ७ | १८ | अस्तित्वात | असित्तांत |
| १० | ३ | दुर्व्यसनापासून | दुर्व्यसनांपासून |
| १३ | २२ | त्यास | त्यांस |
| १४ | ८ | भाषांतर त | भाषांतरात |
| १४ | ११ | रावजी शास्त्री | रावजीशास्त्री |
| १७ | २ | यात्रेकरूमध्ये | यात्रेकरूंमध्ये |
| १७ | १५ | गोदावरीच्या | गोदावरी |
| २३ | ११ | काही एकास | कांहीं एकांस |
| २३ | १४ | दिक्षा | दीक्षा |
| २९ | १५ | रोमनावर | रोमनांवर |
| ३० | ६ | ७ हजाराची | ७ हजारांची |
| ३३ | ४ | उर्दू अनुवाद. सनदा | उर्दू, अनुवाद-सनदा |
| ३५ | ७ | तांबूल भक्षण | तांबूलभक्षण यांची प्राप्ती होते |
| ४१ | ४ | चैतन्य स्वामी | चैतन्यस्वामी |
| ४३ | ५ | माहीम ते कल्याण | माहीम ते ठाणे व ठाणे ते कल्याण |
| ४९ | २२ | मूर्तीवर | मूर्तींवर |
| ५३ | १८ | निबंध लेखकास | निबंधलेखनास |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ९३ | १६ | ढोंग नास्तिक | ढोंगनास्तिक |
| ६६ | ६ | सदाचरणाऱ्या | सदाचरणाच्या |
| ७७ | १२ | शब्दांलंकारादि | शब्दालंकारादि |
| ८८ | ७ | मनां माजी | मनामाजी |
| ९२ | २ | पंख व शेपूट | पंख लांडे असतात व शेपूटही |
| ९९ | २ | स्त्रीपुरूषांना | स्त्रीपुरुषांना |
| १०१ | ७ | राहिले. तर | राहिले, तर |
| १०५ | ७ | छापला | छापले |
| १२३ | १३ | हत्यांचेप्रमाण | हत्यांचे प्रमाण |
| १३३ | १२ | परीक्षामाजीस्त्रेटचे | परीक्षा माजिस्ट्रेटचे |
| १३७ | १५ | मर्दुमइतकीच | मर्दुमकी यांच्या-इतकीच |
| १४५ | ३ | नाहीसे होईल | नाहीशी होतील |
| १६६ | १३ | मतवाईट | मत वाईट |
| १६७ | १४ | स्नात | स्नान |
| १६७ | २० | आक | आव्ह |
| १७२ | १३ | त्याना | त्यांना |
| १७४ | १६ | यास | यांस |
| १९१ | ५ | तरुणावर | तरुणांवर |
| १९३ | ६ | अपटे | आपटे |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| १९६ | ७ | कुपर साहेबांनी | कुपरसाहेबांनी |
| १९७ | ४ | मिचेल साहेब | मिचेलसाहेब |
| २०२ | १७ | (ज्ञानप्रकाशवरुन) | (ज्ञानप्रकाशवरून) |
| २०४ | १६ | जीरोद साहेब | जीरोदसाहेब |
| २०४ | १६ | विद्युतविद्येविषयी | विद्युत्‌विद्येविषयी |
| २०७ | ८ | गलिप्रदान | गालिप्रदान |
| २०७ | १८ | वॉलिस साहेब | वॉलिससाहेब |
| २०८ | २ | पाटन साहेब | पाटनसाहेब |
| २०८ | ५ | शास्त्रवर्जुन | शास्त्र वर्जुन |
| २१० | ३ व ५ | चिनारी | चितारी |
| २१२ | ४ | हैदराबादेस | हैदराबाद, असे |
| २१२ | १६ | केवळेश्वरमत | केवलेश्वरमत |
| २१४ | ३ | वेदांत मतखंडनावर | वेदांतमतखंडणावर |
| २१६ | २० | नाहीसे | नाहीशी |
| २१८ | १४ | राहाणार | राहणार |
| २१९ | १० | चांडालाप्रमाण | चांडालाप्रमाणे |
| २२० | १२ | राहतात | राहातात |
| २२४ | १२ | सरकाराच्याने | सरकारचे |
| २३१ | १५ | स्त्रा | स्त्री |
| २४० | ८ | बक्षीसे | बक्षिसे |
| २४३ | ३ | आहे | आहो |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| २४९ | ११ | आपल्या | आपापल्या |
| २५० | १५ | सुर्योदयच | सूर्योदयच |
| २५४ | १८ | अधिकार आहे | अधिकारी आहेत |
| २५७ | २२ | बीलाचे | बिलाचे |
| २६२ | ४ | मिठांवरील | मिठावरील |
| २६८ | ९ | महमदनीवार्ता | महमदनी वार्ता |
| २७० | ६ | सांगेदास | सांगे दास |
| २७६ | १५ | जोती ऐवजी | जोतीऐवजी |
| २८४ | ११ | मृत्युचे | मृत्यूचे |
| २८६ | ७ | गुरूत्व | गुरुत्व |
| २८७ | १४ | रूष्ट | रुष्ट |
| २९१ | २२ | एक | एका |
| ३०६ | १३ | बेळगावशहराचे | बेळगाव शहराचे |
| ३०८ | १३ | गवरनर साहेबांनी | गवरनरसाहेबांनी |
| ३११ | १२ | एकनाथ स्वामी | एकनाथस्वामी |
| ३१२ | ७ | व कृती | व त्यांची कृती |
| ३१४ | १३ | कुंभार तुकडयाजवळ | कुंभारतुकडयाजवळ |
| ३२३ | ८ | बदी | बंदी |
| ३२३ | १८ | शंकर शास्त्री | शंकरशास्त्री |
| ३२४ | १५ | : परिभाषा | भाग २–परिभाषा |
| ३२५ | २ | पार्लमेंट सभेत | पार्लमेंटसभेत |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ३२५ | ८ | जैन पद्धतीचा | जैनपद्धतीचा |
| ३२७ | ८, ११, १३, १५ | १३ मार्च | १५ मार्च |
| ३२९ | १४ | अडरसनसाहेब | अंडरसनसाहेब |
| ३३५ | १७ | जातीत | जातींत |
| ३३६ | ५ | एल्फिन्स्तन साहेबांचा | एल्फिन्स्तनसाहेबांचा |
| ३४० | ११ | नाही | नाही. |
| ३४० | १८ | द्यावे | द्यावे. |
| ३४५ | ७ | महाराजाचा | महाराजांचा |
| ३४५ | १४ | मिळाले | मिळाली |
| ३४६ | १२ | जातीत | जातींत |
| ३५१ | ३ | इस्त्रायलीवर | इस्त्रायलींवर |
| ३५१ | २० | नसावा | नसावी |
| ३५८ | ९ | सुधारण | सुधारणा |
| ३६२ | ३ | आला आहे | आली आहेत |
| ३६२ | १३ | गलबतातून | गलबतांतून |
| ३६७ | ४ | नवव्यावर्षी | नवव्या वर्षी |
| ३६८ | १७ | ब्रह्मवृंदानी | ब्रह्मवृंदाने |
| ३७१ | ३ | भाषांतरीत | भाषांतरित |
| ३७२ | २ | केला | केली |
| ३७६ | ४ | होते | होत |
| ३८० | १७ | नावाचे | नावाने |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
| --- | --- | --- | --- |
| ३८१ | ५ | सुधारीत | सुधारित |
| ३८४ | १६ | खंडीचे | खंडींचे |
| ३८७ | ६ | दिवसात | दिवसांत |
| ३८८ | ४ | ते . . . लागले | ती. . . .लागली |
| ३८९ | १७ | फरेजर साहेबांनी | फरेजरसाहेबांनी |
| ३९१ | १५ | श्राद्ध विधीचा | श्राद्धविधीचा |
| ३९७ | १८ | विजया दशमीचा | विजयादशमीचा |
| ३९७ | २० | रेणुका देवीचे | रेणुकादेवीचे |
| ३९९ | ७ | पिवळसत | पिवळसर |
| ४०० | ४ | ते | तो |
| ४०० | २१ | इमामास | इमामसाहेबास |
| ४०२ | ४ | नाही | नाही. |
| ४०४ | ११ | बंदोबस्तासाठी | बंदोबस्ताने |
| ४०५ | ३ | रागावतात | रागावतात, |
| ४०५ | २१ | देवांचा | देवाचा |
| ४१० | २ | निघाले, | निघाले. |
| ४१५ | ७ | मिचलसाहेबाकडे | मिचलसाहेब यांजकडे |
| ४१८ | ७ | असते, | असते. |
| ४२२ | ८ | असेही | ही |
| ४२२ | १४ | रूक्मिणी | रुक्मिणी |
| ४२२ | २३ | जातीचे | जातींचे |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ४२३ | १२ | इंजनेर लोक | इंजनेरलोक |
| ४२६ | ७ | अफिरकेतील | आफिरकेतील |
| ४२७ | २३ | आठवठ्यास | आठवड्यास |
| ४३० | १३ | श्रीमंताना | श्रीमंतांना |
| ४३३ | १४ | अणखी | आणखी |
| ४३४ | ८ | आहे | आहे. |
| ४३५ | २२ | गाढवाइतकी सुद्धा | गाढवाइतकीसुद्धा |
| ४३७ | १५ | पाद्री लोकांमुळे | पाद्रीलोकांमुळे |
| ४३७ | १९ | पाद्री लोक | पाद्रीलोक |
| ४३९ | २२ | आकाशलोका | आकाशलोकात |
| ४४० | ७ | डैम्लर साहेब | डैम्लरसाहेब |
| ४४० | १२ | सोल्जर लोकांसही | सोल्जरलोकांसही |
| ४४७ | २ | ब्राह्मण लोक | ब्राह्मणलोक |
| ४५४ | ४ | नारळाचा | नारळांचा |
| ४६० | ९ | मायखळचा | मायखळचाच्या |
| ४६१ | २१ | मृत्युनंतर | मृत्यूनंतर |
| ४६५ | ५ | ट्रकट | ट्रॅक्ट |
| ४७८ | १७ | मनसंकल्पाची | मन:संकल्पाची |
| ४८१ | १७ | अवाच्या | अवाच्य |
| ४८५ | ८ | निर्माण होतात, | निर्माण होतात. |
| ४८९ | १० | टाप्रिबेण | टाप्रीबेण |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ४९१ | १४ | प्रमाण दंड | प्रमाणदंड |
| ४९४ | २ | कार्लेगावी | कार्ले गावी |
| ४९९ | ११ | उड्ल्सन | उड्ल्सन |
| ५०१ | १२ व १३ यांच्यामध्ये खालील दोन ओळी वाचाव्या. | | |

अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, टी. ग्रॅहॅम, प्रिंटर

ज्ञानोदय, पुस्तक १४, अंक २१, मुंबई, १७ नोव्हेंबर १८५५

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ५०५ | १ | : २४, | : २२, |
| ५१४ | ५ | काहा | काही |
| ५३० | ६ | लोकात | लोकांत |
| ५३३ | ७ | प्रत्येकास | प्रत्येकास |
| ५३५ | १२ | बडचारी | बदचारी |
| ५३६ | २ | कर्णेद्रिय | कर्णेंद्रिय |
| ५३९ | ५ | पिशाच रूप | पिशाचरूप |
| ५४० | १४ | इद्रियदमनाने | इंद्रियदमनाने |
| ५४४ | ८ | झडतील | झटतील |
| ५४७ | २३ | कहाण्याप्रमाणे | कहाण्यांप्रमाणे |
| ५४९ | ६ | यहोवा | यहोवा |
| ५४९ | १७ | सदसदविचार | सदसद्‌विचार |
| ५४९ | २७ | सोसायटी पुढे | सोसायटीपुढे |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ५५१ | ३ | साधनावरोबर | साधनांबरोबर |
| ५५१ | ४ | आहे | आहेत |
| ५५१ | ५ | तारण आहे | तारण आहे. |
| ५५७ | ५ | असते | असते. |
| ५५७ | १७ | येशू-निष्कपट | येशू निष्कपट |
| ५६२ | ११ | आ मा | आत्मा |
| ५६५ | १८ | आणि | आणि जे |
| ५६६ | ९ | त्याजर | त्याजवर |
| ५६६ | १० | हवा | हवे |
| ५६६ | १५ | सत्यतेच | सत्यतेचे |
| ५६७ | ४ | रोग | रोग-- |
| ५६७ | ९ | मारावा | मरावा |
| ५६९ | १५ | माजते | माजतात |
| ५७२ | २३ | चैंनी | चैनी |
| ५८८ | ७ | कळला | कळली |
| ५९० | १६ | सद्सदविवेकबुद्धी | सदसद्विवेकबुद्धी |
| ५९१ | १८ | डिमास्थितीसप्रमाणे | डिमास्थितीसप्रमाणे |
| ५९३ | १४ | देवाचा | देवाच्या |
| ५९४ | ९ | आत्म्यची | आत्म्याची |
| ५९८ | १२ | विश्रांती | विश्रांती, |
| ६०५ | ६ | यावर | यांवर |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ६०५ | ९ | झाली. . . मिळविले | झाली,. . . .मिळविले, |
| ६०९ | ९ | करावीत, | करावीत. |
| ६१० | २ | परांकलीन साहेबाचे | परांकलीनसाहेबाचे |
| ६१० | ३ | प्रयत्य | प्रयत्न |
| ६१० | २४ | दिडनाली येते. | छिनाली . . . येतात. |
| ६११ | ६ | ११ | १० |
| ६१३ | ८ | भयाने व कापण्याने | भयानें व कांपण्यानें |
| ६१५ | ४ | देविडसन साहेबाकडे | डेविडसनसाहेबाकडे |
| ६१७ | ४ | आपणास | आपणांस |
| ६१९ | ५ | स्थिती | ख्रिस्ती |
| ६२३ | ३ | डेविडसन साहेबाकडून | डेविडसनसाहेबाकडून |
| ६२६ | १५ | भय थरकाप | भय, थरकाप, |
| ६२७ | ४ | सोसला | सोसली |
| ६२७ | २१ | सणच्या | सणाच्या |
| ६२८ | १८ | गर्भपातामुळे जलोदर | गर्भपातामुळे झालेल्या जलोदर रोगास पाणपोय घालावी |
| ६३२ | १७ | २४ | २५ |
| ६३२ | २० | शदावर | रादविर |
| ६३३ | १, १३, २३, २५ | २४ | २५ |
| ६३३ | ३ | आपणास | आपणांस |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ६३४ | १ | २४ | २५ |
| ६३९ | ९ | आर्शीवाद | आशीर्वाद |
| ६३९ | १७ | आर्शीवाद | आशीर्वाद |
| ६४१ | २६ | निबंध मंडळीनेही | निबंध करणाऱ्या मंडळीनेही |
| ६४५ | १५ | होते | होत |
| ६४६ | २ | की | की : |
| ६५० | ११ | निद्राकाल खेरीजकरून | निद्राकालखेरीजकरून |
| ६५० | १३ | तुम्हास | तुम्हांस |
| ६५१ | १७ | त्याना | त्यांना |
| ६६० | ९ | वाटाणी | वाटणी |
| ६६१ | ९ | देवाची | देवाशी |
| ६७२ | ७ | प्यारव्यांक साहेबांनी | प्यारव्यांकसाहेबांनी |
| ६७२ | १६ | आले | आले. |
| ६७५ | १३ | त्यापैकी | त्यांपैकी |
| ६७५ | २० | चीच बंदरावर | चीचबंदरावर |
| ६७६ | १९ | गुलाबसिग महाराजांचा | गुलाबसिग-महाराजांचा |
| ६७९ | १८ | अगावरती | अंगावरती |
| ६८१ | २ | श्रावन | श्रावण |
| ६८१ | ३ | सूत मिश्रीत | सूतमिश्रित |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | वाचावे |
|---|---|---|---|
| ६८१ | ८ | पारशी | एका पारशी |
| ६८४ | २५ | अफवावर | अफवांवर |
| ६८६ | २२ | झाला. | झाला, |
| ६९६ | २ | २ | १ |
| ६९७ | १ | २ | १ |
| ६९७ | १८ | २ | १ |
| ६९८ | १ | २ | १ |
| ६९८ | ९ | २ | १ |
| ६९९ | ५ | वा | या |

